मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला

पुस्तक ७६ वें.



# माझा यूरोपांतील प्रवास.

हें पुस्तक

डॉ. प्रो. पांडुरंग दामोदर गुणे, एम्. ए., पीएच्. डी.,

यांनीं लिहिलें.



[ प्रथमावृत्ति. ]



प्रकाशकः

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव-मुंबई.



िमत १-४-०. ]  [ १९१५.

# प्रस्तावना.

मी जर्मनींत असतांना उन्हाळ्याच्या वगैरे ज्या सुट्या मला मिळत, त्या मी प्रवासांत घालवीत असें. हा प्रवास जर्मनी, स्वित्सरलंड, इटाली, पश्चिम ऑस्ट्रिया व अंशतः फ्रान्स आणि इंग्लंड या देशांतून झाला. निरनिराळे लोक, त्यांच्या चालीरीति, लहानमोठीं शहरें, त्यांतील ऐतिहासिक व इतर दृष्टींनीं पाहण्यासारखीं स्थळें, आल्प्स् पर्वत, त्यांतील व इतर ठिकाणचीं सरोवरें, नद्या वगैरे पाहून मनाला जें वाटे, तें मी माझे शिष्य व आप्त कै. शंकर विनायक चौकर यांस, व रा. द. कृ. मोहनी, हल्लीं हेडमास्तर, वर्धा, यांनां पत्रद्वारा कळवीत असें. हीं पत्रें येतील तशीं 'फर्गसन कॉलेज त्रैमासिकांत' निवड करून छापवावीं, अशी या दोघांची मनीषा त्यांनीं मला कळविली होती. पण १९१२ अखेर रा. चौकर वारले, व हें काम तसेंच राहिलें. हीं सर्व पत्रें रा. चौकरांचे वडील व रा. मोहनी यांच्या कृपेनें मला परत मिळालीं, याबद्दल मी दोघांचाहि आभारी आहें.

माझ्या कांहीं मित्रांनीं तीं मूळ पत्रें पाहिलीं व तीं छापवून काढा, असें त्यांनीं प्रोत्साहन दिल्यावरून पुस्तकरूपानें तीं महाराष्ट्रवाचक-वर्गापुढें मांडिलीं आहेत. या पुस्तकांत दिलेलीं चित्रें कांहीं आयतीं विकत घेतलेलीं आहेत व कांहीं मीं आपल्या कॅमेऱ्यानें घेतलेलीं आहेत.

फर्गसन कॉलेज, पुणें, }
२४ नोव्हेंबर, १९१५. } **पांडुरंग दामोदर गुणे.**

# चित्रांची अनुक्रमणिका.



'साग्रिस्टिया नुओव्हा' अथवा मेदिचींचा गाभारा, (पान ३०७).

# माझा यूरोपांतील प्रवास.

**एडन**, १५।९।१०.

मीं ज्या बोटींतून प्रवास करण्याचें ठरविलें तिचें नांव 'ओशियाना.' ही पी. ओ. कंपनीची साधारण लहानपैकींच बोट आहे. ही बोट बरीच आंत 'बॅलर्ड पीयर'पासून दूर उभी केली असल्यामुळें आह्मांला 'स्टीम-लॉंच'मधून तेथवर जावें लागलें. कधींहि न केलेल्या जलपर्यटनाचा आरंभ तो! व पोहोंचवण्यास आलेली आप्तइष्टमित्रमंडळी आह्मांकडे अश्रूपूर्ण डोळ्यांनीं पाहत उभी राहिलेली! त्यामुळें आजवर कधींहि न अनुभविलेली अशी मनाची स्थिति झाली. लॉंचच्या पुढल्या टोंकांत उघड्यावर उभें राहून आह्मी सारखे किनाऱ्याकडे टक लावून पहात होतों. लॉंच जों जों दूर चालली, तों तों पीयरवरील मंडळी अस्पष्ट दिसूं लागली. शेवटीं बोटीच्या बाजूला आह्मी गेलों, व वर चढण्याच्या धांदलींत किनाऱ्याकडचें लक्ष्य कमी झालें. आपलें सर्वस्व किनाऱ्यावर व आपण मात्र त्यापासून क्षणक्षण दूर जात आहों, व तेंहि क्षणांत रूपें बदलणाऱ्या अविश्वसनीय समुद्राच्या पाठीवर! हा विचार सतत मनांत घोळे!

बोट सव्वाचार वाजतां सुरू झाली–(ता. १० सप्टेंबरचा तो दिवस होता), व मी अगदीं वरच्या मजल्यावर उघड्या 'डेक'वर जाऊन किनाऱ्याकडे पाहत बसलों. क्षणोक्षणीं तो दूर जात होता व मुंबईच्या त्या परिचित इमारती प्रतिक्षणीं अस्पष्ट दिसूं लागल्या. होतांहोतां अगदीं लांब क्षितिजाजवळजवळ किनाऱ्याची अस्पष्ट काळी रेषा मात्र दिसे. दोन तासांनंतर तीहि दिसेनाशी झाली. ह्मणून निरुत्साह होऊन

मी परत खालीं जाऊं लागलों. जातांना आपले पाय आपल्या स्वाधीन नाहींत, लटपटत हेलकावे खात आपण जातों, डोकें फिरतें, तोंडाची रुचि बिघडून मळमळल्यासारखें होतें, असें माझ्या लक्ष्यांत आलें. यापूर्वीं निरनिराळ्या आजारांचे अनुभव मला आले होते; पण हा आजार फारच चमत्कारिक वाटूं लागला. खोलींत आपण कसे पोंचतों असें मला झालें. नंतर खोलींत जो बिछाना धरला तो येथवर येईतों सोडला नाहीं.

माझी खोली गलबताच्या अगदीं मागच्या टोंकाला असल्यामुळें माझें अंथरूण विलक्षण हाले, व जरा डोकें वर काढलें, कीं, घेरी आलीच असे होई !

पहिल्या दिवशीं 'डेकचेअर' (उघड्या डेकवर वारा घेत आरामांत पडण्याची खुर्ची) शोधीत असतां एक मौज उडाली. खुर्ची कोठेंहि सापडेना. शेवटीं 'डेकस्टयुअर्ड'ला विचारावें ह्मणून गेलों, तो स्टयुअर्डचा पांढरा पोषाक करून कवटी झांकण्यापुरती काळी टोपी घातलेला एक गृहस्थ एका बाईची (अर्थात् इंग्लिश) खुर्ची पाहून देत होता. त्याच्या-जवळ जाऊन 'माझीहि खुर्ची सांपडत नाहीं, तो पाहून द्याल काय ?' असें मी त्याला ह्मणालों. तो त्यानें मजकडे पाहून फक्त गालांत स्मित केलें. तेव्हां केवळ पोषाकावरून आपण फसलों, असें माझ्या लक्ष्यांत आलें, व मी दुसरीकडे गेलो.

आमच्या खोल्यांचे 'टयुअर्ड' बहुतेक गोव्याकडील क्रिश्चन आहेत. आमचा ह्मातारा 'गामा' आमच्यासाठीं बरा झटे. आह्मी चार दिवस पडून होतों, तोंवर चहा, बिस्किटें, दुपारीं कांजी अगर पेज, मध्यें फळें, संध्याकाळीं दूध वगैरे आणून देऊन, आह्मांला बळेंच ध्यायला लावी. त्याच्या त्या धेडगुजरी हिंदुस्तानी बोलण्यानें मौज वाटे. 'तुम बोला,' 'हम लाता,' 'चहा खाव अच्चा,' 'आरारूट खाव,' 'उल्टी नय करेगा,' वगैरे बडबड तो आह्मांभोंवतीं नित्य उठून करी. वेळींअवेळीं घाबरल्यामुळें घंटा वाजवून त्याला बोलावलें, कीं, कधींकधीं तो त्रासे,

व ' तुम घंटी बजाता, क्यापटन बोम मारता ' इत्यादि त्रासून ह्मणे. बिचाऱ्या ह्माताऱ्याची कींव येई; पण करावें काय ?

गलबतांतील यंत्रांचा धडपडाट व बाहेर लाटांचा गोंगाट यायोगें प्रथम बराच त्रास झाला; पण आतां त्याची सवय होत चालली आहे. समुद्राचें पाणी निळें आहे. त्यांतील लाटा जेव्हां एकमेकींवर आपटतात, तेव्हां फेंसाबरोबरच मोठाल्या मोत्यांएवढाले तुषार उत्पन्न होऊन पाण्याच्या सपाटीवर बरेच लांबवर खेळत जातात, तेव्हां अपूर्व मौज दिसते. समुद्राला जर घननीळ परमेश्वराची उपमा दिली, तर ही तुषारश्रेणी त्याच्या गळ्यांतील कौस्तुभयुक्त मौक्तिकसरच साजेल. बोटीच्या बाजूला लाटा फुटून फेंसच फेंस होतो, व त्याचीं तिच्या सभोंवार लहानमोठीं वर्तुळें किंचित् निळसर पण शुभ्र अशीं पसरतात. पांढऱ्या व निळ्या फुलांनीं गुंफलेल्या माळेची कांहींशी शोभा यांत दिसते.

पहिल्या दिवशी काय ती जमीन दिसली. पुढें जमिनीचें नांव नाहीं. वर आकाश, खालीं पाणी व पाण्यावर फक्त आमचीच बोट भुतासारखी चाललेली. एकादा पक्षीसुद्धां बिचारा येत नाहीं! अलीकडील उत्तमोत्तम शास्त्रीय उपकरणांनीं सजवलेली-वाफेनें चालणारी आमची बोट, तरी आह्मांला प्रथम भीति वाटे; मग १९ व्या शतकांत वाऱ्याच्या स्वच्छंदी मेहरबानीवर सर्वथैव अवलंबून असलेल्या शिडांच्या गलबतांत बसून वाटेल तिकडे वाहवल्यासारखें जाणाऱ्या कोलंबसाला व विशेषतः त्याच्या बरोबरच्या बाजारबुणग्यांना कसें वाटलें असावें ?

आमच्या या बोटीवर हिंदुमुसलमान मिळून तीसबत्तीस हिंदी विद्यार्थी आहेत. कांहीं बॅरिस्टर, तर कांहीं डॉक्टर, व कोणी एंजिनीयर होण्यासाठीं जात आहेत. बॅरिस्टरीकडेच भरणा-तोहि अगदीं कच्चा 'भरणा' फार आहे. कारण, पुढल्या वर्षापासून तिकडे प्रवेशाला परीक्षा ठेवून मर्यादा ( पुष्कळांनां मज्जावच ! ) घालण्यांत आली आहे.

यांत कांहींजण तर पुरत्या दोन इंग्रजी इयत्ताहि न झालेले असे आहेत! अशा या भरताडाचें कसें होणार कोण जाणे! यांपैकीं एक पंजाबी मुलगा फक्त सोळा वर्षांचा आहे आपल्या महाराष्ट्र बाजूकडील आणखी एकच आहे. बरेचजण यापूर्वीच गेल्याचें समजतें. आज तीनचार दिवसांत आणखीहि कांहींच्या ओळखी झाल्या. कारण हिंदुस्तानांत जरी आह्मी दूरदूरचे राहणारे असलों, तरी सर्वच सारखे—देश सोडून दूर जाणारे असल्यामुळें सर्वांनां आपण एकच आहों असें वाटतें.

सुएझ, १८।९।१०.

मागलें पत्र पाठविल्यानंतर तांबड्या समुद्रांत आलों. याला तांबडा समुद्र कां ह्मणतात न कळे; पाणी जसें असावें तसें निळसर आहे. दोन्ही बाजूंनीं लांबवर उजवीकडून आरबस्तानच्या व डावीकडून आफ्रिकेच्या पर्वतांच्या ओळी भुरकट तांबड्याशा दिसतात. ह्मणून तर नसेल ना असें नांव पडलें?

तीन दिवस समुद्र अगदीं शांत होता. बिलकूल त्रास झाला नाहीं. सकाळीं ९, दुपारीं १ व रात्रीं ७ वाजतां जेवणाला सर्वांबरोबर वरती 'डायनिंग सलून'मध्यें जाऊं लागलों आहें. तेथें भात, दूधभोंपळा-टोमाटो—कसल्या तरी शेंगा वगैरे पिठांत मिसळून केलेली एक तऱ्हेची पिंवळी आमटी, कधीं तुरीचें वरण, पापड, गोड लोणचें व गव्हांच्या रोट्या हे पदार्थ तीनदां मिळूं शकतात; त्यामुळें जेवणाचें ठीक जुळलें आहे. पण हें जुळवून आणावें लागलें, तो प्रकार असा:—

पहिले चार दिवस अंथरुणावरच पडून होतों, तेव्हां खाण्यापिण्याचा फारसा प्रश्नच नव्हता. पुढें सर्वांनां जशी हुषारी आली, तसा हा विचार उत्पन्न झाला. सहज दहाबाराजण गप्पा मारीत असतां हा विषय निघाला. आह्मांकडून खाण्यापिण्याचेसुद्धां पैसे कंपनीनें चोपून घेतले आहेत, तेव्हां आह्मांला रुचेल तें खाण्यापिण्यास देणें कंपनीला भाग आहे. आपण सेकंड् स्टयुअर्ड् (दुसऱ्या वर्गांतील डायनिंग् पारलरचा बल्लवाध्यक्ष)-

कडे जाऊन त्याशीं भांडून भाता–वरणाची सोय करूं वगैरे गोष्टी कांहींजणांनीं जोरानें सांगितल्या, व सेकंडस्टयुअर्डकडे जाण्याचें ठरलें. सेकंड स्टयुअर्ड कांहीं बोका नव्हता, पण त्याच्या गळयांत घांट बांधण्याची वेळ आली, तेव्हां सर्व जण ' मी नाहीं बुवा' ह्मणून मागें सरले. शेवटीं मीं स्टयुअर्डला भेटून दहाबारा जणांची वर सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करविली.

गलबतावरच रोजच्या स्नानाची व्यवस्था आहे. यासाठीं लहानलहान खोल्या असतात. त्यांत एकेक टब् अगर द्रोणाकृति भांडें ठेवलेलें असतें. हें खाऱ्या पाण्यानें भरून त्यांत उतरावें लागतें. यांत उतरतांना बाणाच्या कादंबरींत वर्णन केलेल्या चन्द्रापीडाच्या स्नानासाठीं तयार असलेल्या ' जलद्रोणीची ' आठवण झाली. या पाण्यांत स्नान झाल्यावर, अर्धी घागरभर गोडें पाणी एका बकेटांत ठेवलेलें असतें, तें स्पंजनें घेऊन त्यानें अंग चोळून काढावें, ह्मणजे खाऱ्या पाण्यानें अंग खाजण्याचा प्रसंग येत नाहीं.

आज जरा वारा सुटून समुद्रांत लाटा येत आहेत; पण मला–मलाचसें काय, कोणालाहि–बिलकुल त्रास होत नाहीं. बहुतेक दिवस वरती डेकवर मांडव दिलेला असतो, तेथें खुर्ची टाकून बसावें लागतें. कारण खोलींत उकाडा फार होतो. यूरोपियन उतारू 'डेक कॉइट' (दोरखंडाच्या वर्तुळां)–नीं खेळतात; अगर एका फळयावरील चौकटीच्या घरांत आंकडे लिहिलेले असतात, त्यांवर बारीक वाळूनें भरलेल्या पिशव्या फेंकतात. पत्तेही खेळतात. रात्रीं गाणेंबजावणें करतात. अशा नानाप्रकारच्या करमणुकींत वेळ घालवण्याचा प्रयत्न ते करतात. हिंदी उतारू आपापसांत गप्पा मारीत अगर पत्ते खेळत वेळ मारून नेतात. यूरोपियन उतारूंचे खेळ पाहत उभें राहण्यांतहि त्यांनां करमणूक वाटते.

रोज पांचसात तरी गलबतें बाजूनें लांबून जातांना भेटतात. सर्वां यांची फार मौज वाटते. लांबवर क्षितिजाजवळ एकादी काळसर

छाया सरपटत चालली आहे, असा भास होतो. या छायेवर ओळीनें आठदहा तरी दिवे दिसतात. यांचा एकाद्या वेळेला तुटलेल्या ताऱ्यांसारखा मनावर परिणाम होतो. रात्रीच्या शांत, गंभीर वेळीं हा देखावा विचाराला कांहीं गंभीर, कांहीं भयप्रद असें अवर्णनीय वळण देतो. दिवसा भेटणारीं गलबतें व उडणारे मासे ( हे पाण्यांतून वर लंब गोलाकृति उड्डाण घेतघेत जात असतात ) व मासे धरणारे पक्षी यांच्या गडबडीमुळें करमणूक होते. शिवाय सर्व हिंदी विद्यार्थी सलोख्यानें, प्रेमानें वागतात, त्यामुळें मनाला बरेंचसें समाधान होतें. क्षणभरसुद्धां एकटेपणा न सांपडल्यामुळें, खेदजनक विचारांनां बहुतेक वावच मिळत नाहीं.

**मार्सेल्स्** २५।९।२०.

सुएझला आह्मी बोट सोडून किनाऱ्याकडे गेलों नाहीं. बोटीवर डॉक्टरचे तपासणीचा फार्स झाल्यावर, कमावलेल्या कातड्यासारख्या उन्हानें तांबूस झालेल्या रंगाचे दहाबारा आरब फेरीवाले शिंपाच्या पोंवळ्यांच्या लहानसहान वस्तु, मण्यांच्या माळा, चित्रांचीं कार्डें, बारीकसारीक नक्षीचें लांकडी सामान, द्राक्षें वगैरे घेऊन भराभर गलबतावर चढले. ते आपल्या जिनसांची कांहींचे कांहींच किंमत सांगत. गिऱ्हाईकानें जपून बरीच कमी किंमत सांगावी, तरी ती तेव्हांच कबूल करून जिन्नस गिऱ्हाईकाच्या गळ्यांत बांधून पसार होण्यांत यांचा हातखंडा दिसे.

ता. १९ सोमवारीं दुपारीं १२॥ वाजतां सुएझ सोडलें. येथून पुढें प्रसिद्ध सुएझचा कालवा लागला. हा कालवा १०० मैल लांब असून फक्त चारएकशें फूट रुंद व सुमारें तीसपसतीस फूट खोल आहे. तांबडा समुद्र व भूमध्यसमुद्र यांस हा जोडतो. हा कालवा खणून जहाजांनां व तद्द्वारा यूरोपच्या प्रचंड व्यापाराला मार्ग सुगम करून देण्याची क्लृप्ति एका फ्रेंच एंजिनियराची. हा कालवा ईजिप्त व आशियांतलें तुर्कस्तान

यांच्या मध्यें, तुर्कांच्या राज्यांत व इंग्लिश–फ्रेंच कंपनीच्या ताब्यांत, अशी याची त्रिविध कहाणी आहे.

बारीक वाळूमय प्रदेशांत हा असल्यामुळें यांतून जहाज अगदीं हळू म्हणजे ताशीं ५।६ मैलांच्या वेगानें चालावें लागतें. रुंदी फार कमी, म्हणून फक्त दोनच जहाजें जोडीनें जाऊं शकतात. दोन्हीं बाजूंनीं किनारा सरासरी कासराभरावर नाहीं. एके बाजूनें पालेस्तैन व दुसरीने ईजिप्त यांची वाळवंटी जमीन लांबवर दिसते. चोहींकडे अगदीं रखरखीत. झाडें बहुतेक नाहींतच.

संध्याकाळच्या सुमाराला कालवा एका सरोवरांत मिळाला. त्याच्या त्या स्तब्ध, हिरव्या पाण्यावरून गलबत हंसाप्रमाणें संथ पोहत चाललें होतें. गलबत एकदम नांगरून पडलेलें तर नाहीं ना, असा भास होई. संध्याकाळचे तांबूस कोवळे सूर्यकिरण त्या सरोवरावर पडून, त्याचें पाणी वितळविलेल्या काचेच्या रसाच्या खोल थराप्रमाणें चकाकत होतें. मध्येंच एखाद्या ठिकाणीं पाण्याच्या कडेकडेनें गलबताबरोबर धावणाऱ्या, बहुतेक वस्त्रहीन अशा, फेलाहीन अगर आरब भिकाऱ्यांची ‘ बक्षीश, बक्षीश ’ अशी कर्कश आरोळी कानावर पडे व सृष्टि-शोभेंत तल्लीन होणाऱ्या मनाचा विक्षेप होई. संध्याकाळ झाली तशी भोंवतीची शोभा विशेष प्रसन्न व गंभीर वाटूं लागली. आकाशाच्या भव्य घुमटांत चंद्राचा घुमता दिवा जसजसा वरवर हेलकावूं लागला, तसतशी तसल्या रखरखीत वाळूच्या मैदानावरसुद्धां किंचित् उदासीन भव्यपणाची छटा पसरूं लागली. सरोवराचें फारसें न हलणारें पाणी, सुमारें शुद्धचतुर्दशीच्या नुकत्याच उगवलेल्या चंद्राचीं त्यावर पडलेलीं किरणें, व सभोंवतालीं वस्ती वगैरे नसल्यामुळें भासणारा शुकपणा, यांचा मनावर फारच गंभीर परिणाम झाला, व ही मौज पहात एका समान आमेरुचीच्या विद्यार्थ्याशीं गप्पा मारीत रात्रीं साडेनऊपावेतों डेकच्या अगदीं मागच्या टोंकावर उघड्यावर उभा राहिलों.

पहांटे दोन वाजण्याच्या सुमाराला माझ्या खोलीच्या अगदीं वर जड सांखळीचा खडखडाट सुरू झाला व मी जागा झालों. पुढचें 'पोर्टसेड' बंदर आलें असावें ह्मणून उठलों व 'ड्रेसिंग गाउन' अंगावर चढवून बाहेर पडलों. डाव्या हाताला किनारा अगदीं जवळ कांहीं फुटांच्या अंतरावर होता, व त्यावर उंच मजलेदार इमारती काळोखाचें पांघरूण घेऊन गाढ झोंपीं गेलेल्या अस्पष्ट दिसत होत्या. उजव्या बाजूला आखात लांबवर—किती लांबवर याची कल्पना येईना—पसरलें आहे असें वाटे, व त्यांत आसपास नांगरून पडलेल्या गलबतांच्या अंधुक आकृति त्यांवरील लुकलुकणाऱ्या दिव्यांमुळें प्रचंड (पाण) घुबडांप्रमाणें दिसत!

सकाळीं (ता. १०) फराळ केल्यावर होडींत बसून आह्मी पांचसहाजण मिळून गांवांत गेलों. एकमेकांशीं काटकोन करून गेलेले मोठमोठे रस्ते, त्यांवर उंच तीनचार मजली घरें, त्यांतून दुतर्फा दुकानें वगैरे देखावा यूरोपियन शहराचा होता; पण दुकानदार, रस्त्यावरून रिकामटेकडे फिरणारे उतारूंनां मारूनमुटकून शहर दाखवूं पहाणारे मार्गदर्शक, संगीत भिकारी व अजागळ पोलिस शिपायी यांचा तो कमावलेला तांबूस काळसर रंग, रस्त्यावरील अगणित धूळ हीं शहराच्या पौर्वात्यपणाची बालंबाल खात्री पटवीत होतीं. दुकानें पहावीं तीं आपलीं निरुपयोगी—भेटी दाखल देण्याच्या—ऐषआरामाच्या वस्तूंचीं, व त्यांस गिऱ्हाईक पूर्वेकडून पश्चिमेकडे व पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणारेयेणारे प्रवासी. दुकानांतील व्यवहार सगळा अर्थात् पौर्वात्य तऱ्हेचा; कोणतीहि क्षुद्रवस्तु मागा, बरेचसे शिलिंग किंमत प्रथम सांगावयाची व गिऱ्हाईक फार चिकित्सेखोर असेल तर त्याला कांहीं पेन्सांला द्यावयाची अशी आपली यांची वहिवाटच! नवीनच प्रवासी असला, तर त्याला हे तेव्हांच बनवतात.

पोर्टसेड दुपारीं ४ ला सोडलें व थोड्या वेळानें घननील 'मेडिटरेनियन (भूमध्य)' समुद्राचें प्रथम दर्शन झालें. तांबड्या समुद्राइतका

हा शांत नाहीं. तो एकाद्या मोठ्या सरोवरासारखा वाटतो; यांत मात्र शिरतांच समुद्रत्व अनुभवाला येतें. बोट थोडी हालूं लागते व पाण्याचा पृष्ठभाग नांगरलेल्या काळ्याभोर शेतासारखा नतोन्नत दिसतो. दृष्टि पोंचेल इतक्या प्रदेशावर लाटा व त्यांवर पांढरा शुभ्र फेंस असें लांबवर दिसतें. लाटांचा गहन निळा रंग व फेंसाचा स्फटिकाहून पांढरा रंग दोन्हीहि विरोधानें फारच खुलून दिसतात. पण ही बहार फार वेळ पाहवली नाहीं. पुढें समुद्र जास्त खवळला व मला दोन दिवस खोली धरावी लागली.

तेविसावीला सकाळीं आंघोळ करून डेकवर गेलों, तों आह्मी इताली व सिसिलीच्या मधल्या 'मेसिना' सामुद्रधुनींतून जात आहों, असें कळलें. आमच्या उजवीकडे पर्वतांचे तटचेतट दिसूं लागले. हे पर्वत तांबड्या समुद्राच्या दोन्ही किनाऱ्याच्या बाजूंस दिसणाऱ्या पर्वतांसारखे रखरखीत शुद्ध फत्तरी असे नव्हते. यांवर सर्वभर हिरवीगार वनश्री हंसतांना दिसे, व तिला आच्छादन करण्यासाठींच कीं काय वरून पर्वतशिखरांनां भुरकट मेघांचें वेष्टन पडलें होतें. डोंगरांच्या पायथ्याशीं तांबड्या कौलांचीं व उंचउंच धुराच्या चिमण्यांचीं शहरें, व झाडींतून प्रेक्षकांशीं जणूं काय लपंडाव खेळणारीं खेडीं दिसत. हीं शहरें व खेडीं अर्धें लपतछपत, अर्धें धांवत जाणाऱ्या शुभ्र निर्झरांनीं ठिकाठिकाणीं विभागलेलीं दिसत. त्या पर्वतश्रेणींतील निरनिराळ्या टेंकड्यांवर तांबड्या शहरांच्या योगें बुट्टीदार दिसणारे, व लहानमोठ्या निर्झरांचे शुभ्र रुपेरी कांठ असलेले निरनिराळे शालूच पसरलेले आहेत कीं काय, असें वाटे. ही रंगांची सळमिसळ मनहरण करून घेणारी अशी भासली. उपासानंतर पक्वान्नाच्या भोजनासारखी आज स्थिति झाली. मधूनच एक आगगाडी धूर बाहेर सोडीत सापासारखी वळणें घेत चाललेली दिसे. तिनें या सृष्टिसौंदर्यांतहि मनुष्याच्या चळवळीची साक्ष पटविली. सरासरी तासाभरानें सिसिलीचे डोंगर आमच्या डावीकडे

हळुहळू दृग्गोचर होऊं लागले, व मग मेसिनाच्या दोन्ही बाजूंला या दोन्ही पर्वतश्रेणींची जणूं स्पर्धाच सुरू झाली. दोन्हीहि आपापल्या सौंदर्याच्या तोऱ्यांतच असून आपल्या पायाजवळ पडलेल्या जलमय आरशांत आपलें प्रतिबिंब पाहण्यांत चूर झाल्या आहेत असें दिसे. या सामुद्रधुनींतून जहाजाला साधारण इंग्रजी s सारखें वळण घेऊन जावें लागलें. प्रथम ईशान्येकडे नंतर सरळ पश्चिमेकडे व पुनः ईशान्येकडे असा त्याचा रोख होता. मेसिना जेथें अगदीं चिंचोळी झाली आहे, तेथें एका बाजूला तो लोकांच्या नित्य व्यवहारांतील ह्मणींत स्थान पावून अजरामर झालेला 'शिला' नांवाचा कडा आपल्या भिवयांची कमान करून आह्मांकडे पाहत आहे, असा मला भास झाला. हा देखावा अंतरामुळें पुसटपुसट होऊं लागला, तसा मी परत खालीं आलों. तो खरोखर शहाणपणाच केला ह्मणावयाचा. कारण दोन्हींकडून पर्वतांनीं आपल्यास असें कोंडीत धरावें याचा राग येऊनच कीं काय, समुद्र खवळूं लागला. संध्याकाळच्या सुमाराला तर त्याचा क्रोध वाढला, त्याबरोबर आमची त्रेधाहि वाढली.

दुसऱ्या दिवशीं ( ता. २४ ) सकाळींहि अस्वस्थच होतों. गामाला बोलावलें, तोहि आठदहा जणांच्या हालहालचाकरीनें त्रासला होता. तो प्रथम कांहीं बडबड करून गेला. पण नंतर पुनः मला पिण्यासाठीं कांजी वगैरे घेऊन आला. मी रागावलों असें वाटून मांझ्या समजुतीसाठीं त्यानें टकळी सुरू केली. ती अशी:—'No water bring sir. Deck steward fight sir, I come, tea bring. You take, no vomit. Bread take, vomit.' या त्याच्या बडबडीनें मला हंसूं आलें. काय बिचाऱ्याचें जीवित! अशी बाराबत्तर, व त्यांतहि आणखी दरखेपेला नव्या उतारूंची चाकरी करण्यांत त्याचें आयुष्य गेलें. लंडनच्या त्याच्या किती तरी खेपा झालेल्या आहेत. पगार अवघा १५।२० रुपये महिना. घरीं मुलांबाळांचें मोठें कुटुंब आहे ह्मणून सांगतो.

दुपारीं ४।४॥ वाजतां कोणी कॉर्सिका ह्मणून ओरडलें. त्याबरोबर नेपोलियनची मूर्ति व कीर्ति डोळ्यांसमोर उभी राहून मी आंथरुणावरून एकदम उठलों व पोर्टहोलामधून पाहूं लागलों.मला स्पष्टशी कल्पना आली नाहीं. एक शुष्क बेट आहे असें वाटलें. मनाची अस्वस्थताहि असें वाटण्यास कारण झाली असावी. संध्याकाळीं बांधाबांध केली. कारण आतां उद्यां सकाळीं पुनः जमिनीवर पाय ठेवावयाचा व नंतर आगगाडीनें फ्रान्स देश ओलांडून इंग्लंडकडे जावयाचें ! ह्मणून मनाची जरा आनंदाची धांदल उडाली. सर्व आटपून लवकरच निजलों, तों कोणी माझा पाय खाजवल्याचा भास झाला. अर्धा उठून पहातों तों दोन इंग्रजी गृहस्थ डेकस्टयुअर्डसाठीं वर्गणी गोळा करावयाला आले होते. मोठ्यानें हंसणें, थट्टा करणें, मध्येंच थोडा आरडाओरडा करणें असे सलगीचे प्रकार त्यांनीं प्रथमच केलेले पाहून जरा आश्चर्य वाटलें; पण आतां आह्मी यूरोपाजवळ आलेले, व गलबतावरची ही शेवटची रात्र ह्मणून तिच्या सन्मानार्थ यांनीं सुरेचें प्रमाणाबाहेर सेवन केल्याचा भास झाला. कदाचित् तसें खरें नसेलहि.

या संध्याकाळीं शेजारच्या खोलींतल्या पंजाबी गृहस्थानें संधान बांधून एका स्वच्छ मुसलमान खलाशाकडून कांहीं चपात्या व ‘ दाल ’ (फोडणीचें घट्ट वरण) आणली. आह्मी दोघेचौघे त्याच्या खोलींत घुसलों व त्या दालचपातीवर यथेच्छ ताव मारला किती मिष्ट लागली ती ह्मणून सांगूं !

**२१, प्रिम्रोज हिल रोड, हॅम्पस्टेड, लंडन,**

**एन. डब्ल्यू., ३० सप्टेंबर १९१०.**

मार्सेलसला ता. २५ रविवारीं सकाळीं जमिनीला पाय लागला. सामान ‘ग्रिंडले अँड् कंपनी’च्या एजंटाच्या हवालीं करून गांवांत निघालों. गाडीवाल्याला इंग्रजी येत नव्हतें व आह्मांला ( एकंदर ६ जण होतों )

फ्रेंचचा गंध नाहीं ! गांवांत पैसे देतांना शिवीगाळ होण्याची पाळी आली; पण शेवटीं एका मध्यस्थानें भांडण तोडलें. सर्व दिवस शहरभर भटकलों. हें शहर एका टेंकडीच्या बाजूवर व पायथ्याशीं वसलें असल्यामुळें रस्ते चढउताराचे आहेत. ज्या भागांतून आह्मी फिरलों, तो चांगल्यापैकीं असून त्यावर ट्रामचें जाळें पसरलेलें दिसलें. स्वच्छता चांगली होती. रविवार असल्यामुळें बहुतेक बाजार बंद होता; पण एके ठिकाणीं बैठीं एकमजली दुकानें बरीचशीं दिसलीं. त्या ठिकाणीं एक माणूस मोठ्यानें लेक्चर देत होता व भोंवतीं मासणांची गर्दी जमली होती. रविवारचें व्याख्यान चाललें असावें, आमच्या मुंबईंत बॅकबेवर दर रविवारीं व्याख्यानें होतात तद्वत्च हें असेल, असें वाटून जवळ गेलों. व्याख्याता फारच आवेशांत आला होता. मंडळीहि मधून टाळ्या वगैरे वाजवून आपली पसंती दर्शवीत होती. आह्मांला त्यांतले काय कळणार ? पण अगदीं जवळ गेलों, तेव्हां व्याख्यात्याचें मासे विकण्याचें दुकान असून, तो त्या वेळीं एक मासा हातांत धरून त्याची तारीफ व गिऱ्हाइकांनां घेण्याचा आग्रह करीत होता असें कळून आलें ! पुढें एका देवळांतून बरींच माणसें—बायाच विशेषतः—बाहेर पडतांना दिसलीं. त्यांच्या डोक्यांवरील टोप्यांत जेवढें वैचित्र्य दिसलें, तेवढें वैचित्र्यासाठीं प्रसिद्ध असलेल्या साऱ्या सृष्टींत देखील नसेल ! झग्यांचेहि रंग नानाप्रकारचे होते. हातांत एक छत्री, एक बायबलचें पुस्तक व एक जुगदान अगर झोळणेवजा पिशवी असा त्यांचा अदृष्ट-पूर्व थाट पाहून मौज वाटली. यांत कांहीं मिशा असलेल्या बाया पाहून आश्चर्य वाटलें. जिकडेजिकडे गेलों तिकडेतिकडे दृष्टीस पडतील त्या वस्तु नीट पाहण्याचा निश्चयच केला होता. खास यूरोपियन शहर पाहण्याचा हा पहिलाच प्रसंग, त्यामुळें प्रत्येक गोष्टीचें कौतुक वाटे. एका 'रेस्टोराँ'मध्यें दुपारीं जेवावयाला गेलों. स्वच्छ चादरी हांतरलेलीं लहानलहान मेजें, प्रत्येकावर कांचेच्या भांड्यांत ठेवलेला एक पुष्पगुच्छ,

व सभोंवतीं चारचार खुर्च्या, सभोंवार भिंतीवर आरसे व तसबिरी असा थाट असून, कडकडीत इस्त्रीचा पांढरा शर्ट–त्यावर छातीचा भाग सोडून काळाकुळकुळीत कोट–डोक्याला पावडर चोळून तुकतुकीत भांग काढलेले व आपल्या धंद्याचें निदर्शक पांढरें फडकें कांखेंत धरलेले–अशा थाटाचे वेटर अगर वाढपी उभे असलेले, अशी व्यवस्था बहुतेक सर्व भोजनगृहांत दिसते. आह्मी एका टेबलाभोंवतीं जाऊन बसलों. तयार पदार्थांचें कार्ड पुढें घेतलें, पण त्यांत काय आहे तें कोणाला कळेल तर शपथ! मग कशावर तरी बोट ठेवून काय येतें ते पहावयाचें व रुचल्यास खावयाचें असें करावें लागलें. नंतर पुन: भटकलों. वाटेंत भाड्याच्या बग्या उभ्या राहण्याचीं ठिकाणें असत, तेथें दरगाडीवानाच्या हातांत एक वर्तमानपत्र पाहून आश्चर्य वाटे!

रस्त्यांची व्यवस्था मध्यवस्तींत फार चढाऊ आहे. मधला मुख्य रस्ता ट्राम् व गाड्या यांसाठीं व त्याच्या दोन्ही कडेला दोन दगडी रस्ते पायानें जाण्यारांसाठीं असून रस्त्याच्या दोन्ही बाजूंला हिरवींगार झाडें होतीं.असें सर्वच नवें, अपूर्व व कौतुक वाटण्याजोगें होतें. रात्रीं सवाआठ वाजतां मार्सेल्स सोडलें. ग्रिंडलेच्या एजंटानें सामान व्यवस्थित आणून दिलें, पण खिसा बराच कातरला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्यारिसच्याजवळ एक ‘ एअरोप्लेन’ विमान प्रथमच पाहिलें. मोठ्या थोरल्या गिधाडा एवढें दिसे. बिचाऱ्याला दुसऱ्याच दिवशीं अपघात होऊन आंतलीं माणसें मरतील असें त्या वेळीं स्वप्नहि पडलें नव्हतें! दहांच्या सुमाराला पारिस गांठलें. दाक्षिण स्टेशनवरून उत्तरस्टेशनवर घोड्याच्या गाडीनें जावयाचें होतें. थॉमस् कुकच्या माणसानें सहा फ्रांकला गाडी ठरवून, एक फ्रांक देखतदेखत खिशांत टाकला! गाडी गांठावयाची असल्यामुळें पारिसची फक्त धूळभेट झाली. ह्मणजे गर्दीनें गाडींतून जात असतां थोडीशी धूळ मात्र आंगावर बसली! पण आह्मीं एका मोठ्या सरळ रस्त्यानें नीटच गेलों. मोठे

रस्ते व इमारती, जागजागीं पुतळे वगैरे दिसले. यापलीकडे पारिसचें दुसरें कांहीं ठाऊक झालें नाहीं. तेथून दुपारीं कॅलेला पोंचलों. लगेच बोटींत बसून डोव्हरचा मार्ग धरला. १।-१॥ तासाचाच हा इंग्लिश चॅनेलवरील जलप्रवास होता. डोव्हरला उतरल्यावर देखतदेखत एक गाडी भरून हातची गेली. दुसरीनें निघालों तो संध्याकाळीं ७॥ वाजतां व्हिक्टोरिया स्टेशनवर उतरलों.

**हॅम्पस्टेड-लंडन**, २१।१०।१०

मी ज्या भागांत उतरलों तो भाग लंडनच्या साधारणतः उत्तरेला एका उंचवट्यावर आहे. मुख्य जुनें लंडनशहर जसजसें वाढत गेलें, तसतशी नवी वस्ती चोंहींकडे पसरूं लागली; नवे भाग उत्पन्न झाले, व जवळचीं कांहीं खेडीं सामिल केलीं गेलीं. अशांपैकींच हा भाग आहे. खुद्द शहरांत-ह्मणजे जुने राजवाडे, जुने रस्ते, बँक, सेंटपॉल, मॉन्युमेंट वगैरेच्या लंडनात जावयाचें असलें ह्मणजे घोड्याची बस, अगर मोटरबस ( पुष्कळ माणसें सरासरी ५० पर्यंत बसण्याची दुमजली भाड्याची मोटर ) अगर ट्यूब ( जमिनीखालीं शेंदीडशें फुटांवर बोगद्यांतून चालणारी विजेची गाडी ) हीं स्वस्त साधनें आहेत. एक पासून चार पेन्सांत वाटेल तितक्या लांबवर जातां येतें. पैकीं ट्युबनें माणूस लवकर जातें; पण मग शहर मुळींच दृष्टीस पडत नाहीं. मोटर-बसच्या वरच्या मजल्यांत उघड्यावर बसावें ह्मणजे मात्र विचित्र देखावा दिसतो. गाड्या, घोडीं, सायकल्स, मोटर्स, बसेस्, यांची ही गर्दी! व दोन्ही बाजूंनां पदपथांवर माणसांची मुंग्यांसारखी रीघ लागलेली! पुढें पहावें, मागें वळून पहावें, पादचारी व वहानांतून होणाऱ्या व्यापाराचा तो जिवंत, अखंड ओघ पाहून माणूस आश्चर्यानें थक्क होऊन जातें. मधूनच वेळोवेळीं चव्हाट्याचे ठिकाणीं या ओघांपैकीं एक प्रवाह एकदम थांबतो व एकदम धक्का बसल्यासारखें होतें. ह्मणून पुढें बघावें

तों पुढील चव्हाट्याच्या चारी कोंपऱ्यावर चार काळे डगलेवाले ज्या बाजूचा व्यापाराचा प्रवाह थोडा वेळ बंद करावयाचा असेल, तिकडे आपला हात आडवा करून मुकाट्यानें उभे असलेले बसवरून दुरून केवळ कळसूत्री बाहुल्यांसारखे दिसतात. लडगेट सर्कस, पिकॅडिली, चीपसाइड, स्ट्रॅन्ड वगैरे ठिकाणीं तर सर्व कांहीं भोंवऱ्यासारखें घुमत आहे, असा भास होतो. लंडन हें एक प्रचंड भवचक्र आहे व आपण त्या चक्राच्या तडाक्यांत सांपडलों आहों, असें वाटल्याखेरीज राहत नाहीं. प्रथमप्रथम तर माणसास दिशाभूल होते. आपण कोठें आहोंत, कोणीकडून कोठें व कसे जात आहों हें कळण्याची कांहीं दिवस पंचाईत पडते; व कांहीं भाग तरी डोळयांच्या सवयीचा होई तोंवर आपली आपणालाच न चुकण्याची अगर न गोंधळण्याची खात्री नसते. लंडनचा प्रथम परिचय गोंधळरूपाचा असतो; जास्त परिचयानें आश्चर्य वाटतें, अतिपरिचयानें काय होत असेल हें सांगतां येत नाहीं.

लहानपणींच भूगोलांतून, अगर इंग्रजी रीडर्समधून लंडनचें वर्णन कोणीं वाचलें नसेल? त्यांत त्याच्या विस्ताराची, त्याच्या जुनेपणाची, त्याच्या वैभवाची कल्पना देण्याचा यथामति प्रयत्न केलेला आढळतो. पण प्रत्यक्ष पाहिल्यावर त्या कल्पना किती कोत्या आहेत, याचें प्रत्यंतर येतें. लंडन अनन्त आहे, पुराण आहे, ऐश्वर्याची खाण आहे, याची खात्री पटायला फारसा वेळ लागत नाहीं. व्यापारधंदे व वस्ती यांच्या वाढीचें समप्रमाण जसें लंडनला तेव्हांच दिसून येतें, तसें इतरत्र दिसणें कठीण. सर्व जगाच्या व्यापाराचें केंद्रस्थान जें शहर ह्मटलें जातें त्याला सीमा असतां कामा नये; तसेंच लंडनचें आहे, व ही वाढ ५।२५ वर्षांतली अगर एकदोन शतकांतली नसल्यामुळें तिच्यांत कांहीं एकादी धर्ती अगर वळण नाहीं. उदाहरणार्थ, बॅंकेच्या भोंवतीं काळाच्या व वारापाण्याच्या परिणामानें काळ्या झालेल्या इमारती, अरुंद वेडेवांकडे गेलेले रस्ते वगैरे पाहून थोडीशी निराशाहि होतेच. तसेंच

शहराच्या विस्ताराच्या, रस्त्यांच्या लांबीच्या व व्यापाराच्या दाटीच्या मानानें येथील चौक अगर चव्हाटे लहान आहेत, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. पांचपांच सातसातशें वर्षांच्या जुन्या इमारती येथील चमत्कारिक हवेमुळें व अलोट धुरामुळें काळ्या ठिक्कर पडलेल्या पाहून या शहराला 'ब्लॅक सिटी' ह्मणावें कीं काय असें वाटूं लागतें. ताळ ना तंत्र अशी वाढ, जुनेपणाचा काळा छाप, सारखी घडामोड व सारखी चलबिचल यांचें कूटयंत्र या व अनेक गोष्टींमुळें लंडन हें एक गूढ आहे, त्यांत अशा कांहीं गोष्टी आहेत, कीं त्या आपणांला अगम्य आहेत व पुढेंहि अगम्य राहतील, अशा तऱ्हेची हुरहुर लंडन पाहूं जाणाऱ्या प्रत्येक विदेशीयाला वाटल्यास नवल नाहीं.

लवकरच फिलॉलॉजीचा अभ्यास करण्यासाठीं जर्मनींत कोणत्या ठिकाणीं जावयाचें, युनिव्हर्सिटींत प्रवेश मिळेल कीं नाहीं, भाषेवांचून प्रथम कसें निभेल, तिकडे जाण्यासाठीं काय विशेष तयारी केली पाहिजे इत्यादि विवंचना पाठीमागें; शिवाय होतां होई तों लवकर लंडनमधून पाय काढावयाचा निश्चय केलेला. अशा धांदलींतहि लंडन पुष्कळ पाहून झालें. रोज सकाळीं फराळ झाल्याबरोबर ९ वाजतां बाहेर पडून जरूरीचें काम आटपलें कीं शहराचा एकादा नवीन भाग, एकादें नवें पाहण्यासारखें स्थळ पाहून यावयाचें असा निश्चय केला आहे. लांबचा पल्ला टयूबमधून, गर्दीचा भाग बसच्या वरच्या मजल्यांत बसून व कांहीं पायीं असा रोजचा प्रवासक्रम ठरल्यासारखा झाला आहे. सेंट जेम्सेस् पार्क, हाइड पार्क, रीजंटस् पार्क अशा स्थळीं कधींकधीं विश्रांति घेण्याचा नित्यक्रमच पडला आहे.

आजवर पुष्कळ गोष्टी पाहिल्या. त्यांचें वर्णन किती करावें? त्यांतल्या त्यांत 'सेंट पॉल्स कॅथीड्रल' ही जुनी, भव्य, काळसर झालेली देवळाची इमारत मला फार आवडली. उंच असल्यामुळें कांहींकांहीं भागांतून तिचा घुमट चांगला दिसतो. विशेषतः एम्बँकमेंट (नदी-

किनारा ) वरून फारच रम्य दिसतो. हा ज्या भागांत आहे त्यांत यात्रें ह्मणजे मात्र तो लांबून दिसत नाहीं. भोंवतीं दुकानांची गर्दी फार; इमारतीच्या भव्यपणाच्या मानानें तिच्याभोंवतीं मोठासा चौक मात्र नाहीं. इमारतीपुढेंच व्हिक्टोरिया राणीचा पुतळा आहे. तेथें उभें रहावें ह्मणजे पुढल्या रुंद पायऱ्या, त्या संपल्यानंतर जुन्या ग्रीक पद्धतीच्या उंचशा खांबांचा खुला सोपा, व नंतर मुख्य दरवाजा एवढा भाग ठळक दिसतो. आंत गेल्यावर डाव्या पाख्यांत ( इं० aisle अगर wing ) प्रसिद्ध ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें धातूचें थडगें असून त्यानें जिंकलेल्या लढायांचीं नांवें भोंवतीं खोदलीं आहेत. मध्यभागीं घुमटाच्या वरच्या बाजूला मुख्य वेदी असून, तिच्या मागल्या बाजूला डॉ. जॉन्सन्, माउंट स्टुअर्ट एलफिस्टन्सारख्यांचीं स्मारकें आहेत. यांतील मुख्य पाहण्याची गोष्ट ह्मणजे घुमट होय. वेदीच्या पुढें उभें राहून घुमटाच्या गर्भाकडे वर पहावें ह्मणजे त्याचें विशाल पण बिनचूक प्रमाण डोळ्यांत भरून आश्चर्य वाटतें. यांतील छत फारच वाखाणण्याजोगें आहे. घुमटाचें प्रमाण व्यवस्थेशीर साधल्यामुळें त्यांत प्रतिध्वनि फार स्पष्ट उठतो. घुमटाला जेथें आरंभ होतो, तेथें सभोंवार एक ग्यालरी अगर सज्जा बांधलेला आहे. यांत कोठेंहि कितीहि हळू बोललें असतां तें विरुद्ध बाजूला स्पष्ट ऐकूं येतें. या 'व्हिस्परिंग ग्यालरी'चा व्यास एकशेंबारा फूट आहे. येथें मुद्दाम एक ह्मातारा माणूस बसविलेला आहे; तो एका भिंतीशीं या देवळाचा इतिहास कुजबुजतो, तो दुसऱ्या टोंकाला उत्तम ऐकूं येतो. घुमटाच्या बाहेरच्या बाजूला उघड्यावर जातां येतें. येथून शहराचा देखावा फार भव्य दिसतो. लहानमोठ्या इमारतींचीं कौलारें, देवळांचे मनोरे वगैरे कांहीं अंतरापावेतों दिसून पुढील देखावा किंचित् अस्पष्ट होत जातो व अगदीं दूरवर सर्व धुरकटपुसट दिसूं लागून पुढेंपुढें कांहींहि दिसेनासें होतें.

हें कॅथीड्रल ज्या भागांत आहे त्या भागाला सिटी ह्मणतात. हेंच मुख्य जुनें शहर होय. हें जुन्या काळ्या इमारती, चिंचोळे वांकडे रस्ते

यांवरून दिसून येतें. हेंच व्यापाराचें मुख्य ठिकाण असल्यामुळें येथें हरहुन्नरांचीं दुकानें आहेत. 'पेटर नॉस्टर रो' ह्मणून एक गल्ली येथेंच जवळ असून तींत पुस्तकांच्या मोठमोठ्या वखारी व दुकानें आहेत. बऱ्याच इंग्रजी पुस्तकांतून हिचें नांव माहीत झालें असल्यामुळें लंडनला आल्यावर ही 'पेटर नॉस्टर रो' तरी कोणची ह्मणून सहज जिज्ञासेनें माणूस तेथें जातें. या जुन्या भागांत माणसें, गाड्या, घोडीं, मोटरबस, खाजगी मोटर्स यांची गर्दी इतकी होते, कीं, आपल्यासारख्या अपरिचित माणसाला भयानें वेडें होण्याची पाळी येते. प्रथमप्रथम एकटें फिरणें तर कठीणच. असो. याच भागांत विल्यम कॉकररच्या मुलानें बांधलेला गिल्ड हॉल, लॉर्ड मेयरचें मॅनशन्–हाऊस, लंडन–ब्रिज व त्याच्याजवळ उभा असलेला २५० फूट उंचीचा मॉन्युमेंट या नांवाचा आंतून पायऱ्या असलेला मनोरा हीं पहाण्यासारखीं आहेत. मी या मनोऱ्यावर चढून पाहूं लागलों, तों चारहि बाजूंनां अफाट पसरलेलें शहर, मधुनमधून उंच दिसणारे देवळांवरचे क्रॉस, हें सर्व धुकें व धूर यांतून पुसटपुसट दिसे. तेव्हां एकाद्या गन्धर्वाप्रमाणें उंच आकाशांतून खालीं मर्त्यलोकाकडे आपण पहात आहोंत असें, किंवा आपण स्वप्नांत एकाद्या भव्य परंतु पुसट, अस्पष्ट अशा देखाव्याकडे पहात आहों असें तरी क्षणभर वाटे. याच्या पलीकडे १५।२० मिनिटांच्या रस्त्यावर लहानशा पण भरलेल्या टेम्स नदीवरील टॉवर ब्रिज व त्याच्याजवळच टॉवर ऑफ् लंडन आहे. या सर्व जुन्या गोष्टी पाहिल्या ह्मणजे शाळेंत इंग्रजींतून घोकून शिकलेल्या इंग्लंडच्या इतिहासांतील जुन्या गोष्टी आठवतात. पूर्वीचा राजकीय तुरुंग आतां राजघराण्यांतलें जवाहीर ठेवण्याचें काम करीत आहे. हा काळाचा महिमा!

दुसऱ्या बाजूकडे (साधारण पश्चिम ह्मणतां येईल) हौसेस् ऑफ् पार्लमेंट, त्यांच्याच समोर वेस्ट् मिन्स्टर ॲबे व वरच्या बाजूस व्हाइट् हॉल किंवा प्रधान व इतर मंत्रिमंडळ यांच्या कचेऱ्या हीं आहेत.

या सर्वांचें वर्णन कोठवर करावें? ऑलिव्हर क्रॉमवेलनें जेथून सर्व सभासदांना कान धरून चोरांसारखें हांकून लाविलें, अथवा जेथें 'वॉरन् हेस्टिंग्ज'ची चौकशी चालली असतां नाटकी शेरिडननें अयोध्येच्या बेगमेच्या छळाचें खोटेंच पण हृदयद्रावक शब्दचित्र काढून सभेला रडायला लाविलें (कांहीं स्त्रिया तर जागच्याजागीं मूर्छित पडल्या ह्मणे!) त्या वेस्टमिन्स्टर हॉलविषयीं लिहावें, कीं, त्याच्या समोरच्या वेस्टमिन्स्टर क्याथीड्रूलमधील राजे, राण्या, मोठमोठे सरदार, सेनापति व त्यांच्याजवळच गरीब बिचारीं सरस्वतीचीं दरिद्री मुलें शेजारींशेजारीं पुरलेलीं पाहून मॉंटगॉमरी कवीच्या 'Sceptre and crown, must tumble down and in the earth be equal made, with the poor scythe and spade,' या ओळी गुणगुणत भर्तृहरिसारखें त्या काळाला नमस्कार करून बाहेर पडावें, कीं व्हाइटहॉलमध्यें वृद्धतरुण मंत्रिमंडळ डोक्याला डोकें लावून, ज्यावर सूर्य कधींहि मावळत नाहीं अशा अवाढव्य राज्याच्या दोऱ्या आपल्या लहानशा घरकुलांतून ओढीत बसतात त्याचें आश्चर्य करीत बसावें, कीं तेथेंच इंडियाहौस लायब्ररींत हिंदुस्तानांतील जुनेजुने अमोल हस्तलिखित ग्रंथ पाहून, जें काम पेशव्यांनीं शक्ति असतांहि —हयगयीनें ह्मणा, रसिकपणा कमी ह्मणून ह्मणा, कसेंहि ह्मणा— केलें नाहीं, तें इंग्रजांनीं केलें हें पाहून नवल वाटावें?............................

वर लिहिलेल्या सर्व गोष्टी पाहतांना वर लिहिल्याप्रमाणें माझ्या मनोवृत्तींत बदल होत असे. याशिवाय 'केन्सिग्टन् म्यूझियम,' 'आल्बर्ट म्यूझियम्,' 'ब्रिटिश म्यूझियम्,' 'हाइड पार्क' वगैरे अनेक गोष्टी पाहिल्या त्यांचें वर्णन कोठवर लिहावें? थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे हें सर्व पाहून मला आनंद, आश्चर्य वगैरे तर वाटलींच; परंतु एक प्रकारचें नवें, शब्दांनीं सांगतां न येण्यासारखें ज्ञान मला यांपासून मिळालें. दृष्टि थोडी तरी विस्तृत झाली.

कधीं इंडिया लायब्ररींत वाचणें, कधीं जर्मनींत जाण्यासंबंधीं एज्युकेशनल अॅडव्हायसरनीं काय केलें याचा शोध घेणें, एकदोन वेळ इंडियाकौन्सिलच्या एकदोन नामदारसभासदांनां भेटणें, यापलीकडे लंडन येथील २९ दिवसांच्या आजवरच्या मुक्कामांत दुसरें कांहीं काम नसल्यामुळें रोज शहरांत वाटेल तिकडे भटकण्याची संधि मी होतां होईल तों वायां जाऊं दिली नाहीं. कधीं पायीं, कधीं ट्राममधून, कधीं मोटरबसमधून, तर कधीं अंडरग्राउंड इलेक्ट्रिक रेलवेमधून वाटेल तिकडे वाटेल तेथवर १ पेनीपासून ४ पेन्सच्या आंत जातां येत असे इतर सर्व मुंबईला आहे, पण जमिनीखालून १०० फुटांवर सर्व शहरभर रेलवेचें जाळें पसरलेलें पाहून मला प्रथम फारच आश्चर्य वाटलें. पाताळांतून जणूं आपण प्रवास करीत आहों असें ह्मणावयाला काय हरकत आहे ? जेथें खोली फार आहे तेथें लिफ्टमध्यें बसून खालीं जावें लागतें, त्या वेळीं डोळे फिरून घेरी येण्याची पाळी येते. आठ वाजतां फराळ (Breakfast) करून ९ ला बाहेर पडावें, तें १॥ च्या सुमाराला कोठें तरी रिस्टोरॉंमध्यें शिरून कांहीं खावें; पुन: ४॥ पावेतों भटकावें, व नंतर चहा घ्यावा. कांहीं वाचावेंसें वाटल्यास एकाद्या पब्लिक लायब्ररींत जावें व वाचीत बसावें. अशीं पुस्तकालयें हरएक मोठ्या रस्त्यावर आहेत; तेथें सर्व वर्तमानपत्रें व साधारण वाचायचीं पुस्तकें फुकट वाचतां येतात, हें एक लोकशिक्षणाचें साधन हिंदुस्तानांत नाहीं, असो. पुन: ७ वाजतां कोठें तरी हॉटेलांत घुसून जेवावें व हळुहळू ९ पर्यंत घरीं जावें. दिवस कोठेंहि गेला तरी संध्याकाळीं वाचायला मी ट्राफल्गारस्क्केअरजवळील सेंटमार्टिन लायब्ररींत जात असें व तेथेंच जवळ यूस्टस् माइल्सच्या हॉटेलांत रात्रीचें जेवीत असें. या ठिकाणीं भात, इंडियन करी ह्मणून घट्ट वरणासारखा— हिंदुस्तानांत कधींहि न खाल्लेला पदार्थ अगर क्वचित् खरेंखरें घट्ट वरणसुद्धां, पापड व फळें इतके पदार्थ १॥ शिलिंगपावेतों मिळत,

व तेवढ्यांवर काम भागे. कधींकधीं गाजरें, बटाटे व वाल ( फ्रेंच बीन्स ) यांच्या मिसळीची करी मिळे; पण तींत तिखटमिठाचें नांव नाहीं. टेबलावर एक लहानसा मिठाचा पेला, एका बाटलींत मिरपूड व दुसरींत मोहरीची ओली पूड हीं असत. त्यांतून पाहिजे तें स्वतः घेऊन मिसळावें लागे. असो.

मध्येंच ता. १८ व १९ आक्टोबरला केंब्रिजला जाऊन आलों. या शहराला युनिव्हर्सिटी व तिचीं १९।२० कॉलेजें यामुळेंच महत्त्व आलेलें आहे. यांपैकीं कांहीं माझ्या मित्रांनीं मला दाखविलीं. चोंहींकडे विद्यार्थीच; इतर गोष्टींनां महत्त्वच नाहीं. यामुळें मला पूर्वींच्या बुद्धगुरूंची व बोरीवेली वगैरेसारख्या डोंगरांतील त्यांच्या विद्यार्थीमंडळासह राहण्याची, आठवण झाली. लहानशी कॅम् नदी व तिच्या दोन्ही कांठांनीं विद्यार्थ्यांचीं खेळांचीं मैदानें, त्यांच्या पलीकडे मोठमोठ्या कॉलेजच्या इमारती, व सर्वत्र पसरलेली शांतता यांमुळें लंडनच्या गर्दींत, धुळींत, गलबल्यांत, गांगरून गेलेल्या शांतताप्रिय माझ्या मनाला थोडी विश्रांति मिळाल्यासारखें वाटून आनंद झाला. येथील संस्कृतचे प्रोफेसर रॅपसन् यांची ओळख करून त्यांजवळून लाइपझिक येथील संस्कृत प्रोफेसराला पत्र घेतलें व परतलों, व दोनचार दिवसांत जर्मनींत जावयाच्या तयारीला लागलों.

लंडनविषयीं एकदोन गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या वाटल्या त्या अशाः—

एवढें मोठें अवाढव्य शहर, इतका प्रचंड व्यापार, जगाच्या चारहि कोंपऱ्यांकडून आलेल्या माणसांची गर्दी, इतकें असूनहि सर्व सुरळीत चालतें ! मजसारखीं अपरिचित माणसें न चुकतां, व मोटर वगैरेंखालीं न चिरडतां सुरक्षित आपल्या बिऱ्हाडीं येतात, याचें श्रेय लंडनच्या पोलिसला दिलें पाहिजे. कोठेंहि आपला रस्ता चुकला, तरी जवळच्या नाक्यावर पोलिसला विचारावें, तो आपल्या ताठ्यांतच पण एकाद्या

यंत्रासारखें 'Two to the right, three to the left' असें सांगतो व त्याप्रमाणें गेल्यास मनुष्य बिनचुक इष्टस्थळीं येतें. पण नव्या माणसाचा या राइट–लेफ्टमध्यें घोंटाळा होण्याचा संभव असतो— Three to the right, two to the left असें सांगितलें कीं उलट सांगितलें, असा भ्रम झाला ह्मणजे मात्र पंचाईत ! तरी पुनः दुसऱ्याला विचारून आपली चूक सुधारतां येते. रस्ते मोकळे करून गाडीघोडे, ट्रामची रहदारी सुरळीतपणें चालविण्यांत यांची हद्द आहे.

दुसरें, जो तो आपल्या उद्योगांत मग्न असल्यामुळें तुमच्याकडे कोणीहि लक्ष्य देत नाहीं. केवळ मौज पाहण्यासाठीं एकाद्या परकी माणसाभोंवतीं निरुद्योगी माणसांची गर्दी, ही गोष्ट फारशी कधीं दिसावयाची नाहीं. कारण रिकामटेंकडें फिरावें, तर पोटाची व्यवस्था काय, हा प्रश्न ज्याच्यात्याच्यापुढें उभा असतो.

सर्व जगाचीं हुन्नरें येथें, सर्व जगाशीं व्यापार; त्यामुळें सर्व जगाची लबाडी येथें भरली असल्यास नवल नाहीं. पण साधारण जपून वागणाराला तिचा अनुभव सहसा येत नाहीं, व व्यापारी सचोटी ह्मणून जो गुण यांच्यांत आहे, त्यामुळें नेहमींच्या व्यवहारांत फसावयालाहि होत नाहीं. एकाद्या दुकानीं जावें व छत्री मागावी; किंमतींत जास्त असूं शकेल, पण जी एकाला किंमत तीच सगळ्यांनां, व घासाघासीचें नांव नाहीं; यामुळें वेळहि बराच वांचतो, व त्रासहि होत नाहीं.

मी कांहीं इंग्रज अधिकारी व इतर सद्गृहस्थ यांनां भेटलों. या भेटींत त्यांची मजशीं वागणूक सरळपणाची, जशी इंग्रजाशीं तशीच मजशीं असे. यूरोपांत तोंडचलाखी फार असते. जें बोलतात तें सर्वच बेंबीच्या देंठापासून नेहमींच नसतें; असें जरी असलें,तरी पण मी इंडियन ह्मणून मजशीं सभ्यपणांत कांहीं कमी झाल्याचें मला तरी दिसून आलें नाहीं. उलट ज्यांनां ज्यांनां मी भेटलों, त्यांनीं मला मदत करण्याचें आश्वासन दिलें व कांहींनीं ती केलीहि. कोणालाहि भेटावयाला जावयाचें

असतां आधीं पत्र पाठवून वेळ ठरविणें, गेल्यावर आपल्या नांवाचें कार्ड पुढें पाठविणें, कांहीं काम असेल तर व्यवस्थितपणें विनाकारण वेळ न दवडतां पुढें कसें मांडावयाचें तें योजून ठेवणें इत्यादि किरकोळ गोष्टींत सावधगिरी ठेविली ह्मणजे त्यांच्यावर चांगला परिणाम होतो, व ते व्यवस्थितपणें, आस्थेनें आपल्याशीं वागतात.

उद्योगाचा वेळ खेरीजकरून कांहीं काम नसतांना, कोणाला सहज भेटावयाला बोलाविलें ह्मणजे, जेवतांना शिळोप्याच्या—विशेष कांहीं अर्थ नसणाऱ्या पण ताज्या व 'फयाशनेबल'—गप्पा कशा माराव्या, वेळ कंटाळवाणा न वाटतां सहज कसा घालवावा, हें या लोकांनां फार चांगलें ठाऊक आहे. उदाहरणार्थ, ता. १९ आक्टोबर रोजीं ७ वाजतां रात्रीं 'एज्युकेशनल ॲडव्हायसर' यांचे घरीं जेवावयाला गेलों. त्यांची पत्नी समुद्रकिनाऱ्यावर हवा खावयाला गेली असल्यामुळें ते एकटेच घरीं होते. त्यांच्या येथें मी एकंदर दीड तास होतों. तेवढ्यांत हिंदी विद्यार्थी, गाणें, हिंदुस्त्रिया ('हिंदुस्त्रियांविषयीं माझें फार चांगलें मत आहे! मी अलीगडास असतांना' वगैरेवगैरे—येथें अलीगडवाल्यांना संधि मिळाली.) ऑक्सफर्ड विद्यार्थी, जर्मन विद्यार्थी व बीयर, जर्मन म्युनिसीपालिटी, टाउनप्लॅनिंग वगैरे विविध विषयांवर गप्पा झाल्या. या सर्वांविषयीं मला कांहीं माहिती असल्यामुळें संभाषण बरें झालें; नाहीं तर कंटाळवाणें वाटण्याची पाळी आली असती! थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे या दीड तासापैकीं १ मिनिटहि कंटाळवाणें गेलें नाहीं. निघावयाच्या वेळेला ओव्हरकोट हातीं घेणार, तों यांनीं तो माझ्या अंगांत चढविला. कोणीहि पाहुणा निरोप घेत असतांना त्याचा ओव्हरकोट घराच्या मालकानें चढवावा, अशी इकडे चाल आहे.

**लाइपझिक, ११ नोव्हेंबर १९१०.**

२४ तारखेला सकाळीं ९ ला 'चेअरिंग क्रॉस' स्टेशनवरून इकडे यावयाला निघालों. ११ वाजतां डोव्हरला पोहोंचून बोटींतून कॅलेकडे

निघालों. जर्मनींत यावयाला आणखी दोन मार्ग आहेत. एक, ऑस्टेन्ड फ्लशिंग ( बेलजियम ) वरून, व दुसरा हॅम्बुर्ग ( जर्मनी ) मार्गें. मात्र या दोहोंतहि बोटीवर ६ तासांवर वेळ काढावा लागतो; पण कॅले मार्गानें १॥-२ तासांत भागतें. अरबी समुद्रावरील हालांची आठवण ताजी होती, ह्मणून हा मार्गच मला बरा वाटला. कॅलेला उतरलों तों एक फ्रेंच पोर्टर पुढें आला. मी त्याला स्टेशनचें नांव सांगतांच त्यानें 'येस्' ह्मटलें. मला वाटलें याला इंग्रजी येत आहे! पण गाडींत बसल्यावर मी त्याला ४० सांतीम ( ४ पेन्स ) द्यावयाला लागलों, तर तो जोरानें फ्रेंच भाषेंत भांडूं लागला; मी इंग्रजींत बोलूं लागलों, व यापेक्षां ज्यास्ती देण्याचें कारण नाहीं वगैरे सांगूं लागलों; पण कसचें? शेवटीं हें विचित्र भांडण गाडीच्या शिटीनें तोडलें व तो बिचारा दिलें तें घेऊन मला शिव्या देत चालता झाला! ( कारण शिव्यांशिवाय दुसरें तो काय देणार?) दीड वाजतां जेवणाच्या डब्यांत गेलों, तेथेंहि पुनः तीच पंचाईत. तेथील नोकरांना इंग्रजी येत नव्हतें व मला फ्रेंचचा गंधहि नव्हता! पण या अडचणींतून एका अमेरिकन गृहस्थानें दुभाषीपणाचें काम करून मला सोडवलें. विशेष खाल्लें कांहीं नाहींच; पण त्याबद्दल ५ मार्क (३॥। रु.) द्यावे लागले. अर्थात्च पुनः चहाला गेलों नाहीं. रात्रीं ८ वाजतां हर्बेस्थाल–बेलजम व जर्मनी यांच्या सरहद्दीवरील स्टेशन–येथें कस्टम अधिकाऱ्यांनां माझें सामान तपासावयाचें होतें; पुनः पंचाइतींत पडणार तों इंग्लिश येत असलेल्या एका जर्मन व्यापाऱ्यानें मला मदत केली, व कस्टम तपासणींतून सुटलों. त्याच व्यापाऱ्यानें रात्रीं ११ वाजतां कलोन येथें दुसऱ्या गाडींत बसवून दिलें, व त्याचे आभार मानून मी झोंपीं गेलों. सकाळीं सहा वाजतां माग्डेबुर्ग येथें गाडी बदलण्यासाठीं उठलों. प्लॅटफॉर्मवर कॉफी घेऊन एक मुलगा फिरत होता, त्याजजवळून एक पेला घेतला, व काळीभोर कडू जहर कॉफी नाक धरून प्यालों; कारण दूध घालून

ही पिण्याची इकडे चाल नाहीं ! त्या मुलाला अर्धा फ्रांक ( फ्रेंच
ां चांदीचें जवळजवळ सहा आणे ) दिला. त्याला तें नाणें काय
है तें कळेना. त्याला फक्त ' मार्क, हाल्ब–मार्क ' वगैरे जर्मन नाणीं
hक ! दोघेहि गोंधळलों; त्या गोंधळांत तो कांहीं जर्मन बडबडला
ीहि मला भक्कम ठाऊक असलेला जर्मन शब्द ' या ' ( होय )
ारला. त्याचा परिणाम काय होतो हें साशंक मुद्रेनें पाहणार, तों
मुलगा दुसरीकडे निघून गेला व मी कटकटींतून सुटलों. पांचचार
ासांनां ' लाइपझिक', 'लाइपझिक' ह्मणून विचारतां त्यांनीं माझा
शय उमजून मला योग्य गाडी दाखविली व पुनः कांहीं गोंधळांत
डतां ता २९ आक्टोबर रोजीं सकाळीं ९ वाजतां मी येथें येऊन
ल झालों. पाटणाकडला एक मुसलमान विद्यार्थी सरकारी स्कॉलर्शिप
न ॲरॅबिक शिकावयला माझ्या आधीं एक वर्ष येथें येऊन राहिला
है, हें मला लंडन येथें कळलें होतें, व मीं त्याला आधींच पत्र लिहिलें
ं. त्यानें माझें स्टेशनवर स्वागत केलें व कॉफी वगैरे पाहुणचार
्यावर हें ठिकाण—नंबर ७ फर्डिनान्ड ऱ्होड स्ट्रास—पाहून दिलें.
णखाण, खोलीचें भाडें व दासीचें वेतन (याला बेडीनुंग ह्मणतात )
रे सुद्धां महिना १४० मार्क ह्मणजे सात पौंड अगर १०९ रुपये
वाल्या बाईला देण्याचें ठरलें.

अजून मला जर्मन चांगलेंसें येत नाहीं. लंडन येथें एका मास्तर-
ळ सहा धडे शिकलों तेवढेंच काय तें, त्यामुळें पंचाईत पडते. पण
वाल्या बाईला मोडकेंतोडकें इंग्रजी येतें, त्याची व खुणाखाणांची
त बरीच होते. मला वाटतें या अडचणीमुळेंच भाषा लवकर सम-
वयाला मदत होते. ऑब्जेक्ट लेसन् व कॉन्व्हर्सेशनल मेथड यांचें
श्रणच तें. रात्रंदिवस जर्मन भाषाच कानावर पडते, त्यामुळें पुष्कळसे
द, कांहीं वाक्यरचना हीं आपोआप लक्ष्यांत रहातात. दुपारीं १॥
जतां दिवाणखान्यांत जेवावयाला जावयाचें ह्मणजे प्रथमप्रथम जिवा-

वर येई. कारण मला जर्मन लवकर यावें या सदिच्छेनें सर्वजण मजशीं बोलूं लागतात, व लहान मुलाला जसें बोलावयाला लावावें, तसें मला बोलावयाला लावतात. कांहींकांहीं वेळेस मजेदार चुका झाल्या ह्मणजे जो हंशा पिकतो तो विचारूंच नये. चूक होतां होईतों दुरुस्त करून नंतर 'तसें केल्याबद्दल रागबीग मानूं नका' असें सभ्यपणें सांगतात, याचें कौतुक वाटतें. जेवणाच्या वेळीं वागण्यासवरण्यांत नव्या माणसाचें चुकावयाचेंच. पण त्याबद्दल तिटकारा न दाखवतां, अगर चुकणाऱ्या माणसाबद्दल एकदम वाईट ग्रह न होऊं देतां, त्याला हळूच सुचवून वाटेवर आणण्याची येथील मंडळींची सौम्य व सभ्य चाल मला फार आवडते. इतक्या थोड्या दिवसांत आह्मांमध्यें जो सलोखा झाला आहे, तो इतर देशांत झाला असता कीं नसता, हीसुद्धां शंकाच आहे.

लाइपझिक, ९।१२।१०.

युनिव्हर्सिटींत माझें नांव दाखल केल्याबद्दल परवांच युनिव्हर्सिटी रिश्टरचें पत्र आलें. युनिव्हर्सिटी ऑक्टोबरांतच उघडली व विद्यार्थ्यांनां प्रवेश मिळून व्याख्यानेंहि केव्हांच सुरू झालीं आहेत. योग्य तऱ्हेनें प्रवेश मिळविण्यासाठीं मीहि संस्कृताचे प्रोफेसर विंडिश् व फिलॉलॉजीचे प्रोफेसर ब्रुग्मन् यांनां भेटलों. दोघेहि फार सभ्य आहेत. प्रो. विण्डिश् यांनां २७ ऑक्टोबरलाच भेटलों. यांनां इंग्रजी चांगलें येतें. त्यांनीं हरतऱ्हेची मदत करण्याचें कबूल केलें, लायब्ररींत आणि इंडोगरमानिक् इन्स्टिट्यूटमध्यें प्रवेश करवून दिला व ता. २९ ऑक्टोबर रोजीं युनिव्हर्सिटी रिश्टर (रेजिस्ट्रार)कडे घेऊन गेले. त्यांनीं माझा पासपोर्ट, आयडेंटिटी सर्टिफिकेट वगैरे कागद तपासून पाहून ठेवून घेतले. लगेच युनिव्हर्सिटींत प्रवेश मिळाला; पण माझ्या सर्टिफिकीटांत मी प्रोफेसर आहें, असें वाचतांच "तुह्माला येथें विद्यार्थी या नात्यानें प्रवेश मिळणें कठीण पडेल; कारण तुह्मी 'बआम्ट' (इं. ऑफिसर, सरकारी नोकर) आहां,

तुह्माला फक्त लेक्चरें ऐकण्याची परवानगी त्या त्या प्रोफेसरांकडून मेळेल, पण विद्यार्थीपणाचे हक्क मिळणार नाहींत, " असें रिशूरनें सांगितलें. झालें! आमची कम्बरच खचली; पण प्रोफेसर विण्डिशनीं धीर देला, कीं "मीं वाटेल ती खटपट करून 'कुल्तुस् मिनिस्टेरिउम्' (इं. मेनिस्टर ऑफ् एज्युकेशन् अँड रिलिजन ) विद्याखात्याच्या मंत्र्याकडून परवानगी मिळेलसें पाहतों.तोंवर तुह्मी माझीं कांहीं व प्रो.ब्रुग्मान् यांचीं कांहीं नवशिक्यांसाठीं दिलीं जाणारीं लेक्चरें ऐका!" त्याप्रमाणें मी लेक्चरें ऐकूं लागलों. प्रथम काय समजणार? पण एका मास्तराच्या मदतीनें या त्या विषयावरील सोपीं पुस्तकें घरीं वाचून बरीच मेहनत करून लेक्चरें ऐकूं लागलों. प्रथमप्रथम या लेक्चरांच्या द्वाराहि जर्मन भाषाच शिकावयाची, इतर गोष्टींकडे लक्ष्यच द्यावयाचें नाहीं, अशी मनाशीं गांठ मारून ठेविली. पारिभाषिक शब्द कांहींकांहीं ठाऊक झाल्यावर लेक्चरांचा गोषवारा तरी समजूं लागे. इतकें करून आपणाला युनिव्हर्सिटींत हक्काचा प्रवेश मिळणार कीं नाहीं, ही धागधूग मागें होतीच. तसा प्रवेश न मिळाला तर 'इन्स्टिटूट्मध्यें प्रोफेसर व कांहीं निवडक विद्यार्थी यांचीं दर आठवड्यांत जीं प्रवचनें होतात (यांस 'युबूंग'–इं. प्रॅक्टिस–प्रयोग ह्मणतात.) तीं आपणांला ऐकण्यास मिळणार नाहींत, वाटेल तीं लेक्चरें ऐकतां येणार नाहींत, व मनांत आल्यास थीसिस् (निबंध)–चीहि तयारी करतां येणार नाहीं, व मग आपला येथवरचा प्रवास फुकट गेल्यासारखें होईल, असें हमेष वाटे. पण वर लिहिल्याप्रमाणें रिशूरचें पत्र आलें, व मी एका प्रसिद्ध जुन्या जर्मन युनिव्हर्सिटीचा विद्यार्थी झालों. पांचशें वर्षांची जुनी ही युनिव्हर्सिटी. हींत इरॅस्मस्, लाइब्निट्स् ,गॉटेसारखे प्रसिद्ध पुरुष विद्यार्थी होते. हींतच आपणहि विद्यार्थी झालों, याबद्दल मला अभिमान वाटूं लागला. यासंबंधीं एक लहानसा विधि असतो. ज्यांनां विद्यार्थीपणाचा हक्क मान मिळाला आहे, असे विद्यार्थी एका दिवाणखान्यांत जमतात.

तेथें रेक्टर (आपल्याकडील चॅन्सेलर)–ची स्वारी थाटानें येते, व प्रत्येक विद्यार्थ्याला विद्यार्थिपणाचें आपल्या सहीशिक्क्याचें सर्टिफिकट (याला 'इम्माट्रिकुलात्स्योन' ह्मणतात.) व एक 'औसवाइजकार्ट'नांवाचें टिकिट देऊन प्रत्येकजणाशीं हस्तांदोलन करते. हा विधि उरकल्यानंतर रेक्टरचें छोटेंसें उपदेशपर भाषण होऊन समारंभ खलास होतो. हा इम्माट्रिकुलात्स्योन्‌चा दाखला अद्यापपावेतों लॅटिन भाषेंत लिहितात, हें नवल आहे. या दाखल्यासाठीं १५।१६ रुपये फी द्यावी लागली. आतां युनिव्हर्सिटी लायब्ररींतून वाटेल तितकीं पुस्तकें बहुतेक फुकट घरीं वाचावयाला न्यावीं,अगर तेथेंच वाचकवर्गासाठीं मोठा हॉल बांधून तेथें खुर्ची, टेबल, दिवा वगैरे सोय केली आहे, तेथें बसून वाटेल तेवढा वेळ वाचावें. वाटेल तें पुस्तक एका अर्ध्या तासाच्या आंत काढून मिळतें. इन्स्टिटूट्‌मध्यें दिवसरात्र वाचीत काम करीत बसावें; वाटेल तेवढीं लेक्चरें ऐकावीं; या सगळ्या गोष्टींची मुभा मिळाली आहे व तिचा मी पूर्ण फायदा घेत आहें. एका विषयाचीं आठवड्यांत चार लेक्चरें ऐकलीं, तर त्यांनां सर्व सेमेस्टर (टर्म–अर्धे वर्ष)--ची अवघी १२ रुपये फी द्यावी लागते. ही फी प्रोफेसराची खाजगी असते. आपल्या विषयाच्या इन्स्टिटूट्‌चे सभासद होण्यास एका टर्मची सव्वादोन रुपये फी असते. सर्वांची जी फी जमेल, ती इन्स्टिटूट्‌साठीं पुस्तकें खरेदी करण्यांत खर्च होते. माझें 'इन्डोगर मानिशेस,' (इंडोजर्मनीक) इन्स्टिटूट्‌ युनिव्हर्सिटीच्या शेजारींच असल्यामुळें सकाळीं ८ ते ९ पर्यंत लेक्चर ऐकून इन्स्टिटूट्‌मध्यें येऊन वाचावें; बाराला पुनः लेक्चर असल्यास तें ऐकून मग एक वाजतां जेवण्यासाठीं घरीं जावें; दुपारीं पुनः तीन वाजतां लेक्चर असल्यास ऐकावें; चार ते सहापर्यंत इन्स्टिटूट्‌मध्यें काम करावें, पुनः तासभर लेक्चर ऐकून सात नंतर घरीं परत जावें, असें करतां येतें. प्रो. ब्रुगमान्‌च्या 'यूबुंग्ज' (प्रवचनें–हीं दरगुरुवारीं संध्याकाळीं सात ते नऊ पावेतोंअसतात.)जरा गहन असल्यामुळें मी त्यापुढल्या

सहामाहींत (समर सेमेस्टर) ऐकण्याचें ठरविलें आहे. तूर्त त्यांचीं चार सोपीं लेक्चरें नाताळच्या सुटीनंतर ऐकण्याचें ठरविलें आहे. सध्यां प्रो. विण्डिश् यांचें 'जुन्या संस्कृत वाङ्मयाचा इतिहास' हें लेक्चर व प्रो. फोल्केल्ट यांचीं तत्त्वज्ञानावरील लेक्चरें ऐकतों. फोल्केल्ट फार स्पष्ट व अगदीं सोप्या भाषेंत बोलतात, ह्मणून त्यांचीं लेक्चरें ऐकण्यानें भाषेचें ज्ञान अधिक होतें.

याशिवाय वाचनाचा—केवळ जर्मन लवकर व चांगलें यावें या दृष्टीनें वाचावयाचा—व्यवसाय ठेवला आहे. वृद्ध घरवाली बाई फार गोड स्वभावाची व मनमिळाऊ आहे. तिलाच रात्रीं तास अर्धा तास कांहीं तरी सोपेंसें गोष्टीचें पुस्तक अगर नाटक वाचून दाखवितों. यामुळें शब्दांचा भरणा होऊन लवकर बोलतां येण्यास चांगली मदत होते. वर्तमानपत्रांत कोठें कांहीं सोपें सांपडल्यास बाई मजकडून वाचवून घेते. मध्येंच ती बोलावयालाहि लावते. भाषांतरें करीत बसल्याचा कंटाळा येतो, व माझा मास्तर तें करवून घेण्याच्या फारसा आग्रहांत पडत नाहीं.

इन्स्टिटूट्पैकीं कांहीं निवडक विद्यार्थ्यांच्या ओळखी झाल्या आहेत. माझ्याशीं सर्वजण बरे वागतात व यथाशक्ति मदत करतात. यांपैकीं कांहींजण जेव्हां पहावें, तेव्हां इन्स्टिटूट्मध्यें वाचीत अगर लिहीत बसलेले दिसतात. यांच्या या काम करण्याच्या चिकाटीचें आश्चर्य वाटतें. कांहींजण सकाळींच (मांसाच्या तुकड्यानें भरलेली) भाकरी खिशांत घालून लेक्चरला जातात, व दोन लेक्चरांच्यामध्यें जो पाव तास सांपडतो त्यांत त्या भाकरीवर ताव मारीत सज्जांत अगर चौकांत फिरतात. असें खाणें गैरशिस्त आहे—निदान प्रशस्त तरी नाहीं, असें कोणालाहि वाटत नाहीं.

**लाइपझिक,** ६ जानेवारी, १९११.

इकडे नाताळाचा सण फार मोठा मानला जातो. आपल्याकडे जशी दिवाळीच्या सुमारास साफसुफी करतात, तसेंच इकडेहि करून खिस्त-

मस् देणग्यांसाठीं ह्मणून नानातऱ्हेच्या वस्तु दुकानांतून विकावयाला ठेवलेल्या असतात. एरवीं रविवारीं बाजार अगदीं बंद असावायचा; पण डिसेंबर महिन्याच्या प्रत्येक रविवारीं दुकानें आपलीं उघडीं असतात. शिवाय ख्रिस्तमस्साठीं ह्मणून मुद्दाम एक बाजार एका ठरींव चौकांत पालांपालांतून भरत असतो. खाण्याच्या व मुलांच्या खेळाच्याच वस्तु फार असतात, हें सांगणें नकोच. या वेळीं मुलांच्या जिवाची धांदल विचारूंच नये! 'हें विकत घे, तें विकत घे' असें करीत तीं आपल्या आईबापांनां सारखीं बाजारांतून हिंडवीत असतात. शेवटीं हे नाताळाचे दिवस केव्हां संपतील असें त्यांनां होतें! नाताळचा मुख्य दिवस 'हायलिगर आबेंड्' (ता. २४ डिसेंबर) जसजसा जवळ येत जातो, तसतसें गांवांतील बहुतेक चौकांत 'टान' (इंग्रजी—फर्) झाडाच्या खांद्या विकण्यासाठीं शेतकरी व खेड्याचे इतर लोक दुकानें मांडून बसतात. या झाडाची एकटी मोठी खांदी आपल्या सरूसारखी दुरून दिसते. हिंवाळ्यांतसुद्धां ज्यांनां हिरवीं पानें असतात, अशा अगदीं थोड्या उत्तरयूरोपियन झाडांपैकीं 'टान' हें एक झाड आहे. ह्मणूनच याच्या खांद्या अगर उंचसे रोपे विकत घेऊन ते घरांतील दिवाणखान्यांत शोभेच्या ठिकाणीं उभारून ठेवण्याची इकडे चाल आहे. चांगल्या रोपट्याला ५ पासून १० मार्क पडतात. ते घरांत आणून उभे केल्यावर त्यांत कांचेचे गोळे, खोट्या चांदीच्या झिरमिळ्या, मेणबत्त्या, चंद्र-जोतीच्या काड्या वगैरे लावून आरास करतात, व पवित्र संध्याकाळीं ह्मणजे ख्रिस्तजन्माच्या दिवशीं संध्याकाळीं दिवे लावूनहि आरास पहावयाला घरांतील सर्वजण जमतात. या झाडाला 'क्रिस्त बाउम्' अगर नाताळाचें झाड ह्मणतात. ही चाल जर्मन लोक ख्रिस्ती होण्याच्या पूर्वींपासूनची असून ख्रिस्तधर्म स्वीकारल्यावरहि उत्सवप्रिय लोकांनीं ती तशीच चालू ठेविली आहे, असें विद्वानांचें ह्मणणें आहे.

नाताळासाठीं ज्या देणग्या द्यावयाच्या त्या या झाडाखालीं लपवून ठेवलेल्या असतात, व २४ वीला रात्रीं त्या सर्वांनीं आपापल्या हुडकून

ध्यावयाच्या असतात. ज्या घरीं मुलेंबाळें असतात तेथली धांदल व तेथला आनंद काय विचारावा! या देणग्या वायनाख्ट्स्मान् (इं. फादर् ख्रिस्टमस्) आणून देत असतो, अशी इकडील मुलांची समजूत करून दिलेली असते. हें झाल्यावर मग फराळ, चहाकॉफी, दारू वगैरे प्रकार होऊन मध्यरात्र उलटल्यावर व सर्व देवळांतून ख्रिस्तजन्माबद्दल गजर झाल्यावर सर्वजण निजावयाला जातात. पुढचे दोन दिवस मेजवान्या, भेटी-परतभेटी यांच्या गडबडींत जातात. मर्टल्वेली उंबऱ्यावर टांगून तिच्याखालीं यदृच्छेनें जाणाऱ्या तरुणींचें अकस्मात् जाऊन चुंबन घेण्याची इंग्रजी चाल येथें नाहीं. मेजवानीला 'टूट्हान्' ( इं. टर्की कॉक ) व प्लम्पुडिंग करण्याची चाल कोठेंकोठें आहे; पण ती अनुक्रमें अमेरिका व इंग्लंड यांतून आलेली आहे.

नाताळाचें झाड व त्यांतील आरास नव्या वर्षापर्यंत कायम ठेवतात. वर्षाच्या शेवटल्या दिवशीं ( ता. ३१ डिसेंबर ) आमच्या येथेंहि नाताळाच्या झाडांत दिवे लावले होते. पार्टीसाठीं मित्रमंडळी बोलावलेली होती. प्रथम जेवण, गप्पागोष्टी झाल्या; नंतर बऱ्याच वेळानें चहाकॉफी, आइस्क्रीम, केक्स व कढतकढत पंच (चारपांच दारूंचें उकळलेलें तांबडें मिश्रण ) इत्यादींची फैर झडली. जसजशी रात्र होत चालली, तसतसे सर्वजण झोंपेनें अधीर झालेले असले, तरी जुन्या वर्षाचा अंत पाहण्याला उत्सुकतेनें जागत बसले होते. नव्या वर्षाचा आरंभ पाहण्यासाठीं सर्वजण उतावीळ पण स्तब्धपणें बसले होते. हळुहळू झाडांतले दिवेहि पेंगूं लागले. सर्वत्र शांतता पसरली होती. खरोखरच घरांतलें कोणी आसन्नमरण असतां त्याभोंवतीं जागत बसावें तसा भास होऊं लागला. जुन्या वर्षाच्या अंतकाळीं सर्वत्र स्तिमित झालें होतें. बाहेर रस्त्यावरसुद्धां सुई पडली असती तरी देखील ऐकूं आली असती! इतक्यांत १२ बरोबर सर्वत्र एकदम जिवंतपणाचा संचार झाल्याचा भास झाला. चोहींकडे खिडक्या उघडून त्यांतून

बाहेर डोकीं काढून मुलेंमाणसें आनंदानें 'प्रोझिट् नॉययार्' सुखकर नवें वर्ष! असें मोठ्यानें ओरडूं लागलीं. बरेच लोक गांवांत फिरण्यासाठीं घरांतून बाहेर पडले व खिडकींतून कोणी ' प्रोझिट् नॉययार् ' ह्मटलें, कीं, आपणहि प्रत्युत्तरादाखल 'प्रोझिट् नॉययार्!' ह्मणून ओरडत फिरूं लागले. बहुतेक घरीं नाताळाच्या झाडासमोर गाणें, नाचणें, ग्रामोफोन वगैरे उत्सव व आनंद यांचीं चिन्हें स्पष्ट ऐकूं येऊं लागलीं. जिकडे-तिकडे आनंदच आनंद, पुन: केक न व पंच यांवर फडशा! बायकामुलें सुद्धां पितात, व पेले एकमेकांच्या पेल्यांनां लावून ' तुमच्या सुखासाठीं !' ह्मणून झोंकतात ! पांचच मिनिटांपूर्वीं जिकडेतिकडे शांत, मृतप्राय वाटे, तें नंतर नव्या वर्षाच्या स्वागतार्थ सर्वत्र आनंदमय झालें. सर्व देवळांतून घंटा वाजूं लागल्या. त्यांचा तो गंभीर ' डिंग डाँग डिंग, डिंग डाँग डिंग ' असा आवाज लोकांनां जणूं 'आनंद करा, आनंद करा,' असें सांगत आहे असें वाटे. या वेळीं मला आंग्ल कविवर्य टेनिसन्च्या खालील ओळींची आठवण झाली:—

' Ring out the old, ring in the new,
Ring happy bells across the snow;
The year is going, let him go
Ring out the false, ring in the true.

Ring out false pride in place and blood,
The civic slander and the spite;
Ring in the love of truth and right,
Ring in the common love of good.'

**लाइपझिक**, ३।२।११

सध्यां इकडे हिंवाळ्याचा भर आहे. वारंवार बर्फ पडतें. जवळील पार्कमधील सर्व तळ्यांचें पाणी गोठतें व त्यावर स्केटिंग करण्यासाठीं सकाळदुपार दोन्ही वेळ लहानमोठीं माणसें जातात. रस्ते सगळे बर्फानें

पांढरे स्वच्छ, पानें झडलेल्या झाडांच्या खराट्यासारख्या दिसणाऱ्या खांद्यांवर शुभ्र बर्फाचा थर, घरांच्या कौलांवर बर्फमय आच्छादन असें जिकडेतिकडे हिममय, पांढरें शुभ्र दिसून डोळयांला सुख आणि मनाला अप्रतिम आनंद होतो. नोव्हेंबरमध्यें पहिल्यांदाच बर्फ पडलें, तेव्हां बर्फ कसें पडतें हें मला ठाऊक नसल्यामुळें प्रथम मी आश्चर्यचकित झालों होतों. एक दिवस थंडींत युनिव्हर्सिटीकडे दुपारचा जावयाला निघालों, तों थंडगार पाऊस पडूं लागला, व पुढें त्यांतच पिंजलेल्या कापसाच्या लहानलहान चकत्यांसारख्या चकत्या पडूं लागल्या. प्रथम हें काय आहे हेंच कळेना; परंतु मग त्या चकत्या खालीं बसून रस्ता पांढरा शुभ्र झाला, तेव्हां कळलें, कीं हें बर्फ पडलें ह्मणून!

आदल्या दिवशीं संध्याकाळीं बर्फ पडून जावें, रात्रीं कडक थंडी—फ्रीझिंग पॉइंटच्याहि खालीं ८।१० डिग्री—पडावी, व सकाळीं पुन: स्वच्छ सूर्यप्रकाश पडावा, अशा दिवसाची शोभा कांहीं अपूर्व दिसते! जिकडेतिकडे शुभ्र व स्वच्छ बर्फ पडतें, व त्यांवर सूर्याचीं किरणें चकाकतात, तेव्हांचें दिवसाचें ऐश्वर्य कांहीं अवर्णनीय असतें. अशी हवा परवांच्या रविवारीं दुपारीं पडली होती. माझे भोजनबंधु डॉ. मेंक व त्यांची आई यांनीं जेवण झाल्यावर 'आपण आज दूरसे फिरायला जाऊं, येतां का?' ह्मणून विचारलें, व मी त्यांजबरोबर फिरावयाला गेलों. दोन वाजल्यावर आह्मी पार्कमधून निघालों. डॉ. मेंक हे फार विनोदी गृहस्थ आहेत. त्यांनीं अनेक प्रकारांनीं थट्टा करून मला हंसवावें. आह्मी बरेच लांब गाश्वित्स नांवाच्या खेड्याकडे फिरतफिरत गेलों. वाटेंत नानाप्रकारच्या गप्पा झाल्या. जर्मन इतिहास, राज्यपद्धति, शिक्षण यांविषयीं बरीच माहिती त्यांनीं मला सांगितली. 'तुह्मी इतक्या लांबून आमच्यांत आलांत, तेव्हां आमचे रीतीरिवाज, स्वभाव यांविषयीं होतां होई तों प्रत्यक्ष माहिती मिळवावी, हें बरें. दुसऱ्यांनीं आमच्या स्वभावांचीं केलेलीं वर्णनें यथार्थ नसतात,' वगैरे इषारा त्यांनीं दिला. पुढें वाटेंत

रानांमध्यें गोठलेल्या पाण्याचें डबकें लागलें; तेव्हां 'चला, तुह्माला बर्फावरून घसरायला शिकवतों,' ह्मणून त्यांनीं मला बर्फावर नेलें. परंतु मला तें कसचें साधतें ? मी तेव्हांच पडलों; त्याचें मलाच हंसूं आलें. 'बर्फ कसें असतें, हें जवळून पाहण्याची तुमची इच्छा होती वाटतें ?' वगैरे बोलून डॉ. मेंक यांनीं थट्टा केली. नंतर आह्मी एका खेड्यांत शिरलों. तेथें एका उपाहारगृहांत संगीत ऐकूं येऊं लागलें; तेव्हां 'जर्मन खेड्यांतील लोक रविवार कसा घालवतात तें तुह्माला दाखवतों चला,' असें ह्मणून डॉ. मेंक यांनीं मला ओढलें. तेथें आंत मोठ्या दिवाणखान्यांत नाच, रंग, गायन चाललें होतें. आह्मी अर्धा तास तेथें बसलों. करमणूक झाली. आंत स्त्रीपुरुषांचा बराच मोठा समुदाय होता. स्त्रिया खेड्यांतील वाणीउदमी, शेतकरी यांच्या होत्या. पुरुषबायकांच्या जोड्या अंगाशीं अंग, छातीशीं छाती, तोंडाजवळ तोंड लावून नाचतांना पाहून अपूर्वपणानें जरा कसेंसेंच वाटलें! बाया नाचण्याच्या जागेच्या बाजूला टेबलाशीं बसलेल्या असतात. कोणी पुरुषानें येऊन विचारलें तर नाचावयाचें, नाहीं तर तटस्थ बसावयाचें. एका मुलीला तीनचारदां तीनचार निराळ्या माणसांबरोबर नाचण्याचा सुयोग आला, आणि तिच्या शेजारच्या दोघीतिघी मनांत तिचा हेवा करीत स्वस्थ बसल्या होत्या बिचाऱ्या ! ज्यांना कोणी पुसत नाहीं, 'नाचावयाला येतेस का ?' असें विचारीत नाहीं, अशा स्त्रियांना 'मावर ब्लूमेन' ह्मणजे भिंतीवरचीं फुलें–केवळ शोभेला, काढून घेतां येत नाहीं व इतर कांहीं उपयोग नाहीं अशीं–असें थट्टेनें ह्मणतात. नंतर आह्मी उठलों व वनांतून फिरतफिरत रात्रीं सात वाजतां घरीं आलों.

परवां नुकतेच एक पंजाबी गृहस्थ मला भेटावयाला आले होते. ते गेल्यावर दुपारीं आह्मी दहाबाराजण जेवावयाला जमलों. त्या वेळीं झालेल्या संवादावरून दोन भिन्न संस्कृतीच्या लोकांत कांहीं एकाच बाबतींत सभ्यासभ्यतेच्या, शिष्टाशिष्ट प्रकाराच्या कल्पना कशा भिन्न असतात, हें दिसून येईल. मिस लँडिन् नांवाची अमेरिकन मुलगी मला विचारते "का हो, तुह्मी आपल्या मित्राचें चुंबन घेतलेंत ?"



‘ फामिलिएन् आबेन्ड्’ ( इं. ॲट होम् ).

मी ह्मणालों "नाहीं. आमच्यांत तशी चाल नाहीं. आमच्यांत तें एका दृष्टीनें पवित्र व दुसरीनें शृंगारिक मानलें जातें."

मिस लँडिन् ह्मणते "किती चमत्कारिक हें?"

यावर डॉ. मेंक ह्मणाले "अहो, तरुण मुलींचें चुंबन फार गोड लागतें, बरें का? आह्मी त्याचा मनसोक्त अनुभव घेतों!"

मिस लँडिन् ह्मणते "डॉक्टर मेंक, काय तुह्मीहि चुंबनें घेतलीं ह्मणतां?"

डॉ० मेंक ह्मणतात "अलबत."

वगैरे.

**लाइपझिक्, ता. १।३।११.**

या घरांत आह्मी सहाजण रहातों, व बाहेरचे सातआठजण (पुरुषबायका मिळून) फक्त दुपारीं जेवावयाला येथें येतात. ही आमची 'टिश गेझेल शाफ्ट' अथवा भोजनमंडळी. या मंडळीनें कांहीं नियम केले आहेत. पैकीं एक असा आहे, कीं, जेवणाला येण्याला ज्याला उशीर होईल, त्यानें १० फेनी (सव्वा आणा) दंड ह्मणून द्यावा. हे पैसे सांठविण्यासाठीं प्रशियन हेमलेट घातलेला एक धातूचा छोटासा कुत्रा भोजनमंडळींपैकीं एकानें नजर केला आहे. याच्या पाठीला १० फेनीचें नाणें मावण्याएवढें भोंक आहे, त्यांतून दंडाचे पैसे टाकावयाचे. असे जवळजवळ १५ मार्क (सव्वाअकरा रुपये) जमले, तेव्हां एका संध्याकाळची 'फामीलिएन् आबेंड' (ॲटहोम पार्टी) करण्याचें ठरलें. खाण्यापिण्याचे पदार्थ अर्थात् रगड होते. गप्पा, गायन, नानातऱ्हेचे खेळ झाले. यांपैकीं कांहीं खेळ आपल्याकडे पोरकट समजले जातील; पण लहानमोठे सर्वजण त्यांत मनःपूर्वक पडून आपली करमणूक करून घेत असतात. एक खेळ, आंधळीकोशिंबिरीप्रमाणें एकाचे डोळे बांधून त्याच्या हातांत दोन चमचे द्यावयाचे, व त्याला आपल्या अंगाभोंवतीं

दोनचार गिरक्या घालावयाला लावून बाकीच्यांनीं आपापल्या जागीं बसावयाचें, व आंधळ्यानें आपल्या चमच्यांत कोणाला तरी एकाला पकडून, चमच्यानेंच चांचपून कोणाला धरलें आहे तें ओळखावयाचें. तो चमचा आंगावरून फिरवीत पकडलेल्या माणसाचें जेव्हां वर्णन सुरू होतें, तेव्हां जो हंशा पिकतो तो विचारूं नये. एकाद्या बाईला आंधळ्यानें पकडलें असून 'हा बुवा आहे' असें ह्मणावें, नंतर अधिक वर्णन करतांना तो लठ्ठेश्वर आहे असें ह्मणावें, ह्मणजे खूब खसखस पिकते. त्या माणसाला आपण स्त्री पकडली आहे असें कळतें, तर तो जास्त जपून शब्द वापरता. 'लठ्ठेश्वर' वगैरे संबोधनें कधींहि न देता!

दुसरा खेळ, खोखोमध्यें मुलें जशीं बसतात, तशा तऱ्हेनें खुर्च्या एक-मेकांला खेटून ठेवायच्या; मात्र माणसांच्या संख्येपेक्षां १ खुर्ची कमी असली पाहिजे. नंतर कोणी तरी पियानो वाजवायचा, व बाकीच्यांनीं खुर्च्यां-भोंवतीं पळायचें. पियानो जसजसा जास्त जोरानें वाजेल, तसतसें जास्त जोरानें पळावें लागतें. वाजणें बंद झाल्याबरोबर सर्वांनीं जागा सांपडेल तेथें बसण्याचा प्रयत्न करायचा. कोणी तरी एकजण शिल्लक रहातोच. गडबडींत खुर्चीच्या पाठीकडून कोणी बसूं लागतात, व गुळगुळीत लांकडी जमिनीवर आपटतात; कोणी एकाच खुर्चीवर बसण्याचा प्रयत्न करीत असतांना एकमेकांच्या मांडीवर बसतात. असा एकच गोंधळ उडतो. नंतर शिल्लक राहिलेला एकजण बाजूला रहातो, व त्याच्याबद्दल एक खुर्ची कमी करून पुनः खेळ सुरू होतो. शेवटीं एकच माणूस उरला, ह्मणजे खेळ संपला.

तिसरा खेळ, सर्वजणांनीं मोठेंसें रंगण करून खुर्च्यांवर बसायचें, व प्रत्येकाला एक एक टोपण नांव ठेवायचें. नंतर एकानें (याला खुर्ची नसते) मध्यें उभें राहून ताह्मन, ताट अगर तबक उभें फिरवून, कोणाचें तरी टोपण नांव घेऊन हांक मारायची, व तो आला असतां त्याची जागा आपण पटकावयाची. त्यानें लवकर येऊन फिरतें ताट

पडायच्या आधीं उचललें तर ठीक, नाहीं तर तो हरला असें समजून त्याजपासून कांहीं तरी वस्तु दंडादाखल घ्यावी व ताटली पुनः फिरवावी. या खेळानें थोडा उत्साह येतो. शिवाय, ताटली पडण्यापूर्वी झेलायच्या गडबडींत कोणाचा पाय घसरून पडल्यास मजा होते ती निराळीच.

चौथा जाहिरातींचा खेळ. सर्वांजवळ कागद देऊन प्रत्येकाला उभी घडी पाडायला सांगायची, व नंतर वर्तमानपत्रांत जसे जाहिरातींचे मथळे असतात तसे लिहायला लावायचें. नंतर त्या लिहिलेल्या भागावर घडी पाडून त्या कागदांची अदलाबदल करायची, व ज्यांनीं ज्यांनीं जशी जाहिरात लिहिण्याचें योजिलें असेल, तशीच ती दुसऱ्याकडून मिळालेल्या कागदावर पुरी करायची. नंतर एकजण हे सर्व कागद वाचतो. त्यांत नाना तऱ्हेच्या हास्यास्पद गमती निघतात. उदारणार्थ, १. एक घोडा–केंसांवर रामबाण औषध. २. तरुण स्त्री–भाड्यानें देणें आहे. ३. एक घर–रुचकर असून शक्तिवर्धक. ४. एक कोंबडी–तरुण श्रीमान् वर पाहिजे! इत्यादि इत्यादि.

याच दंडाच्या पैशांतून एकदां दुपारीं जेवण होतांच आठदहाजण मिळून सहलपार्टी काढली. एका खेड्याजवळील सुंदर वनांत जायला निघालों. मी आपला तांबडा रेशमी रुमाल घातला होता. आमच्या पैकीं एकजण सहा फुटांवर कांहीं इंच ताडासारखा उंच वाढलेला होता, त्याची उंची व माझा रुमाल यामुळें सर्वजण आमच्या कंपूकडे टकमकां पहात. आह्मी वनाचे तोंडीं गेल्यावर दोन फोटो घेतले. वन फारच सुंदर, रस्त्याचे दोन्ही बाजूंस 'टान' झाडें नियमित अंतरावर लावलेलीं, व त्यांमध्यें गवत. आह्मी खूब फिरलों, फळेंहि खाल्लीं. नंतर कॉफी वगैरे कांहीं मिळावें ह्मणून जवळच्या खेड्यांत शिरलों, तेथें खेडवळ मुलें आमच्यामागें लागलीं. त्यांनां वाटे, ही फिरस्ती नाटककंपनी आहे! कोणी नीट उपाहारगृहाचा पत्ता सांगेना. शेवटीं कंटाळून एका उपाहारगृहांत शिरलों, तों तेथें घमकन् घाण आली; ह्मणून

एकएकजण आंत गेलों तसे बाहेर पडलों. मालक रानवट दिसत असून दारूच्या धुंदींत होता; तो रागावून पुढें आला व आह्मांपैकीं उंच गृहस्थ मागें राहिला होता त्याला 'चल निघ बाहेर' ह्मणून ढकलून आपले बटबटीत व पांढरे डोळे बाहेर काढीत गुरगुरला. त्याचें तें खरबुजी तोंड, भेसूर डोळे, टेंकाडासारखें मध्येंच वर आलेलें नाक, केरसुणीसारख्या चढवलेल्या भिवया, व एकंदर तारवट हावभाव हें सर्व एकाद्या चिताऱ्याला रंगवण्या योग्य होतें. मग उपाहारगृहाचा नाद सोडून तेथून स्टेशनचा रस्ता धरला. मी तुर्क आहें, असें त्या खेडवळांस वाटलें. आमच्या मागें दोनतीन नांगरे चालले होते, त्यांनीं आमच्यापैकीं एका थट्टेखोराला येऊन विचारलें 'का हो, तुमचा तो लंभाव्या किती उंच आहे ?' आमचा गमत्या उत्तर देतो 'तो एक माणूस नाहीं, दोन माणसें एकावर एक जोडून चाललीं आहेत.' तेव्हां एका नांगऱ्यानें आपलें काळसर, कुरूप रुंदट दाभाड विचकून 'ओऽऽ (असें काय ?)' असें आश्चर्यानें पांढऱ्या झालेल्या डोळ्यांतून जणूं ह्मटलें. स्टेशनजवळ येतों तों वळिवाच्या पावसानें धांदल उडविली. आमच्या बरोबरच्या बायांनां हाऱ्यायेवढाल्या आपल्या टोप्या व झगे संभाळतांसंभाळतां पुरेवाट झाली. नंतर संध्याकाळीं सात वाजतां कसेबसे घरीं पोंचलों.

लाइप्झिक्, ता. १५ मार्च.

टर्म संपल्याला आठ दिवस होऊन गेले. आतां युनिव्हर्सिटी दीड महिना बंद राहून एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यांत उघडेल. लेक्चरें सुरू असलीं ह्मणजे दिवसाचे बारा तास ज्ञानसत्र सारखें चाललेलें असतें. लेक्चर-हॉल व लेक्चररूम मिळून पंचेचाळीस खोल्या आहेत. यांत सकाळीं आठपासून रात्रीं नऊपर्यंत कांहींना कांहीं विषयांवर लेक्चरें सारखीं चाललेलीं असतात. दुपारीं एकपासून तीनपर्यंत कायती विश्रांति असते. युनिव्हर्सिटींत सध्यां एकंदर साडेचार हजार विद्यार्थी

आहेत, ते निरनिराळ्या विषयांवारीं वांटले जातात. युनिव्हर्सिटीच्या धर्म, कायदा, वैद्यक व तत्त्वज्ञान अशा चार मुख्य शाखा असून प्रत्येक शाखेंत किती तरी निरनिराळ्या विषयांवर आणि पोटविषयांवर व्याख्यानें होत असतात. तत्त्वज्ञान हें मायपोट आहे; त्यांत खरेंखुरें तत्त्वज्ञान, इतिहास, समुद्रासारखा विस्तीर्ण भाषाविषय, मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र व यंत्ररसायनादि नवीं शास्त्रें या सर्वांचा अंतर्भाव होतो. हे निरनिराळे विषय शिकवायला दीडशें कसलेले मुख्य अध्यापक व तितकेच उपाध्यापक आहेत. प्रत्येकाला आठवड्यांतून सहा तासांवर काम नसतें, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. कामाचे दिवसांत युनिव्हर्सिटीची इमारत किती गजबजलेली दिसते! पण सुटी होतांच तींत बहुतेक सामसूम होतें. विद्यार्थ्यांनां घ्यावीं तितकीं लेक्चरें व करावें तेवढें काम! आठवड्यांत सतरांपासून वीस लेक्चरें घेणारे विद्यार्थी मला ठाऊक आहेत. लेक्चर फक्त पाऊण तासाचेंच असल्यामुळें फारसा ताण पडत नाहीं. हवीं तेवढीं लेक्चरें घ्यावीं, हवे तितके दिवस ऐकावीं, फक्त फी भरून पटावर नांव पडलें ह्मणजे पुरतें. हजिरी वगैरे कोणी पहात नाहीं. परीक्षा देणें असेल तर एक निबंध व तीन कोणचे तरी विषय तोंडी परीक्षेसाठीं, एवढाच युनिव्हर्सिटीचा विद्यार्थ्यांवर निर्बंध असतो. इतकी मोकळीक असूनहि येथले विद्यार्थी जितकी मेहनत घेतात, तितकी इतरत्र घेत असतील कीं नाहीं, याची शंकाच वाटते. पण कामाच्या वेळीं काम व करमणुकीच्या वेळीं करमणूक हें तत्त्व या लोकाच्या हाडींमासीं खिळलेलें आहे. यामुळें संध्याकाळीं नाटक, कॉन्सर्ट वगैरे ऐकायला जावें, तेथें विद्यार्थ्यांचा भरणा बराच दिसतो. त्यांनां सवलतीहि फार असतात. विद्यार्थ्यांस सर्व ठिकाणीं निम्मे दर असतो.

टर्म संपत आली असतां मी एकदां नाटकाला आणि एकदां कॉन्सर्टला गेलों होतों. नाटक व्हायचें तसें रीतसर झालें; पण स्टेजपेक्षां प्रेक्षक-

समुदायांतच विशेष मौज दिसली. जितक्या स्त्रिया तितक्यांगणिक पोषाखाची तऱ्हा, व रंग निराळा. केंस बांधण्याची प्रत्येकीची तऱ्हा वेगळीच. एकीचा बैराग्यासारखा टोप, तर दुसरीचे लहान मुलीसारखे पांचपेडीत केंस गुंफलेले; कोणाचा फक्त पुढच्या बाजूस दिसे न दिसे इतका भांग, व दोन्ही बाजूंनीं खुलवून फुगविलेला केंसांचा भार; कोणाच्या केंसांत लांब वांकडी फणी, तर कोणाचे केंस लहानशा रंगीत फितीनें बांधलेले, तर कोणाच्या केंसांत मण्यांची सांखळी. एक ना दोन, अठरा प्रकार! बायनॉक्युलर तर बहुतेकींच्या हातीं. त्याचा मोर्चा खेळ सुरू असतांना स्टेजकडे असे, पण तो थोडा थांबला, कीं, वळलाच पाठीमागें माडीवर, पिटमध्यें वगैरे! असेंच कॉन्सर्टचें. तेथें श्रोतृसमुदायांत निम्याच्या वर स्त्रिया, व स्त्रियांत तीनचतुर्थांश तरुणी असतात. जे कांहीं थोडे पुरुष येतात, त्यांचा पोषाख नेहमीं-प्रमाणें काळा असतो. त्यांनीं तेवढा जाकीट व नेकटाय यांत हवा तितका रंगेलपणा दाखवावा. पण स्त्रियांच्या पोषाखांत मात्र अवर्णनीय वर्णवैचित्र्य असतें. त्यांतले त्यांत नीळसर, पिवळसर, गुलाबी अगर मोतिया व अस्मानी या रंगांची रेलचेल असते. रंगवाल्यांच्या दुकानांतील गुलाबी रंग अशा प्रसंगीं स्त्रियांच्या गालांवर विराजमान होत असतो कीं काय, असा भास होतो.

**शार्लोटेन्-बुर्ग ( बर्लिन )**, १५ एप्रिल ११.

युनिव्हर्सिटीचें व्यवधान तूर्त कमी झालें, व वाढत्या राष्ट्रांची राजधानी पाहण्याची इच्छा अनावर झाली; ह्मणून सुटी होतांच येथें आलों. खुद्द बर्लिन राहण्याला चांगलें नाहीं, ह्मणून शार्लोटेनबुर्ग नांवाच्या अगदीं नव्या व बर्लिनच्या अगदीं नजीकच्या गांवांत खोली घेऊन राहिलों आहें. बर्लिन व याच्यामध्यें 'टीयरगार्टन्' ह्मणून एक पार्क तेवढा आहे. ट्राम व अंडरग्राउंड, घोड्याच्या व मोटरबसेस्,

शिवाय गांवाच्या सभोंवतीं गेलेली रिंगबान्-आगगाडी यांनी तर तेंहि अंतर पार नाहींसें करून टाकलें आहे. तेव्हां अंतराचा प्रश्न उरलाच नाहीं.

मी उतरलों आहें त्या ठिकाणीं जेवणाची सोय नाहीं, ह्मणून कधीं येथेंच गांवांत, तर कधीं बर्लिनमध्यें जाऊन जेवतों. येथें पांचचार शाकाहारी खाणावळी आहेत. एक युनिव्हर्सिटीजवळ आहे, तींत विद्यार्थीच फार येतात. मला असें वाटतें, कीं, इतरांपेक्षां या खाणावळी सवंग असल्यामुळें इतके विद्यार्थी येथें येत असावे. कारण, अशा रीतीनें घरच्या पैशांपैकीं जितके कमी खर्च होतील, तितका 'बीयर' पिण्यांत जास्त खर्च करण्याला सांपडेल! हा आपला माझा तर्क आहे, व तो विद्यार्थ्यांचें बीयरवरील प्रेम व वरील खाणावळींचा सवंगपणा यावरून उद्भवला.

आतांपर्यंत शहरांत पायीं व ट्रामनें मिळून खूब फिरलों. पांचसात म्यूझियम्स्, राजवाडे, किल्ला, सर्व जर्मनीचें पार्लमेंटसभागृह अथवा राइशटाग, फक्त प्रशियाचें सभागृह, डोम् नांवाचें हल्लींच्या बादशहानें बांधविलेलें विस्तीर्ण देऊळ, युनिव्हर्सिटी व लायब्ररी, निरनिराळीं स्मारकें, १८७०-७१ च्या फ्रेंच युद्धाच्या स्मरणार्थ उभारलेला जयस्तंभ, मोठ्या बागा, शिकारखाना (यांत लहानमोठे मिळून १४।१५ सिंह आहेत), मुख्य व्यापाराच्या पेंठा, राटहाऊस (टाउन्‌हॉल), न्यायकचेरी, वेधशाळा वगैरे मुख्यमुख्य गोष्टी पाहून झाल्या. या सर्वां-वरून जर्मनीच्या अलीकडे वाढूं लागलेल्या वैभवाची कल्पना येते. कोकणांतला एकादा गरीब रामभट मुंबईला प्रथम आला असतां जसा चकित होतो, तसा मी या वेळीं चकित झालों नाहीं; कारण मी लंडन-हून येथें आलों आहें. लंडनची वस्ती, व्यापार व एकंदर कारखाना फारच अफाट. पण इतके लांब, रुंद, सरळ गेलेले 'उंटरडेन् लिंडेन्' 'फ्रीड्रिच स्ट्रास,' 'लाइफझिगर स्ट्रास' वगैरे सारखे विस्तीर्ण रस्ते,

'श्लोसप्लात्स,' 'पोटसडामर प्लात्स,' 'आलेक्झांडर प्लात्स,' 'साव्हिनी प्लात्स' यांसारखे जागजागीं असलेले मोठमोठे चौकहि लंडन येथें बर्लिन-सारखे व बर्लिनइतके नाहींत खास. पण यांत नवलहि नाहीं. लंडन हें आज शेंकडों वर्षें वाटेल तिकडून वाटेल तसें वाढत आहे. बर्लिनची वाढ अगदीं अलिकडची असून ती बरीचशी शास्त्रीय पद्धतीवर होत आहे. येथलें पोलिसहि बरें आहे, पण लंडनच्या पोलिसपुढें याची कांहीं थोरवी नाहीं.

येथें पोलिसपेक्षांहि इतर लोकांचीच मदत नवख्या माणसाला फार होते. येथील माणसें दिसण्यांत स्थूल, पण कोण कसें आहे वगैरे ओळखण्यांत चलाख असतात. नवा माणूस कांहीं अडचणींत आहे, त्याला इष्ट स्थळ सांपडत नाहीं असें दिसलें, कीं, फारशा शिष्टाचाराची वाट न पाहतां त्याशीं बोलून, काय हवें तें विचारून, त्याला रस्ता वगैरे दाखवायचा असेल तर आपला मार्ग थोडा वांकडा करूनहि त्याजबरोबर जातात. पण अंगांत चौकसपणा फार असल्यामुळें तेवढ्यांतलेतेवढ्यांत त्या नव्या माणसाला 'कोण, कुठला' वगैरे प्रश्न विचारून बेजार करून सोडतात. इतर सुखवस्तु लोकांच्या बरोबरीनें बर्लिनच्या रस्त्यांतून सैन्यांतील अधिकारी लोकांची संख्या दृष्टीला पडते. डोक्यावर हेलमेट ( धातूचें शिरस्त्राण ), एकाच डोळ्यावर तेवढें एक गोल भिंग, गळ्याला उंचचउंच कडक कॉलर, करड्या रंगाचा लांब कोट, कमरेला लटकणारी तलवार व पायांत मागून आरी असलेले बूट, असा यांचा थाट असतो. हे वर्तनांत व चालण्याबोलण्यांत ताठ असल्यामुळें, मधल्या वर्गाच्या सामान्य लोकांनां यांचा राग येतो. 'ओफित्सीयर झिंड टीयर' ( ऑफिसर्स शुद्ध बैल असतात ) अशी इकडे ह्मण आहे.

बँडच्या आवाजाबरहुकूम पाय टाकीत चालणाऱ्या शिपायांच्या लहानसहान टोळ्या इकडूनतिकडे जातांना येथें हमेश दृष्टीला पडतात,

व कायसरची मोटर केव्हां कूठून येईल व भरकन् निघून जाईल याचा नियम नसतो. येथील कायसर नेहमीं फिरत असतो ह्मणून त्याला ‘ रायझ कायसर ’ असें थट्टेनें ह्मणतात.

शिक्षणाच्या बाबतींत जपान, अमेरिका यांसारख्या नव्या राष्ट्रांस जर्मनीनें कित्ता घालून दिल्याचें महशूर आहे. तेव्हां प्रत्यक्ष या देशांत राहण्याचा सुयोग आला असतां येथील शिक्षणपद्धतीचें बारीक निरीक्षण करण्याची संधि वायां जाऊं देऊं नये, असा मूळचा संकल्प होता. येथील एका नव्या मुलीच्या शाळेच्या डिरेक्टर-( सुपरिंटेंडेंट अगर हेडमास्तर )ची व माझी लाइपझिक् येथेंच ओळख झाली होती. त्यांस भेटून मीं आपला उद्देश कळविला. तेव्हां इन्स्पेक्टरला विचारल्यावांचून आह्मांला अशी परवानगी देतां येत नाहीं, असें त्यांनीं सांगितलें.कर्मधर्मसंयोगानें त्यांच्याबरोबर एकदां फिरावयाला गेलों असतां इन्स्पेक्टरची अनायासें गांठ पडली. त्या दोघांनीं आपल्या टोप्या काढून लांबवर खालींपर्यंत हेलकावल्या; मींहि आपली टोपी किंचित् उडवल्यासारखें केलें. नंतर इन्स्पेक्टरनें सांगितलें, कीं, अशी परवानगी फक्त कुल्तुस् मिनिस्तेरिउंम्-( शिक्षण-मंत्री ) यालाच देतां येते, व तीहि परस्थांनीं आपापल्या कॉन्सलच्या मार्फत मागावी लागते. एवढें कळल्यावर नमस्कारचमत्कार होऊन आह्मी आपापल्या मार्गानें जाऊं लागलों. जातांना डॉ. विल्ड्हागेन् हळूच सुचवितात “अहो, तुमची टोपी उडवण्याची इंग्रजी पद्धत येथें जरा ताठ्याची समजली जाऊन उगीच गैरसमज होईल; तरी तुह्मी येथील रिवाजाप्रमाणें जास्त नम्रता दाखवावी हें बरें. मी असें सुचवतों याबद्दल मात्र रागावूं नका.” मीं ती सदूबुद्धीनें केलेली सूचना लक्ष्यांत ठेवली, व या बाबतींत जर्मन लोकांपेक्षांहि कांकणभर जास्त नम्रपणा दाखविण्याचा निश्चय केला.

नंतर लवकरच येथील ब्रिटिश कॉन्सलला भेटलों. “ हें काम अँबॅसडरच्या मार्फत झालें पाहिजे. त्यांस मी पाहिजे तर ‘तुह्मांला मदत करावी’

ह्मणून चिठी देतों," असें त्यांनीं सांगितलें. नंतर इकडच्यातिकडच्या गोष्टयाशा गप्पा झाल्या. त्यांतच येथील मोठ्या इस्पितळांत एक गुजराती हिंदी विद्यार्थी आसन्नमरण पडला आहे, असें कळलें. तेव्हां मी त्याचा पत्ता विचारून बिचाऱ्यास जाऊन भेटूं लागलों, व कधींकधीं त्याची स्थिति व त्याचे पैशाअडक्यासंबंधीं निरोप कॉन्सलला जाऊन सांगें. एकदां मीं सहज नर्सपाशीं त्याच्या स्थितीविषयीं बोलणें काढलें, तों "किती दिवस हा अजून जगेल, एवढाच आतां प्रश्न उरला आहे," असें तिनें सांगितलें. इतक्या लांब, आईबाप, बायकोमुलें सोडून केवळ विद्यार्जनासाठीं आलेला, त्याचा आतां असा शोचनीय शेवट होणार, या विचारानें माझें मन उद्विग्न होई.

मी कॉन्सलला आतां वरचेवर भेटें. ब्रिटिश् लिगेशनकडे जाऊन येथील शाळा पाहण्याची परवानगी मला मिळवून द्या, असें मीं त्यांनां कळविलें असल्याचें कॉन्सलला सांगितलें, व त्यांनीं स्वतः भेटून खटपट करण्याचें आश्वासन दिलें. मात्र येथील अधिकारचक्र फार जड व दिरंगाईखोर असतें, तेव्हां परवानगी लवकर मिळेल अशी आशा बाळगूं नका, असें त्यांनीं सुचविलें, आणि साक्सनीच्या आणि बव्हेरियाच्या ब्रिटिश मिनिस्टरांनां शिफारस पत्रें दिलीं. शेवटीं माझे परत जाण्याचे दिवस जवळ येत चालले तरी परवानगी येईना. ईस्टरच्या सुटीसाठीं शाळाहि लवकरच बंद व्हावयाच्या होत्या. शेवटीं ता. ४ एप्रिल रोजीं रोअर-पोस्टमार्फत (नलिका पोस्ट. अगदीं जरूरीचा शहरांतला पत्रव्यवहार शक्य तितक्या लवकर व्हावा, ह्मणून जमिनीखालीं नळ्या घातल्या आहेत व त्यांतून प्रेशरनें पत्रें रवाना होतात.) परवानगी आली, व मला जो आनंद झाला तो विचारूं नये. लगेच डॉ. विल्डहागेन् यांस टेलिफोन केला, व त्यांच्या शाळेंत दुसरे दिवशीं सकाळीं साडेआठ वाजतां जाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें दोन दिवस दोनदोन तास जाऊन कांहीं वर्ग शिक्षण चालू असतांना पाहिले. विशेष मौज शास्त्रीय

शिक्षणाची वाटली. चौथ्या क्लासांत सरासरी बारा वर्षांच्या अल्लड मुली होत्या. त्यांचें हें शाळेंतील सहावें वर्ष होतें. या क्लासांत नाटूअर कुण्ड-सृष्टिज्ञान हा विषय चालला होता. आदल्या दिवशीं शिक्षकानें सर्वांनां एका खनिज पदार्थाचा तुकडा दिला होता, व तो कसचा आहे हें घरीं शोधून काढायला सांगितलें होतें. तो तुकडा काय आहे, कसचा आहे, हें शोधून काढायला काय काय करावें लागलें वगैरे मुली आज मास्तरला सांगत होत्या. नंतर पांचव्या ह्मणजे चौथ्याच्या खालच्या (आपल्याकडे याच्या उलट मोजण्याची पद्धत आहे.) क्लासांत एक मास्तरीण वाचन, अर्थ वगैरेंची उजळणी घेत होती तेथें दहा मिनिटें बसलों. मास्तरीणबाई जरा घाबरल्यासारखी दिसली. त्यांच्याखालच्या क्लासांत प्राण्यांविषयी–विशेषतः पक्षी–सामान्य माहिती शिक्षक देत होता. कांहीं पक्ष्यांचीं चित्रें, कांहींचे सांगाडे व कांहीं पिंजऱ्यांत जीवंत ठेवलेले असे पक्षी प्रत्यक्ष दाखवायला आणून त्यांचे आकार, रंग, संवयी, प्रदेश वगैरेंची माहिती सांगितली जात होती. दहाव्या ह्मणजे शेवटल्या–सहा वर्षे वयाच्या मुलींच्या वर्गांत गेलों. तेथेंहि वाचन, त्याचा गोषवारा सांगणें इत्यादि गोष्टी चालल्या होत्या. मुलींच्या बोबड्या उच्चारांनीं करमणूक झाली. एवढ्या लहान मुलींचें लक्ष्य कसें वेधवावें, त्यांस कंटाळवाणें न होईल यासाठीं काय करावें, हें त्या मास्तरिणीस पूर्णपणें माहित होतें. वर्गाच्या भिंतीवर बाग, घर, मुलें, बदकें, कुत्रीं अशीं छोटींछोटीं चित्रें सभोंवार लाविलीं होतीं. कांहीं चित्रें मुलांच्या नेहमीं पाहण्यांतल्या प्रसंगांचीं होतीं. अशांपैकीं एकाकडे बोट दाखवून त्यांत दाखविलेला प्रसंग मुलीकडून गोष्टीच्या रूपानें संगतवार पण खेळतखेळत सांगवून घेण्याचें काम फार चित्तवेधक वाटलें. मास्तरिणीचे सूचक प्रश्न फारच खुबीचे असत. एकंदरींत हात, डोळे, कान व तोंड या इंद्रियांचा पद्धतशीर उपयोग करून कोणत्याहि गोष्टीचें ज्ञान करून देण्याची इकडील पद्धत फारच सुरेख आहे. पोपटपंचीला होतां होईल तो बहिष्कार

घालायचा, हें इकडील बालशिक्षणाचें मुख्य तत्त्व आहे. मुलांनां नेहमीं घरीं न दिसणारे प्राणी व पदार्थ दिसावे, कळावे, ह्मणून शाळेला एक म्यूझियम जोडलेला आहे. या शाळेचें (सर्व जर्मन शाळांचेंच) लक्ष्यांत ठेवण्यासारखें एकएक अंग ह्मणजे शाळेच्या मागलें मोठें थोरलें 'होफ्' अगर आंगण होय. सरासरी नवांच्या सुमाराला २० मिनिटांची मोठी सुटी मिळत असते, तींत लहानमोठ्या सर्व मुली व कांहीं मास्तरिणीहि या होफ्मध्यें जमतात, व फराळ झाल्यावर गप्पागोष्टी करीत खेळत-खेळत त्या भोंवतीं फिरतात.

किंडरगार्टन् पद्धतिविषयीं जर्मनीची ख्याति आहे. या पद्धतीच्या शाळा सर्व देशभर पसरल्या आहेत. पण सर्वांत उत्तम ह्मणून नांवाजलेली अशा तऱ्हेची शाळा बर्लिनमध्येंच आहे. 'तिला पेस्टालोझ्झी फ्रोबेल हौस' ह्मणतात, व येथें मुख्यत्वेंकरून किंडरगार्टन् मास्तरिणीहि तयार करतात. त्याची चालकीण फ्राऊ क्लारा रिश्हर् इला पत्र लिहून उत्तराची वाट पहात होतों. निराशा होते कीं काय असें वाटूं लागतें, तों ता. ११ रोजीं या, असें तिचें पत्र आलें व त्याप्रमाणें बरोबर वेळेवर (१० वाजतां) गेलों. आंत गेल्यावर स्वागत करण्यासाठीं बाई पुढें आली, तों तिचा उंच, भारदस्त बांधा, गंभीर चेहरा, सभ्य बोलणेंचालणें यांवरून असल्या जुन्या व जगद्विख्यात संस्थेचें चालकत्व या बाईकडे आहे, हें सर्वथैव योग्य आहे, असें वाटल्यावांचून राहिलें नाहीं. बाईनें एक तरुण मास्तरीण मजबरोबर देऊन तिला सर्व दाखवायला सांगितलें. ही संस्था फ्रोबेलनें १८६७ त स्थापिली व ती लवकरच उदयास आली. पुढें त्याच्यानंतर त्याच्या अलोट बुद्धीच्या व कर्तबगारीच्या भाचीनें ती चालविली व आतां ती या बाईच्या नेतृत्वाखालीं आहे.

तीनपासून सातआठ वर्षांपर्यंतच्या अर्भकाशीं कसें वागावें, व त्यांनां कसें वागवावें आणि वाढवावें, हें तरुण होतकरू मास्तरिणींस शिकविणें,

व अशा वयाच्या अर्भकांस पेस्टालोझ्झी व फ्रोबेल यांच्या पद्धतीवर शिक्षण देणें, असा दुहेरी हेतु या संस्थेचा आहे. पेस्टालोझ्झी आणि फ्रोबेल यांनां आपल्या वेळच्या शिक्षणपद्धतीचा वीट आला होता. त्यांचें मुख्य ह्मणणें असें, कीं, घर व शाळा यांत सध्यां जमीनअस्मांतराचें अंतर होऊन बसलें आहे. गृहशिक्षणाला मदत व दुजोरा देणें हें शाळांचे ध्येय असावयाचें बाजूला राहून, त्यांनीं घराला ग्रासून टाकलें आहे, त्याचें शिक्षणदृष्टया महत्व लोपविलें आहे, असें ते ह्मणत. शाळांतील एकंदर परिस्थिति इतकी भिन्न व कृत्रिम बनत गेली कीं, शाळेंतील एकंदर क्रम व वातावरण यांशीं मुलाची एकतानता व्हावयाला फार कठिण पडतें, व त्यांतच त्याचा वेळ व शक्ति व्यर्थ खर्च होतात. तेव्हां शाळा पुनः सुधारली पाहिजे, शाळेंतील वर्ग ह्मणजे आपल्याच घरांतील खोलींत मास्तरीण ह्मणजे आपली मावशी आहे, आप्त आहे, असें मुलांनां वाटूं लागलें पाहिजे, तरच गृहशिक्षण व शाळेंतील शिक्षण यांत मेळ बसेल, असें ते दोघे प्रतिपादीत. शिवाय, खोड्या करण्याची जी मुलांची स्वाभाविक प्रकृति तिजकडे शाळेंत केवळ दुर्लक्ष्य केलें जातें. चळवळखोर, जिवंत ताज्या वाढत्या रक्ताचीं अर्भकें बांकावर तासचेतास दाबून ठेवून त्यांनां औषधासारखें ज्ञान पाजण्यानें त्यांच्यांत जीवनकला तरतरीत रहात नाहीं, त्यांचें चळवळीचें सामर्थ्य जिरतें, त्यांची स्वतंत्रता हिरावून घेतली जाते, असें ते ह्मणत. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे बौद्धिक यंत्रें तयार करणें हा शिक्षणाचा हेतु नाहीं, तर मनुष्याच्या सर्व नैसर्गिक शक्तींची सारखी वाढ होऊन, तीं जीवनकलहाला समर्थ अशीं निपजतील तरच त्यांस मिळालेलें शिक्षण, 'शिक्षण' या नांवाला पात्र आहे, नाहींतर व्यर्थ, अशा विचारसरणीनें प्रेरित होऊन फ्रोबेलनें 'किन्डरगार्टन्'ची कल्पना काढली, व शाळा स्थापिली; पण लवकरच योग्य शिक्षकांची वाण भासूं लागल्यामुळें ही संस्था स्थापणत्रांत आली, अशी हिची कहाणी आहे.

फ्राऊ रिशरनी ज्या खोलींत माझें स्वागत केलें, तेथें शिक्षणविषयक पुस्तकांचा चांगलासा संग्रह असून, स्वच्छ व उजळ दिसणाऱ्या भिंतींवर किंडरगार्टन् पद्धतिसंबंधानें प्रसिद्ध असलेल्या स्त्रीपुरुषांचे फोटो टांगलेले दिसत होते. जिकडेतिकडे नीटनेटकेपणा, टापटीप, स्वच्छपणा दिसत होता. या खोलींतून त्या तरुण मास्तरिणीनें मला एका प्रशस्त सोप्यांतून मुलांच्या खेळण्याच्या जागेकडे नेलें. ही जागा चांगली लांब, रुंद, व उंच असून तींत प्रकाश व हवा चांगली खेळती होती. इच्यामध्यें ३० पासून ४० मुलें दर वेळेला येऊन नानातऱ्हेचे खेळ खेळतात. त्यांच्याबरोबर दोनचार शिक्षकिणी असून त्या या मुलांबरोबर नाचत, बागडत, हंसतखेळत होत्या. यांस मुलें 'टांट'–मावशी ह्मणत. मुलांच्या बरोबर याहि गाणीं ह्मणतांना दिसत. सकाळीं सर्व मुलें याच ठिकाणी येऊन प्रार्थना करतात, असें मला मास्तरिणीनें सांगितलें. सोप्याच्या दुसऱ्या बाजूला दोन्हीकडे लहानलहान खोल्या होत्या. सरासरी दहा मुलांनां बसण्याखेळण्यास पुरेशी जागा प्रत्येकींत होती. या खोल्यांचा आटपसरपणा लक्ष्यांत ठेवण्यासारखा होता, व त्यांत फुलें, झाडें, पक्ष्यांचे पिंजरे वगैरे सर्व घराप्रमाणेंच खिडक्यांत ठेवलेलें होतें. आपण घराहून भिन्न ठिकाणीं आहों, असें मुलांनां होतां होईल तों भासूं नये, याविषयीं फार दक्षता ठेविला जातो. या छोटेखानी घरांत त्या 'टांट' अथवा मावशा, व त्यांचीं तीं मुलें, जेवणाचा वेळ खेरीजकरून सकाळीं नवांपासून दुपारीं चार वाजेपर्यंत मनाला येईल तशीं खेळत, अगर कांहीं काम किंवा करमणूक करीत असतात. मुलांनां आवडेलसा पण ज्यांतून कांहीं तरी शिक्षण अप्रत्यक्षपणें देतां येईल असा उद्योग पुरविण्यांत या टांट मोठ्या दक्ष असतात. या प्रत्येक छोट्या कुटुंबांतील मुलांचें वय तीनपासून पांच वर्षांचें असल्यामुळें, वयाप्रमाणें वर्ग ठरविणें हें तत्त्व येथें बिलकूल अमलांत आणलें जात नाहीं. झाडांनां पाणी व पक्ष्यांस चारा घालणें, टेबलें खुर्च्या साफ करणें,

फराळाची तयारी जमवणें इत्यादि गोष्टी, व मधुनमधून आंधळी कोशिंबिरीसारखे खेळ, बाहुल्या करणें, कागद कातरून नावा वगैरे करणें, असले उद्योग मुलें हौसेनें करतात. मधुनमधून मुलें आपल्या टांटबरोबर बागेंत जाऊन उघड्यांत बागडतात, फुलें तोडतात, खणून झाडें लावतात, आधींच लावलेलीं असतील त्यांची वाढ बारकाईनें पाहतात, सुटीमध्यें घरीं जातांना आपण स्वतः लावून वाढविलेलें एकादें गाजर अगर एकादा मुळा, किंवा एकादें फुलझाड, आपल्या आईसाठीं नेतां आलें ह्मणजे त्यांस जो आनंद होतो तो अवर्णनीय होय, असें येथल्या सर्व मास्तारिणी मोठ्या कौतुकानें मला सांगत होत्या. अशा तऱ्हेनें खेळ व करमणूक यांच्या मदतीनें प्रत्येक मुलाची बुद्धि व शरीर हळुहळू वाढीस लावण्यास या संस्थेंतील सर्व मास्तारिणी मनःपूर्वक झटत असतात. याच मजल्यावर शिकाऊ 'टांट'ला मुलांसाठीं कॉफी वगैरे तयार करण्यासाठीं एक खोली व आंघोळीसाठीं एक खोली, अशा समोरासमोर दोन खोल्या आहेत. ज्या मुलांच्या आईबापांस सवड अगर ऐपत नाहीं, अशांच्या मुलांस तेथील तरुण मावशा ममतेनें स्नान घालतात.

वरच्या मजल्यावर एका बाजूला सहापासून आठ वर्षांच्या मुलांसाठीं जरा मोठाल्या पांचसहा खोल्या आहेत. यांतील व्यवस्था व शिक्षणहि किंचित् शाळेच्या धर्तीवर मुद्दाम ठेवलेलें असतें. खेळ व उद्योग यांच्याचबरोबर अगदीं आरंभींचें प्राथमिक शिक्षण सुरू होतें. किंडरगार्टन्‌मधील स्वैर, स्वतंत्र लीला, व शाळेंतील शिस्त आणि बंदी यांच्यामधली स्थिति या वयांत असते. अशीं वीसपासून पंचवीस मुलें बसतील, अशा बेतानें या खोल्या केल्या आहेत. यांपैकीं एक वर्ग विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा होता. यांत बुद्धीचीं जरा मंद, अधू मेंदूचीं अशीं मुलें एका मध्यवयस्क मावशीच्या ताब्यांत होतीं. यांनां वागविणें व शिकवणें हें कष्टाचें काम असूनहि ती मावशी तें मोठ्या

उत्साहानें व मेहनतीनें करतांना पाहून आश्चर्य वाटलें; व कर्तव्य-जागृतीचें उज्ज्वल स्वरूप येथें मूर्तिमंत पहावयाला मिळालें. या खोल्यांच्या समोरच्या बाजूला अशीच पुन: खोल्यांची रांग आहे. तेथें किंडर-गार्टन् मास्तरिणींनां, कागद कातरून त्याचीं खेळणीं करणें, इतर हस्त-कौशल्याचीं कामें करणें, व शिक्षणशास्त्र यांचें पद्धतशीर शिक्षण दिलें जातें. खोल्यांच्या या ओळीच्या उजवीकडे दोन्ही ओळीस जोडून, खालच्या खेळाच्या जागेच्या बरोबर डोक्यावर एक प्रशस्त दिवाणखाना आहे. येथें नानातऱ्हेचीं वाद्यें ठेविलीं आहेत. यांत उत्सव वगैरे होतो, व सभा भरतात. यावरील दोन मजले तरुण मावशांच्या राहण्या-शिकण्याच्या खोल्यांनीं व्यापले आहेत. दुसऱ्या मजल्यावर जेवणासाठीं दिवाणखाना आहे. येथें राहणारीं सर्व मुलें त्यांत दुपारीं एकत्र जमून जेवतात. अगदीं वरच्या मजल्यावर दिवाबत्ती, कपडेलत्ते साफ करणें वगैरेसाठीं जागा आहेत.

याप्रमाणें मुख्य इमारतींतील व्यवस्था आहे. नेहमींच्या शिक्षकिणी वगळून येथें सरासरी १५० तरुण स्त्रिया किंडरगार्टन्पद्धति सप्रयोग शिकण्यासाठीं आलेल्या आहेत. त्या जर्मनी, फ्रान्स, ग्रेटब्रिटन, इटाली, रशिया, युनायटेड् स्टेटस् वगैरे निरनिराळ्या देशांच्या आहेत. यावरून या संस्थेची कीर्ति व उपयुक्तता यांची कल्पना येईल. परदेशांतून आलेल्यांसाठींच मुख्य इमारतीचे वरचे दोन मजले राखून ठेवले आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या संस्थेंत एकंदर १५० मुलें आहेत. पैकीं ज्यांचीं घरें लांब आहेत, अगर ज्यांची इच्छा आहे, अशांना दहा पेनी घेऊन येथेंच जेवणाची सोय केलेली असते.

मुख्य इमारतीभोंवतीं बागेची सोय आहे. पण तूर्त हिंवाळा असल्या-मुळें सध्यां तेथें कांहीं नव्हतें. पलीकडे एका आवारांत कबूतरांचें व कोंबड्याचें खुराडें, बदकांसाठीं तळें, मधमाशांच्या पोळ्याची व्यवस्था, लहानसा मेंढवाडा, सशांसाठीं एकदोन बिळें वगैरे गोष्टी

दिसल्या. शहरांत कोंडलेल्या या मुलांनां असल्या कृत्रिम तऱ्हेनें कां होईना पण सृष्टींतल्या अगदीं साध्या प्राण्यांचें, त्यांच्या सवयींचें ज्ञान मिळावें, यासाठी ही व्यवस्था आहे. या गोष्टी खुल्या सृष्टींत नैसर्गिक स्थितींत पहावयाला मिळाव्या, ह्मणून कांहीं अंतरावर वनांत याच संस्थेचें एक ठिकाण आहे. तेथें मुलें वर्षांतून एकदोनदां पाळीपाळीनें पाठविण्यांत येतात. शिवाय, अशक्त आजारी मुलांचीहि या ठिकाणीं सोय केली जाते.

मुख्य इमारतीच्या मागल्या बाजूला यूगेंड् होर्ट् ह्मणून इमारत आहे. गरीब आईबापांच्या सातपासून चौदा वर्षांच्या मुलांनां करमणूक, व्यायाम व उपयुक्त हस्तकलांचें शिक्षण या इमारतींत दिलें जातें. हें अर्थात् शाळेच्या वेळानंतर ह्मणजे दुपारीं एकपासून सहा वाजेपर्यंत दिलें जातें. तळमजल्यांत त्यांनां आपल्या वस्तु काढून ठेवण्याला, हातपाय धुऊन साफ करण्याला, वाटेल तर आठवड्यांतून एकदां स्नान करण्याला व्यवस्थित जागा असते. नंतर त्यांनीं वरच्या मजल्यावर जावें व निर-निराळ्या खोल्यांतून शाळेचें काम करावें, स्वतःची करमणूक करावी, अगर आठवड्यांतून एकदां एकाद्या टांटबरोबर दुपारची वेळ मजेंत घालवावी. येथेंच साधा स्वयंपाक मुलींस शिकवण्याची व्यवस्था केलेली आहे. त्याच्याहि वरच्या मजल्यांत सुतारकाम, पुस्तकें बांधणे, टोपल्या विणणें, ब्रश करणें वगैरे सोपीं सोपीं कामे शिकविण्यासाठीं खोल्या आहेत. या 'यूगेंड् होर्ट्' अगर 'युवकाश्रमां'त सरासरी शंभरपावेतों मुलेंमुली आहेत. पैकीं सरासरी चाळीसएक मुख्य इमारतींत जेवतात.

अशा तऱ्हेची व्यवस्था या फ्रोबेल हौसमध्यें पाहिली. मनाला आनंद तर वाटलाच, पण त्यापासून बोधहि पुष्कळ झाला.

ड्रेसडेन्, ता. २५ एप्रिल १९११.

बर्लिनहून परत येऊन आठएक दिवस झाले. अजून युनिव्हर्सिटीचीं लेक्चरें सुरू व्हायाला अवकाश आहे, ह्मणून परवांच्या दिवशीं अकस्मात्

बेत ठरवून येथें आलों. नव्या राजधानीचें शहर पाहून झालें, पण जुनें ड्रेसडेन् इतक्या जवळ असून तसेंच राहून गेलें याचें आश्चर्यच करीत होतों. ड्रेसडेन् हें फार जुनें शहर ह्मणजे यूरोपीय मध्ययुगांतलें असून एका प्रसिद्ध व भरभराटींत असलेल्या स्वतंत्र राज्याची राजधानी होतें, व आहे. आतां तें राज्य आपल्या दोन मोठ्या तालुक्यांएवढें चिमुकलें होऊन बसलें आहे; पण ल्यूथरच्या वेळीं त्याचा विस्तार हल्लींपेक्षां चारपांच पट अधिक होता. शिवाय त्या वेळचा तेथील राजा फ्रीड्रिश् याचें यूरोपीय राजकारणांत मोठें प्रस्थ असून त्यानेंच पोपविरुद्ध ल्यूथरला आश्रय दिला होता. या प्रांताचे ह्मणजे साक्सनीचे राजे पोलंडवरहि कांहीं दिवस राज्य करीत असत. सांगायचें एवढेंच, कीं, ड्रेसडेन्च्या मानानें बर्लिन् फार अलीकडचें असें वाटतें. दुसरी गोष्ट अशी कीं, ड्रेसडेन् सृष्टिसौंदर्याच्या आगरांत एल्बनदीच्या कांठीं वसलें असल्यामुळें बर्लिन् त्याच्यापुढें किती तरी फिक्कें पडतें.

संध्याकाळचे पांच वाजल्यावर येथें पोंचून एका ठिकाणीं बिऱ्हाड टाकलें, व हिंडायला निघालों. व्यापाराचें केन्द्रस्थान जो 'प्रागर स्ट्रास' त्यांतून फिरलों. हा रस्ता बर्लिनच्या रस्त्यासारखा सरळ नाहीं; बरींच वळणें घेऊन गेलेला आहे. नंतर किल्ल्याच्या ( इकडे राजवाड्याला 'श्लोस्' अगर किल्ला ह्मणण्याची चाल आहे. ) बाजूनें जुन्या देवळां-वरून नदीकिनाऱ्यावर मोठी 'टरास' अथवा दगडी सज्जा बांधलेला आहे तेथें गेलों, व नदीच्या रुंद पात्रावर बोटींच्याद्वारा चाललेली सायं-काळची घडामोड स्वस्थपणें पहात बसलों. नदीला एकंदर चारपांच पूल असून पलीकडल्या तीरावर नॉयस्टाट् नांवाच्या शहराचा नवा भाग वसलेला आहे, तो मात्र बर्लिनच्या वळणावर आहे. या पुलांपैकीं दगडी सज्जाच्या दोन्ही बाजूंला असलेले दोन पूल फारच सुबक असून सृष्टिशोभा व मनुष्यकृतीचें सौंदर्य यांची मिळणी येथें अप्रतिम झाली

आहे, असें वाटतें. विशेषत: सूर्यास्तानंतरचा देखावा फारच रमणीय असतो. शहरांतील राजवाडे व देवळें यांच्या मुख्यांगावर ग्यासलाइटचा उजेड पडलेला असून, त्यांचीं शिखरें मात्र अंधारांत अस्पष्ट व गंभीर दिसतात. नदीच्या कांठांवरील व पुलांवरील दिव्यांचें पाण्यांत प्रतिबिंब पडून नदीच्या गंभीर पाण्याला गगनाची शोभा येते. नदीच्या प्रवाहाच्या मार्गानें दोहींकडे लांब नजर फेंकण्याचा प्रयत्न करावा, ह्मणजे जसजशी नजर दूर जाते तसतसा शहरच्या दिव्यांचा प्रकाश कमीकमी होऊन शेवटीं पलीकडील सृष्टिशोभेला काळसर आवरण घालणाऱ्या उदास अंधारांत दृष्टि शून्य होऊन परत फिरते, व जवळील नदीकांठच्या जीवनसंचारांत मिळून जाते.

येथें कांहीं नामांकित देवळें आहेत. पैकीं मुख्य 'लूथर्किर्श व होफकिर्श ( राजदेऊळ )' हीं होत. पहिलें प्रॉटेस्टंट् असून दुसरें कॅथॉलिक् आहे, हें आश्चर्य आहे. याचें कारण येथील प्रजा सर्व लूथर मतानुयायी असून राजघराणेंच तेवढें रोमधर्मीय आहे. याचें कारण असें, कीं, पोलंडची गादी रिकामी पडली तेव्हां तिजवर साक्सनीचें घराणें आपला हक्क सांगूं लागलें. पण पोलश लोक सर्व कॅथॉलिक व त्यांचें तोंवरचे राजेहि तसेच होते. ह्मणून साक्सनीच्या राजानें जसा प्रसंगानुरूप पोषाक बदलावा तसा आपला धर्मपंथहि राज्यासाठीं बदलला. धर्म व राज्य! एक भविष्यावर हवाला देणारें, व दुसरें चालत्या काळांत ऐश्वर्य देणारें! साक्सनीच्या राजानें एकाद्या व्यवहारचतुर माणसासारखें केलें. आधीं देह, मग देव, हेंच खरें! येथील राजवाडा फार मोठा व फार संपन्न आहे. त्यांत जवाहीर व चीजवस्त इतकी भरली आहे, कीं, तितकी खुद्द कायसरच्या अनेक राजवाड्यांतहि नाहीं. हें जवाहीर व ७।८ उत्तमांपैकीं खोल्या १॥ मार्क दिला ह्मणजे पहावयाला मिळतात. सगळ्या पहावयाला एक तास लागतो. दहाएक माणसें जमलीं ह्मणजे तेथील रक्षकांपैकीं एकजण सर्व सवर्णन दाखवितो.

येथील चित्रसंग्रहालय फार जुनें व अति संपन्न आहे. यांत जुन्या इतालियन, फ्रेंच फ्लांडर्स आणि जर्मन चिताऱ्यांचीं उत्तमोत्तम चित्रें मोठ्या काळजीनें ठेविलीं आहेत. नव्यांचींहि बरींच आहेत. राफाएला (इं.राफेल्)ची प्रसिद्ध माडोना येथें एका स्वतंत्ररीतीनें शृंगारलेल्या खोलींत एकटीच ठेविलेली आहे. मुलाला कडेवर घेऊन उभी राहिलेल्या सबंध माडोनाचें हें तैलरंगाचें चित्र राफाएलनें एवढें एकच काढलें आहे. त्याच्या इतर माडोनांच्या अर्धप्रतिकृतिच ( बस्ट् ) तेवढ्या आहेत. ह्मणून इच्यांत उभें रहाण्याचा डौल आहे; त्यामुळें ती इतरांहून निवडून पडते. मेरी मुलासह ढगांवर उभी असून खालच्या बाजूनें संत मंडळी भक्ति-प्रेमपूर्ण मुद्रेनें तिजकडे साश्चर्य पहात आहेत, असा हा देखावा आहे. 'माडोना'या शब्दांतच क्रिश्चन लोकांनां कांहीं जादू भासावी, हें योग्य आहे, ह्मणून या तसबिरीपुढें ते भाविकपणें उभे रहातात. पण मजसारख्या परधर्मीयासहि या माडोनाचा साधेपणा, चेहऱ्यावरील सौम्यता व सर्वांगांत मातृवात्सल्य ओतप्रोत दाखविलेलें पाहून आश्चर्य, आनंद व आदर वाटतो. या ग्यालरींत धार्मिक व पौराणिक चित्रांचाच फार भरणा आहे. इतरहि थोडीं आहेत. उदाहरणार्थ, इंग्लंडचा पहिला चार्लस् याचीं मुलें फारच गोजिरवाणीं व सुबक आहेत. सृष्टीचे देखावे फार थोडे आहेत, व जे आहेत तेहि फारसे मनांत भरत नाहींत. ही ग्यालरी यूरोपांत फार नांवाजलेली आहे. उत्तम ग्यालरीज् ह्मणून ज्या गणल्या जातात, अशा तीनच आहेत. ही एक व फ्लॉरेन्स आणि पारिस येथील दोन.

ड्रेसडेन्ला प्रवासी येतात ते दोन अर्थांनीं येतात. एकतर शहर व विशेषत: त्यांतील ग्यालरी पहावी ह्मणून, व दुसरें भोंवतालची सृष्टिशोभा मनसोक्त उपभोगावी ह्मणून. निदान मी तरी हा दुहेरी हेतु मनांत ठेवून गेलों होतों. नदीच्या दुसऱ्या कांठावर जरा खालचे बाजूस टेंकड्यांवर लोश्वित्स् ह्मणून खेडें आहे. तेथवर ट्रामनें जावें, व नंतर सांखळ-

दंडाचे गाडींत (जर्मन्–ड्रादसाइल्बान्, इं.–फनिक्युलर् किंवा वायर रेल्वे) न बसतां पायींच डोंगरावर जावें; ह्मणजे सभोंवती जी शोभा दिसते ती अपूर्व होय. हे वसंताचे दिवस. सध्यां सर्व झाडांनां पालवी फुटली आहे, कांहींनां मोहोर, कळ्या वगैरे येऊन पानांच्या हिरवळींत कळ्यामोहोरांचा तांबडसर गुलाबी, पांढरा रंग मिसळून जी बहार दिसते, तिनें दृष्टीचें पारणें फिटतें. तेथून झाडांत बहुतेक झांकून गेलेलें शहर देवळांच्या मनोऱ्यांच्या रूपानें पाहणाऱ्याच्या दृष्टीसमोर येण्याचा प्रयत्न करीत आहे, असा भास होतो. डोंगरांच्या पायथ्यापायथ्यानें वळणें घेऊन गेलेली एल्बनदी आंत प्रतिबिंबित झालेल्या सृष्टीसौंदर्या-मुळें आकाशगंगेसारखी शोभते. या अनंत सृष्टिशोभेनें–कारण मी जिकडे दृष्टि फेंकीं तिकडे वनश्री सारखीच खुललेली होती, तिला कोणच्याहि दिशेनें खंड पडलेला नव्हता–माझें मन इतकें वेडें होऊन जाण्याचें आणखी एक कारण होतें. यूरोपांत हिंवाळ्याच्या तोंडीं आल्या-मुळें देवदारु खेरीजकरून सर्व झाडांचीं पानें गळलेलीं, फुलांचें तर नांव नाहीं, गवतें सुकून करडीं झालेलीं, असा देखावा सर्व ऋतुभर मजभोंवतीं पसरलेला होता. चार अधिक महिने सृष्टीनें रुक्ष स्वरूप धारण केलें होतें, व मधुनमधून जरी तिच्या गालांवर हिमाचें शुभ्र स्मित चमकत असे, तरी पानाफुलांनीं अनलंकृत अशा त्या तरुण तापसीकडे पाहण्याचें जिवावर येई. आतां मात्र तिनें आपला तापस वेष टाकून देऊन तरुण लीलावतीचें रूप धारण केलें होतें, व त्या रूपाच्या अप्रतिम दृष्टिसुखाचा मी यथेच्छ अनुभव घेऊं लागलों. ड्रेसडेन् भोंवतींच्या प्रदेशाला सेक्सिश श्वाइत्स् अथवा साक्सनींतील स्वित्झरलंड ह्मणतात, तें अगदीं यथार्थ आहे.

ड्रेसडेन्ला अवघे तीन दिवस मी आहें. तेवढ्यांत बिऱ्हाडाच्या घरीं व इतर ठिकाणीं जीं माणसें भेटलीं तीं बर्लिन्च्या माणसांपेक्षां जास्त मनमिळाऊ आणि खुल्या दिलाचीं अशीं वाटलीं. घरवालीबाई बऱ्या

स्थितींतली व सुस्वभावाची होती. तिनें व इतरांनीं हिंदुस्तानांतील शिक्षण, रीतीभाती, स्त्रियांची योग्यता वगैरे नानाविध विषयांवर प्रश्न केले. भारी चौकस हे लोक. जेवतांना नुसती औपचारिक ओळख झाली पुरे, कीं हे लगेच सलगी करून बोलायला लागतात, प्रश्न विचारतात, थट्टा करतात वगैरे. आगगाडींत अगर ट्राममध्यें एकादा सभ्य गृहस्थ शेजारीं बसलेला असावा; आपण विदेशी आहों असें त्याच्या लक्ष्यांत आलें, कीं तो, कांहीं तरी ओघानें बोलणें काढून 'वो झिड् झी त्सु हौस, वेन इश् फ्रागेन् डार्फ्' (कोणच्या देशांत आपले घर आहे, हें मी विचारूं का?) असा प्रश्न आदबीनें विचारील, माहिती काढून घेईल व देईल. पण ओळख झाली नाहीं या सबबीवर स्वस्थ बसणार नाहीं. वाटेल तो उठतो आणि आपला प्रश्न विचारूं लागतो, असेंहि कांहीं वेळेला होतें; पण कोण माणूस कसा आहे हें पाहून आपणास आंखडतें घेतां येतें.

येथें एकदां जेवतांना बर्लिनची भाषा व साक्सनीची भाषा यांवर बोलणें निघालें. तेव्हां 'बर्लिनचे लोक उगाच आह्मांला नांवें ठेवतात; पण त्यांचे उच्चार काय धड असतात?' वगैरे आवेशयुक्त टीका होऊं लागली. तेव्हां मीहि ह्मणालों 'बर्लिन येथें मी ज्या ठिकाणीं होतों, तेथें मला नेहमीं 'हेर् यून' ह्मणत असत.' हें सांगितल्यावर जो हंशा पिकला, तो विचारूं नये. बर्लिनच्या लोकांच्या वाईट उच्चाराचा मासला ह्मणून एकानें एक सूत्रमय वाक्य ह्मणून दाखविलें. 'एन यूट् येब्राटन यांज इस्ट् एन यूट याब योटेस.' यावर आह्मीं सर्वजण पुनः पोट धरधरून हंसलों. कारण या वाक्यांतील सर्व यादि शब्दांचा खरा उच्चार 'ग' आहे. उ० 'आयन गूट् गेब्राटन् गांज इस्ट् आयन गूट गाब गोटेस=खरपूस भाजलेलें बदक ही देवाची एक उत्तम देणगी आहे.' असो.

बर्लिनच्या कॉनसल्चें पत्र बरोबर आणलें होतें. तें घेऊन येथील दरबारच्या ब्रिटिश मिनिस्टरला भेटायला गेलों. येथील अति सुंदर व अति श्रीमंत वस्तीच्या वीनरस्ट्रासमध्यें त्याचें राहण्याचें ठिकाण आहे. भोंवतीं सुरेख बाग, इमारतहि टुमदार व शांत दिसणारी आहे. आंत जाऊन नांवाचें कार्ड पाठविलें. थोड्या वेळानें चाकरानें मि. ग्रँट् डफ् यांच्या छोट्याशा दिवाणखान्यांत नेलें. हे गृहस्थ पंचेचाळिशी उलटलेले पण अतिशय सदृढ बांध्याचे व प्रकृतीचे दिसले. बांधा मध्यम, रुंदट तोंड, व जॉनबुली ताठरणा पाहून मीं जरा बेताबेतानेंच नमस्कार करून पत्र हातांत दिलें. मला वाटलें कीं, तें ठेवून घेऊन, कांहीं त्रोटक शब्दांनीं माझी बोळवण होईल. पण तसें कांहीं झालें नाहीं. उलट 'कोणत्या रीतीनें मी तुमच्या उपयोगी पडावें?' असा सभ्य प्रश्न ऐकून मीं ह्मटलें 'येथील कुल्तु-कुल्तुस् मिनिस्टेरिउम्ला लिहून, या संस्थानांतील सर्व प्रकारच्या शाळा पाहण्याची परवानगी मागवाल तर बरें होईल.' 'अवश्य मागवतों' असें उत्साहाचें उत्तर मिळाल्यामुळें 'मी स्वत: लेखी अर्ज करण्याची जरूरी आहे काय?' असें मी पुन: ह्मणालों. 'कांहीं जरूर नाहीं. हें पत्र व तुमचें स्वत:चें येथवर येणें एवढेंच बस आहे.' असें समाधानकारक उत्तर मिळाल्यावर मीं आपला पत्ता त्यांस लिहून देऊन आभार मानून उठलों, व काम झालें या आनंदाचे भरांत तेथील ग्रोसर गार्टन् अगर मोठें उपवन पहावयाला गेलों. अशा कृत्रिम बागेसहि निसर्गाचें वळण लावण्याचा येथील माळ्यांचा प्रयत्न चांगला साधला आहे. या ठिकाणीं चित्त घटकाभर रमतें. यांतच एका बाजूला शिकारखाना अगर पशुसंग्रह आहे.

**लंडन**, ३० जून १९११

युनिव्हर्सिटी बंद व्हायला अजून सव्वा महिना अवकाश आहे; पण राज्याभिषेकोत्सव पाहण्याची संधि पुन: मिळणार नाहीं ह्मणून

प्रोफेसरांनां सांगून येथें १७ व्या तारखेला आलों. जागेची व्यवस्था आधींच करून ठेवायला सांगितली होती, ह्मणून आयत्या वेळेला पंचाईत पडली नाहीं. मनुष्य उत्सवप्रिय असतो हें तर खरेंच; पण बरीचशी मित्रमंडळी या प्रसंगानें येथें भेटतील ह्मणून पुस्तकें थोडीं बाजूला ठेवण्याचा निश्चय केला. जर्मनींत जाऊनहि आतां सहा साडेसहा महिने झाले. या अवधींत मराठी व इंग्रजीचा एकादा शब्दहि कानावर पडला नाहीं, हेंहि एक छोटेंसें कारण होतें. येथें येऊन पंधरा दिवस व्हायला आले, पण काय ? दोन दिवस समारंभ पाहण्यांत व बाकीचे मित्रमंडळीस भेटण्यांत, त्यांच्याशीं गप्पा मारण्यांत, कांहीं नव्या ओळखी करण्यांत केव्हांच गेले, तें कळलें नाहीं.

समारंभ, मिरवणूक वगैरे पाहिलीं. अपूर्व थाटमाट होता. सर्व जग येथें लोटलेलें, तेव्हां गर्दीला काय विचारावें ? मोंगल-मराठे यांच्या मिरवणुकीचीं वर्णनें वाचलीं; इंग्रजांची मिरवणूक प्रत्यक्ष पाहिली; याविषयीं विस्तृत वर्णन सर्व हिंदी वर्तमानपत्रांतून आलेंच असेल; टाइम्सचे वगैरे स्पेशल बातमीदार येथें आहेतच. तेव्हां माझें वर्णन तें त्यांहून अधिक अगर निराळें काय असणार ? परंतु दोनचार गोष्टी मला विशेष वाटल्या, त्या लिहीत आहें.

पृथ्वीच्या चारहि कोंपऱ्यांतून सर्व राष्ट्रांचीं नानावर्णांचीं माणसें येथें भरलीं होतीं. त्या गर्दीचें मूर्तस्वरूप थोरला पिकॅडिली रस्ता व ट्राफल्- गार स्केअर या ठिकाणीं पहावयाला मिळालें. विशेष गोष्ट अशी, कीं, एवढ्या माणसांच्या तोब्यांत कोठें बखेडा, दुखापत वगैरे झाल्याचें ऐकलें नाहीं. याचें बरेंचसें श्रेय लंडनच्या हुषार पण नम्र पोलिसाकडे असलें, तरी गर्दींतील माणसांची सहिष्णुता, आनंदीवृत्ति, व कायद्याची जबाबदारी ओळखून त्याला योग्य तो मान देण्याची साहजिक प्रवृत्ति, हीं वाखाणण्याजोगीं होतीं, व त्यामुळें पोलिसचें काम अर्धें सोपें झालें.

दुसरी गोष्ट, सर्व इंग्रजांच्या चेहऱ्यावर दिसणारा आनंद होय. राज्यारोहणसमारंभ हें आनंदाचें मुख्य कारण खरें; तरी दुसरेंहि एक कारण असावें. तें असें. आपलें राज्य व वैभव केवढें आहे हें सर्व इंग्लिश पौरजनांनां वाचून व ऐकून ठाऊक असेल; पण या दिवशीं कानडा, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड इत्यादि वसाहतींचे प्रसिद्ध मुत्सद्दी राजाला प्रणाम करण्यासाठीं आलेले प्रत्यक्ष पाहून व वसाहतींतील सैन्यें, हिंदुस्तानांतील शीख, गुर्खा पलटणें व हिंदु संस्थानिक, इंग्लंडच्या राजाच्या रथापुढें थाटानें शिपाईबाण्यानें जातांना डोळ्यांसमोर पाहून, इंग्रजी साम्राज्याची, त्याचा विस्तार व वैभव यांची, त्यांनां प्रत्यक्ष ओळख पटून मूळच्या आनंदांत भर पडली असल्यास नवल नाहीं.

तिसरी गोष्ट, ह्मणजे सगळ्या समारंभाचा शिपाईबाणा होय. मोठमोठे सरदार, सेनापति, शिलेदार वगैरेचें जणूं प्रदर्शनच काढलें होतें! आस्क्विथ, जॉन् बर्न्स वगैरेसारख्या मंत्र्यांचा यांत बिलकूल अंतर्भाव नव्हता. एकंदर कार्यक्रमांत त्यांनां कोठेंहि जागा नव्हती. ते केवळ प्रेक्षक या नात्यानें वेस्ट्मिन्स्टर् देवळांत गेले होते.

मुकुटधारणादि समारंभ, त्याचीं उपांगें हजार वर्षांपूर्वी जशीं होतीं, तशींच आहेत; त्यांत काळाला अनुसरून कांहींहि फरक झालेला नाहीं. सर्व पाश्चिमात्य सुधारणेच्या अग्रभागीं असलेले इंग्रज लोक कितीहि प्रागतिक असले, तरी कित्येक बाबतींत किती पुराणप्रिय, एवढेंच नव्हे, तर जुन्याला चिकटून बसणारे असतात, याचें हें उदाहरण आहे.

कालचा समारंभ मुख्य बाबतींत एडवर्ड, व्हिक्टोरिया व त्यांच्या पूर्वींच्या कित्येक पिढ्यांच्या हुबेहूब सारखाच झाला.

दुसऱ्या दिवशींच्या भव्य मिरवणुकींत लॉर्ड मेयरनें बादशहाला 'राजधानीची तरवार' ( Sword of the city ) नजर केली. हा एक असाच परंपरागत आलेला प्रकार वरच्याच विधानाची साक्ष पटवितो.

पांचवें–देशांत ‘ Radicalism ’ ‘Socialism’ची केवढीहि
लाट आली तरी तिच्या तळाशीं राजनिष्ठा, राजसत्ता, राजा-
वांचून राज्य नाहीं ही भावना, घट्ट बसली आहे. वर्तमानपत्रें वाचून;
आणि उभयपक्षीय वक्तयांचीं जोरदार भाषणें ऐकून सामान्य जनसमूह
तात्पुरता वाहवो पाहिजे तर, पण साधारण स्वास्थ्य ( खाण्यापिण्याची
चैन ) असलें म्हणजे थाटमाट, मिरवणुकी, लखलखाट, उत्सव
हीं त्यांनां हवीं असून त्यांच्या केंद्रस्थानीं राजा त्यांनां अवश्य हवा असतो.

लाइप्झिक् ,१६ जुलै १९११.

‘ सुखकर विद्यार्थिपण कोणचें ?’ म्हणून एकदां मला प्रश्न विचा-
रला गेला. तेव्हां अभ्यासाची रीत व चिकाटी, भरपूर साधनें, परीक्षेचा
लफडा कमी, व परीक्षेला लागणाऱ्या डिसरटेशन अगर एखाद्या
स्वतंत्र विषयावर मुद्देसूद व आजतागाईत माहितीच्या निबंधलेखनानें
आपली बुद्धि स्वतंत्रपणे खर्च करून आपल्या जबाबदारीवर काम
करण्याची सवय, या गोष्टी पाहतां इकडलें विद्यार्थिपण बरें; दांडगे-
पणा, बीयर, द्वंद्वयुद्धें वगैरे लक्ष्यांत घेतां आपलेकडील बरें; असें कांहींसें
चमत्कारिक दिसण्यासारखें उत्तर मला द्यावें लागलें. बुद्धिमत्तेनें आमचे
विद्यार्थी कोणासहि हार जाणार नाहींत, हा मला अभिमान आहे, व
तो खरा आहे असें मला वाटतें. इकडल्या विद्यार्थ्यांप्रमाणें आपल्या
पायावर उभें राहून कोणच्याहि गोष्टीचा ऐतिहासिक—चिकित्सक
दृष्ट्या विचार करणें, ही गोष्ट आमच्या विद्यार्थिवर्गांत उणी वाटली,
तर त्याचें खापर शिक्षणपद्धत्तीवर–युनिव्हर्सिटीवर वगैरे फोडावें लागेल,
असें मला वाटतें. अगदीं धूळपाटीपासून शाळेंत नेमलेलीं पुस्तकें
वाचणें, घोटणें यापलीकडे फारसें कांहीं आमच्या विद्यार्थ्यांस ठाऊक
नसतें. शाळेच्या अभ्यासापलीकडे इतर वाचन व प्रत्यक्ष अनुभव असें
कांहीं आहे, अशी त्यांनां कल्पना नसल्यास नवल नाहीं. कारण, घरून

अशी कल्पना मिळण्याला स्वतः वडील चौकस व माहितगार असून त्यांस उदरभरणापलीकडे थोडा वेळ मिळाला पाहिजे, व त्यांनां मुलांचें काय चाललें आहे याची चौकशी करण्याची स्फूर्ति असली पाहिजे. आई सुशिक्षित असली पाहिजे, व स्वतः शिक्षकाला आपल्या पुस्तकापलीकडे काय आहे याची माहिती पाहिजे. या सगळयांचा अगदीं अलीकडेपावेतों आपलेकडे अभावच होता. मग मुलांमध्यें वाचनाची अभिरुचि, चौकसपणा, ज्ञानाची गोडी हीं उत्पन्न झालीं नाहींत, तर दोष कोणाचा? शिक्षकलोक आपल्या विषयाच्या नेमलेल्या पुस्तकापलीकडे किती पहातात, वाचतात हें सर्वांनां ठाउक आहेच. मग अशा शिक्षकांनीं स्वतःमध्यें नाहीं तें विद्यार्थ्यांत कोठून आणावें?

मुलें हीं मास्तरांच्या हातीं येतात, तीं नैसर्गिक जिज्ञासा कोमेजून गेलेलीं अशीं येतात. कारण, अगदीं साध्या गोष्टीविषयींहि घरीं कधीं त्यांनीं विचारिलें असतां आईकडून स्वतःचें ज्ञान तात्पुरतेंच असल्यामुळें एकादी थोबाडींत, अगर तितकी मजल गेली नाहीं, तरी 'बाळया किती विचारशील रे? इतकी चौकशी एवढ्या वयांत हवी कशाला?' अशासारखें उत्तर मिळतें. या रीतीनें जिज्ञासा दडपली जाऊन परिणाम असा होतो, कीं, इकडल्या आठनऊ वर्षांच्या पोराला जें ठाऊक असतें, तें आपल्याकडे पंधरा वर्षांच्या मुलाला कळतें कीं नाहीं याची शंकाच येते. हें मला इकडल्या शाळांत पहावयाला मिळालें.

दुसरें, गांवांत अगर शहरगांवीं तरी मुलांनां उपयुक्त पण सुलभ अशीं पुस्तकें पुरवणाऱ्या लायब्रऱ्या नाहींत. तें राहो, पण प्रत्येक शाळेंत तरी पुष्कळशा मुलांनां पुस्तकें सहज वाचावयाला मिळावीं म्हणून उपयुक्त लायब्रऱ्या कुठें आहेत? व ज्या थोड्या असतील तेथें मुलें कितीशीं वाचतात? व किती शाळेचे चालक आणि मास्तर असें मुलांनीं वाचावें याची काळजी घेतात? जसें शाळांचें तसेंच पुढें कॉलेजांचें. मुलें परीक्षेसाठीं तयार करायचीं हा शिक्षणाचा उद्देश!

मुलांनां धड लायब्ररी नाहीं. असलीच तर तेथें शांतपणें बसून वाचण्याची, लिहिण्याची सोय त्यांनां नाहीं. कोणा तरी प्रोफेसराची भीड घातल्याशिवाय पुस्तक मिळावयाचें नाहीं, वगैरे वगैरे किती सांगावें? येथें दर शाळेला चांगलीशी व दर युनिव्हर्सिटीला जंगी लायब्ररी असते. तेथें वर्षाला फार तर दोनचार आणे वर्गणी दिली, कीं, वाटेल तें पुस्तक, हस्तलिखित जुने ग्रंथसुद्धां मुलांनां वाचावयाला मिळतात. युनिव्हर्सिटी लायब्ररींत 'लेझ हाल' ह्मणून वाचण्यालिहिण्यासाठीं सर्व सामुग्री असलेला मोठा दिवाणखाना असतो; त्यांतच ताजीं वाङ्मयात्मक, शास्त्रीय, ऐतिहासिक मासिकें सर्व देशांतल्या विद्यार्थ्यांनां वाचण्यासाठीं ठेविलेलीं असतात. शिवाय, खुद्द युनिव्हर्सिटीच्या इमारतींत वाचनासाठीं एक हॉल असतो, व प्रत्येक विषयासाठीं दोनतीन प्रोफेसरांच्या देखरेखीखालीं पुस्तकादि सामुग्री भरलेलें इन्स्टिट्यूट असतें. यांत प्रोफेसराच्या मदतीनें विद्यार्थ्यांनां आपापल्या विषयांवर माहिती कशी मिळवावी, निबंधाचें काम कसें करावें, वगैरेचें प्रयोगासह शिक्षण मिळतें. या प्रयोगशिक्षणाला यूबुंग् (अगर प्राक्टिस-प्रयोग) ह्मणतात. अशीं साधनें आपल्याकडे आहेत काय? याप्रमाणें साधनाला, पद्धतीला दोष दिला; पण थोडा विद्यार्थ्यांकडेहि शिंतोडा येतोच.

शिक्षणाचा अगदीं निकृष्ट उद्देश घेतला, कीं, नेमलेलीं पुस्तकें वाचून परीक्षेंत पास व्हावयाचें! तरीसुद्धां तीं पुस्तकें व्यवस्थितपणें, वर्षाच्या आरंभापासून थोडथोड्या अंशानें वाचणारे विद्यार्थी शंभरांत पंचवीस तरी सांपडतील काय? पहिले सहा महिने खेळणें—तेंहि राहोच, कारण, खरें खरें खेळून शरीरसंवर्धनाकडे पहिले सहा महिने खर्च केले तरी वाईट नाहीं—नुसता उनाडपणा, गप्पा, व आळस यांत घालवून परीक्षेची वेळ जवळ आली ह्मणजे दिव्याच्या वाती सरसावीत निशाचरासारखें वाचीत जागत बसलेले विद्यार्थी बरेच असतात. हें खरें

आहे ना ? तेव्हां या उभयपक्षी दोषामुळें तिकडच्याइकडच्या विद्यार्थ्यांत अंतर बरेंच आहे. इकडच्या विद्यार्थ्यांचा उद्योग-अभ्यासीपणा ( अभ्यास=Application ह्मणजे कोणतेंहि काम हातीं घेतलें असतां तें मेहनतीनें करीत राहणें) जरी नीरस वाटला, तरी वाखाणण्या-जोगा आहे. ( नीरस ह्मणण्याचें कारण, आपणांस हुशार समजणारे खेळाडू विद्यार्थी संथपणें, नियमितपणें अभ्यास करणारांची हंसून टर उडवितांना आपलेकडे दृष्टीस पडतात, या गोष्टीवरून तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल ! ) तो आपलेकडील विद्यार्थ्यांत कमी आहे. स्वतंत्रपणें, लोकांची वृथा छाप आपल्या मतांवर पडूं न देतां विचार करण्याची सवय इकडल्या विद्यार्थ्यांनां आहे; ती आपलेकडे कमी; व जबाबदारी अथवा आपल्या स्वतःच्या हिंमतीनें काम करण्याची संवय इकडल्या विद्यार्थ्यांत आहे, आपलकडे नाहीं. यामुळें वाईट वाटण्याचें कारण नाही. मलाहि वाईट वाटत नाहीं. परिस्थितीनें असा नेभळेपणा आला आहे; तो जाणून आपण काढून टाकला पाहिजे आपला दोष आपणांला कळूं लागणे हें सुधारणेचें अत्यंत आशाजनक चिन्ह होय.

यांच्यांतहि दोष आहेत; पण ते सांगून काय फायदा ? दांडगाई, मूर्खपणा, फाजीलपणा इकडे फार आहे. पण तो अभ्यासांत व्यत्यय आणीत नाहीं, हें आश्चर्य आहे. कामाच्या वेळीं काम व खेळाच्या-मूर्ख-पणाच्या वेळीं खेळ-मूर्खपणा वगैरे जणूं यांच्या अंगवळणींच पडून गेलेलें आहे !

इकडे गरीब गोऱ्या विद्यार्थ्यांनां बऱ्याच सवलती आहेत. त्यांपैकीं एक तरी मला निश्चित ठाऊक आहे. युनिव्हर्सिटीचें एक फ्री बोर्डिंग हौस त्यांच्यासाठीं बांधलेलें आहे. तेथें त्यांनां जेवण-राहणें फुकट मिळतें. लायब्ररी हाताशीं असल्यामुळें पुस्तकें त्यांनां फारशीं घ्यावीं लागत नाहींत. फीविषयीं त्यांनां काय सवलत आहे हें मला तूर्त पक्कें ठाऊक नाहीं; पण इथल्या मानानें फी थोडी ह्मणजे दर विषयाला टर्मला

सतरा मार्कपेक्षां जास्त नाहीं. तीन विषय मिळून चार प्रोफेसरांचीं लेक्चरें ऐकिलीं, तर अडसष्ठ मार्क अधिक सात युनिव्हर्सिटीचे किरकोळ ह्मणजे पंचाहत्तर मार्क एका टर्मला, ह्मणजे एकशेंपन्नास मार्क अथवा ११२॥ रुपये वर्षाला जास्तींत जास्ती पडतात. जेथें साधारण रहाण्याला शंभर रुपये तरी कमींत कमी खर्च येतो, तेथें सबंध वर्षाची ११२॥ रुपये फी कांहींच नाहीं, ह्मटलें असतां चालेल. नादारी वगैरे असल्याचें मला अजून ठाऊक नाहीं.

येथील विद्यार्थ्यांचें आपल्या विद्यार्थ्यांशीं वर्तन कसें असतें, हा प्रश्न सोपा व अवघडहि आहे. आपण जसें लोकांशीं वागूं तसें लोकहि आपणांशीं वागतील, हें त्रिवाचा सत्य आहे. मजशीं त्यांचें वर्तन आहे त्यावरून कल्पना करून चालावयाचें नाहीं. कारण, प्रथम मी एक हिंदुस्तानांतला प्रोफेसर येथें स्प्राख्विझेनूशाफ्ट् ( फिलॉलजी-व्युत्पत्ति शास्त्र ) शिकण्यासाठीं आलों आहें, हें सर्वांनां ठाऊक झालें आहे; दुसरें, मी येथें दोन बड्या प्रोफेसरांकडे आलों आहें, ते प्रोफेसर ऑनररी प्रीव्हिकौन्सिलर ( गेहायमर होफ्राट् ) आहेत, हें विद्यार्थी जाणून आहेत; तरी पण परकी विद्यार्थ्यांशीं यांचें वर्तन सभ्यपणाचें असून त्यांस ते सवडीअंतीं मदतहि करतात, असें मला दिसतें.

इकडे आपल्याकडील गरीब विद्यार्थी असल्याचें मला ठाऊक नाहीं; पण नसावेत असें मला वाटतें. कारण, गरीब विद्यार्थी येथें येऊन उपजीविकेचें साधन शोधूं लागण्यापूर्वी त्याला भाषेची मोठी अडचण आहे. अशा विद्यार्थ्याला टायपिस्ट्, कारकुनी, दुकानावर बिक्री ( विशेषतः पुस्तकांच्या दुकानांवर ) वगैरे अशींच कामें करावीं लागणार, व तीं त्याला भाषेचें बरेंसें ज्ञान असल्याशिवाय करतां येणार नाहींत. इंग्लंड, अमेरिकेची गोष्ट निराळी आहे. यूरोपाकडे येऊं इच्छिणारा असा आपला विद्यार्थी घेतला तर त्यानें निदान सातआठ वर्षें तरी इंग्रजीचा अभ्यास केला असलाच पाहिजे, असें धरून चालण्यास

हरकत नाहीं. अशाला इंग्लंड—अमेरिकेंत वरीलसारखीं कामें करून उदरनिर्वाह करणें शक्य आहे. अशीं कांहीं उदाहरणेंहि मला ठाऊक आहेत.

**लाइप्झिक**, २८ जुलै, १९११.

गरीब विद्यार्थ्यांनां मदत करण्यासाठीं येथें प्रोफेसरांची एक कमिटी नेमली आहे, तिच्या डिरेक्टरला नुकताच मी भेटलों. त्यानें बरीचशी हकीकत सांगितली. कांहीं सरकारी स्कॉलर्शिपा, कांहीं युनिव्हर्सिटीच्या व कांहीं खाजगी उदार गृहस्थांनीं ठेवलेल्या स्कॉलरशिपा, अशा सर्वांची आणि बोर्डिंगहौसची व्यवस्था वर लिहिलेली कमिटी लावते. स्कॉलर्शिपा वर्षाला तीनशें मार्क अशा सरासरी तीनशेंएक आहेत. शाळेतील सर्टि-फिकिटें, गरीब असल्याबद्दल कोणा भल्या गृहस्थाची शिफारस वगैरे असलें ह्मणजे ही ‘ स्टिपेंडिअम् ’ मिळूं शकते. साधारणत: दोन वेळ फुकट जेवण ज्यांनां मिळते त्यांनां स्कॉलर्शिप नाहीं, व ज्यानां स्कॉलर्शिप आहे त्यांनां जेवण नाहीं, अशी व्यवस्था असल्यामुळे त्यांतले त्यात बऱ्याच विद्यार्थ्यांची सोय होते. तरी पण लायकीप्रमाणें दोन्हीहि मिळ-णारे असे थोडके विद्यार्थी आहेत. दोन्ही मिळून संख्या सहासातशें आहे. युनिव्हर्सिटींत साडेचार हजारांवर विद्यार्थी असल्यास या मद-तीचें प्रमाण शेंकडा सरासरी पंधरा पडतें.

अलीकडे येथें उन्हाळा फार झाला आहे. ९०° वर पारा चढतो. आपल्या मानानें हें जरी कमी असलें, तरी इकडील कपड्याची आणि एकंदर राहण्याची रीत पाहतां हें ९० ह्मणजे आपल्याकडील १०५ — ८ पर्यंत वाटतात. दुपारीं खिडक्या लावून पडदे ओढून बसलें तरी उकडून घाम येतो. त्यामुळें काम बरोबर होत नाहीं. यंदां उन्हाळा अपूर्व आहे, असें सर्व ह्मणतात. अमेरिकेकडेहि असेंच आहे. ४००-५०० माणसें तेथें नुकतींच उन्हानें मेलीं. शिवाय कान्स्टँन्टिनोपल, किंवा

आपल्या मराठी इतिहासांत फक्त रूमशाम नांवानें महशूर असलेलें शहर, येथें परवां भयंकर आग लागली. अशा आगी नेहमीं ऐकूं येतात. पंधरा दिवसांत पावसाचा थेंब नाहीं, त्यामुळें 'पाणी जपून वापरावें, दुरुपयोग करणारास पंधरा मार्क दंड होईल,' अशी नोटीस इथल्या कमिशनरानें कालच काढली आहे! दूध, लोणी, भाज्या, फळें दुपटीनें महागलीं आहेत. इकडे शेतकीवरच सगळें अवलंबून नसल्यानें व पैशाच्या समृद्धीमुळें पावसाकडे आपल्याकडल्यासारखे डोळे लागून राहत नाहींत.

**लाइप्झिक**, ४ आगस्ट, १९११.

नुकतीच सुटी झाली व आमच्या इन्स्टिटयूटच्या मंडळींनीं सुटींत चार चोहींकडे पांगण्यापूर्वी एक लहान सहल करण्याचा बेत केला, व मला बरोबर बोलावलें. अर्थात्च येथील विद्यार्थी विशेष सलगीनें पाहण्याची संधि दवडावीसें न वाटून मीं हो ह्मटलें, व दुपारीं चार वाजतां स्टेशनावर गेलों. तेथें बाकीचे आठजण मला भेटले. रेल्वेनें पाउणतासाच्या रस्त्यावर रॉटा ह्मणून फळबागांविषयीं प्रसिद्ध असलेलें एक खेडें आहे, तिकडे आह्मी निघालों. रेल्वेनें बॉलेन खेड्यापर्यंत जाऊन पुढें पायीं आप्फेल, बिर्नेन, फिर्सिश वगैरे यूरोपीय फळांच्या बागांतून चाललों. दोनदोन, तीनतीन अशा टोळ्यांनीं गप्पा मारीत जातांजातां रॉटाला आह्मी साडेपांचच्या पूर्वींच पोंचलों. आमच्याबरोबर एक इकडील सरदार 'बॅरोन फॉन् इ०इ०'होता. युनिव्हर्सिटींत सातआठ वर्षे अभ्यास करून डिग्री न घेतां तसाच पुढें भाषांचा अभ्यास करीत राहिलेला असा हा विचित्र माणूस आहे. एक संस्कृत जाणणारा हिंदी गृहस्थ येथें आहे असें कळल्यापासून, माझी ओळख व्हावी अशी त्याची फार इच्छा होती. असो. तेथें एका उपाहार व दारूगृहासमोर एका कृत्रिम टेंकडीवर आह्मी सर्वजण गप्पा मारीत खुर्च्यांवर बसलों. ही टेंकडी त्या दारू-



'कोअर स्टुडेंट' ( जर्मन विद्यार्थि ).

गृहाच्या मालकीची होती, हें सांगायला हवें. एका बाजूच्या फळबागाखेरीजकरून डोंगर–झाडी–चांगलासा ओढा इत्यादि सृष्टिशोभा, अगर इतर कांहीं ऐतिहासिक महत्त्वाचें येथें कांहीं नसतां, यांनीं सहलीला हेंच ठिकाण कां शोधलें, आणि साधारणतः विद्यार्थि व इतर जर्मन स्त्रीपुरुष येथेंच उन्हाळयांत फार कां येतात, याचें कारण मला मग समजलें. नव्हे, तें टेबलावरच समोर आलें ! निरनिराळया फळांपासून तयार केलेल्या दारूचें त्यांच्या दृष्टीनें चटकदार मिश्रण अगर 'बोल' हें तें कारण होय ! प्रत्येकानें किती पेले झोंकले, हें मी मोजीत बसलों नाहीं; पण दर ग्लासाबरोबर मंडळीची चित्तवृत्ति खुलून मौजेला भरती येई. नाना तऱ्हेच्या थट्टा, गप्पा, विद्यार्थ्यांचीं गाणीं, युनिव्हर्सिट्यांवरचीं थट्टेखोर पद्यें, प्रोफेसरांवर बारीकसारीक टीका, व्याख्यानांचीं सोंगें वगैरेंत वेळ जाऊन संध्याकाळ केव्हां झाली, तें कळलें नाहीं. उदाहरणार्थ, गॉटे कवीचें पद्य Ergo Bibamus 'तर आपण पिऊंया' हें त्यांचें पालूपद ! 'आपण येथें गोड कामासाठीं जमलों आहों, तर गड्यांनों ! पिऊंया' वगैरे गाणें सर्वांनीं मोठ्या उल्हासानें ह्मटलें, व त्यांच्या प्रसिद्ध कवीच्या शब्दांनां मान देऊन तें खरें केलें ! युनिव्हर्सिटीवरच्या गाण्यांचा मासला कोकणस्थांच्या देशस्थांवर, व देशस्थांच्या कोकणस्थांवरच्या टीकांप्रमाणेंच आहे. उदाहरण ' नाख् बेर्लीन् बेर्लीन्, डोट त्सीएन् डी ओक्सेन् हिन्–ह्मणजे बर्लिनच्या युनिव्हर्सिटींत फक्त बैल जातात !' वगैरे. प्रोफेसरांवरील टीकाहि अशाच. येथल्या प्रसिद्ध प्रोफेसर ब्रुगमान्ची अशी ठाम समजूत आहे, कीं, सर्व आर्यभाषांतील m, n, म, न हे वर्ण $m_\circ$, $n_\circ$, ( आपल्या वैदिक अनुनासिकासारखें कांहीं तरी ) या कल्पित इंडोगरमानिक वर्णांपासून निघाले असावे. या $m_\circ$, $n_\circ$ चा नीट उच्चार करतां येत नाहीं ह्मणूनच ते वर्ण थट्टा व हंशा यांचें मूळ होऊन बसले आहेत. उदाहरणार्थ 'गम् याचें मूळ ' $g_\circ m_\circ$' असें येतें. त्याचा उच्चार आपण

देशस्थांची थट्टा करतांना 'गणानां त्वा गणपतिं' याचें शेवटचें अनुनासिक जसें 'गुँङ्' सारखें उच्चारतों, तसा करावयाचा! तेव्हां असे शब्द काढून त्यांचा उच्चार करायची खटपट करून कांहींजणांनीं हंशा माजवला. एकानें त्या प्रोफेसराला चित्राचें कार्ड धाडलें, तेव्हां बाकीच्यांनीं त्यावर सह्या केल्या शेवटीं दिवस तारीख घालयची, तेव्हां एकानें 'mit woch मिटवोख बुधवार' या शब्दाचें इंडोगरमानिक रूप कार्डावर लिहावें अशी सूचना करतांच, ती हंशाच्या बाजारांत पास झाली, व कार्डावर साध्या 'mit woch' च्या ऐवजीं m it woch असें इंडोगरमानिक रूप (त्या प्रोफेसरानें शोधून काढलेलें) लिहिलें गेलें! अशीं पण थट्टेविरहित कार्डें आणखीहि कांहींजणांनीं आपल्या मित्रमैत्रिणींनां लिहिलीं. ही इकडे चाल आहे. माझी व अशा मित्रमैत्रिणींची तोंडओळखहि नव्हती, तरी इकडील रिवाजाप्रमाणें मींहि सही केली! नंतर सर्वजण येथें जेवलों, व जेवण झाल्यावर मंडळींचा 'बोल' चा दुसरा हप्ता झाला. एकमेकांची शरीरप्रकृति (गेझुंड्हाइट्) पितांना पेल्यावर पेले आपटून जो मधुर ध्वनि होई त्याने मंडळीचा आनंद दुणावे! नंतर ल्याटिनमध्यें बोलण्याची टूम निघून एकच आरडा व गोंधळ माजला. एका लहानशा बकेटां-तून सर्वांचे पेले भरण्याचें काम वेलर नांवाच्या विद्यार्थ्याकडे होतें, त्याची ल्याटिनमध्यें स्तुति झाली. त्याला 'कामधेनु' ही पदवी मिळाली, हें रीतसर झालें नव्हे? आपल्याकडील संस्कृताच्या अभिमानी विद्यार्थ्यांनीं (असे किती?) जेवायच्या वेळीं क्लबरूममध्यें भटजीसमोर संस्कृतमध्यें गडबड करण्याचा प्रयत्न करावा, तसेंच हें! इतकें होतें तों साडेआठ वाजले. बारा वाजल्याशिवाय परतायचें नाहीं असें आधींच ठरलें असल्यामुळें, बाकीचे तीन अधिक तास कसे घालवायचे, ही पंचाईत पडली; पण या पंचाइतीचा टिकाव 'बोल' पुढें कसचा निघतो? तिसरी बोलची आवृत्ति! मग काय, एका गृहस्थाला

शीघ्रकवित्वाची उकळी येऊन त्यानें आपल्या सोबत्यांपैकीं एकमेकांवर पद्य करून ह्मणावें, व ज्याच्यावर तें केलें 'त्याच्या सुखासाठीं' ह्मणून मंडळींनीं ग्लास तोंडाजवळ न्यावे ! त्या पद्यांपैकीं कांहीं खरोखरच चटकदार होतीं. त्या गुलामानें 'प्रो.गून'च्या'अब्स्टिनेन्स'–दारूपासून अलिप्तता 'यावरहि पद करून मला व सर्वांसहि हंसविलें ! मूर्ख, दुर्बल 'बॅरोन फॉन इ. इ.' इतका वेळ दांतखिळ बसल्यासारखा स्तब्ध होता. पण आतां जणूं काय दारूनें ती खीळ उचटल्यामुळेंच कीं काय, ल्याटीन–ग्रीक–जर्मन–वेडेंवांकडें इंग्लिश–एकादा मोडका संस्कृत शब्द-स्लाव्हिश् इत्यादिकांची त्यानें यथेच्छ कत्तल उडविली.मध्येंच मी सर्वांनां उद्देशून चार शब्द इंग्रजींत बोललों, कीं "तुमचा हा दारूचा प्रकार खेरीजकरून, बाकी सर्व थट्टा, खेळणें, भाषणें, मौज, सलोख्यानें वागणें इत्यादि मला आवडलें; व दारू बाजूला ठेवून, तुमच्या या एकोप्याची मी नेहमीं स्तुतीच करीन." मधले जाड्या अक्षरांतील शब्द त्यांस कितपत पटले असतील, हें मला ठाऊक नाहीं. पण अशा लहान लहान सहली आमचे आठदहा विद्यार्थी मिळून सह्याद्री, महाबळेश्वर वगैरे ठिकाणीं करतील ( कांहीं थोडे करतात हें मला ठाऊक आहे ) व सृष्टिसौंदर्य पाहण्यानें सौख्य, विविध माणसें व ऐतिहासिक स्थळें पाहण्यानें ज्ञान, व त्या सर्वांबरोबरच शारीरिक फायदे, आणि सर्वांपेक्षां ज्यास्त महत्त्वाची गोष्ट ह्मणजे इतर माणसें बरोबर घेऊन कांहींहि काम सलोख्यानें, जुटीनें व ह्मणूनच सुखानें करण्याची संवय, हें सर्व संपादण्याची हौस धरतील, तर किती बरें होईल ! हें मला आतांच वाटतें आहे असें नव्हे; तर त्या रात्रींहि असेंच वाटलें. असो. नंतर अकरा वाजतां परत स्टेशनकडे जाण्यास सर्वजण उठलों, व इतकी दारू पिऊनहि सर्वजण व्यवस्थित असल्याचें मला आश्चर्य वाटावें, इतक्यांत 'बॅरोन फॉन इ.इ.'बरोबर दोघांतिघांनां घेऊन टेंकडीच्या पायऱ्यांवरून खालीं लोळला ! बाकीचे चटकन् उठले. बॅरोनला इतरांनीं बळेंच उठविलें.

शरीर जणूं धरणीला भेटलें, तरी त्याचें डोकें हवेंतच फिरत होतें! तोंडाची टकळी सारखी चालू होती. मग दोन्हीकडून दोघांनीं त्याला धरून चालविलें. बाकी सर्वजण हुषार होते. लहानपणापासून हाडीं-मासीं दारू खिळलेली, व आज एकदोन हजार वर्षें पिढ्यानूपिढ्या त्यांच्या रक्तांत भिनलेली; तिला कसचे एऱ्हवींच दाद देतात! सर्वांचीं डोकीं स्थिर होतीं; पण कांहींचे पाय अस्थिर होऊन डोक्याचें न जुमानीतसें झाल्यामुळें, दोघे माझा आश्रय करून दोन्ही बाजूंनीं हातांत हात गुंफून चालले होते. 'बॅरोनच्या उदाहरणावरून एकंदर सर्वच तसे असतात असा ग्रह कृपा करून होऊं देऊं नका,' अशी त्यांनीं मला विनंति केली! बारा वाजतां गाडींत बसून रात्रीं एकाला मी घरीं पोंचलों; व जर्मन विद्यार्थ्यांचा खराखुरा अनुभव आज आला व प्रथमचे समज अगदीं खरे होते, असें गुंगत झोंपीं गेलों!

परवांच्या दिवशीं स्वित्झरलंडकडे जाण्याची तयारी करीत आहें.

७ आगस्ट, १९११.

मागच्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें सोमवारीं सकाळीं लाइप्झिक सोडलें, व 'हाल' येथें एका मित्राकडे गेलों. त्यानें मोरित्सबुर्ग, नदी, गीबिजूस्टाइन् वगैरे पाहण्याला नेलें. हा गांव लहानच ह्मणजे दीड लाखाच्या वस्तीचा असल्यामुळें, वरील दोन गोष्टी खेरीजकरून मजसारख्या प्रवाशाला फारसें पहाण्यालायक येथें कांहीं नाहीं. मोरित्स-बुर्ग ही आपल्याकडील किल्ल्यासारखी, मोठमोठ्या भिंती, बुरूज व भोंवतीं खंदक असलेली इमारत आहे. ही मिडल् एजेस् ह्मणजे पंध-राव्या शतकांतली असून प्रथम एका सरदाराच्या व नंतर एका बलाढ्य कॅथॉलिक उपाध्यायाच्या ताब्यांत होती. आतां एक तळघर खेरीजकरून बाकी सर्व पडझड झाली आहे. एका कोंपऱ्यांत एक लहानसें पदार्थ-संग्रहालय असून त्यांत १५।१६।१७।१८ या शतकांतल्या जुन्या वस्तु

आहेत. हा दुर्ग पाहून आपल्याकडील किल्ल्यांची व खंदकांची आणि त्यांच्याबरोबरच त्यांच्या सुखदु:खांनीं भरलेल्या इतिहासाची आठवण झाली, आणि जुन्या व ह्मणूनच प्रिय व महत्त्वाच्या गोष्टींचा जपून संग्रह करण्याकडे, ऐषआरामी मोंगल बादशहांनीं व सदा अस्वस्थ, लढाईंत गुंतलेल्या मराठ्यांनीं लक्ष्य दिलें नाहीं ह्मणून किंचित् वाईट वाटलें. 'या हिंदु लोकांनां ऐतिहासिक भावना ( Historical Sense) नव्हती, व अजूनहि नाहीं' असें पाश्चात्यांनीं ह्मटलें असतां, मनुष्यधर्माप्रमाणें आह्मांला मिरच्या लागाव्या हें ठीकच आहे; पण त्यांच्या त्या ह्मणण्यांत तथ्य आहे असें कबूल करावें लागतें !

गीबिजस्टाइन् हें ठिकाण उंच टेंकडीवर आहे. किल्ल्यासारखेंच कांहीं असावें, पण त्याचा एक घड्याळ असलेला बुरूज खेरीजकरून फारसा अवशेष राहिलेला नाहीं; मात्र वरून शहर, भोंवतीं दोन फांट्यांसह नदी व झाडी, टेंकड्या, व एकीवर जर्मनीचा राष्ट्रीय वीर व हितकर्ता बिस्मार्क याचा पुतळा, हा सर्व देखावा रमणीय दिसतो.

संध्याकाळीं झुआलॉजिकल गार्डन् ( याला ' त्सो ' असें संक्षिप्त नांव आहे) मध्यें गेलों. यांत सिंहव्याघ्रादि जनावरें, जटायूचे वंशज व इतर पक्षी हें असायचें तसें होतें; पण एका बाजूला आफ्रिकेंतील कांहीं निग्रो बायकापुरुषांचा विचित्र नाच, व उंटागाढवांवर तेथेंच भोंवतीं वाजतगाजत काढलेली वरात वगैरे चमत्कारिक होतीं. कुठलीं तरी खालच्या वर्गांतलीं दरिद्री वेडींवांकडीं माणसें आणून ' असे इजिप्शिअन असतात, असे आफ्रिकन असतात, ' अशी लोकांची सररहा कल्पना करून देत असतांना पाहून तिटकारा आला.

परत येतांना, दुकानांतून आपले कामधंदे आटपून घरीं अगर सांकेतिक स्थळीं जातांना तरुण मुली आढळल्या. आह्मां दोघांनां पाहून हंसण्याइतका बेफामपणा यांच्यांत होता. हा प्रकार मला लाईप्झिक, बर्लिन अगर ड्रेसडेन या ठिकाणीं आढळून आला नाहीं. येथील मुली वात्रट-

पणाविषयीं प्रसिद्ध आहेत. काम संपल्यावर विद्यार्थ्यांची वाट पहात उभें राहून, कोणी तरी एकजण पटकावून त्याच्याबरोबर गांवाबाहेरील उपवनांत हातांत हात गुंफून गप्पा मारीत २-२॥ तास फिरतात व मग घरीं जातात. 'हाल'ला येऊन मुलींबरोबर उधळणें व दारू पिणें, हाच विद्यार्थ्यांचा अभ्यास असतो, हें इकडे महशूर आहे, व त्यावर 'इन् हाल डा ट्रिंकेन् आल-हालला सर्वांस दारू पिण्याचा उद्योग,' असें एक पद्यहि आहे. असो.

मंगळवारीं सकाळीं मी, माझे मित्र व एक बंगाली विद्यार्थी यांच्याबरोबर दहाबारा मैलांवर मेर्सेबुर्ग ह्मणून लहानसें गांव आहे, तेथलें जुनें देऊळ पाहण्यासाठीं इलेक्ट्रिक ट्रामनें गेलों. सबंध इमारत एकाच वेळची नाहीं; पण मुख्य चापेल—अल्टार—अगर वेदी, व त्याखालील ग्रुफ्ट् अथवा तळघर हीं इ० स० १०१५त बांधलीं गेलीं. दर जुन्या देवळाला तळघर अवश्य असे, हें कदाचित् तुह्माला ठाऊक असेल. यांत देवळाचें द्रव्य—त्या वेळीं हीं देवळें मोठमोठ्या राजांपेक्षांहि संपन्न असत—व इतर गुप्त वस्तु ठेवण्यास जागा असून एकादा प्रसिद्ध उपाध्याय अगर देऊळभक्त राजा तिथें पुरीत असत. पंधराव्या शतकापासूनच्या कांहीं राजे, राण्या व मुलें यांच्या शवांच्या पेट्या अजून दाखवतात. वरून जस्ताची, कुसरीनें मढवलेली, कोरलेली मोठी पेटी, व त्यांत प्रेतासह एक लांकडी पेटी, अशी व्यवस्था असते. ती ग्रुफ्ट—तळघर पाहून आल्यावर आपण थंड व कुजट पाताळांतून पुनः मृत्युलोकीं आल्यासारखें बरें वाटलें. इतर विशेष पाहण्यासारखें कांहीं नसल्यामुळें शेजारच्या नदीकांठच्या सुंदर बागेंत प्लाटान् झाडाच्या गार छायेखालीं कांहीं वेळ बसलों, व दुपारीं जेवायला परत हाल येथें एका शाकाहारी खाणावळींत गेलों. येथें खर्च फारच कमी व ह्मणूनच गरीब जर्मन विद्यार्थ्यांचा भरणा फारच मोठा असतो, हें सांगणें नकोच!

येथील युनिव्हर्सिटी लहानशीच असून तिची इमारत शुद्ध एकाद्या मोठ्या पेटीसारखी चौकोनी आहे. लायब्ररीहि बेताचीच आहे. तिचे

डिरेक्टर प्रो. हुल्च–जे अशोकाच्या व इतर शिलालेखांविषयीं प्रसिद्ध असून हिंदुस्तानांत सतरा वर्षें हेंच काम करीत असत–त्यांच्याकडे दुपारीं ४ वाजतां गेलों. हे घरांतसुद्धां इंग्रजींत बोलतात. विविध विषयांवर गप्पा मारून त्यांच्याबरोबर दोन तास फिरावयास गेलों. हे सरळ व मनमिळाऊ असून यांनां आपल्या विद्वत्तेसंबंधीं गर्व नाहीं, असें वाटलें.

कासेल्, ९ आगस्ट, १९११.

बुधवारीं अकरा वाजतां हाल सोडलें, व तीन वाजतां कासलला आलों. माझ्या डब्यांत एक ऑस्ट्रियन व एक बर्लिनीरिन् (बर्लिनची एक स्त्री) अशीं दोघें होतीं. त्या ऑस्ट्रियननें बाड् नाउहाइमच्या अतोनात गप्पा सांगितल्या, व उन्हानें आणि धुराच्या घाणीनें मीं जरा अस्वस्थ झालेलों पाहून 'Legen sie sich hin–पडा जरा' ह्मणून आपली ब्लँकेटची वळी उशाला दिली. मी डोळे लावून स्वस्थ पडलों होतों. झोंप कसची येते त्या वेळीं? पण हा मी झोंपलों असें समजून तो त्या बाईशीं माझ्याविषयीं कांहीं बोलला, तें ऐकून माझें हंसूं आवरेना. 'हा गृहस्थ आपण हिंदी आहों असें सांगतो, पण हा हिंदुस्तानांत रहिवासलेला जपानी खास आहे,' असें त्यानें आपलें ठाम मत त्या बाईला सांगितलें!

पाकीट तसेंच स्टेशनवर ठेवून, व साबण, वस्त्रा वगैरे सकाळच्या नव्यापव्याची सामग्री फक्त घेऊन, एका ठिकाणीं एक दिवसाकरितां निजणें व सकाळचा फराळ एवढ्याला तीन मार्क किंमतीची खोली घेतली. लगेच, विल्हेल्म्सहॉअ ह्मणून दोन हजार फूट उंचीची टेंकडी आहे, तिकडे ट्रामनें गेलों. टेंकडीच्या पायथ्यापासून टोंकापर्यंत उंचउंच आयश, फिश्ट, टान, लिंड इत्यादि झाडांचें दाट रमणीय उपवन आहे. त्यांतून शेंकडों लहानलहान रस्ते सापाप्रमाणें मुरडत गेले आहेत. अर्धे वर गेलें ह्मणजे डोंगरांतल्या जीवंत पाण्याचाच,

पण पायऱ्या बांधून व मध्यें ठिकठिकाणीं तळीं करून त्यांत सोडलेला कृत्रिम धबधबा लागतो. सध्यां पाणी अगदींच थोडें असल्यामुळें गम्मत दिसत नाहीं. टेंकडी सबंध चढून गेलें असतां वरून शहर दरींत वसल्यासारखें दिसतें. टेंकडीवर मोठमोठ्या दगडांची, चवदाव्या शतकांतल्या एकाद्या जुन्या पडकळीसारखी मुद्दाम बांधलेली एक अष्टपैलू इमारत बाहेरून साधारण चांदबिबीमहालाच्या दोन मजल्यांसारखी दिसते. ही सरासरी एकशें पस्तीस फूट उंच असून तीवर एक निमुळता होत गेलेला दगडी ' पिरामिड, ' अथवा दीपमालेच्या आकाराची इमारत शंभर फूट उंचीची आहे, व सगळ्याच्या वरती तीन टन वजनाचा व पस्तीस फूट उंचीचा हर्क्युलिसचा तांब्याचा पुतळा आहे. मुख्य इमारतीला सभोंवतीं दगडी पायऱ्या आहेत. पिरामिडला आंतून एका खांबाभोंवतीं गेलेला आंखूड पायऱ्यांचा लोखंडी जिना आहे. पिरामिडच्या वरच्या दहा फुटांनां तीन लांकडी शिड्या आहेत, व त्या अर्थात्‌च अगदीं उरावर आल्यासारख्या उभ्या आहेत. यांवर बायका तर नाहींच, पण पुरुषसुद्धां फारसे जात नाहींत. मला पिरामिडांतच एक जर्मन सोबती मिळाला, त्याच्याबरोबर मी या शिड्याहि जपून चढून गेलों, तों हरक्यूलिसच्या पोटरीजवळच्या खिडकीपर्यंत आह्मांला जातां आलें. तेथून खालीं शहर व मागच्या बाजूला खेडीं व विस्तृत वन हीं पाहून दुपारच्या कडक उन्हानें तापून गेलेलें माझें डोकें शांत झालें, व आजचा हा प्रवास भावी स्वित्झरलंडांतील उंच पर्वतांतल्या प्रवासाचा पुरो–दूत अगर अग्रदूत आहे, असें क्षणभर वाटलें. बरोबर मराठी बोलणारें आपलें हिंदी कोणी जवळ असतें तर या आनंदांत केवढी भर पडली असती !

नंतर त्या जर्मन गृहस्थाबरोबर परत येऊन शहराचा अगदीं जुना भाग पहायला गेलों. येथील घरें तीन मजल्यांच्यावर उंच नव्हतीं. कांहींच्या त्या लहान जाळीसारख्या खिडक्या, अरुंद व अगदीं आपल्या

एकाद्या जोगेश्वरींच्या बोळासारखे वांकडेतिकडे रस्ते, त्यांवरची कुजट हवा, यांनीं पुण्यनगरच्या एकाद्या बोळाची सहज आठवण होते! मजलेदार घरें जुनींच कायम राहिलीं असतील असें ह्मणतां येत नाहीं; तरी खिडक्यांनीं बायकांच्या रिवाजाप्रमाणें आपली जुनी रीत सोडली नाहीं. त्यांवरून व रस्त्यांवरून इकडील 'मिड्ल् एजेस्' मधील सामान्य लोकांच्या राहण्याची वगैरे थोडी कल्पना येते.

ती आल्टमार्क्ट् अगर जुन्या बाजाराची बाजू असल्यानें, गलिच्छ कपडे घातलेले, घाणेरड, घरांत नकारघंटा असूनहि काम फारसें न करतां चव्हाट्यावर कोंपऱ्याकोंपऱ्यांनीं उभे असलेले असे बेकार लोक दाखवून, यांस 'बुमलर्' अथवा चकाट्या पिटणारे असें ह्मणतात, असें माझ्याबरोबर पिरामिडांत चढलेल्या त्या जर्मन गृहस्थानें सांगितलें.

गुरुवारीं सकाळीं, शहरच्या साधारण आग्नेयीला कार्लसआव ह्मणून फ्रेंच धर्तीवर लावलेलें उपवन आहे, त्यांत दोनअडीच तास भटकलों. गर्द छाया, सुंदर तळें, स्वान (हंस ?) नांवाचे पांढरे पक्षी, व पाण्यावर पसरलेल्या पांढऱ्या कमळांच्या वेली, यामुळें उन्हाचा त्रास बारा वाजतांहि झाला नाहीं. एका सुंदर राईतील झाडांचीं नांवें माहित नव्हतीं, ह्मणून झाडाखालीं बांकावर बसलेल्या एका ह्मताऱ्याबावाला विचारतां त्यानें कास्टानीएन् ( इं. चेस्ट्नट् ) ह्मणून सांगितलें, व अठराव्या शतकाच्या आरंभापासून ही राई व हें उपवन तयार करण्याला कशी खटपट पडली, व आतां आपण कसे आयत्या राईचा उपभोग घेत आहों, ही कहाणी सांगून त्यानें मला लहानपणीं वाचलेल्या मराठी तिसऱ्या पुस्तकांतील अक्रोडांच्या गोष्टीची आठवण करून दिली.

हे सगळे दिवस प्रवाशांच्या साधारण रिवाजाला अनुसरून मीं निजण्याफराळापुरतें हॉटेलांत, व बाकी भटकून दुसऱ्या ठिकाणीं जेवण्यांत घालविले. असें करण्यांत खिशाला थोडा कमी चट्टा बसतो हें तर

आहेच; पण निरनिराळ्या ठिकाणीं जेवण, चहा, थंड लिंबाचें सरबत वगैरे घेण्यांत नाना ठिकाणच्या रीति, नानातऱ्हेचे लोक व त्यांचे विश्रांतीचे ह्मणजे बीयर घेण्याचे प्रकार वगैरे दृष्टीस पडतात, हें विशेष कारण होय. कोणी चालून, काम करून थकलें, अगर रिकामटेकडे-पणामुळें वेळ जात नाहींसा झाला, ह्मणजे एकादें लोकाल् अगर रिस्टोरॉं याचा आश्रय करितात; आणि मग म्युन्श्‌नर, लिस्टेन्‌हायनर, सावरब्रुनेन, हेलेस पिल्झनर वगैरे बीयरचे पेल्यावर पेले उडतात! बीयरच्या प्रकाराला अनुसरून ग्लासचा आकार ठरलेला असतो. म्युन्श्‌नरचा ग्लास मुसलमान फकिरांच्या टमरेलासारखा पण पोचेदार दिसणारा असा असतो. हेलेस बीयरला साधा निमूळता उंच ग्लास, तर लिस्टेनहा-यनरला बेढब आकाराचें चिनीमातीचें पात्र असतें. हेलेस बीयरच्या जाड्या ग्लासाची मूठ (हातांत धरण्यासाठीं) तांबडी असावी लागते, वगैरे अनेक प्रकार आहेत. एक ग्लास मी आपल्या बडोदी वाडग्याच्या आकाराचा व भयंकर पसरट तोंडाचा असा पाहून थक्क झालों. माझ्या-सारख्या बीयरद्वेष्टयाच्या कपाळीं पसरट तोंडाचा पण शेवटीं करंगळी-एवढा चिंचोळा लिंबाच्या सरबताचा ग्लास येतो! आज तर पाण्याचा ग्लास, दोन भक्कम लिंबाच्या फोडी, वाटींत साखर व थोडें बर्फ असें पुढें तयार करून घ्यावें लागलें. असो.

**हायडलबर्ग्**, १३ आगस्ट, ११.

प्रवासांत आतां हें पहा तें पहा असें करण्यापलीकडे दुसरा उद्योग राहिला नाहीं, त्यामुळें दिवस केव्हांच जातो. पण रात्रीं कांहीं उद्योग नसतो. नाटकगृहांत जावें तों कडक उन्हाळ्यामुळें तींहि बंद आहेत, व उघडीं असतीं तरी रोज कोण जातो ह्मणा! पण एकंदरींत दिवसा फार फिरून दमलों नसलों तर, तुह्मास पत्र लिहिण्यांत स्वतःची करमणूक करावी असें वाटतें. असें केल्यानें मागें कधींकधीं पत्रासाठीं फार वाट

पहायला लाविली, त्याचेंहि उद्दें निघाल्यासारखें होईल, असें मागून हळूच सुचलें. नेहमींच कांहीं लिहिण्यासारखें असेल असें नाहीं, पण आपलें लिहितों झालें.

खरोखरी लाइप्झिकहून स्वित्सर्लंडकडे जायचें ह्मणजे प्रथम लांब पश्चिमेकडे कासेलकडे जाऊन नंतर दक्षिणेकडे फ्रांकफुर्ट, हायडलबर्ग्, स्ट्रासबुर्गवरून वाझलकडे जाण्याचा असा हा द्राविडी प्राणायाम नको होता. पण माझे मित्र नाउहाइमला आले, व ते जर्मनींत असतां त्यांची भेट न होणें बरें न वाटून सर्व बेत बदलला, व चारपांच दिवस नाउहाईमला त्यांच्या समागमांत काढायचे ठरवलें. नाउहाइम् हा गांव लहानसाच ह्मणजे एकाद्या मोठ्या खेड्याएवढा सरासरी आहे. व्यापार वगैरेविषयीं याची प्रसिद्धी नाहीं; अर्थात्च ट्रामवेचा अभाव आहे. पण या गांवाला तेथील ऊन व थंड औषधी पाण्याच्या झऱ्यांनीं महत्त्व आलें आहे. हें पाणी औषधासारखें पिण्यासाठीं, व त्याचीं ठरींव पद्धतीनें स्नानें करण्यासाठीं सर्व यूरोपीय देशांतील श्रीमंत लोक येथें येऊन तीनचार महिने राहतात. माझ्या हॉटेलांतील इंग्रजी रोगी व रस्त्यानें फिरतांना दिसलेले रशिया, फ्रान्स इत्यादि देशांचे रोगी पाहून ज्वरानें पीडिलेल्या वसंतसेनेच्या आईची आठवण झाली! रिकामटेकडेपणा, तीन वेळ मांसावर सपाटून ताव मारणें, व संध्याकाळीं कूअरहौसमध्यें बीयर, आईसकॉफी वगैरे कांहीं तरी घोटीत गाणें ऐकत बसणें, यामुळें ते सर्व विपणिगत बलीवर्दाची 'सरी करिती' यांत संशय नाहीं. तरी त्यांत खरोखरी संधिवाताचे रोगी कांहीं असतात, हें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे. मात्र बहुतेकांचा रोग श्रीमंतीचे चोंचले व ह्मणूनच धन्वंतऱ्यालासुद्धां असाध्य हा होय!

मला सुदैवानें औषधी स्नानाची जरूर नसल्यामुळें, व विशेषतः तेथील उन्हाळा सोसला नाहीं ह्मणून मीं मित्राचा निरोप घेऊन ता. १२ शनिवारीं संध्याकाळीं निघून फ्रांकफुर्टला आलों. पाकीट स्टेशनवरच

ठेवून ओव्हरकोट खांद्यावर टाकून एका लहानशा हॉटेलांत बिऱ्हाड ठेवलें. फ्रांकफुर्ट् हें व्यापारासाठीं प्रसिद्ध आहे. येथील बाजार वगैरे पहावा ह्मणून लगेच बाहेर पडलों. वाटेनें फ्रेंच्, स्पानिश, इंग्लिश् , रशियन् इत्यादि भाषा कानीं पडत. ती दुकानें बंद होण्याची वेळ होती, ह्मणून रस्त्यांनीं गर्दी फार. कोणी रिस्टोरॉंकडे, तर कोणी 'सिनेमॅटोग्राफ'चे खेळ पाहण्यास धांवत. सरळ घराकडे जाण्याची प्रवृत्ति कमी. रिस्टोरॉंत दिवसाच्या श्रमानंतर तरतरी आणण्यासारखें कांहीं तरी घेऊन गप्पा मारीत, व रिस्टोरॉंतील पाहुण्यांच्या करमणुकीसाठीं होत असलेलें गायन ऐकत बसलेले लोक चोहींकडे दृष्टीस पडत. यांत तरुणतरुणींचा भरणा फार, हें सांगणें नकोच. मी सहज मौज पाहण्यासाठीं एका कोनो अगर सिनेमा–थिएटरांत गेलों. त्यांत इतर चित्रांत न्यूझीलंडचे पर्वत, ग्लेशर, धबधबे, दऱ्या यांचे देखावेहि दाखविले गेले, ते मला फार आवडले. प्रेक्षकांची गर्दी होऊन उष्मा होऊं लागला, तों थिएटरांतील एक नोकर एका पिचकारीच्या पुढल्या छिद्रांच्या टोंकांतून गुलाब पाण्यासारखे सुवासिक पाण्याचे फवारे प्रेक्षकांच्या डोक्यावर वरचेवर उडवीत होता. शरीराचें सुख आधीं व मग सगळें, हें यूरोपीय संस्कृतीचें एक मूळतत्त्व आहे; त्यासाठीं हे लोक कायकाय नव्या क्लृप्ति योजतात हें पाहून मन थक्क होतें.

अकरा वाजतां बिऱ्हाडीं येऊन झोंप येतेशी पाहूं लागलों. मागें एक उंच इमारत असल्यानें आधींच वाऱ्याचा बुंदहि नव्हता. त्यांत आणखी खालीं फेस्ट्साल्मध्यें (उत्सवशाळा–कोणालाहि घरीं जागा नसेल त्यांनीं लग्नादि समारंभाचीं जेवणें, मजलशी वगैरे कराव्या, यासाठीं अशा शाळा अगर गृहें कांहींकांहीं रिस्टोरॉंतून असतात.) मंडळी जमून त्यांचें संगीत रंगांत आलें होतें. खरोखरीचें कोणचेंहि संगीत वाईट नाहीं; पण तर्र झालेली मंडळी त्याला साथ देऊं लागली ह्मणजे जो गोंधळ होतो, त्यापेक्षां 'गोंधळ' बरा! इकडे सगळ्या फेस्ट अगर

उत्सवकरमणुकींत दारूला गणपतीचें स्थान असतें, हें तुह्माला ठाऊक आहेच. ती जास्त झाली ह्मणजे मंडळी कसे तारे तोडतात याची कल्पना मीं ता.४ आगस्टच्या पत्रांत दिलीच आहे. सांगावयाचें इतकेंच, कीं, आपण ज्याला तर्रपणा अगर 'घोड्यावर असणें' असें ह्मणूं, त्याला हे आन्गेहायट्र्ट् ह्मणजे जरा रंग आलेला असें ह्मणतात. तेव्हां त्यांच्या मजेला जों जों रंग येऊं लागला, तों तों माझ्या झोंपेचा भंग होऊं लागला. असें एक वाजेतों चाललेलें होतें. मग केव्हां झोंप आली नकळे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गॉटे हाउस पहावयला गेलों. १७४९ त गॉटे या घरांत जन्मला. त्या वेळीं घरांत जशी व्यवस्था होती तशीच ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. तळमजल्यावर जेवण्याची खोली व सैंपाकघर आहे. यांत चुलीचा विटाचुन्याचा ओटा कमरेइतका असून, त्याला सर्पणफांटा ठेवण्यासाठीं एक कमान, तें चुलींत घालण्यासाठीं बाजूला तोंडें, व वरच्या बाजूला दोनतीन पदार्थ एकदम शिजवितां यावे, ह्मणून तितकीं चुलाणें अशा पद्धतीचा साधा आहे. अलीकडची यंत्राची, ग्यासनें चालणारी चूल त्या वेळीं कोठची ! गॉटे लहान असतां त्याची आई त्याला चिमण्याकावळ्याच्या गोष्टी ज्या खुर्चीवर बसून सांगे, ती जुनी खुर्चीहि दाखवितात. घराच्या मागें एक लहानसें गॉटे म्यूझियम् आहे. यांत त्याचीं व संबंधी माणसांचीं चित्रें, पत्रें, हस्ताक्षरें, किरकोळ आंगठी, हातरुमाल, कायसरची काठी अशासारख्या वस्तु, कीं ज्यांचा गॉटेशीं प्रत्यक्षअप्रत्यक्ष संबंध आला असेल त्या सर्व ठेवल्या आहेत. पाहण्याला एक मार्कोचें तिकीट ठेविलें आहे. पण आपलेकडे एकाद्या यात्रेच्या दिवशीं देवळांत माणसांची रीघ लागावी, तशी त्या घरांत लागलेली मीं पाहिली. नेहमीं अशीच असते. जर्मन लोक येतील यांत नवल नाहीं; पण इतरहि येतात. आपणांकडे पहावें तों संस्कृत काय अगर मराठी काय, बहुतेक हिंदी कवींच्या चरित्रांवर दंतकथेचें

दाट धुकें पसरलें आहे; त्याच्याखालीं तथ्य पहावें तों थोडेंच सांपडतें; मग त्यांचीं जन्मस्थळें, हस्ताक्षरें, चित्रें यांच्या अस्तित्वाचें नांव कशाला! इतकेंच नव्हे, तर ज्यांविषयीं आपणांला अशी माहिती आहे, त्यांच्या स्मारकवस्तूंविषयीं तरी आपणांस इतकी कुठें हौस आहे? मोरोपंतांचें उदाहरण घ्या. त्याच्या बारामतीस त्याचें घर, धूळपाटी रात्रीं लिहून दाराशीं ठेवीत असे ती खोली, गणपतीचें देऊळ हींच ह्मणून पाहण्यासाठी कितीजण जातात? व ज्यांनां निदान इतर कारणांसाठीं बारामतीस जाण्याचा प्रसंग आला असेल. अशा कितीजणांनीं मोरोपंतांची नुसती आठवण तरी केली आहे? देशाला भूषणास्पद झालेलीं जीं माणसें त्यांच्याविषयीं बेफिकीरपणा—हा आपला दोष आजकालचा नाहीं!

नंतर पुढें रॉमर नांवाच्या टाउन्‌हॉलसारख्या इमारतींतील कायसरसाल पाहिलें. हींत पूर्वीं सगळ्या जर्मन संस्थानांचे राजे जमून (कुअरफ्यूर्स्टेन्) जर्मनीचा कायसर निवडीत असत. हल्लीं मात्र परमेश्वरच कायसर निवडतो ह्मणावें; जो कायसरचा मुलगा तोच पुढचा कायसर होतो! असो. नंतर तेथील जुनें, नवव्या शतकांतलें क्याथोलिक देऊळ पाहिलें. रविवार असल्यामुळें गर्दी अतोनात असून उपाध्येयबोवा उपदेश करीत होते. या गर्दीमुळें मला प्रथम आश्चर्य वाटलें. कारण यापूर्वीं पाहिलेल्या प्रॉटेस्टंट देवळांमध्यें श्रोतृसमुदायांत रिकाम्या खुर्च्या व बाकें यांचीच संख्या फार असल्यामुळ 'जडाला'सुद्धां उपदेश करण्याचा मान धर्मोपदेशकाला मिळे. श्रद्धा हा गुण प्रॉटेस्टंटांचा खास नव्हे! या देवळांतील 'आल्टार'-वर आपल्याकडील रामपंचायतन वगैरे जसें असावें तसें मूर्तींचें खिस्तपंचायतन दोन ठिकाणीं असून त्यासमोर प्रत्येकजण गुडघे टेंकून 'तत्सवितुर्हृदयाय नमः, वरेण्यं शिरसे स्वाहा' वगैरेसारखी तालिम करीत असे. एकंदरींत या देवळांत माझी करमणूक फार

झाली. नंतर माईन नदीच्या कांठानें लहानशा बागांतून, गवतावर, पुलाखालीं वगैरे उन्हाचे वेळीं अस्ताव्यस्त निजलेले गरीब कामकरी लोक मीं पाहिले. इकडील बाजूच्या लोकांची स्थिति फार वाईट आहे. रोजचे रोज हातावर मिळवून कसेंबसें पोट भरणें भाग पडल्यामुळें, रविवार व इतर सुटीचे दिवस यांनां फार कठीण जातात. रोजमुरा बेताचा, महागाई अतिशय व दारूची छाप, यांमुळें रविवारसारख्या बेकारपणाच्या दिवशीं चव्हाट्यावर व कोंपऱ्याकोंपऱ्यांनीं विड्या फुंकीत उभें राहणें अगर, वर लिहिलेल्यासारख्या ठिकाणीं आळसानें झोंपा काढणें, यापेक्षां दुसरा उद्योग त्यांनां नसतो.

शहरें तेथून सर्व सारखीं. जें बर्लिनला तेंच ड्रेसडेनला, जें फ्रांकफुर्ट येथें तेंच हायडल्बर्ग येथें असें सकृद्दर्शनीं वाटतें,व तें बऱ्याच अंशीं खरेंहि आहे. शहरची एकंदर मांडणी, पाहण्याजोग्या इमारती, शिक्षणाचीं साधनें, व वरच्या–मधल्या वर्गांची राहणी यांत फारसा फरक दिसून येत नाहीं. कदाचित् मोठ्या शहरांतील कपड्यालत्त्याविषयीं–मुख्यत: बायकांचा वाढलेला अनिवार चोंचलेखोरपणा–लहान शहरांतून कमी प्रमाणांत दिसेल. उदाहरणार्थ, फ्रांकफुर्ट येथील बहुतेक बायांचे झगे घोट्याच्या बेताचे असल्यानें त्यांनां धूळभेट कधीं होत नसे; पण खालच्या वर्गाच्या ह्मणजे खेड्यापाड्यांतील सभ्य व गरीब शेतकऱ्यांच्या बोलण्यांत, राहणींत, कपड्यालत्त्यांत प्रांतोप्रांतीं भिन्नता दिसून येते. कासेलपासून फ्रांकफुर्टच्या सभोंवारच्या टापूला 'हेसेन' प्रांत ह्मणतात. या प्रांतांतील तिसऱ्या वर्गाची राहण्याची, बोलण्याची व विशेषत: कपड्याची सरणी, जर्मनींत थोडे दिवस राहिलेल्या मजसारख्या माणसाच्याहि चटकन् लक्ष्यांत येते. पुरुष व बायका दोघांच्याहि कपड्यांत चित्रविचित्रपणा फार. प्रत्येकाच्या आंगावर हिरवा, तांबडा, निळा हे मुख्यत्वेंकरून, व इतर रंग बारीकसारीक फितींच्या रूपानें पाहतांना, इन्द्रधनुष्याची लहानशी आवृत्ति आपल्यापुढें आहे

कीं काय, असें वाटतें. नाउहाइम्‌मध्यें एका संध्याकाळीं टेंकडीवरच्या साध्या गरीबशा रिस्टोरॉंत त्याच्याच योग्यतेचीं रोगी व इतर माणसें बसलीं असतां, त्यांच्यासमोर टेबलावर उभें राहून दोन तरुण मुली व एक तरुण पुरुष अशीं गाणें गाऊन त्यांची करमणूक करीत होतीं. या गरीब गाणारांनां वरच्या दर्जाच्या गाणारांसारखी बेग्लायटुंग्—अगर बाजा-सारंगी वगैरेची साथ बिलकूल लागली नाहीं. त्यांचा तो मजेदार पोषाक व साधें लावणीवजा गाणें यांनीं माझेंहि लक्ष्य तिकडे गेलें, व मी फिरतांना किंचित् थांबलों. नंतर एका संध्याकाळीं हायडल्‌बर्गला आलों. अपूर्व सृष्टिशोभेविषयीं या शहराची ख्याति बरेच दिवस ऐकत होतों, व अशा ऐकण्यांत व प्रत्यक्ष पाहण्यांत अंतर पडून पुष्कळ वेळां निराशा होत असते तशी आपलीहि कदाचित् होईल, या विचारांत होतों; पण वस्तुस्थितीपुढें वर्णनच कोतें पडलें. एका बाजूनें गर्द झाडांनीं आच्छादलेले डोंगर, व दुसऱ्या बाजूनें लहानशीच नेकार नांवाची नदी, यांच्या अडचणींत गांव वसल्यामुळें गांवाला रुंदी फारशी नाहींच ह्मटलें असतां चालेल. नदीच्या पलीकडेहि डोंगर असून त्यांच्या पायथ्याशीं थोडीं घरें आहेत. गांवांत फारसें पाहण्यासारखें कांहीं नाहीं. पण, पांचपंचवीस डोंगरांचीं हिरवीं शिखरें, त्यांच्यामधून वळणें घेत गेलेली छोटीशी नदी, व डोंगराच्या बरगडींत वसलेला गांव, ही पाहून मनाला आनंद होतो. डोंगरावरून ठिकठिकाणीं सभों-वार नजर फेकतां यावी ह्मणून बिस्मार्कसॅायल, औसंसिश्ट्‌स्‌टुर्म्, कॉनिग्जस्टल् वगैरे बुरुजासारखीं स्थळें केलीं आहेत. हीं सर्व दोन दिवस खूब पायपिटी करून पाहिलीं. एका डोंगराकडे फिलोजोफेन् वेग् अथवा तत्त्वज्ञान्यांचा मार्ग नांवाचा झाडांनीं अनाच्छादित असा रस्ता आहे. या वेळीं उन्हाळा असल्यामुळें दुपारचें टळटळीत उन्ह लागून जरा त्रास झाला, व तत्त्वज्ञान्यांच्या या व्यवहारशून्यतेचा प्रत्यय आला! कोठेंहि फारशी नसणारी, हायडलबर्गची विशेष एक गोष्ट, ह्मणजे

युनिव्हर्सिटींतील विद्यार्थ्यांचा तुरुंग ही होय ! मुख्य इमारतीच्या नोकर लोक राहण्याच्या बाजूला चारपांच अरुंद खोल्या आहेत. मुलांनीं कांहीं दंगा, फाजीलपणा केल्याचें युनिव्हर्सिटीच्या नजरेला आलें, कीं, त्यांनां तीन दिवसांपासून चार आठवडेपर्यंत यांत कोंडण्यांत येतें. चांगल्या माणसाला सुद्धां जीवर एक वेळ निजलें असतां संधिवात जडेल अशी एक भुईसरशी लोखंडी खाट प्रत्येकाला मिळते. गादी पाहिजे तर भाड्यानें आणावी. जेवणखाण सर्व बाहेरून आपल्या पदरचें आणावें ! अशी शिक्षा झालेल्या विद्यार्थ्यांनीं काळ्या शाईनें आपले चेहरे भिंतीवर रंगविले आहेत. कोणीं इतर चित्रें, कोणीं नांवें अशी काढलीं आहेत. कांहींनीं आपले फोटो दाराला चिकटवून ठेवले आहेत. त्यांत प्रिन्स् बिस्मार्क यांच्या पुतण्याचाहि एक आहे! असो. हायडलबर्गला कोणीं जायला निघालें, कीं, त्याला हा तुरुंग अवश्य पाहण्यास सांगत असतात.

१५ आगस्ट, १९११.

हायडलबर्ग काल अकरांला सोडून दोन वाजल्यानंतर स्ट्रासबुर्गला आलों; पण येथें मुक्काम करण्याचें मनांत येईना. उन्हाळ्यामुळें केव्हां एकदां स्वित्सलँडात जाऊं असें झालें. ह्मणून येथें फक्त गांवांत तास-दीडतासाचें चक्कर घेतलं. कयाथोलिक लोकांचा सण असल्यामुळें सर्व व्यापार बंद असून चर्चकडे लोक धावत होते. त्यांत मला फ्रेंच-जर्मनची सळमिसळ दिसली, व या प्रांताचा चमत्कारिक इतिहास पाहतां त्याबद्दल आश्चर्य वाटलें नाहीं. हा आलसेस्–लोथ्रिंगेन् प्रांत मूळचा जर्मनीचा; पण तो नेपोलियनच्या वेळेपासून ( त्याच्या कांहीं आधीं ) फ्रेंचांच्या ताब्यांत गेला. फ्रान्सशीं निकट सांनिध्य व फ्रेंच सत्ता यामुळें तो बहुतेक फ्रेंचायित होऊन गेला होता. पुनः १८७०–७१ च्या फ्रँकोजर्मन् लढाईंत तो बिस्मार्कनें परत मिळवला, व तेथें

सक्तीचें प्राथमिक शिक्षण जर्मन भाषेच्याद्वारा सुरू केलें; तें लोकांनां अर्थात् आवडलें नाहीं. आतांपर्यंत या प्रांताला फारसे सनदशीर हक्क कांहींहि मिळाले नव्हते. ते हल्लींचा प्रधान बेथमान् देऊं लागला, तों जर्मन हौस ऑफ लॉर्डस् (बुंडेसराट)नें तें फेंटाळून लावलें. इतिहास चोहींकडे सारखाच आहे, व त्या दृष्टीनें पाहतां जर्मन हौस ऑफ लॉर्डसूची-सुद्धां इंग्लिश हौस ऑफ लॉर्डस्प्रमाणें दशा होणार, यांत शंका नाहीं. हा प्रांत बहुतेक क्याथोलिक आहे. म्युन्स्टर नांवाच्या क्याथोलिकांच्या देवळांत लोक जातयेत होते, तेथें मीहि गेलों. तों गुडघे टेंकून व हातीं जपमाळ घेऊन येशूच्या अगर मेरीच्या मूर्तीपुढें पुटपुटण्याचा विधि जोरानें चालला होता. मात्र येथील कल्पक लोकांनीं फार वांकावें लागूं नये ह्मणून जमिनीसरशा बैठकीच्या खुर्च्यांवर गुडघे टेंकले होते ! नंतर समोरच्या रिस्टोरॉंत जेवायला गेलों, तों पहिला प्रश्न 'तुह्मी पिणार काय ?' मी थोडक्यांत मिटण्यासाठीं 'आन्स्टिनेन्ट' ह्मणून सांगतां, एका वृद्ध कुमारीनें मजसमोर पाण्याची बाटली आणून ठेविली. दारू घेतली नाहीं ह्मणून मीं घेतलेल्या जिनसांवर २५फेनी ( ३ आणे ) उगाच चढवण्यांत आले ! फ्रांकफुर्टच्या ज्या हॉटेलांत मी होतों, तेथेंहि मुद्दाम नोटीस लावली होती कीं, दारू न घेणाराच्या जेवणावर २५ फेनी ज्यास्त आकारल्या जातील ! जेऊन उठायच्या वेळीं वाढणाऱ्या दासीला यूरोपांतील सर्वमान्य चालीप्रमाणें थोडी चिरीमिरी देतांच ती नकळत 'मेर्सी' असा फ्रेंच शब्द बोलून गेली. मेर्सी ह्मणजे थँक्स, आभार होय. राजकर्त्यांनीं कितीहि नियम केले, तरी तोंडीं जर्मनपेक्षां फ्रेंच शब्द सहज येणें हें सृष्टीला सोडून नाहीं.

असो. मंगळवारीं संध्याकाळीं बाझल्ला आलों. येथून आतां बाझल् स्वित्झरलंड् लागलें; त्याबरोबर हवाहि पालटली. महाबळेश्वरी शीतळाई वाटते. या गांवांतून ऱ्हाईन नदी गेली आहे. तिच्या कांठीं

सज्जावर बसून संध्याकाळीं जेवलों. नुसत्या उकडलेल्या वालांच्या शेंगांला १ फ्रांक् ( बारा आणे ) द्यावा लागला ! असो. येथें आपल्या-कडील तांबडा कण्हेर फार ठिकाणीं आढळतो, व त्याच्या कुंड्या सज्जांत वगैरे ठेवतात. स्टेशनावर उतरून बाहेर आलों, तों आपल्या-कडील कैद्यांच्या डगल्यांसारखीं डगलीं घातलेले पांचपन्नास इसम मजबरोबरच ट्राममध्यें घुसले ! मागून कळलें, कीं, ते कैदी नसून पोस्टाचे शिपाई आहेत. बाहेरून तरी अगदीं भिकार दिसणारे पोस्टाचे शिपाई यूरोपांत दुसऱ्या कोठें नसतील ! सिटिझन् ऑफ् इंडिया नांवाच्या पुस्तकांत एका मद्रासी आय्या पोस्टमनचें चित्र शेलकें ह्मणून छापलें आहे ! तो सुद्धां बरा दिसतो. असो. बाझल् बुधवारीं सोडलें. वाटेनें खेडीं दिसत. त्यांच्या घरांवरील कौलें अगदीं पुण्याच्या थापट्या-सारखीं दिसलीं. जरा जास्त व्यवस्थित मांडलीं होतीं, इतकेंच काय तें. घरांभोंवतीं परड्यांत खरोखरी सर्पणाचे ढिगारे पडले होते. येथेंहि तेंच आहे. सामान्यतः आल्पस्मधील स्वस्त लांकडांचें सर्पण मिळाल्यावर मुद्दाम कोळसे कोण विकत घेतो ?

बर्न् १७ आगस्ट, १९११.

बर्नला आलों. ठिकठिकाणीं सज्जांवरून आल्प्स्चीं हिमाच्छादित शिखरें दिसतात. दिवसा शुद्ध स्फटिकासारखीं चमकतात. संध्याकाळीं कोंवळ्या किरणांनीं ताम्रवर्ण त्यांवर खुलून जी बहार दिसते, ती कवींनींच वर्णावी ! इतरांची मात्रा नाहीं.

आल्पस् इतक्याजवळ दिसल्यामुळें त्यांवर जाण्याची उत्कंठा अनावर होत चालली आहे, व तिच्या ओढीमुळें उद्यां सकाळीं बर्नहून पुढें जाईन ह्मणतों. आतां पुरे करतों. तुह्मांला वाचण्यास या पाळीस त्रास पडेल याबद्दल वाईट वाटतें. पण इलाज नाहीं.

२१ ऑगस्ट, १९११.

बर्नहून घाईघाईनें रवाना केलेलें पत्र पावलेंच असेल. बर्न येथील सृष्टिवैभवाची धांवती कल्पना मागल्या पत्रीं दिलीच आहे. आल्प्स् पर्वताचीं हिमाच्छादित शिखरें बर्न येथें निरनिराळ्या ठिकाणांहून व निरनिराळ्या वेळीं पाहिलीं; त्या सर्वांत संध्याकाळची शोभा मला फार अपूर्व वाटली, व लवकर पुढें येण्याची उत्कंठा लागली. त्या-प्रमाणें शुक्रवारीं सकाळीं बर्न शहर सोडलें. येथील लोकांची मुख्य उपजीविका प्रवाशांवरच आहे, असें ह्मणण्याला हरकत नाहीं. कारण, सर्व ऋतूंमध्यें स्वित्झरलंडांत यूरोपीय व अमेरिकन प्रवाशांची सारखी गर्दी असते; व त्यांनां जेवणखाण, राहणें, गाड्याघोडीं, नानातऱ्हेच्या करमणुकी व वाटाडे वगैरे पुरवणें हा व्यापार येथील लोकांनां जितका त्रासाचा तितकाच पैदाशीचाहि आहे. दुसरेहि धंदे नाहींत असें नाहीं. उदाहरणार्थ, स्वित्झरलंडांतील घड्याळें फार प्रसिद्ध असल्याचें तुह्मांलाहि ठाऊक आहेच. असें घड्याळासाठीं प्रसिद्ध एक बील नांवाचें गांव एका सरोवराच्या कांठीं आहे; तिकडे बर्नहून प्रथम गेलों. पण भाषा येत नसल्यानें कारखाना पाहणें जुळलें नाहीं. पश्चिमस्वित्झरलंड फ्रान्सला लागून असल्यामुळें तेथील भाषा, चालीरीती सर्व फ्रेंच आहेत; त्यामुळें मला त्रास पडतो. बील येथून नॉयशाटेल ह्मणून सरोवर दक्षिणेकडे आहे तें पाहिलें. दोन्ही बाजूंनीं उंचउंच पर्वत व कांठांशीं पर्वताच्या उतरणीवर गांवें, असें हें आहे. येथून पुढें दक्षिणे-कडे प्रसिद्ध लेमन् सरोवर आहे, तें पाहिल्यावांचून आल्प्स्कडे जाऊं नये असें वाटलें, व ह्मणून लीसानला आलों. या ठिकाणीं एका फॅशनेबल हॉटेलांत सरासरी दोन मुठी अर्धाकच्च्या भाताला एक फ्रांक् द्यावा लागला. प्रथम तर राईस् काय हें कोणाला समजेना! हें शहर माउंट ज्यूराच्या लगत्यास व व लेमन्च्या कांठीं वसलें असल्यामुळें येथील सृष्टिशोभा पाहण्यास प्रवाशांची जणूं यात्राच भरते. जेथें

जेथें मी गेलों, तेथें तेथें धूळ बसलेले बूट, गुडघ्यापर्यंत जाडे चित्रविचित्र रंगांचे पायमोजे, वरती जरा फुगलेली तुमान, मळक्या जाड्याभरड्या गुंड्या व पट्या यांनीं भरलेला कोट, एका हातांत भला जाडा लोखंडी शेंबी बसवलेला आल्पाइन सोटा व दुसऱ्यांत बेडेकर नांवाचें मार्गदर्शक पुस्तक—अशा थाटाचे शेंकडों प्रवासी भेटले. या सगळ्या थाटाचा कळस ह्मणजे एक पाठीशीं कसलेली फयाशनेबल पडशी होय. प्रथम याचें मला हंसूं येई. पण पदोपदीं तेंच दिसल्यावर हंसावें तरी किती !

लोसान्‌ला एक दिवस होतों. तेथून रविवार तारीख वीसला सकाळीं आगबोटीनें लेक लेमनवरून जिनीव्हाकडे निघालों. या सरोवराच्या स्वच्छ, गोड व निळ्या पाण्याचें आंग्लकवि बायरन्‌ यानें दोन ठिकाणीं केलेलें चटकदार वर्णन तुह्मीं वाचलेंच असेल. कवीच्या सुरस वाणीपुढें हें गद्य किती टिकणार ? पण मला जें वाटलें, तें सर्व तुह्माला लिहावयाचें असा निश्चय असल्यामुळें लिहीत आहें. लेमन्‌च्या पाण्याची गोडी मीं स्वतः लोसान्‌च्या किनाऱ्यावर जाऊन चाखली होती; यूरोपीय प्रवासी आपणांला काय ह्मणतील याची क्षिति न बाळगतां जागजागीं होड्यांसाठीं केलेल्या पायऱ्या उतरून या अमृतमय पाण्याचीं यथेच्छ आचमनें मीं केलीं. सर्व दिवस फिरून दमलों होतों, त्या सर्व श्रमांचा परिहार होऊन पाण्याच्या गंभीरपणाचीहि कल्पना आली. दुरून हें पाणी समुद्राच्या पाण्यासारखें नीलवर्ण दिसतें. स्विझरलंडांतील इतर सरोवरें अशीं दिसत नाहींत; त्यांचें पाणी जरा हिरव्या रंगावर असतें. जवळच्या किनाऱ्यावरील खेडीं, झाडी, झरे व लहानमोठे डोंगर यांनीं सर्व चित्रविचित्र दिसतें. दूरच्या ह्मणजे पांच पासून आठ मैल ( ही या सरोवराची जास्तींत जास्त रुंदी होय ) दूर असलेल्या किनाऱ्यावरचें सर्व अस्पष्ट दिसतें. मोठमोठे पर्वत मात्र पुसट धुकें व सूर्यप्रकाश यांतून निळसर—पांढरे दिसत. अशी ही उदात्त

व रमणीय शोभा दोहीं बाजूंस असल्यामुळें आपण सुद्धां सहस्रनेत्र निदान त्रिनेत्र तरी असतों तर किती बरें होतें, असें वाटे ! शेवटीं वेड्यासारखा या बाजूवरून त्या बाजूकडे हेलपाटे घालतांना मला पाहून इतर उतारूंनां आश्चर्य वाटलें असेल ! वाटेनें स्वच्छ पांढऱ्या एकेरी व दुहेरी शिडांचे पडाव हंसपक्ष्यांसारखे पाण्यावर इकडून तिकडे संथपणें पोहत असतांना दुरून दृष्टीला पडत. एका हौशी गृहस्थानें यांचे फोटो घेतले; मजजवळ क्यामेरा नाहीं ! असा हा अपूर्व, रमणीय व सुखकर सरोवरावरील प्रवास तीन तासांनंतर जिनीव्हा येथें संपला.

लेक लेमनचा आकार साधारण चंद्रकोरेसारखा आहे, व तिच्या एका टोंकाशीं दोन्हीं बाजूंनीं हें टुमदार शहर वसलेलें आहे. सरो· वरांतून जोरानें पुढें वाहणाऱ्या ऱ्होन नदीनें शहर दुभागलें आहे. यामुळें या टुमदार शहराला विशेष शोभा आली आहे. शिवाय येथील हवाहि उत्तम असल्यामुळें सुखवस्तु प्रवाशांची व फशाशनेबल बाय· कांची येथें गर्दी फार. येथील लोक फ्रेंचच ह्मणावयाला कांहीं हरकत नाहीं. इतर भाषा समजणारे येथें आहेत; पण मुख्य भाषा फ्रेंच. यामुळें बंदरावर ( बंदर व गांव एकच आहे ) जरा पंचाइतींत पडलों. पण मग एका जर्मन जाणणाऱ्या पोर्टरनें वरील ठिकाणीं आणलें. तों, ही सृष्टिशोभा आपण एकटेच पाहत आहों, घरचें नाहीं तर नाहीं, पण देशचें तरी कोणी भेटतें तर ठीक होतें, या वारंवार उद्भवलेल्या विचाराला अनुसरूनच कीं काय, एक बंगाली विद्यार्थी बारा वाजतां जेवतांना भेटला.अशा ठिकाणीं आपल्या देशचें कोणी भेटेल, ही आह्मां दोघांनांहि कल्पना नव्हती ! तेव्हां यूरोपीय तुटकपणा बाजूला ठेवून व शिष्टाचार ( इकडील ) धाब्यावर बसवून ' तूं हिंदी कां ?' ह्मणून आह्मी एकमेकांनां विचारलें. नंतर सारा दिवस दोघे सर्व ठिकाणीं बरोबर होतों. दोघांनांहि आनंद झाला हें सांगणें नकोच. नंतर प्रसिद्ध फ्रेंच


Schynige Platte 1970 m
20523 Lauterbrunnen-Mürren — Landschaft bei der Grütschalp

' लेमन् ' सरोवर.

तत्त्ववेत्ता व्हॉलटेर यानें वसवलेलें फरने नांवाचें खेडें पाहिलें. तेथें त्याचा ह्मातारपणचा पुतळा आहे. त्याच्या चेहऱ्यावरूनच हा जिभेचा व लेखणीचा फार कडू व कडक असला पाहिजे, असें दिसून येतें.

ता. २१ रोजीं सकाळीं तो बंगाली विद्यार्थी पुढें गेला, व मीं गांवांत तीनएक तास हिंडून पाहण्यासारख्या गोष्टी पाहिल्या. यांतील कांहीं देवळें, म्यूझियम्, राट्हाऊस् वगैरेसारख्या गोष्टी सर्व ठिकाणीं साधारणत: सारख्या असतात; पण त्या बहुतेक मीं पाहण्याचें ठरविलें आहे. कारण, प्रत्येकींत कोणाना कोणा तरी ऐतिहासिक पुरुषाचें कांहीं तरी स्मारक पहायला सांपडतें. उदाहरणार्थ, येथील साल डला रेफार्मॉशिआँ (इंग्रजी=रेफर्मेशन हॉल ) मध्यें क्याथॉलिझम झुगारून देणारांपैकीं प्रमुख काल्व्हिन याचें पुस्तकालय, हस्ताक्षर वगैरे पहायला मिळालें. आपल्या सुधारलेल्या मतांसाठीं पारिस येथें छळ होऊन हद्दपार झाल्यावर काल्व्हिन येथें आला, व येथील धर्मसुधारक झ्विंग्ली याच्या मदतीनें त्यानें मोठी धर्मक्रान्ति केली. ज्या दिवाणखान्यांत ही सुधारक पुढारी मंडळी व त्यांचे अनुयायी जमून प्रार्थना करीत, तो अगदीं साधा एकाद्या कॉलेजच्या लेक्चररूमसारखा आहे. वेदी, रंगाचीं व क्रिस्तचारित्र दाखविणारीं भिंगें वगैरे या सुधारकांना कांहीं नको होतें. दुसरें पाहण्यासारखें तळ्याच्या तोंडाशीं—होन नदीला दुभागविणारें असें एक लहानसें बेट आहे. यांत फ्रेंच तत्त्ववेत्ता रूसो याचा पुतळा आहे. याचा जन्म खुद्द जिनीव्हा शहराचा, पण याचें जन्मठिकाण या लोकांनीं कायम राखिलें नाहीं. तेथें आता एक छापखाना वगैरे आहे.

संध्याकाळीं गडगडणें, विजा व पाऊस यांमुळें फिरणें झालें नाहीं. सात वाजल्यावर एका चांगल्याशा भोजनगृहांत गेलों. जेवण व्यवस्थित मिळालें. शेवटीं वाढणाऱ्या चाकराच्या हातावर नेहमींप्रमाणें दहा सांतीम् ( जवळजवळ एक आणा ) ठेवतांच तकतकीत कैसाचा ताठ मिशावाला तो चाकर टंवकारून 'त्सेन सॉंतीम फ्यूरमिश् फ्यूरमिश्

(दहा सेंट मला–मला दहा सेंट) असें गुरगुरला. मीं किंचित् हंसून शांतपणें होय ह्मटल्यावर, त्यानें चिडून जाऊन भांडीं घासणाऱ्या हलक्या नोकराला हाक मारून त्याच्या अंगावर तें नाणें फेंकलें. मी तसाच हंसतच डोक्यावर टोपी ठेवून बाहेर पडलों.

इंग्लंडमध्यें बरेच ठिकाणीं चिरीमिरी देऊं गेलें तरी घेत नाहींत. मग न दिली असतां रागावण्याचें बाजूलाच राहिलें ! जर्मनींत चिरीमिरी घेतात; पण थोडीफार याकडे लक्ष नसतें; व घाईंत न दिली तरी कोणी गुरगुरत नाहीं. पण फ्रान्स व येथें कांहीं प्रकार अपूर्वच ! त्याचा हा वरील लहानसा मासला मला आज मिळाला. इटालींतहि असेंच आहे ह्मणतात.

ता. २२ आगस्ट, १९११.

आज दोन महिने सारखी पावसासाठीं ओरड होती. तो रविवार रात्रीपासून पडूं लागला आहे. डोंगरी पाऊस तो ! एकदां आला ह्मणजे झोडून काढतो. मेघांची गर्जना व विजांचें चमकणें हा चमत्कार तर विचारूंच नये. दूर पर्वतांत काळ्या ढगांतून तांबडी–पिंवळी अशी मिश्ररंगाची वीज लख्कन् चमकतांना पाहून डोळे दिपतात व क्षणभर अंधारी येते.

आज मंगळवार आहे, तरी इतक्या लवकर हें पत्र बंद करून रवाना करीत आहें. कारण, आतां पर्वतांजवळ खेड्याखेड्यांनीं फिरावयाचें आहे. वेळ व साधनें मिळतील न मिळतील; जमल्यास पुनः एखादें चित्राचें कार्ड वगैरे शुक्रवारपावेतों पाठवीन.

**मॉंट्रो**, २३ ऑगस्ट, १९११.

काल जिनीव्हा येथून पत्रें रवाना करून संध्याकाळीं ९–१० च्या बोटीनें मॉन्ट्रोकडे येण्यासाठीं जिनीव्हा सोडलें, त्या वेळीं अभ्र आलें

होतें. पण हवेंत शीतलाई होती, ह्मणून आह्मी दुसऱ्या वर्गाचे सर्व उतारू बाहेर डेकवर उघड्यावर बसलों होतों. नुकताच लाईप्झिकहून रवाना झालेला ज्ञानप्रकाश हातांत पडून तो मी वाचीत होतों, तों पावसाची जोराची सर आली. घाईघाईनें आंत शिरतों तों गारा पडूं लागून एकच गोंधळ व बहार उडाली. त्या वेळचा सरोवरावरचा देखावा पाहण्यासारखा होता. पाण्यांत ज्या गारा पडत, त्या बरोबर पाण्याचे थेंब व बुडबुडे घेऊन उठत; त्यामुळें सरोवराच्या पृष्ठभागाची पातळी मोडून जागजागीं बोराएवढीं मोत्यें सर्वभर पसरल्यासारखें दिसे. डोंगरावर काळे कुट्ट ढग येऊन गर्जना करीत होते, व उत्कृष्ट पिंवळी नागमोडीसारखी विजेची लांबचलांब शलाका क्षणक्षण चमकून डोळे दिपवीत होती. अशा वेळीं कालच जिनीव्हा येथें विकत घेतलेल्या दूरदर्शकयंत्रानें तो प्रक्षुब्ध देखावा पाहतांना मला अतीशय आश्चर्य वाटे. पण पंचतत्त्वांपैकीं या कांहींचा क्षोभ माझ्या पथ्यावर पडला; तो असा:—मी असा यंत्रानें पहात व आपलें आश्चर्य व आनंद व्यक्त करीत बाहेर उभा होतों, तसाच एक मध्यम —आपल्यामतें उतार–वयाचा, नखशिखांत प्रवासी वेष केलेला हंगारी प्रांतांतील बुदापेस्त् येथचा जमीनदार रा. वोल्फ, यंत्रानें पहात उभा होता. विजेच्या एका अपूर्व लखलखाटासरशीं दोघांच्याहि तोंडून एकदम ' Wie herrlich—वी हेरलिश ( किती अप्रतिम ! ) असे उद्गार निघाले, व दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. इकडील लोकांच्या साधारण समजुतीप्रमाणें त्यानें मला ' तुमच्या जपानांत असे अप्रतिम देखावे दिसतात का ?' ह्मणून विचारलें, व ओळखीला, बोलाचालीला आरंभ झाला. कोठें जातां वगैरे विचारपूस झाल्यांवर 'मीहि बायको व मुलीसह मॉंट्रोवरून शामूनीला जाऊन तेथून जवळचे मॉं ब्लॉं ( Mount Blane ! ) च्या आसपासचे ग्लेशर्स पाहणार आहें; तुह्मी येत असलां तर चला, बरोबर जाऊं." ह्मणून त्यानें ह्मटलें.

मलाहि माहितगार सोबत हवीच होती, व हीं माणसेंहि एकंदरींत सज्जन दिसलीं, ह्मणून मी त्यांच्याबरोबर जाण्याचें ठरविलें, व रात्रीं नऊ वाजतां मॉँट्रोला आलों.

त्या वेळची शोभा कांहीं निराळीच होती. चोंहींकडे डोंगरांतून पायथ्याशीं, मध्यावर व शिखराजवळजवळ निरनिराळीं खेडीं असून त्यांतील होटेलांतील वगैरे विजेचे दिवे सर्वभर चमकत होते. कार्तिकी पौर्णिमेला अगर त्याच्या आधीं दिवाळींत, विशेषतः एकाद्या भव्य जुन्या इमारतींत तुरळक परंतु उत्तम लखलखणाऱ्या दिव्यांच्या रांगा लावाव्या, त्यासारखीच, पण अति विशाळ प्रमाणांत ही शोभा दिसे. असो. ती रात्र एका मोठ्या हॉटेलांत काढून आज सकाळीं नवांला त्या हंगारियन गृहस्थाचें लहानसें कुटुंब, मी व एक हंगारियन इंजिनीअर असे पांचजण शामूनी दरी व गांवांकडे निघालों.

मॉँट्रो, २५ आगस्ट, १९११.

सारखा चढ पहिल्यापासूनच होता; पण तो मॉर्टिनीपासून विशेष सुळक्यासारखा वाटूं लागला. येथें आगगाडी सुटून विजेनें चालणाऱ्या गाडीचा प्रवास सुरू झाला. दोन्ही बाजूंनीं, अर्ध्याच्यावर झाडांनीं आच्छादल्यामुळें हिरवेगार, पण शिखराजवळ केवळ काळे व पांढुरके कडे, त्यांतून जोरानें खालीं आदळणाऱ्या फेसमय नद्या अगर ओढे, पायथ्याशीं सुंदर फुलांचें गवत व त्यांतून सापासारख्या मुरडत गेलेल्या सहस्र पांढऱ्या वाटा असा हा देखावा शेवटपर्यंत दिसला. मधुनमधून सांदींत—दऱ्याखोऱ्यांत असलेलीं ९।१९ घरांचीं खेडीं, कुठेंकुठें गाडी पाहतांच हातरुमालानें पालवणारे प्रवासी, व कांहीं ठिकाणीं गळ्यांतल्या सुंदर आवाजाच्या घांट्या हलवीत संथपणें जाणारीं गुरें, यायोगें जड सृष्टि व सजीव प्राणी हीं एकमेकांनां जणूं सजवून कंटाळवाणेपणा कमी करीत आहेत असें दिसे. लहानपणीं

गाईवासरांत वाढलेल्याला हा शेत्रटचा देखावा पाहतांच लहानपणचे दिवस आठवून जें अंतर्यामीं वाटलें तें लेखणीच्या मर्यादेपलीकडे आहे ! शामूनी जसजशी जवळ आली तसतसे माँ ब्लाँ जवळचे ग्लेशर अगर बर्फाचा भला जाडा व लांब थर असलेले डोंगर दिसूं लागले. दुरून बर्फाचा रंग पुसट निळा दिसे. असा हा देखावा पहायला मिळेल असें स्वप्नींहि नसतां,आज मीं तो प्रत्यक्ष पहात आहें, हा प्रत्यय येऊन समाधान झालें.

लगेच दुपारीं माँ ब्लांच्या अगदीं लगत, द बॉसाँ ह्मणून एक ग्लेशर पाहण्याला गेलों. हा फक्त ११०० मेटर ह्मणजे सरासरी ५३०० फूट उंचीवर आहे. चढ बेताचाच आहे, पण पावसानें निसरडें झाल्यानें थोडा त्रास होई. जवळ गेल्यावर पांढऱ्या शुभ्र बर्फाचा प्रचंड प्रवाह डोंगराच्या वरपासून मध्यापर्यंत पसरलेला पाहून थक्क झालों, व त्यावर चालून पहावें आणि त्यांतील कृत्रिम गुहेंतहि जावें, असें वाटलें. एक फ्रांक देऊन गेलों. परमेश्वराच्या या अवर्णनीय कृतींत माणसानें आपली क्लृप्ति चालवून युक्तीनें एक लांबचलांब व खोल गुहा केली आहे, आणि आंत उजेड रहावा ह्मणून जागजागीं मेणबत्या लावल्या आहेत ! बर्फाचें घरच तें ! कितीहि गरम कपडे घातले तरी काय होतें ! आंत जातांच सबंध आंगाला टांचण्या टोंचाव्या असें होऊन शहारे आले ! मृत्यूचा गारठा तो ! तरी तसाच हुषारीनें हळुहळू शेवटपर्यंत गेलों. बुटाला भले जाड अणकुचीदार खिळे मारले होते, व एक भक्कम लोखंडी टोंकाची शेंबी असलेली काठी विकत घेतली होती; यामुळें निसरायचा संभव बराच कमी असे. अगदीं आंत गेल्यावर मात्र निराशा झाली. अरुंद बोगद्याशिवाय तेथें कांहीं नव्हतें; उलट पाय मात्र थिजण्याची पाळी आली. त्यांतून बाहेर येऊन पुनः तो भव्य देखावा, तीं कल्पनातीत उंचीचीं बर्फमय शिखरें वगैरे पाहतांच पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. सृष्टीचे हे थक्क करून सोडणारे सुंदर पण

राक्षसी देखावे मनुष्याचें मन आपल्या कर्त्याकडे सहज वळवतात, असें मला वाटतें. तसेंच माझें होऊन त्या आल्प्सादि पर्वतांचे व सर्व सृष्टिकर्त्याचे धन्यवाद मीं मनांत गाइले !

दुसऱ्या दिवशीं ह्मणजे काल ता. २४ रोजीं सकाळीं सहांला उठलों, तों ढग वगैरे सर्व मावळून सकाळचीं कोंवळीं उन्हें पर्वतावर पडलीं होतीं. त्या वेळचा तो रमणीय देखावा वर्णन करणें शक्य नाहीं. मूर्तिमंत आनंदच त्या चमकणाऱ्या बर्फावर, शिखरांवर व ग्लेशरवर नांदत होता. माँ ब्लाँहि याच वेळीं पहायला मिळाला.

नंतर हा सर्व देखावा उत्तम तऱ्हेनें जेथून दिसतो त्या, माँ ब्लाँ आदि शिखरें व ग्लेशर्सच्या रांगा यांच्या समोरच्या, माँ. द. फ्लेजेअरकडे निघालों. हा चढ जरा अवघड होता. पण वाटेनें डोंगरांतून झुळझुळ आवाज करीत वाहणारे पांचपंचवीस चपळ झरे, बळकट खुराच्या डोंगरी शेळ्यांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज, उंच सुळक्यासारखें वाढलेल्या देवदारांचें बन, व त्या झाडांचा कस्तूरीसारखा येणारा सूक्ष्म सुगंध यांनीं आल्हाद होऊन उत्साहानें वर जावेंसें वाटे. या देवदारांकडे पाहून, त्यांच्या सुगंधाचा आस्वाद घेऊन, व उंच पर्वतांशीं यांचा निकट संबंध असलेला ओळखून, आपल्या कविवर्य कालि-दासानें हिमालयाच्या मुलीला देवदारु वृक्ष मुलासारखा आवडायला लावण्यांत दाखविलेली सृष्टीशीं एकतानता व प्रतिभासामर्थ्य याची खरी कल्पना आज मला आली ! असो. अशा या ‘ वृषभध्वजानें पुत्रीकृत ’ देवदारूंच्या गर्द छायेतून हौसेनें चढूं लागलों. बरोबरच्या दोघी बाया व अर्धवृद्ध रा. वोल्फ हीं मागे रेंगाळलीं; व एंजि-नीयर व मी दोघेंच पुढें गेलों. मागें वळून पहावें तों आपण किती वर आलों याचें आश्चर्य वाटे; आतां मजल गांठली या ऐटींत वर नजर फेंकावी तों अजून किती लांब मजल राहिली आहे, याचा प्रत्यय येऊन खिन्न व्हावें ! असें किती वेळ चाललें. शेवटीं एंजिनीयर

दमून बसला व ' आपण नाहीं आतां पुढें येत ' असें ह्मणाला. तेव्हां स्वत:चा थकवा बाजूला ठेवून त्याला दादा बाबा करून हुषारी देऊन कसें तरी पुढें घातलें. इंग्रजी कवि पोप याच्या 'Alps on Alps arise' या वचनाची आठवण झाली. असो. शिखरावर बरोबर दोन तासांत ह्मणजे साधारण लोकांच्या ४०।५० मिनिटें आधींच पोंचलों. वरचा देखावा किती वर्णावा! ती शिखरांची बर्फाच्छादित माळा दहा वाजतांच्या स्वच्छ सूर्यकिरणांत शुद्ध चांदीच्या राशीसारखी तळपे; थोडें खालीं सर्व हिरवेंगार; व ग्लेशर्सच्या पायथ्यांतून निघालेल्या निर्झरांचा धो धो आवाज, गार झोंबणारा पण हुषारी आणणारा वारा व त्याबरोबर डोंगरी फुलांचा व देवदारूंचा सुगंध या सर्वांनीं तिन्ही इंद्रियांच्या वृत्ति तल्लीन होऊन, चवथ्या मनांत लीन झाल्या व मन पुन: या अगाध व अपूर्व सृष्टीच्या निर्माल्याकडे लागलें. असें बराच वेळ होऊन मग तेथील लहानशा घरांत प्रवाशांच्या नांवाच्या चोपडींत एक वेळीं सुचलेला मराठी श्लोक लिहिला व इंग्रजींत आपली सही केली. दोन तासांत Chillen Clarense' ( शियो क्लारांस ) हें करून पुढें जाणें आहे.

**इंटरलाकेन**, २९ आगस्ट, ११.

अलीकडे पत्रावर पत्र येत असल्यामुळें तुह्माला कदाचित् आश्चर्य वाटेल; पण या प्रवासांतील आनंदाचा-अनुभवांचा प्रत्यक्ष वांटेकरी कोणी नसल्यानें माझीं पत्रें वाचून अप्रत्यक्ष रीतीनें तरी तुह्मीं वांटेकरी व्हावें, या इच्छेनें लिहीत आलों आहें. असो.

शामूनी खोरें, माउंट ब्लांक ( खरें फ्रेंच नांव 'माँ ब्लाँ' ) आदि शिखरें व ग्लेशर्स पाहिल्याविषयीं मागच्या पत्रीं लिहिलेंच आहे. खुद्द शामूनी गांवांत कांहीहि नाहीं; व्यापार, कला वगैरे कशाविषयींहि याची प्रसिद्धी नाहीं; पण याच्या भोंवतीच्या अपूर्व सृष्टिशोभेमुळें

काशी–मक्का–जेरुशलेमसारखें हें यात्रेचें ठिकाण झालें आहे. अर्थात्च येथील वस्ति उन्हाळा खेरीजकरून फारशी नाहींच ह्मणायला कांहीं हरकत नाहीं. मोठमोठीं हॉटेलें हीच याची वस्ति; व प्रवाशांनां रात्र दोन रात्र उतरायला जागा देणें व त्याबद्दल वाटेल तें बिल आकारणें हा लोकांचा मुख्य धंदा. असो. नाजूक प्रवाशांनां डोंगरावर जाण्यासाठीं खेंचरें भाड्यानें देणें हाहि एक बराच किफायतीचा धंदा आहे. मागल्या पत्रांतील फ्रेजेअर डोंगर उतरत असतां आह्मीं अशीं किती तरी खेंचरें नाजूक जीवंत ओझें पाठीवर घेऊन जात असतांना पाहिलीं. एकदां तर साधारण तरुणशी आई खेंचरावर स्वार झाली होती व तिच्या अनुक्रमें १२ व १० वर्षांच्या दोन मुली त्याचें शेंपूट धरून मागें येत होत्या, तें पाहून आह्मी पोट धरधरून हंसलों.

नंतर मॉंट्रोला परत येऊन बायरननें गाइलेला 'शिलॉन' किल्ला पाहिला. लेमन सरोवराच्या कांठीं पाण्यांत हा असल्यानें याच्या सभोंवतींचा देखावा अपूर्व आहे. बाकी यांतील न्यायकचेरी व तिच्या मागेंच आरोपीचा छळ करण्याची खोली ही सांगड पाहून 'मिडल एजेस' मधील न्यायाची कल्पना येते. एका बाजूच्या खोलींत कबूलीजबाबासाठीं ह्मणून (?) एक उंच खांब असून त्याला एक रुंदट लोखंडी कडें ठोकलें आहे. आरोपीची मान यांत जात असे हें सांगणें नकोच. या यमाच्या कड्यानें आपलें गळा दाबण्याचें काम चुकून नीट बजावलें (व अशी चुकी त्याजकडून हमेश होत असली पाहिजे!) तर जाळीनें झांकलेलें एक अंधारी भुयार तळ्यांत गेलेलें आहेच बाकीच्या कामाला तयार! असो. येथें एका दगडी खांबावर बायरननें आपलें नांव कोरलें आहे; तें आतां अजरामर झालें आहे. ह्मणूनच कीं काय, पहायला जाणारा प्रत्येकजण आपलें नांवहि त्याच खांबावर जागा सांपडेल तेथें कोरतो! सृष्टीच्या नियमाविरुद्ध अजरामर होण्याची इच्छा नसल्यामुळें मीं आपलें नांव त्यांत कोरलें नाहीं.

मॉँट्रोहून शुक्रवार ता. २५ संध्याकाळीं पावसांतच इंटरलाकेन येथें आलों. गांवापासून जरा दूर डोंगराच्या बाजूला आयगर् हॉटेलांत उतरलों. विजा, धो धो पाऊस, डोंगरी वाऱ्याचा घोंगाट या सर्वांनीं रात्रभर धुमशा घातला. पण दुसऱ्या दिवशीं उघाडी पडून रित्या घनांनीं शिराळ धरलें होतें; ह्मणून डोंगरांत बिआटुस् गुहेकडे जाऊन आलों. ही गुहा साधारण शाडूच्या अगर खारवट डोंगरांत पाण्याच्या प्रवाहानें आपोआप झालेली आहे. डोंगराच्या मध्यापासून तों बहुतेक शिखरापर्यंत जाळ्यासारखी गेली आहे. आंत एक सुंदर निर्झर वाहतो. विजेचे दिवे व वाटाड्या आहे, ह्मणूनच आंत पाहून येतां येतें.

इंटरलाकेन अथवा 'सरोवरांच्यामध्यें' हें गांव लहानच आहे. पण दोहींकडे रम्य हिरवींगार सरोवरें व सभोंवतीं आल्प्स् पर्वत यामुळें हें टुमदार दिसतें. आल्प्स् पर्वताच्या दुसऱ्या प्रसिद्ध शिखरांची रांग येथून जवळच असल्यामुळें ती पाहणारांचें इंटरलाकेन हें केन्द्रस्थान झालें आहे. ती रांग ह्मणजे श्रेक्हॉर्न, आयगर, मोंश, युंगफ्राऊ, ब्ल्यूमलिस् आल्प् वगैरे ही होय. यांत युंगफ्राऊ अथवा प्रमदा हें शिखर जास्त उंच व सुंदर आहे. तरी मॉं ब्लॉंपेक्षां उंची फार कमी आहे. मॉं ब्लॉं ४८०७ मेटर अगर १६०२० फूट व 'प्रमदा' अर्थातूच ४१६७ मेटर=१३८९० फूट उंच आहे. हीं तीन आयगर (प्रमत्त), मोंश (भिक्षु) व प्रमदा शिखरें गांवांतून व जवळपासच्या टेंकड्यांवरूनहि दिसतात. पण सर्व शिखरांची रांग पूर्णपणें पहावयाची असल्यास वीसएक मैलांवर नीजेन् ह्मणून डोंगरावर जावें लागतें. हा २३६६ मेटर=७८८० फूट उंच असून, त्यावर ड्राटसाइल्बान् अगर लोखंडाच्या दोरांवरून चालणाऱ्या गाडीनें अगदीं वरपर्यंत जातां येतें. तेथें रविवारीं १२ वाजतां पोंचलों; दिवस निरभ्र असल्यानें तो भव्य देखावा उत्तम रीतीनें पहायला सांपडला. पूर्वेकडे डोंगरांच्या

खिडींत तीं दोन लहान सरोवरें ( ज्यांच्यामध्यें इंटरलाकेन आहे ), व तेथून दक्षिण बाजूकडे सभोंवार वेटरहॉर्न्, श्रेकहॉर्न, आयगर, भिक्षु, प्रमदा, ग्लेशरहॉर्न्, मिट्टागहॉर्न्, ( मध्यान्हशृंग ), ब्राइट्हॉर्न् ( विस्तीर्ण श्रृंग ), डोल्डेनहॉर्न्-वगैरे अनेक शृंगें डोक्यावर शुभ्र बर्फ धारण करून स्तब्धपणें उभीं असलेलीं पाहून, आपणांवर त्यांच्या स्तब्धपणाचा परिणाम होतो, व तटस्थवृत्तीनें या सभोंवारच्या सृष्टि-वैभवाला नेत्रांनीं प्यावें, असें वाटतें, पण तृप्ति ह्मणून होत नाहीं. अशी इंदुमतीसारखी अप्रतिम लावण्याची खाण प्रमदा पाहून मलाहि त्या अंगवंगकलिंगमगधादि राजांप्रमाणें झाल्यास काय आश्चर्य आहे ? मॉं ब्लॉंचा देखावा व हा प्रमदेचा देखावा हीं अगदीं निराळीं आहेत. मॉं ब्लॉंचीं शिखरें अधिक उंच असून त्यांतून ग्लेशर्स स्पष्टपणें दिसतात, व या उंचीमुळेंच बर्फविरहित शिखर एकहि दिसत नाहीं. इकडे श्रेकहॉर्न्सारखीं शिखरें बऱ्याच ठिकाणीं बर्फरहित असून त्यांचे काळे सुळक्यासारखे कडे भयंकर दिसतात. पण या प्रमदे-भोंवतींचीं शिखरें जणूं एका ओळींत मांडल्यासारखीं लांबच लांब दिसतात, व त्यांच्या पायथ्याशीं एक फारच लांब व रुंद खोरें आहे. या खोऱ्याच्या सरासरी पूर्व बाजूला तीं दोन सुंदर सरोवरें व त्यांमध्यें छोटें इंटरलाकेन् असा फारच विस्तीर्ण आणि नजर न पोहोंचेल असा देखावा येथें आहे. वरून तीं दोन सरोवरें पाहून तर असें वाटतें, कीं, हे दोन नैसर्गिक आरसे असून त्यांत सृष्टिसुंदरी आपलें गंभीर स्वरूप स्तब्धपणें पाहत आहे.

नीजेनवरून खालीं येऊन ड्राटसाइलवानमधून उतरतांना एक मौज दिसली. एका गाडींतून उतरून दुसरींत बसायचें होतें, तों माझ्यापुढेंच अगदीं आजतागाईत पद्धतीचा पोषक केलेली एक बाई चढूं पहात होती. आजतागाईत पोषाकांत झग्याला खालच्या बाजूला घोळ बिलकूल नसल्यामुळें पावलें साफ व लांब टाकतां येत नाहींत,

हें कदाचित् मागें मीं लिहिलें असेलच. असाच निरुंद झगा या बाईचा असल्यानें तिला वरच्या पायरीवर पोहोंचेइतकें उंच पाऊल टाकतां येईना! शेवटीं तिला दोन हातांवर खालचा भाग तोलून वर टुणकन् उडून बसण्याची कसरत करावी लागली! माझें हंसूं आवरेना—पण हंसावें तरी कसें?

नंतर काल सोमवारीं लहानलहान डोंगरांवर चढून पुन: तेच ते देखावे पाहिले, पण वरची सर अर्थात् आली नाहीं.

सृष्टिशोभेशिवाय इंटरलाकेन्ची जनावरांविषयीं प्रसिद्धि आहे. मी राहतों या हॉटेलवरून गायीवासरांचे कळप रोज सकाळीं तळयाच्या कडेनें डोंगरांत चरायला जातांना पाहून मला अश्वी, नगर यांची आठवण होते. पण आपल्याकडील गुरें या मानानें कांहींच नव्हत. येथें एक-एक धिप्पाड गाय, तिची अक्षरश: घागरीएवढी कास, व तिच्या मागलें तिलाहि लहान ह्मणवूं पाहणारें वांसरूं ही एक अपूर्व पाहण्यासारखी गोष्ट आहे. यामुळें येथील दुभतें फार विपुल व कसदार असतें. आलों त्या रात्रीं पेलाभर दूध मागवून प्याल्यावर, पुन: रोज रात्रीं तें मधुर, स्वादिष्ट, घट्ट दूध मागवूं लागलों. गोठवलेल्या दुधाविषयीं (condensed milk) स्वित्सरलंडाची प्रसिद्धी असल्याचें तुह्मांला ठाऊक आहेच. येथें लांकडी कोरींव कामहि चांगलें होतें. खुर्च्या, टेबलें, कोचें, गमतीचीं खुंटाळीं, काठ्या–छत्र्या ठेवण्याचे खांब वगैरे नक्षीकाम फारच पाहण्यासारखें असतें, व जनावरांप्रमाणेंच यालाहि सर्व यूरोपभर व अमेरिका, जपान इकडूनहि मागणी फार असल्याचें कळतें. असो.

म्युरेन्, ३०।८।११.

इंटरलाकेनहून काल एक पत्र रवाना केलेंच आहे. तेथून आज सकाळीं दहा वाजतां निघालों. एकंदरींत इंटरलाकेनचे पांच दिवस

मोठे मजेंत गेले. रोज कोठें ना कोठें तरी पहायला जाणें, व कंटाळा येईल त्या दिवशीं गांवांतच अगर नदीच्या कांठीं अगर *कूअरहौस समोरच्या राईंत फिरणें, किंवा हॉटेलपुढें बागेंत बसून शेतकऱ्यांच्या गवताच्या गाड्या, गुरांचे कळप व त्यामागें चाललेले छोटे गुराखी वगैरे पाहण्यांत करमणूक होत असे. इंटरलाकेन् हें खेडेवजाच असल्याचें मागें लिहिलेंच आहे. ह्मणूनच मोटर, बग्या, सायकल्स, विजेचे दिवे वगैरे शहरच्या गोष्टी, व शेतकरी, गुरें, गुराखी या खेड्याच्या गोष्टी यांचा येथें मिलाफ झाला आहे.

इंटरलाकेनहून साडेअकराला लाउटरब्रुनेन येथें आलों. हें एक अगदीं लहान खेडेंच आहे, पण शामूनीप्रमाणें एका सुंदर खोऱ्यांत अगर दरींत वसलेलें आहे. तिन्हीं बाजूंनीं पर्वत व एक बाजू खुली, असें हें नैसर्गिक कोठारासारखेंच आहे. दोन बाजूंचे डोंगर तटासारखे सरळ गेले असून त्यांवरून लहानमोठे बरेच निर्झर खालीं पडतात; यामुळें या गांवाला लाउटरब्रुनेन अगर बहुनिर्झर हें नांव पडलें आहे. पैकीं दोनतीन विशेष पाहण्यासारखे आहेत. एक स्टाउब्-बाख् अथवा धूलिनिर्झर ह्मणून; हा कड्यावरून सुटल्यापासून खालीं येईपर्यंत उंचीमुळें व वाऱ्यानेंहि केवळ पांढऱ्या बारीक धुळीप्रमाणें दिसतो ह्मणूनच याला तसें नांव पडलें आहे. दुसरा ट्रयुमेल-बाख् अगर छिन्ननिर्झर ह्मणून; पाण्याची अजत्र शक्ति, कीं, जिनें कठीण खडक फोडून त्यांत रंध्रें करून आपला रस्ता काढला आहे, व परमेश्वराची अगम्य कृति,

* कूअरहौस म्हणजे हवा खाण्याला आलेल्या पाहुण्यांच्या करमणुकीसाठीं जेथें रात्रीं गायनवादनाचे जलसे होतात, अशी नाटकगृहासारखी इमारत. स्वित्सर्लंडांत मी आजपर्यंत जेथें जेथें फिरलों, तेथेंतेथें आपलें कूअरहौस ठेवलेलेंच. म्युरेन् हें एक नाकपुडीएवढें खेडें आहे, पण येथें सुद्धां हवा खावयाला येणाऱ्या चैनी मंडळीसाठीं कूअरहौस आहे! मला यूरोपीय गायनाची अजून चव न समजल्यामुळें मी हीं कूअरहौसें बिलकूल टाळलीं!

यांचें हा निर्झर चालतेंबोलतें निदर्शन होय. युंगफ्राउ अगर प्रमदे-जवळच्या एका ग्लेशरपासून हा प्रचंड प्रवाह निघून पांच ठिकाणीं डोंगर फोडून बाहेर पडला आहे. अगदीं पहिल्या ह्मणजे डोंगराच्या बऱ्याच वरच्या ठिकाणीं जाऊन पहावें ह्मणजे एका लहान, अंधाराच्या बोगद्यांतून फोंफावत निघून समोर खडकावर जोरानें आदळतांना हा दिसतो. तो तेथील धो धो आवाज, वितळलेल्या चांदीसारखा फेंसमय पाण्याचा अगडबंब लोट, त्यामुळें अत्यंत कठीण असतांहि झिजून मऊ झालेला कडा, व बऱ्याच उंचावर, आंतून कड्याच्या पोटीं पाहण्यासाठीं केलेल्या सज्जावर उभें असलेल्या प्रेक्षकालाहि सचैल अभिषेक घालणारा तुषारसमुदाय हीं प्रत्येक आश्चर्य करण्यासारखीं आहेत. असेंच जरा खालीं चार ठिकाणीं झालेलें आहे. यामुळें हा लोट चारपांच ठिकाणीं खडकाच्या भिंतीनें खंडल्यासारखा झाला आहे, ह्मणून त्याला छिन्ननिर्झर ह्मणतात. हें शामूनीला नाहीं.

हें पाहून झाल्यावर दमलों व जरा भूकहि लागली, ह्मणून एका विसांव्याच्या ठिकाणीं दूध पिण्याला मागितलें. चहाचा एकादा पेला भरून येईल असें मनांत ह्मणतों, तों दासीनें चिनीमातीचें सरासरी पाऊणशेराचें भांडें भरून पुढें ठेविलें. किती मधुर व कसदार दूध तें ? पिऊन अंतरात्मा शांत झाला. या पाऊणशेरावर दुधाला अवघे चाळीस सांतीम ( सरासरी ३–३॥ आणे ) पडले.

हें पाहण्याच्या गडबडींत एक इंग्लिश गृहस्थ तीनदां भेटला. प्रथम भेटतांच त्यानें वेळेला अनुसरून नमस्कार केला, व हंसला. मी हिंदी हें त्यानें तेव्हांच ओळखलें. नसतें तरच नवल ! इंग्रज लोक ताठेबाज असतात, अशी यांची सर्व यूरोपांत ख्याति; पण प्रवासांत कसचें काय आलें आहे ? त्याच्या माझ्या खूप गप्पा झाल्या. राज्या-रोहणोत्सवाला आलेल्या हिंदु मांडलिकांचे भव्य पोषाक, घोड्यावर बसण्याची ऐट वगैरेची स्तुति तो करीत होता, वगैरे. हें सांगावयाचें

एवढ्यासाठींच, कीं, प्रवासांत नेहमींचे चमत्कारिक रिवाज कोणीहि ठेवीत नाहींत. खरोखरी मला हे प्रवाशांचे रीतिरिवाज फार आवडतात. दुसरे प्रवासी भेटले असतां त्यांनां नमस्कार करणें, हंसणें, मार्ग विचारणें अगर सांगणें, एकादा दमलासें दिसल्यास त्याला उत्साह आणणें इत्यादि गोष्टी मला पटतात. येथें ओळखी करून देण्याचा संभ्रम वगैरे कांहीं लागत नाहीं.

नंतर, १८५० मेटर (६१६६ फूट) उंचीच्या डोंगराच्या शिखरावर म्युरेन् ह्मणून खेडें आहे; सर्वजण त्याच्या सभोंवारच्या सृष्टिशोभेची, हवेची वगैरे फार स्तुति करीत असतात; ह्मणून जिज्ञासेनें मीहि विजेची गाडी न घेतां पायींच चढूं लागलों. किंचित् अभ्रें आल्यामुळें उन्हाचा त्रास झाला नाहीं. एका बाजूनें डोंगर व त्यांवरील देवदारांची झाडी, आणि दुसऱ्या बाजूनें खालीं खोल दरी, असा हा मजेदार रस्ता होता. वाटेनें झुळझुळ वाहणारे लहानलहान ओढे कितीतरी ओलांडावे लागले. अशा तऱ्हेनें घाम पुशीत, वाटेनें भेटलेल्यांस नमस्कार करीत, पाठीशीं पडशी, कोट काढून तिच्यावर अडकवलेला, टोपी पुढें सदऱ्याला लोंबवलेली, अशा थाटानें सरासरी सव्वातास चाललों. तेव्हां आतां मजल बहुतेक गांठली असें वाटून, समोर दिसणाऱ्या काळ्या मेघाला 'भो मेघ गंभीरतरं नद त्वं' असें ह्मणतों, तोंच जणूं काय, चिडूनच त्यानें धारांनीं मला झोडण्याला आरंभ केला. पंधरावीस मिनिटें होता—पण डोंगरी पाऊस तो! त्यानें नखशिखांत भिजवून काढलें. जवळ झोंपडी वगैरे कांहीं आश्रय नाहीं. पावसांत झाडांचा आश्रय ह्मणजे कृतघ्नाच्या मैत्रीसारखा! तेव्हां तसाच पुढें चेंपीत निघालों व आणखी पाऊणतासांत म्युरेन् गांठलें. त्या जोराच्या सरींत त्रिभुवन आठवलें! सारे कपडे चिंब भिजले. फक्त रात्रीचा पोषाक पडशींत कोरडा राहिला होता. तो घालून, बाकीचे कपडे वाळत टाकून स्वस्थ पडलों.




'बेर्गबान्' ( साखळदंडाची गाडी ), लाउटरब्रुनेन

**लाउटरब्रुनेन्, ३१ ऑगस्ट, १९११.**

**म्युरेन्** ( सकाळीं ).

आज सकाळींच उठून येथून सरासरी आणखी १२०० मेटर उंच असलेल्या शिल्ट्हॉर्न्वर जायचा बेत होता. त्या प्रमाणें लवकर तयारहि झालों. पण खिडकी उघडून पाहतों तों दाट धुकें चोंहींकडे पसरलेलें ! साडेआठ वाजतां कोठें थोडी उन्हाची तिरीप पडल्यासारखें होऊन पुनः धुकें दाटलें, तें अद्याप दहा वाजल्यानंतरहि वाढतच आहे. ' शिल्ट्-हॉर्न्ला जायचें, शिल्ट्हॉर्न्वर जायचें' हें जें आज पांच दिवस वारें भरल्यासारखें झालें होतें, त्यावर आज या धुक्यानें विरजण घातलें ! फार दिवस बाळगलेल्या आशेचा असा अकस्मात् हिरमोड झाल्यानें जो निरुत्साह होतो तो कांहीं विचारूं नये ! काल संध्याकाळीं येतांना जी म्यूरेन्ची गोड शोभा पाहिली, तिच्यावरच समाधान मानून, धुकें कमी होईल तेव्हां परत लाउटरब्रुनेन्ला जाणें आहे. तेथून पुढें ग्लेशर्स् व डोंगरांचीं शिखरें यांत विजेच्या गाडीनें जायचें आहे. तेथेंहि असेंच धुकें पडून सृष्टिवैभवाच्या देखाव्याचें आजच्यासारखे वाटोळें न होवो ही इच्छा आहे ! पहावें काय होतें तें.

**लाउटरब्रुनेन्** ( रात्रीं आठ वाजतां ).

सरासरी बारांच्या सुमाराला भिक्षु व प्रमदा यांवरचें धुकें अकस्मात् फाटून तीं पांढरीं शिखरें, व मागें शुद्ध निळें आकाश अशी शोभा दिसूं लागली सहा तास धुक्याशीं झगडतांझगडतां शेवटीं बारांच्या नंतर सूर्याचा विजय होतोसा दिसला. होतांहोतां सर्व शिखरें स्पष्ट दिसूं लागलीं. पण लवकरच खालून लाउटरब्रुनेन्-ताल् ( खोरें अगर दरी ) मधून धुराच्या डोंबाळासारखे धुक्याचे लोटच्या लोट वर येऊं लागून शिखरें पुनः अस्पष्ट होऊं लागलीं. एक क्षणभर उत्तम सूर्यप्रकाश पडून शिखरें चमकावीं, तों दुसऱ्या क्षणीं त्यांवर खालून नवा धुक्याचा ढग

यावा, असें दोन तास चाललें होतें. नेहमीं पाहण्याला न मिळणाऱ्या व ह्मणूनच अपूर्व अशा या सृष्टिचमत्कारानें इन्द्रजालांतील मायेप्रमाणें माझ्या मनावर परिणाम झाला! व शिल्टहॉर्न् नाहीं तर नाहीं, पण हा अद्भुत देखावा तरी पहाण्याला मिळाला, एवढ्यांतच समाधान मानून दोन वाजतां लाउटरब्रुनेन्‌कडे यायला निघालों.

वाटेनें पांढऱ्या व हरण्या अशा मिश्र रंगाच्या सरासरी शंभर गायींचा कळप दृष्टीला पडला. हीं डोंगरी गुरें फार मारकीं असतात, असें आगगाडींत एका गृहस्थानें सांगितलें होतें; पण मला त्याच्या उलट दिसून आलें. जवळच गुराखी उभा होता, त्याच्याशीं थोडा बोललों. आपल्या गुरांविषयीं अभिमान व आनंद त्याच्या चेहऱ्यावर पाहण्यासारखा होता. ' इतक्या दुधाचें तुह्मी काय करितां?' ह्मणून विचारतां ' हमेष मलई करतों, अगर गोठवून डबे भरून विकण्याला पाठवितों,' असें तो ह्मणाला. असो.

येथें आल्यावर पुनः संध्याकाळीं एक दीड तास खोऱ्यांत थंड हवेंत फिरलों. तों कांहीं दृश्य व कांहीं अदृश्य अशा हजारों निर्झरांचा एकवटलेला आवाज कानीं पडे, व सृष्टीचें तें स्वाभाविक गायन ऐकून करमणूक होई. शेक्सपीयरच्या 'As you like it' मधील वृद्ध ड्यूकला अशा पळणाऱ्या निर्झरांत पुस्तकें दिसत. मला या चपळ, बुडबुड करणाऱ्या झऱ्यांत मधुर गायन ऐकूं येतें; हें रुचिवैचित्र्य होय! असो.

उद्यां सकाळींच उठून हिमाच्या आलयांत अगर समुद्रांत (Eismeer) प्रमदेच्या अगदीं जवळ जाणें आहे. उद्यांचा सर्व दिवस या ठिकाणाहून त्या ठिकाणीं अशा धांदलींत ग्लेशर्स, बर्फाचीं अखंड मैदानें व उंच शिखरें वगैरे पाहण्यांत जाईल. जेथें शेवटीं पोंचायचें तें ठिकाण १०,००० फुटांच्यावर उंच आहे. तेथून लिहायला मिळणार नाहीं, व मिळालें तरी पुढच्या आठवड्याशिवाय रवाना होणार नाहीं, ह्मणून आतांच पत्र पुरें करून येथूनच पाठवीत आहें. डाकेच्या वेळेवर जाईल, असें वाटतें.

माझी प्रकृति बरी असल्याचें इंटरलाकेनहून लिहिलेंच आहे. येथेंहि ती उत्तम आहे. उत्तम हवेंतच येऊन पडल्यावर मग काय प्रकृतीला पहावें ?

ब्रीएन्झ, ३ सप्टेंबर, १९११.

लाउटरब्रुनेन्हून गुरुवारीं रात्रीं मुद्दाम स्टेशनवर जाऊन टाकलेलें पत्र वेळेवर मिळालें असावें असें वाटतें. त्यानंतर ठरल्याप्रमाणें शुक्रवारी सकाळीं बर्फाच्या आगरांत–ज्याला 'आइसमेअर'–हिमसमुद्र ह्मणतात, तिकडे जाण्याला निघालों. रस्ता फारच चढाचा होता. अशा चढासाठीं इकडे 'झानराडबान'चा उपयोग करतात. या गाडीच्या पुढच्या डब्याला मध्यें एक लहानसें दांते असलेलें चाक असतें व त्याच-प्रमाणें नेहमींच्या रुळांच्या मध्यें त्या लहानशा चाकाला जुळतील असे दांते असलेला तिसरा रूळ असतो. या योजनेमुळें केवढाहि चढ असला तरी गाडी खालीं घसरण्याची भीति नसते. ही गाडी ट्राम-सारखी विजेनें चालते. हींत बसून दरी खालीं टाकली व डोंगरावर हळु-हळू जाऊं लागलों. कांहीं ठिकाणांहून लाउटरब्रुनेन्ची सबंध दरी, इतकेंच नव्हे, तर लांब पलीकडे तळ्यांच्या मधलें इंटरलाकेनहि दिसे, व दुसऱ्या बाजूनें आल्प्स्चीं गगनचुंबित शिखरें दिसत, व या विरोधाचा परिणाम मनावर फार होई. याप्रमाणें तीन स्टेशनें टाकून आयगर–ग्लेशर नांवाच्या २३२३ मेटर उंचीच्या स्टेशनावर आलों. येथून आयगर शिखराखालचा ग्लेशर तीन मिनिटांवर आहे, ह्मणून याला असें नांव आहे. येथें आल्यावर त्या तिन्ही प्रसिद्ध शिखरांच्या ( आयगर, मोंश, युंगफ्राऊ ) समोरासमोर अगदीं थोडक्या अंतरावर उभें असल्यामुळें, सूर्यकिरणांत बर्फाच्या चकाकण्यानें व त्याच्या अति शुभ्रपणानें डोळे दिपून जातात. ग्लेशरचा बराचसा भाग माणसांनां त्याजवर चालतां यावें ह्मणून दगड–माती टाकून खराब केला आहे, त्यामुळें त्याच्या शुभ्र-निळेपणाला गालबोट लागल्यासारखें झालें आहे. येथून पुढें

आइस्‌मेअर बरेंच ह्मणजे ७०० अधिक मेटरवर उंच असून आयगरच्या अगदीं पाठीच्या बाजूला आहे. अशा स्थळीं मोठ्या शिखरांत एका बाजूकडून उलटीकडे विलक्षण चढाच्या बोगद्यांतून गाडी नेण्यांत माणसानें जें आपलें कल्पनाचातुर्य दाखविलें आहे, तें अचंबा वाटण्याजोगें आहे. हा बोगदा अर्ध्या तासाच्यावर लांब आहे, व मध्यें एक लहानसें स्टेशन केलें असल्यामुळें अगदीं सदट नाहींसा वाटतो. शेवटाच्या आइस्‌मेअर स्टेशनावर उतरून एक मिनिट उजेडाच्या बाजूनें गेलें, कीं, आइस्‌मेअर किंचित् खालीं दिसतें. ३१६१ मेटर उंचीवरून पाहिलेला हा बर्फाचा देखावा अपूर्व होय ! आयगर, फीशरहॉर्न् दोन्ही, फिन्स्टर आर हॉर्न् व श्रेकहार्न् अशीं सभोंवतीं असून मध्यें सरोवरासारख्या जागेत बर्फ सांठलेलें आहे. हें किती खोल असेल याची कल्पना करवत नाहीं. यावर माणसें फारशीं जात नसल्यानें याची नैसर्गिक शोभा अगदीं जशीच्या तशीच कायम राहिली आहे. गाडींतून उतरलेले आह्मी सर्व उतारू लोखंडी कठड्याशीं उभे राहून आश्चर्य व्यक्त करीत असतां एकदोन डोंगरी बर्फांतले वाटाडे 'बर्फावर जाऊन त्यांतील भेगा कशा असतात वगैरे पहायचें आहे काय?' ह्मणून विचारूं लागले. कोणी धजेना. इतक्यांत मला काय आहे तें पाहण्याची हुडहुडी भरून मी तयार झालों. एका लांकडी फळ्यांच्या कामचलाऊ जिन्यानें चांचपडत खालीं उतरल्यावर वाटाड्यानें माझ्या कमरेला चऱ्हाट बांधून आपल्या हातांत बळकट धरलें, व आह्मी घटकेंत खालीं, घटकेंत पुनः वर, कांहीं सपाटीवर, असे बर्फांतून जाऊं लागलों. कांहीं ठिकाणीं बर्फ दगडासारखें कठीण व निसरडें होतें, तर कांहीं जागीं वाळूप्रमाणें बारीक ढिगारे असून ते पायाखालीं वाजत. पाय ठेवतांना निसरूं नये ह्मणून टांच बळकट रोंवून, हातांतील आरीची काठी बर्फांत टोंचावी लागे. अशा रीतीनें पंधरावीस मिनिटें चालल्यावर बर्फाच्या त्या समुद्रांत पडलेल्या एका मोठ्या भेगेच्या कांठाशीं आह्मी आलों. रुंदी तीनचार हातांच्या वर

नव्हती; पण लांबी खूब. फाशरहॉर्नपासून त्याच्या विरुद्ध बाजूच्या शिखरापर्यंत होती. खोल इतकी, कीं, डोकावून पाहिलें असतां डोळे फिरत. तिच्या आंतल्या दोन्ही बाजू निळसर असून अर्ध्यापर्यंत चमकत होत्या; त्याच्यापुढें हळुहळू प्रकाश नाहींसा होऊन तळ दिसत नव्हतें. हिच्या पलीकडे जाण्यासाठीं दोन विती रुंदीची एक लांकडाची फळी आडवी टाकली आहे. तीवरून जाण्यापूर्वीं पाय आपटून त्यांनां चिकटलेला बर्फाचा चिखल झाडून टाकावा लागतो; नाहींतर अरुंद फळीवरून पाय निसरून मोक्षच! चाळीसएक मिनिटें चालल्यावर 'लगतच्या ग्लेशरवरून श्रेकहॉर्नच्या बाजूनें तुह्माला पलीकडे ग्रिंडेलवाल्डच्या खोऱ्यांत सुरक्षित उतरवतों,' असें तो वाटाड्या माझी चिकाटी वगैरे पाहून ह्मणाला. पण माझे बूट पातळ, पायमोजेहि लोकरीचे पण पातळच असल्यामुळें मीं नाकारलें. शिवाय परत ग्रिंडेलवाल्ड खोऱ्याकडचें टिकिट काढून पैसे खर्चून बसलों होतों, व वाटाड्याला कमींतकमी २५ फ्रांक द्यावे लागले असते. असो. याप्रमाणें बर्फाच्या समुद्रावर एक लहानशी सफर करून वर आलों. आपण आज कांहीं तरी विशेष अपूर्व केलें, पाहिलें, असें वाटे; छाती मात्र बराच वेळ उडत असल्याचें गाडींत बसल्यावर मागून माझ्या लक्ष्यांत आलें. याप्रमाणें आल्प्स् पर्वतांत येऊन लांबून व जवळून त्याचीं शिखरें पाहण्याची, प्रत्यक्ष त्यांत व त्यांवरील बर्फांत जाण्याची बरेच दिवसांची हौस तृप्त झाल्यासारखें वाटून समाधान झालें. खुद्द बर्फावरून भेग ओलांडून चालत असतांना, मध्येंच उन्हानें शिखरावरचें बर्फ उठून एकादी भली थोरली बर्फाची शीळ खालीं घसरत असतां होणारा गडगडाट ऐकतांना, मला काय वाटत असावें त्याची मला अद्याप कल्पनाहि करतां येत नाहीं!

नंतर त्याच दिवशीं दुपारीं चार वाजतां ग्रिंडेलवाल्ड खोऱ्यांत त्याच नांवाच्या गांवीं आलों. येथेंहि दोन ग्लेशर्स कांहीं उंचीवर आहेत; पण सहज वाटेल त्याला जातां येण्यासारखें असल्यामुळें अगदीं काळे खराब

होऊन गेले आहेत. नेहमीं आटोक्यांत असलेल्या वस्तूचा अशा तऱ्हेनें उपमर्द करण्याचा माणसांचा स्वभावच आहे! एक ग्लेशर दोन उंच कड्यांच्या अरुंद व लांबचलांब खिंडीच्या मुळाशीं पाचर मारल्यासारखा वरपासून पायथ्यापर्यंत उभा असून, त्यांतून एक नदी जोरानें खिंडींतून गोंगाट करीत खालीं दरींत गेली आहे. या खिंडीला 'लुचीन श्लुख्ट् (Lutschine Schlucht)' ह्मणतात. एकंदरींत हें ग्रिंडलवाल्ड खोरें लाउटरब्रुनेन् इतकें रमणीय नाहीं. निदान मला तरी तें आवडलें नाहीं. पण त्याच्या पाठीशीं उभ्या असलेल्या फाउलहॉर्न नांवाच्या शिखरावरून सभोंवारच्या आल्प्स्चा देखावा फार नामी दिसतो, असें मीं वारंवार ऐकिलें होतें, व *बेडेकरहि तेंच ह्मणतो. तेव्हां उद्यां तिकडे जावें असें वाटे; पण रस्ता पांच तासांचा बिकट, उंची फ्रेजेअरपेक्षां बरीच अधिक (फ्रेजेअर १८७१; फाउलहॉर्न २६८४;) व तशांत आइसमेअरमध्यें चढतांउतरतांना गुडघ्याची शीर लचकलेली, अशा स्थितींत न जाणें एकपक्षीं बरें वाटे. अशा 'हो ना' तच रात्रीं झोपीं गेलों.

तारीख दोन शनिवारीं सकाळीं उशिरां उठलों, व दहा वाजतां पाहतों तों पायांनीं आपली फाउलहॉर्न्ची वाट धरली, इतका उत्साह होता! अर्थात् मग तसाच पुढें सरसावलों. वाटेंत गुराखी, डोंगरी खेड्यांत खेंचरावरून सामान नेणारे हेलकरी, इतर प्रवासी वगैरे भेटतील त्यांशीं बोलण्यांत वगैरे अर्धी मजल एक तास चाळीस मिनिटांतच गांठली. तेथें एक विश्रांतिगृह होतें; त्यांत दूध, पाणी पिऊन बरोबर घेतलेलीं फळें खातांच हुषारी आली. दोन इंग्लिश गृहस्थ माझ्या आधींच तेथें बसलेले होते; त्यांनां माझ्या मजल काढण्याचें आश्चर्य वाटलें.

---

* या नांवाच्या दीर्घोद्योगी गृहस्थानें प्रत्येक देशांतून प्रवास करतांना अत्यंत जरूरीचीं माहितीपूर्ण पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांचीं त्यानेंच केलेलीं भाषान्तरें यूरोप-अमेरिकेंतील सर्व लोक वापरतात.




‘ आर नदीची खिंड ’ मायरिंगेन.

**ल्युसर्न्**, ता. ५ सप्टेंबर, १९११.

नंतर तिघे बरोबर पुढें जाऊं लागलों. रस्ताहि दोन डोंगरांच्यामध्यें बरा सपाटीचा होता. डोंगरांच्या बाजूंनीं हिरव्या गवतांत गाई चरत होत्या. त्यांच्या घंटांच्या गोड आवाजानें कानाला सुख होई. कांहीं वेळ बरोबर गेल्यावर ते दोघे गृहस्थ रेंगाळले व मी एकटाच पुढें सरसावलों. वाटेनें बर्फांतून उगम पावणाऱ्या ओढ्यांच्या पाण्याचें लहानसें तळें लागलें. येथून पुढला फाउल्हॉर्न् शिखरापर्यंतचा रस्ता फार बिकट व खडकाळ असा होता, त्यामुळें फार त्रास झाला; पण शेवटीं दोन वाजतां भर उन्हांत वरती जाऊन पोहोंचलों. घसा कोरडा पडून दमहि लागल्यामुळें वरील रिस्टोरॉंच्या मेड सर्व्हंटला 'पाणी दे' एवढेंच सांगण्याला प्रयास पडले; पण तिनें 'येथें कसचें पाणी? दारू घ्या अगर सोडावाटरसारखेंच सेल्टरवासर घ्या,' असें ह्मटलें. या वेळीं पाण्यावांचून माझें चालणार नाहीं ह्मणून मोठ्या कष्टानें व काकुळतीनें सांगतां, 'आह्मी ग्लेशरचें पाणी फक्त सैंपाकासाठीं आणतों, तें पिण्यासारखें शुद्ध नाहीं, त्यामुळें तें आह्मी देऊं धजत नाहीं' असें तिनें स्वच्छ उत्तर दिलें. झालें! अगदीं कंबरच खचल्यासारखें होऊन एका खुर्चीवर बसलों, व तिनें दिलेली वाटाण्याची सुप—अगर आमटी थोडीशी कशी तरी घशाखालीं उतरवून, तें गिळगिळित लागणारें असमाधानकारक सेल्टरवासर थोडेंसें प्यालों. थोड्या वेळानें ते दोघे इंग्रजहि दमूनभागून आले. त्यांतील एकानें पाण्यासाठीं मजसारखेंच जंगजंग पछाडले, पण व्यर्थ! दारूमध्यें आज इतकीं शतकें बुडालेल्या यूरोपांतील एका गृहस्थालाहि या वेळीं पाण्याचीच आवश्यकता भासली, ही विशेष गोष्ट आहे. असो. नंतर जरा वरती टोंकावर जाऊन, पोटाची नाहीं तर नाहीं, पण डोळ्यांची व मनाची यथेच्छ तृप्ति करून घेतली! मागें नीजेन (नीजेन २३६६ मेटर उंची) शिखरावरून पाहिलेल्यासारखाच, त्याच शिखरांचा देखावा पाहिला; पण हा अधिक जवळून व जास्त उंचीवरूनचा

असल्यामुळें याचा पल्ला अधिक लांबवर पोंचत होता. शिवाय नीजेन-वरून न दिसणारें * फीयरवाल्डस्टेटरसे अगर चार जिल्ह्यांचें सरोवर व त्याच्या भोंवतींचे पिलाटुस, रिगी हे पर्वत फाउल्हॉर्न्वरून चांगले दिसले, आणि अंतर थोडें असल्यामुळें बर्फाच्छादित शृंगांची व ग्लेशर्सची शोभा अपूर्व भासली. शेवटीं, या सगळ्याला 'तो पहा मी ज्यावर चाललों तो आयगर ग्लेशर! तें पहा श्रेकहॉर्न व फींशरहॉर्न्, ज्यांच्यामागून अगदीं जवळ बर्फसमुद्रांत मी गेलों होतों!' या ताज्या आठवणीची जोड मिळाल्यानें तर अप्रतिम मोहकपणा आला होता. शिल्टहॉर्न् (१९७३ मेटर) वर जाण्याच्या आड धुकें आलें; फाउल-हॉर्न्च्या आड दुखरा पाय येण्याची भीति होती. पण ती तशीच मागें सारून गेलों, व इतक्या लांब प्रवास केल्याचें सार्थक झालें, असें वाटलें. पावणेदोन तास तेथें होतों. शेवटीं एका बांकावर आडवा होऊन पाठीला चांगलें उन्ह दिलें. डोंगराच्या उन्हांत पाठ तापवणें फार आरोग्यकारक आहे, असें इकडचे लोक ह्मणतात; तें कसेंहि असलें तरी घामानें चिंब झालेले आंतील कपडे वाळून माझा मात्र तात्कालिक फायदा झाला ह्मणायचा!

सरासरी चार वाजतां परत फिरलों. या वेळीं मात्र उजव्या पायानें बरेंच अडवलें. त्यामुळें लंगडत, वाटेनें थबकत, विसांवा घेत चाललों. अगदीं शेवटीं शेवटीं रानांत एकटीच एका म्हाताऱ्या बाईची झोंपडी लागली; तेथें दूध व थोडी विश्रांति घेतली. 'जातांना येथें मला कोणीं दिसलें नाहीं!' असें मीं ह्मणतांच 'नव्हतें तर नव्हतें, तुह्मी स्वतः चरवींतून दूध ओतून घेऊन प्यायचें होतें,खालीं फळ्यांवर पाय वाज-वले असतेत, ह्मणजे मी आलें असतें; अगर तुह्मी पैसे टेबलावर ठेवून पुढें जायचें होतें,' असें ती ह्मणाली. भोळी बिचारी! स्वतः-सारखेच साधे सर्व लोक असतात अशी तिची समजूत असल्यास

* याच सरोवराच्या कांठच्या ल्यूसर्न् शहरहून हें पत्र लिहिलें जात आहे.

काय नवल आहे ? मी कोठला, कोठून आलों वगैरे विचारून घेतल्या-वर 'एकूण माझ्या ह्यातारीच्यापेक्षांहि तुह्मी इतके तरुण असून खूब फिरलां, अं !' असें तिनें आपलें आश्चर्य प्रगट केलें. सभोंवारच्या पांच-चार खेड्यांत दूध वगैरे विकत घेणें अगर विकणें एवढ्यापुरताच तिचा ह्यातारीचा प्रवास होता, हें येथें सांगितलें पाहिजे.

या आठ तासांच्या पायपिटींत खरीं खरीं आल्पाइन् खेडीं कशीं असतात, हें पहायला सांपडलें. लाउटरब्रुनेन्, म्युरेन्, ग्रिंडेलवाल्ड हीहि खेडींच; पण त्यांतील घरें, रस्ते, माणसेंहि इतकीं बदलून गेलीं आहेत, कीं, त्यांनां खेडीं ह्मणणें जिवावर येतें. पण खरीं खरीं डोंगरी खेडीं, कीं जेथें शहरचें वारें अजून फिरलें नाहीं व पुढेंहि फिरणें शक्य नाहीं, व जेथें गवत किंवा देवदारु झाडें—तींहि २५०० मेटरच्यावर विरळाच वाढतात, जों जों उंच जावें तों तों गरीब नम्र गवत मात्र वर वाढलेलें दृष्टीला पडतें,—याशिवाय दुसरें होतच नाहीं, अशा उंच अव-घड ठिकाणीं पहायला मिळालीं. पांचपंचवीस घरांपेक्षां जास्ती घरें येथें नसतात. हीं घरें—अगर झोंपड्या ह्मटलें असतां जास्त शोभेल—केवळ देवदारूच्या फळ्यांचीं ( अगर एकाद्या बाजूला लांब पण अरुंद तुळया एकावर एक रचलेल्या कोठेंकोठें सांपडतात ) असतात. वरचें छप्पर बारीक फळ्यांचें असतें, व वादळांत त्या उडून जाऊं नयेत ह्मणून त्यांवर मोठमोठे धोंडे ठेवलेले असतात. फळ्यांचें एक खाटलें, त्यावर उबेसाठीं पुष्कळसें वाळलेलें गवत, व तें फारसें टोंचूं नये ह्मणून एकादें फाटकें ब्ल्यांकेटाचें रकटें, असा एक बिछाना एका बाजूला; दुसऱ्या बाजूला चूल व जवळ जळाऊ लांकडांचा ढिगारा; तिसऱ्या बाजूला कपाटाचें काम भागवणाऱ्या, कांहीं वस्तू ठेवण्यासाठीं एकावर एक टांगलेल्या दोन फळ्या, व दाराकडच्या बाजूला बर्फ तुडवून ओले झालेले बूट व कपडे वाळवण्यासाठीं खिळे, हा या झोंपड्यांतला सारा संसार असतो ! साऱ्या दिवसभर गायींमागें ज्यांनां फिरायचें, त्यांनां

खुर्च्या, टेबलें, स्टुलें यांची काय जरूर? गायींचे व डुकरांचे गोठेहि असेच लांकडी असतात. दारांची वगैरे जरूर पडत नाहीं; आंत गुरें कोंडून दार लावलें ह्मणजे चांगला बंदोबस्त राहतो. गोठ्याच्या एका भिंतीला बाहेर आणखी फळ्या आडव्या मारून शेणासाठीं जागा केलेली असते. सकाळीं दूध काढलें, ह्मणजे तें दोनपासून तीन फूट उंचीच्या, पाठीवर घेण्यासाठीं एका बाजूनें मुद्दाम चपट्या केलेल्या पिंपांत भरून, मोठीं मुलें व पुरुष यांच्या पाठीवर, जवळचें मोठें खेडें अगर शहर येथें रवाना होतें. एवढाच व अतिशय साधा, कमी भानगडीचा उद्योग यांनां असल्यामुळें हे लोकहि साधे असतात. व्यवहारांतल्या भानगडी, लुच्चेगिऱ्या ठाऊक होण्याचे प्रसंग यांनां कमी येतात. यामुळें यांचा साधेपणा कधींकधीं वेडगळपणासारखाहि भासण्याचा संभव असून, कितीएक परके प्रवासी या लोकांनां ‘ डुम, स्टयुपिड् ’ अगर वेडगळ असें विशेषण देतात. मला मात्र तसें वाटत नाहीं. हॉटेलें हीच ज्यांची मुख्य वस्ती, व प्रवाशांकडून पैसे काढणें हाच जेथील लोकांचा धंदा, अशा बाझल्, बर्न्, लोसान्, जिनीव्हा, ल्युसर्न्, झ्यूरिच् आदि शहरांत व इंटरलाकेन्, लाउटरब्रुनेन्, ग्रिंडेलवाल्ड, शामूनी आदि शहरवजा खेड्यांत मात्र व्यवहार, भानगडी, धूर्तपणा, लबाडी—काय वाटेल तें ह्मणा—पूर्णपणें भरलेलें आहे. तेव्हा स्विसलोकांविषयीं माझें मत जर कोणीं विचारलें, तर मला वरीलसारखें वर्गीकरण करावें लागेल. असो.

नंतर दमून येऊन, गुडघे व खालचे पाय कढत पाण्यानें शेकून साडेआठ वाजतांच निजलों. अति श्रम झाले ह्मणजे झोंपहि स्वस्थ येत नाहीं! दुसऱ्या दिवशीं ह्मणजे रविवारीं निघून, गाडीनें इंटरलाकेन् व लगेच पुढें बोटीनें ब्रीएन्झर्—से (ब्रीएन्झचें सरोवर; ज्या दोहींच्यामध्यें इंटरलाकेन आहे, त्यापैकीं वरचें ह्मणजे पूर्वबाजूचें हें सरोवर होय.) वरून ब्रीएन्झ या खेड्याला आलों व पुनः कांहीं न करतां तोहि दिवस विश्रांति घेतली; फक्त या पत्राचा पहिला भाग तेथें लिहिला.

झ्यूरिच्, ८ सप्टेंबर १९११

ल्युसर्न्हून एक पत्र रवाना करून बुधवारीं सकाळीं साडेदहा वाजतां येथें आलों, व आज अकरा वाजतां ऱ्हाइनचा धबधबा पाहण्यासाठीं शाफहौसेनला जात आहें. तेवढें झालें, कीं, प्रवास संपलाच ह्मणायचा. वाटेंतच बोडन्सरोवर (इं. लेक ऑफ कॉन्स्टन्स्), म्युनिच्, म्यूर्न्बर्ग वगैरे पाहून पुढल्या पत्राच्या वेळेला बहुतकरून लाइप्झिकला जाईन.

ल्युसर्न्ला आपणांला काय दिसेल, याची थोडी कल्पना आधींच मला होती. कारण, फाउलहॉर्नवर जातांना वाटेंत भेटलेल्या इंग्रज गृहस्थांनीं ल्युसर्न् ह्मणजे लंडन व पारिस यांवरहि विशेष आहे, असें सांगितलें होतें. मी ज्या वेळेला शहर (शहर आपल्या अहमदनगर एवढेंहि खरोखर नाहीं!) पाहण्याला गेलों, ती वेळहि संध्याकाळची असल्यानें, सरोवराच्या किनाऱ्यावर नाना रंगांचा नानाप्रकारचा पोषाक करून आणि इतर रीतीनें आपणांला सजवून यूरोप व अमेरिका येथील वृद्ध व तरुण स्त्रीवर्ग आपल्या इष्टमित्रांबरोबर 'हवा खात' फिरत होता. एवढ्याचसाठीं उन्हाळ्याचे हे तीन महिने सरोवराच्या कांठची हवा खाण्यासाठीं ही सर्व मंडळी चोंहींकडून ल्यूसर्न्ला जमत असते, व त्यांचें स्वागत करण्यासाठीं राजवाड्यांनां खालीं पहायला लावणारीं मोठमोठीं हॉटेलें, कूअरसाल् आदि संगीत शाळा, जवाहिरादि ऐषआरामाच्या जिनसांचीं मोठमोठीं दुकानें, विजेच्या दिव्यांनीं शृंगारलेले मुख्य रस्ते व बोटी, होड्या, एअरशिप (आकाशनौका) इत्यादि व इतर करमणुकीच्या साधनांनीं ल्युसर्न् शहर सदां तयार असतें. या सर्व गोष्टी लंडनप्यारिसला आहेत; पण, उत्तम हवा, सरोवरांचें स्वच्छ पाणी (त्याची किंमत या पाहुण्यांनां फारशी नसते, हें मोठ्या दुःखानें सांगावें लागतें!) व या उन्हाळ्याचे तीन महिन्यांत त्यांचा उपभोग घेण्यासाठीं सुधारलेल्या पश्चिमेकडील (अगदीं लांबच्या पश्चिमेकडील तर आधीं!) सर्व देशांचे श्रीमंत, सुखवस्तु,

व विशेषत: फ्याशनेबल पाहुणे एके ठिकाणीं जमणें, हें लंडनपारिसला नाहीं! यामुळें यूरोपअमेरिकेचें सौंदर्य, समृद्धि, तारुण्य आणि मुख्यत: फ्याशन् हीं सर्व, कांहीं वेळ तरी या नाकपुडीएवढ्या स्थळीं एकवटतात, याबद्दल त्यास अभिमान वाटल्यास वावगें होणार नाहीं. मी जर आल्प्स्मधून नुकताच जाऊन आलों नसतों, तर ल्युसर्न्‌ला या यूरोपीय लोकांच्या 'पुण्यैः हृतमिव दिवः कान्तिमत्खण्डमेकं' असें ह्मणायला चुकलों नसतों; आणि खरोखरच आरबी भाषेंतल्या सुरस व चमत्कारिक गोष्टींतील एखाद्या बादशहाची ऐषआरामी राजधानी साजेल असें हें आहे. पण ज्यांचीं शिखरें आकाशापावेतों जणूं गेलेलीं दिसतात, ज्यांची उंची अनंत, ज्यांवरचें बर्फ अनंत, ज्यांचें नैसर्गिक वैभव अनंत, ज्यांची शांति-गांभीर्य अनंत, व ज्यांचें किंचित् औदासीन्यहि अनंत, अशा आल्प्स्पर्वतांतून नुकताच मी जाऊन आल्यानें मला या शहरांतील सर्व नश्वर गोष्टींचा कंटाळा आला. मुंग्यांसारखीं गजबजणारीं माणसें, त्यांचें मधमाशांपेक्षां कर्कश गुणगुणणें, फुलपांखरांच्या नैसर्गिक वर्णवैचित्र्याशीं स्पर्धा करूं पाहणारे पोषाक, व गाणें, नाचणें, नाटक पाहणें, नट्टनथट्टून बोटी-होड्यांतून सरोवरावर अगर रस्त्यावर फिरून एवढा मोठा सोन्यासारखा दिवस अशाच आणखी रिकामटेंकड्या उद्योगांनीं कसा घालवावा ही त्यांची विवंचना, हें सर्व पाहून, सृष्टीच्या स्वानंदसाम्राज्यांतून मृत्युलोकींच्या नानाखटपटींत आपण येऊन पडलों आहों, असें वाटे. ल्युसर्न्‌ला तीनचार दिवस राहूं, हा आपला पहिला विचार बदलून, थोडा विसांवा मिळाल्याबरोबर येथून पाय काढण्याचें मीं ठरविलें, व दीड दिवसांतच गाशा गुंडाळला.

आतांपर्यंत टाळलेल्या कूअर्हौसच्या तडाक्यांत मात्र ल्युसर्न् येथें सांपडलों. येथल्या कूअ हौसमंडळीचा असा नियम आहे, कीं, एका रात्रीपेक्षां अधिक मुक्काम ज्याचा होईल, अशा प्रत्येक पाहुण्यानें कूअर्-तिकिट घेतलेंच पाहिजे. नाहीं तर ज्या हॉटेलमध्यें त्या पाहुण्याचा

मुक्काम असेल त्याच्या मालकानें रोज ठरलेली रक्कम दंडादाखल आकारावी ! झालें ! मला सांपडलों तडाक्यांत ! फुकट दंड भरण्याऐवजीं एकदां तेथें जाऊन एकादा फ्रांक खर्चण्याचें ठरविलें व मंगळवारीं रात्रीं साडेआठला कॉन्सर्टहॉलमध्यें गाणें ऐकायला गेलों. कांहीं थोडें समजे, तेवढ्यापुरतें बरें वाटे. नवांनंतर मंडळी बरीच जमली. तेथें गाणें ऐकत बसणें फुकटचें नाहीं. तिळाला गूळ बोळवण, या न्यायानें कांहीं तरी प्यायला घेतलें पाहिजे, असा शिष्टाचार आहे, व तो इकडील पानप्रिय लोकांच्या पथ्यावरच आहे. 'तुह्मी काय पिणार?' ह्मणून एका दासीनें विचारतां 'मी (दारू) पीत नसतों,' असें सांगितल्यावर ती नाक मुरडून पुढें गेली. तेथें स्वस्थपणें बसून मला फशशनचें सूक्ष्म निरीक्षण करायला सांपडलें. तें येथें सांगत बसत नाहीं. मागें प्रसंगानें कांहीं मासले दिले होते, पुढेंहि ओघानें यायचे असल्यास येतील. फक्त मला एक पटणारा ह्मणजे स्कार्फ् अगर शेलेवजा एक रेशमी (क्वचित् जरीचेंहि) पटकूर वापरण्याचा प्रकार होय. पटकूर ह्मणण्याचें कारण हा झिरझिरीत स्कार्फ् धड लांबहि नसतो व रुंदहि नसतो. याचा रंग वाटेल तो असेल. पण तो फिकट असला पाहिजे. कोणी हरिदासासारखा हा पुढें सोडतात; कोणी खांद्यावरून घेऊन यानें पाठ झांकतात; कोणी डोक्यावरील टोपल्यावरून घेऊन पुढें हनुवटीखालीं गांठ देतात; कोणी अगदीं शेला पांघरावा तसा वापरतात; हें संवयीचें असल्यामुळें मला बरें दिसलें. असो. इतक्यात मंडळी एकामागून एक एका मोठ्या दिवाणखान्याकडे जाऊं लागली. मीहि औत्सुक्यानें गेलों. तों एका खूब लांब व दीडहात रुंदीच्या टेबलाभोंवतीं ही गर्दी जमलेली ! त्या टेबलाच्या मध्यभागीं निमूळतें रंगण असून त्यांत भोंवताहून दुहेरी गलीसारखीं भोकें होतीं व त्यांनां नंबर होते. हेच नंबर टेबलाच्या दोन्ही बाजूंवर आंखलेल्या चौकटींतून सळमिसळ करून मांडले होते. या नंबरांवर मंडळी पैसे ठेवीत होती, व एक माणूस मधल्या रंगणांत एक चेंडू टाकीत होता.

तो ज्या ज्या गल्लींतून जाईल त्या त्या नंबरांचे पैसे परत मिळत. जेथें विश्रांति घेईल त्यास दुप्पट पैसे परत मिळत; बाकीच्यांचे अर्थात् कुअर्‌हौसला जमा ! या फ्याशनेबल खेळाला जुवेगिरी कोणीं ह्मणावें ? 'ही एक सहज हलक्लीशी करमणूक आहे; पैसे लावले ह्मणून काय झालें ? मोठे लोक कोठें जुवा खेळत असतात का ? तेव्हां हा जुवा खास नव्हे.' अशी मीं आपल्या मनाची बळेंच समजूत करून घेऊन तेथून पळालों, व घरीं येऊन स्वस्थ झोंप काढली. पहांटेपहांटे उठतांना मृच्छकटिकांतील दुसरा अंक स्पष्ट डोळ्यांपुढें उभा राहिला !

## झ्यूरिच.

असो. याप्रमाणें ल्युसर्न्-फ्याशनेबल ल्युसर्न्-थोडेंसें पाहून, बुधवारीं सकाळीं त्याला नमस्कार ठोकला व येथें आलों. स्टेशनांतून बाहेर आल्याबरोबर पहिली विवंचना हॉटेलची ! या पाळीला असें कांहीं झालें, कीं, जेथें जावें तेथें 'आतांच खोल्या भरल्या,' अगर, 'शंभराव्या मजल्यावर एक लहानशी खोली आहे ती घ्या पाहिजे तर,' अशीं उत्तरें मिळत. शेवटीं ही भिक्षांदेही एक तासानंतर या हॉटेलांत आलों तेव्हां आटपली. पुण्याला प्लेगमध्यें हातचें घर सोडून बाहेर झोंपडींत रहायला जावें, व प्लेग आटपल्यावर 'जागा आहे का हो ?' करीत दारोदार फिरावें, यापैकींच हा एक प्रकार ! नंतर शहरांत भटकलों. खरेंच, या भटकण्याचा आतां मला कंटाळा आला आहे, व शहरें तेथून साधारण सारखींच, त्यांत पहायचें तरी काय, असें वाटूं लागलें आहे. कांहीं विशेष असेल तें उरकून घेऊन पुढें जावें असा आतां क्रम ठेवून आठ दिवसांत परत घर पहायचें, असा संकल्प मीं केला आहे.

गुरुवारीं सायंकाळीं मीं झ्विंग्लीम्यूझियम पाहिलें. यांत या ख्रिस्तधर्मसुधारकाचे हस्तलेख, पुस्तकें, स्वत:जवळ ग्रीक् बायबल विकत घेण्या-

पुरते पैसे नाहींत ह्मणून लोकांचें पुस्तक उसनें घेऊन त्यावरून स्वत: त्यानें उतरून घेतलेलें पुस्तक, वगैरे त्याच्यासंबंधाच्या अनेक गोष्टींचा संग्रह आहे. फ्रेंच सुधारक काल्व्हिन् (काल्व्हँ), जर्मन ल्युथर यांचा त्याच्याशीं झालेला पत्रव्यवहारहि आहे. इंग्लंडची एके वेळीं राणी होऊं घातलेली विदुषी लेडी जेन् ग्रे इचें झ्विग्लीला आलेलें ल्याटिन् पत्रहि नीट जपून ठेवलेलें आहे. धन्य त्या सोळाव्या शतकाचे आरंभींच्या सुधारकांची व धन्य त्यांचें स्मरण व स्मारक वस्तु कायम ठेवणारांची ! शेवटीं क्याथोलिक लोकांनीं झ्विग्लीला ठार मारलें, तेव्हांचे त्याचे शब्द भगवद्गीतेची आठवण करून देतात. 'तुम्ही माझ्या देहाला ठार केलें, तरी माझ्या आत्म्याला मारूं शकणार नाहीं !'

शेवटीं जातांजातां घाईंत येथले प्रसिद्ध संस्कृतज्ञ प्रो. केगी यांची भेट घ्यायची आहे. येथें आल्याबरोबर त्यांनां मीं एक पत्र लिहून भेट घेण्याची व ओळख करण्याची इच्छा दर्शविली. तों गुरुवारीं ते स्वत: दोनदां हॉटेलांत माझ्या पश्चात् येऊन माझा शोध घेऊन गेल्याचें कळलें. दुसऱ्या खेपेला त्यांनीं आपला एक पाहुणा बरोबर आणला होता, व मला घेऊन झ्यूरिचर् सरोवरावर बोटिंग् करण्यासाठीं जाणार होते. यामुळें मला वाईट वाटलें व लगेच मीं त्यांनां 'शुक्रवारीं सकाळीं साडेआठला भेटतों; आपण पुन: येण्याची तसदी घेऊं नका,' असा टेलिफोन केला. त्याप्रमाणें वेळेवर गेलों, तों दासीनें दिवाणखान्यांत नेऊन बसविलें. ऋग्वेदाचा अभ्यास करतांना यांच्या ऋग्वेदावरील पुस्तकाचें इंग्रजी भाषांतर वाचून यांजविषयीं माझ्या मनांत आधींच एकप्रकारचा पूज्यभाव उत्पन्न झाला होता; व ह्मणून तर यांनां प्रत्यक्ष पाहण्याची संधि वायां जाऊं द्यायची नाहीं, असा निश्चय केला होता. थोड्या वेळानें प्रोफेसर आंत आले व त्यांनीं माझें स्वागत केलें. ठेंगणी व जरा स्थूल वाटणारी ही मूर्ति हंसतमुख व शांत असल्यामुळें, माझा संकोच तेव्हांच गेला. नंतर संस्कृत, विशेषत:

वेद, वेदाच्या अभ्यासाचें हल्लींचें स्वरूप वगैरे विषयांवर गप्पा झाल्या. 'तुह्मी सध्यां काय करतां, पुढें काय करणार?' वगैरे प्रश्नांचें मीं शक्य तेवढें व योग्य तें उत्तर दिलें. सरासरी एक तासभर बसलों होतों. यांचें भाषण मधुर होतें, पण स्विस् उच्चार कानाला प्रथम चमत्कारिक वाटत; प्रत्येक ठिकाणीं जर्मनचा खरखरीत उच्चार ऐकून हवापाण्याचा वाणीवर कसा परिणाम होतो, याचा प्रत्यय आला.

**म्यूनिच्**, १२ सप्टेंबर, १९११.

झ्यूरिच्हून निघतांनिघतां टाकलेलें पत्र पावलेंच असेल. तेथून जर्मनी व स्वित्झरलंड यांच्या सरहद्दीवर र्‍हाइन नदीच्या कांठीं असलेल्या शाफहौसेन खेड्यांत शुक्रवार ता. ८ रोजीं १ वाजतां आलों. येथून ४० मिनिटांवर र्‍हाइन नदीचा धबधबा आहे. तो पाहण्यासाठीं तीन वाजतां गेलों. पलीकडच्या तीरावर खडकावर बांधलेला 'लाउफेन्' नांवाचा लहानसा किल्ला अगदीं धबधब्यावर असल्यामुळें, तेंच पाहण्याचें मुख्य ठिकाण झालें आहे. त्याच्या दरडीवरील बागेच्या पायथ्याशीं गेलें ह्मणजे धबधब्यापासून अर्ध्या हाताच्या अंतरावरून तो पाहतां येतो. हा फार उंच नाहीं; पण अतिशय जोराचा असल्यामुळें धो धो आवाज व खडकावरून आदळणाऱ्या पाण्याचा फेंस व तुषार हीं पाहण्यासारखीं व ऐकण्यासारखीं आहेत. पण सर्वांत उत्तम देखावा धबधब्यासमोर राईतील रस्त्यावरून दिसतो. येथें मी दोन तास बसलों. मागें निरभ्र निळें आकाश, त्याला लागून वाढल्यासारखे दिसणारे व ऋतुमानानें ज्यांचीं अग्रें, पानें पिकून पिंवळसर तांबडीं दिसत असे मोठे वृक्ष, तेथून खडकाच्या दुसऱ्या बाजूवर गेलेला आठ कमानीचा आगगाडीचा पूल, त्या कमानींतूनच जणूं निघणारें फेंसमय शुभ्र पाणी, व तुषारावर सूर्यकिरण पडल्यामुळें दिसणारीं दोन इंद्रधनुष्यें अशी ही एकवटलेली शोभा पहावी तितकी थोडीच! जों जों

संध्याकाळ होत चालली तों तों भोंवतालचें सृष्टिवैभव सौम्य व शांत भासूं लागलें. सूर्यास्ताचे कांहीं आधीं मी तेथून उठून शापहौसनकडे जाऊं लागलों.

इतक्यांत एक अपरिचित गोरा दिसणारा गृहस्थ पुढें येऊन 'तुम्ही पौर्वात्य विशेषतः हिंदी आहांत काय?' असें विचारूं लागला. अशा स्थळीं असें कोणी एकदम येऊन असा प्रश्न विचारील, हें स्वप्नींहि नसल्यामुळें किंचित् आश्चर्यचकित होऊन मी त्याच्याकडे नीट पाहूं लागलों, तों त्याच्याहि चेहेऱ्यावरील पौर्वात्य झांक नजरेला पडली; पण तो हिंदी आहे असें मात्र मन सांगेना! मग त्याच्या प्रश्नाचें उत्तर देतां, 'तुम्हाला पर्शियन भाषा येते काय?' म्हणून त्यानें पुनः विचारलें. मीं नाहीं म्हटल्यावर, त्यानें इराणांतून वैद्यक शिकण्यासाठीं आपण इंग्लंडांत कसे गेलों, तेथें कंटाळून परतणार तों ब्रिटिश म्यूझिअम्-मध्यें इराणी वकिलानें कसें लावून दिलें वगैरे हकीगत सांगितली, व 'येथें (शाफहौसेन) एका किल्ल्यांत आशियांतील उत्तम हत्यारें व इतर कलाकौशल्याच्या कामाचें खाजगी संग्रहालय असून त्याचें टिपण करण्यासाठीं मला बोलावलें असल्यामुळें तें माझ्याच ताब्यांत आहे, तरी तुम्हीं तें अवश्य पाहिल्यावांचून जाऊं नका, खाजगी आहे, तरी माझ्या हातीं त्याच्या किल्ल्या आहेत, तुम्ही चलाच!' असा त्यानें आग्रह मांडला. 'तुम्हाला उद्यां जाणें भाग आहे,' म्हणून सांगतां, 'तर मग आतां कसेंहि करून चलाच!' असें त्यानें पुनःपुनः म्हटल्यावर पूर्वेकडील मनःपूर्वकपणाचा तो आग्रह पाहून मींहि कबूल केलें व गेलों. शार्लोटनफेल्स् नांवाच्या त्या खाजगी किल्ल्यांत अगर वाड्यांत गेलों, तों खुर्च्या, टेबलें, सतरंज्या, भिंतीवरील पडदे, खिडक्यांचे पडदे वगैरे सर्व सामान आशियांतील! नंतर दावूदनें (हें त्या गृहस्थाचें नांव) संग्रहालयांत नेलें; तों चोंहींकडे तरवारी, खंजीर, चिलखतें वगैरे भिंतीला लटकावून अगर टेबलांत ठेवलेलीं दृष्टीस पडलीं. त्यांच्या मुठी जडा-

वाच्या असून इतक्या चमकत, कीं कांहीं विचारूं नये. यांपैकीं कांहीं मॉ. मोझेभ् ( संग्रहालयाचा मालक ) याला इराणचा शहा, त्याचे सरदार वगैरे मोठमोठ्या लोकांनीं नजराण्यादाखल दिल्या होत्या व बहुतेक त्यानें स्वतः मध्यआशियांत असतां वाटेल ती किंमत देऊन खरेदी केल्या. रशियाची पूर्व तुर्कस्थानाशीं लढाई झाली, तींत हा गृहस्थ रशियाच्या बाजूनें लढला होता; पुढें स्वित्झरलंडकडून इराण व जवळचे प्रांत येथें वकील ह्मणून असे. त्यामुळें त्याला संधि उत्तम मिळून त्यानें या वस्तु घेण्याचा उपक्रम चालविला. तरवार, सुरी, खंजीर, बंदूक, चिलखत, निशाणें, पडदे, नकशीचें काम, जें जें चांगलें दिसलें तें तें यानें जमवलें. या वस्तूंपैकीं बऱ्याचशा हिंदी बादशाहा व महाराणे यांच्या वेळच्या व मालकीच्या आहेत. तें हिंदी कड्यांचें चिलखत, गेंड्याच्या कातड्याची ढाल, लांब समशेर, छातीवर गेंड्याच्या कातड्याचा उभा पट्टा, शिरस्त्राण हीं सर्व पाहून मला आनंद झाला. ज्या वेळीं हीं केलीं व वापरलीं गेलीं, त्या वेळचीं यूरोपांतील ओबड-धोबड व अवजड चिलखतें, हत्यारें यांची कल्पना येताच ( हीं मीं बर्लिन वगैरे ठिकाणीं पाहिलीं आहेत हें सांगणें नकोच. ) धन्य वाटे. त्या वेळी पुष्कळ बाबतींत आपण 'पश्चिमे'च्या पुढें होतों; पण नंतरच्या भानगडींनीं व कांहीं अंशीं स्वतःच्या शिथिलपणानें, आत्मविश्वासाच्या अभावानें आज आपण पश्चिमेच्या पुष्कळ मागें आहों, ही कल्पना लगेच मनांत येऊन किंचित् खेद वाटला.

असो. याप्रमाणें एक तास तेथें पहात फिरत होतों. शिराज येथें निदान चारपांचशें वर्षांपूर्वीं बनवलेल्या त्या चपल तरवारींचें अस्सल पाणी पाहून हल्लींच्या कितीहि उत्तम पाण्याच्या यूरोपीय हत्यारांची किंमत वाटणार नाहीं ! हिंदी तरवारी, खंडे, खंजीर, कट्यारी यांचेंहि पाणी वाखाणण्याजोगें होतें. एका कोंपऱ्यांत एका लढाऊ नबाबाचा मेणाचा पुतळा होता; घोडा व स्वार यांच्या अंगावर नखशिखांत



‘प्राच्य शस्त्रास्त्रांचा म्यूझियम्,’ शाफहौसेन्.

चिलखत असून नबाबाच्या आंगावर वरून तांबडा भरजरी पायघोळ आंगरखा होता. हें चित्र मोठें भव्य दिसलें व लढाय्पे नबाब कसे सजत असत, याची कांहींशी कल्पना आली. नंतर दुसऱ्या खोलींत गेलों. तेथें इतर वस्तु ह्मणजे तऱ्हेतऱ्हेचीं नक्षी काढलेलीं भांडीं, स्त्रियांचे वगैरे ऐषआरामाचे पोषाक, व कुराण, शाहनामा आदि मुसलमानांना पूज्य असलेल्या ग्रंथांच्या सोनेरी चित्रांनीं सजवलेल्या हस्तलिखित प्रती, हीं सभोंवार कपाटांतून नीट ठेविलीं होतीं. या हस्तलिखित प्रती सरासरी १६ व्या शतकांतील आहेत. त्यांत आंगठ्या-एवढी 'श्रीमद्भगवद्गीतेची' सुरळी हस्तिदंती डबींत जपून ठेवलेली पाहून मला आश्चर्य वाटलें! अतिशय बारीक पण सुंदर व सुवाच्य अक्षरांत ही लिहिली असल्यामुळें ती मला थोडी वाचतां आली. नंतर आणखी एक दिवाणखान्यासारखी बसायची खोली पाहिली; ही पौर्वात्य वस्तूंनींच पण अपूर्व शृंगारली असून, छताच्या बाजूनें रंगाच्या तावदानांतून न दिसणारे विजेचे दिवे लावले ह्मणजे फारच सुंदर दिसे. ही दाखवितांना दावूदाला जो हर्ष होत होता, तो विचारूं नये! त्याला जणूं उकळ्या फुटत होत्या! ही दाखविण्यापूर्वीं 'तुह्माला नंदनवनांत यायचें आहे काय?' असें तो एकाद्या वेड्या माणसा-सारखें ओरडला. नंतर मिसेस् मोझेअर् आली. तिची ओळख त्यानें करून दिली. मी हिंदी असें कळल्यावर, 'तर मग हिंदी वस्तूंच्या कामीं तुह्मी आह्मांला चांगली मदत करूं शकाल; उद्यां पुनः याल काय?' असें तिनें विचारलें. हें खाजगी संग्रहालय केवळ कर्मधर्म संयोगानेंच पहायला मिळालें ह्मणायचें! मला तें पाहून अत्यंत समाधान झालें.

दुसऱ्या दिवशीं ह्मणजे ता. ९ सप्टेंबर शनिवारीं म्यूनिच्कडे येण्याला निघालों. वाटेंत फ्रीड्रिश् हाफेन् ह्मणून गांवीं झेफेलिनच्या आकाश-नौकांचें कार्यालय पहावें ह्मणून कॉन्स्टन्सहून बोटीनें बोडनसे नांवाच्या

सरोवरावरून गेलों. पण तें कार्यालय पहायला न मिळून निराशा झाली, व तसाच पुढें गाडीनें संध्याकाळीं म्यूनिच्‌ला आलों.

अशा ठिकाणीं आल्यावर माझ्या नेहमींच्या रीतीप्रमाणें इतर कांहीं न करतां मुख्य व्यापाराचे दोनतीन रस्ते व अत्यंत दळणवळण जेथें असतें असे दोनतीन चौक इकडे फिरलों. अशानें शहरच्या एकंदर लोकांची साधारण बाह्य कल्पना येऊं शकते. उदाहरणार्थ, येथील वरच्या दोन वर्णांनीं टाकाऊ ह्मणून सोडलेली, पण फक्त खालच्या वर्गानें कायम राखलेली विशिष्ट पोषाकाची रीत, जिला 'बायरिश ट्राख्ट्' (Bavarian mode of dress) ह्मणतात ती पहायला सांपडली. पायांत जोडबूट, पोटरीवर बुटापर्यंतहि न पोंचणारे लांडे हिरव्या नक्षीचे पोटरी-मोजे, गुडघ्याच्या वरपर्यंतच पोंचणारी साधारण मळकट तपकिरी रंगाची विजार, वरती मळक्या स्वेटरवर मोठ्या बटनांचा कॉलरवांचून व पुष्कळ पट्टे असलेला कोट, व बाजूला कसला तरी पिसारा असलेली उभट वांकडी टोपी, असा या खालच्या वर्गांतील पुरुषांचा पोषाक असतो. बायकांच्या झग्या-जाकिटांत फारसा फरक नसला तरी डोक्यावर जी काळी टोपी असते, ती दुरून हत्तीच्या विशाळ कानांसारखी दिसते, व तिच्यामागून पाठीवर लांबच लांब दोन पट्टे सोडलेले असतात. कांहीं टोप्या दुरून काळ्या बाशिंगासारख्या दिसतात व यांनां दोन्ही बाजूंनीं खांद्यांच्या मागें लोंबणारे काळे गोंडे असतात. असो. या म्यूनशेन्‌च्या विचित्र गर्दींत मला ज्यूलोक फार दिसले. काळेपिंवळे लोक इकडे फारसे येत नाहींत ह्मणून, अगर माझ्या नखशिखांत पांढऱ्या पोषाकामुळें ह्मणा, कसेंहि असो, पण जाणारेयेणारे लोक मुद्दाम थबकून वळून मजकडे पहात उभे रहात.

सगळ्या जर्मनींत क्याथॉलिक लोकांचा भरणा बराच असल्याचें मीं मागें लिहिलेंच आहे. एकंदर लोकसंख्येच्या $\frac{2}{3}$ हे आहेत; व

ते बहुतेक दक्षिणजर्मनींत व विशेषतः बव्हेरिया (जर्मन नांव 'बायर्न -Byern) प्रांतांत आहेत. खुद्द म्यूनूशेन्‌मध्यें तर प्रॉटेस्टट लोक ½ सुद्धां नसतील! ह्मणूनच येथील सारीं देवळें क्याथॉलिक आहेत व तीं बहुतेक पावलापावलीं भेटतात! रविवारीं सहज 'फ्राउबेन् किर्श' नांवाच्या जुन्या प्रसिद्ध देवळांत तीनच्या सुमाराला गेलों. तीं 'गोटेस डीन्स्ट्' ह्मणजे अर्चेची वेळ होती. प्रत्येक दाराच्या आंत शिरल्याबरोबर दोन्ही बाजूंस पाण्यानें भरलेलीं दोन उथळीं होतीं. जो कोणी आंत जाई, तो यांतील पवित्र पाणी मार्जनासारखें किंचित् उडवून कपाळा-वर व छातीला लावी; व नंतर पुढें जाऊन उजवा गुडघा वांकवून अगर वांकवलासें करून, थोडें पुटपुटून मग लगेच बाहेर जाई. मी मात्र अर्चा पाहण्यासाठीं थांबलों. लगेच वेदीच्या उजव्या बाजूनें, पाय-घोळ रेशमी झगा घातलेला उपाध्याय व हातांत दोन जळत्या जाड्या मेणबत्त्या घेतलेले दोन चेले अशी मिरवणूक गंभीरपणें वेदीपुढें येऊन वर चढली, व जेथें क्रॉस व येशूची मूर्ति होती तेथें थबकली. लागलीच तिघांनींहि वेदीपुढें गुडघे टेंकले आणि उपाध्येबोवांनीं मोठ्यानें मंत्र पुणगुणण्यास सुरुवात केली. नंतर तिघे उठून वेदीच्या डाव्या हाताला आसनाकडे वळले. गुरुजी त्यावर बसले व शिष्य जळत्या मेणबत्त्यांसह बाजूला उभे राहिले. नंतर समोरच्या सज्जांतून ऑरगेल—वाद्य सुरू झालें. त्यांतहि उपाध्येबोवांचें अस्पष्ट पण मोठमोठ्यानें गुणगुणणें ऐकूं येत होतेंच! मग मी कंटाळून तेथून परतलों. या वेळीं देवळांत माणसें तुरळकच होतीं. अकरा वाजतांच्या अर्चेच्या वेळेप्रमाणें (फ्रांक-फुर्टला ही अर्चा पाहिल्याचें मीं लिहिलें आहेच.) हें क्याथॉलिक देऊळ भरलें नव्हतें. असो. दुसऱ्या एका बासिलिका नांवाच्या देवळांत दुसरे दिवशीं गेलों. तेथें एका टेबलावर पेन्सिलीनें लिहिलेलें 'टागेस् गेबेट्' अगर रोजची प्रार्थना मीं पाहिली. खालीं उपाध्यायाची सही होती. प्रार्थना दोनच वाक्यांची होती; पण खालची फलश्रुति गमतीची होती.

'जो कोणी ही प्रार्थना रोज करील, त्याचीं सर्व पापें क्षालन व सर्व इच्छा सफल होतील.' असो. अशा गोष्टी लिहाव्या तितक्या थोड्या आहेत.

म्यूनशेन् हें व्यापारासाठीं प्रसिद्ध आहेच; पण येथील मुख्य उद्योग ह्मटला ह्मणजे बीयर् तयार करण्याचा ! म्युनशनर बीयर् साऱ्या जर्मनींत फार प्रसिद्ध आहे. बीयर–गिरण्या गांवाच्या दक्षिणभागांत इतक्या आहेत, कीं, आज सकाळीं तिकडे सहज पाहतों, तों 'दाट धुकें पडलें आहे काय!' असें मला वाटलें ! प्रत्येक रिस्टोरॉंची एकाद्या विशिष्ट प्रकारच्या बीयरविषयीं ख्याति, व त्या सगळ्यांतून दिवस उगवल्यापासून बऱ्याच रात्रपावेतों खूब गर्दी ! येशूनें आपल्या शेवटच्या जेवणाच्या वेळीं शिष्यांनां दारू पुढें करून 'हें माझें रक्त प्या' ह्मणून तिचे घोंट घेण्याला लावलें होतें; हल्लींचे त्यांचे शिष्य ही तेवढी त्याची आज्ञा भरपूर पाळतात, व रिस्टोरॉंरूपी देवळांत तिचें भरपूर पान करतात, यांत काय नवल आहे ? यामुळें बहुतेक स्थूलोदर अगर लंबोदर होऊन अवजड, बोजड दिसतात; व हा गुण (?) त्यांस तेव्हांच निवडून पाडतो. येथील माझ्या चार दिवसांच्या मुक्कामांत बर्लिनसारखा येथें ऑफिसियरांचा सुळसुळाट मला दिसला नाहीं, व येथें खरोखरीच त्यांचे बर्लिनसारखें स्तोम नाहीं !

एकंदरीनें म्यूनिच् शहर मला बर्लिनपेक्षां आवडलें. कलाकौशल्याविषयीं याची ख्याति आहे व येथील दरबारीं हमेश प्रसिद्ध चितारी, नांवाजलेले मूर्तिकार बरेच असतात. त्यामुळें जागजागीं चांगल्याचांगल्या चित्रांचीं प्रदर्शनें पहायला सांपडतात. येथील भाषेला मात्र नमस्कार असो !

कलांच्या समृद्धीनें कृषिकर्म, जनावरांची जोपासना यांनां मागें पाडलें. त्याचा प्रत्यय, सकाळीं भलें मोठें कॉफीपात्र व एक लहानसा दरिद्री दुधाचा पेला हीं समोर आलीं ह्मणजे उत्तम येतो. स्वित्झरलंडांतील दुभत्याच्या समृद्धींतून एकदम येथें आलों, त्यामुळें हा फरक फारच ठळकपणें नजरेला आला.

**लाइपझिक**, १५ सप्टेंबर, १९११,

वरच्या मथळ्यावरून माझा प्रवास संपल्याचें लक्ष्यांत येईलच. बुधवारीं सकाळीं म्यूनिच् सोडलें व न्यूर्नबर्ग वगैरे ठिकाणीं न थांबतां संध्याकाळीं साडेपांचला येथें आलों. घाई करण्याचें कारण असें झालें, कीं, या खेपेला घरचीं पत्रें बुधवारपर्यंत मिळालीं नाहींत. म्यूनिच्ला रोज पोष्टांत जाऊन तपास घ्यावा, पण नकार घेऊन परत यावें लागे. शेवटीं या खेपेला पत्रेंच नाहींत, कीं, घरवालीबाई कोठें गांवास गेल्यामुळें तीं घरीं पडून राहिलीं आहेत, याचा निर्णय करण्याचें ठरवून इकडे धांव घेतली, व दुसराच तर्क खरा ठरला. पण बाईनें माझीं पत्रें म्यूनिच्ला पाठवावीं, ह्मणून दासीला लिहिलेलें पत्र बुधवारीं सकाळींच तिच्या हातांत पडून तिनें लगेच पत्रें म्यूनिच्ला पाठवलीं ! मी इकडे व पत्रें तिकडे ! तीं परत हातीं येईपर्यंत झालेल्या तळमळीची कल्पनाच करावी !

**लाइपझिक**, ८ आक्टोबर, १९११.

परवांच्या पत्रांत माझ्या अभ्यासक्रमाविषयीं आपणांला जिज्ञासा असल्याविषयीं लिहिलेंत, व येथील युनिव्हर्सिटी वगैरेविषयीं विचारलेंत. त्याविषयीं लिहितांना थोडा अप्रासंगिकपणा पदरीं घ्यावा लागला, तरी नाइलाज ह्मणून त्याकडे दुर्लक्ष्य करून, इकडील युनिव्हर्सिटी-शिक्षणांच्या पूर्वतयारीकडे थोडें बघूं.

जर्मनीमध्यें प्राथमिक शिक्षण सक्तीचें आहे, हें आतां नव्यानें सांगायला नको आहे. सहा वर्षांचें मूल ( मुलगा व मुलगीहि ) झालें, कीं, तें शाळेंत गेलेंच पाहिजे, नाहींतर वडील अगर पालकांनां दंड अगर कैद भोगावी लागते ! अशा मुलांसाठीं प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आहेत, त्यांनां 'फोल्क्स्शूल' ह्मणतात. येथें चारपासून आठ वर्षें मुलांनां शिक्षण मिळतें. अर्थात् प्रथम थोडे, सोपे व अत्यंत

उपयोगाचे असेच विषय–ह्मणजे धर्म, जर्मन लिहिणें वाचणें, साधें गणित, गाणें व थोडेंसें ड्रॉइंग–वरच्या वर्गांत सृष्टिशास्त्र–हे असतात. सक्तीचें असल्यामुळें हें शिक्षण मोफत आहे, हें सांगणें नकोच. एकंदर खर्चाचा एकतृतियांशवर सरकार देतें, व बाकीचा खर्च 'गेमाइंड' अगर हिंदुस्तानांत माहीत असलेल्या शब्दांत सांगायचें ह्मणजे 'लोकल बोर्ड' करतात. या दोनतृतियांशचा बराच मोठा भाग जमीनदारादि पैसेवाल्या लोकांवर पडतो, हें बरें आहे. सरकारची नजर यांवर बरी असल्यामुळें, छडी हीच विद्यादेवीची भक्कम किल्ली अशा कल्पनांच्या तात्या पंतोजींनां अर्थात्च मज्जाव आहे. सर्व शिक्षकांनां शिकवावयाचें कसें याचें उत्तम शिक्षण लेअरसेमिनारमध्यें कमींतकमी दोन वर्षें तरी मिळालेलें असतें. असो.

यानंतरच्या ह्मणजे दुय्यम शिक्षणाच्या शाळांत दोन भेद आहेत. एक, फक्त युनिव्हर्सिटीसाठींच मुलें तयार करणाऱ्या शाळा. यांनां गिमनाझिएन् ह्मणतात. येथें ल्याटिन व ग्रीक यांचें प्राबल्य फार असतें. इतिहास, भूगोल, गणित, शास्त्रादि विषय असतात. जर्मन अर्थात् असतेंच. यांमध्यें शिक्षण फारच श्रेष्ठ प्रतीचें होतें. या शाळांत नऊ वर्ग असून, वरचे दोन वर्ग आमच्याकडील पी. ई. व आय्. ई. च्या बरोबरीचे असतात. उदाहरणार्थ, येथील टॉमसस्कूलमध्यें मी सेकुंडा क्लासांत गेलों असतां (वरून दुसरा वर्ग) सृष्टशास्त्रांतील वेलेन टेओरी (इं. Waves-theory) अगर लहरींचें तत्व मास्तर यंत्राच्या साहाय्यानें समजावून सांगत होता. मी स्वतः इंटरमीजिएटच्या क्लासांत असतांहि या विषयाची अशी माहिती व त्याचा व्यवहारांत उपयोग हीं मला इतकीं ठाऊक नव्हतीं! तसेंच इतर विषयांचें. ल्याटिनमध्यें आपल्या* आय. ई.चेंहि वाचन नसेल इतकें येथील प्रिमानर वरच्या पहिल्या क्लासांतील मुलांचें झालेलें असतें. इतिहासाच्या वर्गांत

* अर्थात् ज्यांनीं ल्याटिन दुसरी भाषा घेतली असेल अशा आय.ई.चेंहि.

फ्रीड्रिश् डेर् ग्रोस ( इं. Frederick the Great ) च्या राजकारणावर मास्तर धडा देत होता, व तो मुलांनां नीट समजत असल्याचें माझ्या तेव्हांच लक्ष्यांत येई. तारखांवरच सर्वस्वी भर इकडे नाहीं! हें सर्व शिक्षण मातृभाषेच्याद्वारें दिलें गेल्यामुळें विशेष सुलभ होऊन मुलांच्या मनावर जास्त ठसतें, हें कोणालाहि समजेल! इतिहास करतांना इंग्रजी शब्द घोंटीत बसण्याचें त्यांच्या कपाळीं नाहीं!

या गिमनाझिएनच्या शिक्षणाला जर्मनींत फारच मान आहे. आपल्याला जन्टलमन् ह्मणण्यांत प्रौढी मारणारा कोणताहि सभ्यगृहस्थ गिमनाझिएन्खालून गेलेला असलाच पाहिजे. दुसरें असें, की, या गिमनाझिएन्मध्यें ८ अगर ९ वर्षें शिक्षण झाल्याचा ज्याला दाखला असेल, अशा तरुणांनां फक्त एकच वर्ष लष्करी शिक्षणांत घालवण्याची सवलत मिळते. बाकीच्यांनां दोन वर्षें काढावीं लागतात. असो. असें सन्माननीय गणलें गेलेलें व असे हक्क ज्यानें प्राप्त होतात अशा या शिक्षणाला यूरोपांतील कोणच्याहि देशापेक्षां कमी खर्च लागतो, ही तारीफ करण्यासारखी गोष्ट आहे. फीसुद्धां दरवर्षी १००पासून १२०मार्क सरासरी असते. यूरोपच्या मानानें ही फारच थोडी आहे, असें ह्मणावें लागतें. तरी गरीब विद्यार्थ्यांनां बहुधा फुकट शिकतां येतें. नवव्या वर्षाच्या शेवटीं शाळेंतच परीक्षा होऊन युनिव्हर्सिटींत जाण्याला योग्य असा दाखला मिळतो, व त्यावरून युनिव्हर्सिटींत प्रवेश होतो. युनिव्हर्सिटीविषयीं जरा पुढें लिहीत आहें.

दुसऱ्या प्रतीच्या दुय्यम शाळांनां 'रे आल गिमनाझिएन्' व 'ओबर् रे आलशूलेन्' ह्मणतात. यांतहि शिक्षण नऊ वर्षांचें असतें. या दोन्हींत व गिमनाझिएन् यांत फरक इतकाच, कीं, पहिल्यांत ल्याटिन्-ग्रीकबरोबरच इंग्लिश-फ्रेंच या नव्या भाषा असतात, व कोणचीहि एक जोडी घेतलेली चालते. शिवाय शास्त्रीय विषयांस थोडे जास्त तास मिळतात. दुसऱ्यांत ल्याटिन-ग्रीकला मुळींच फांटा मिळतो व

नवी जोडी महत्त्व पावते. शास्त्रीय विषय शिकवतांना व्यावहारिक उपयुक्ततेवर जास्त नजर असते. या दोहींतील मुलांनां युनिव्हर्सिटींत प्रवेश फक्त कायद्याची बाजू व वैद्यक बाजू इकडेच असतो; धर्म व तत्त्वज्ञान या युनिव्हर्सिटींतल्या बाजूंकडे त्यांनां प्रवेश नाहीं. अर्थात्‌च या दोहींपैकीं एकांत शिकलेल्या माणसाला जन्ट्‌लमन्‌ या दृष्टीनें बरेच कमी मार्क मिळतात! या शाळांचा मुख्य उद्देश श्रेष्ठ प्रतीच्या धंदेशिक्षणाची पात्रता आणून देणें हा आहे. तेव्हां या शाळांविषयीं ज्यास्त पाल्हाळ न लावतां एकदम युनिव्हर्सिटीकडे आतां वळण्याला हरकत नाहीं.

युनिव्हर्सिटीच्या अभ्यासाविषयीं कॉलेजमासिकांत कांहीं त्रोटक लिहिलेलें तुह्मीं वाचलेंच असेल. त्यावरून नीट कल्पना न होणें शक्य आहे. युनिव्हर्सिटींत चार फेशर ( Facher ) अगर बाजू असतात; १ धर्म, २ कायदा, ३ वैद्यक व ४ तत्त्वज्ञान. पहिल्या तिन्ही धर्मोपाध्याय, वकील व वैद्य यांच्याकरितां आहेत. शेवटलींत ज्याला सामान्यतः तत्त्वज्ञान नांव देण्यांत येतें तें, भाषा, इतिहास, भूगोल, अर्थशास्त्र हीं येतात. रसायनशास्त्र, यन्त्रशास्त्र, प्राणि—वनस्पति—भूगर्भ इत्यादि शास्त्रांचाहि या चवथ्या बाजूंतच अन्तर्भाव होतो. वरच्या प्रतीच्या शिक्षकाच्या नोकरीला तत्त्वज्ञान—शाखेपैकीं तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्र अगर लॅटिन—ग्रीकादि जुन्या भाषांचीच व्यक्तिशः व्युत्पत्ति, हे विषय घ्यावे लागतात.

कमींत कमी सहा ( Semester ) टर्म लेक्चरें ऐकिलीं ह्मणजे पदवीसाठीं परीक्षा देतां येते. परीक्षेवांचून इकडेहि पदवी नाहीं; मात्र पद्धतींत भेद आहे. एक मुख्य विषय व त्याला आनुषंगिक दोन दुसरे जुळणारे विषय असे तीन विषय चांगले अवगत असावे लागतात. उदाहरणार्थ, मुख्य विषय, राजनीतीचा इतिहास, व अर्थशास्त्र आणि इतिहासाचा कांहीं भाग हे दोन, विषय किंवा मुख्य व्युत्पत्तिशास्त्र व इतिहास, तत्त्वज्ञान यांपैकीं विशिष्ट भाग. या विषयावर

प्रत्येकीं निदान दोनदोन टर्म तरी लेक्चरें ऐकावीं लागतात. याखेरीज प्रत्येक विषयाचे जे इन्स्टिटयूट्स् ह्मणून असतात, त्यांत प्रत्येक प्रोफेसर आठवड्यांतून दोन यूबुंग ह्मणजे प्रयोगभूत प्रवचन घेत असतो. आपलें लेक्चर ऐकणाऱ्या विद्यार्थ्यांपैकीं बरेच पुढें असलेले, ह्मणजे ३।४ तरी टर्म लेक्चरें ऐकून, घरींहि ज्यांचें वाचन चांगलें झालें आहे असे विद्यार्थी, त्यांतूनहि विशेष तयारी ज्यांची असते असेच निवडून घेतले जातात. ही निवड एकादा दिलेला निबंध चांगला ज्यांस लिहितां येईल अशांची फक्त होते. असे दहापंधरा विद्यार्थी निवडून पाळीपाळीनें प्रत्येकाला आपल्या विषयांपैकीं दिलेल्या भागावर विवेचन लिहून आणावयाला सांगायचें; व तें नेमानें दर आठवड्यांत नेमलेल्या दिवशीं वाचलें जाऊन त्यावर टीका होऊन प्रोफेसरानें चुका दाखवायच्या व कसें विवेचन करावें हें सांगायचें. अशा कांहींशा या यूबुंगेन असतात. या यूबुंग बऱ्याचशा ऐकाव्या लागतात. अशा रीतीनें विषयांची तयारी झाली ह्मणजे आपण परीक्षेस तयार आहों असें आपल्या विषयाच्या फॅकल्टीला कळवलें, ह्मणजे त्या त्या विषयाचे प्रोफेसर परीक्षा घेतात. ही परीक्षा तोंडी असते; व मुख्य विषय खेरीजकरून फारशी अवघड नसते. विषय चांगला अवगत आहे, त्यावर चांगलें वाचन, चांगले परिश्रम झालेले आहेत असें पाहण्यापुरतीच ही चांचणी आहे. मुख्य विषयांत मात्र विशेष कसोशीनें प्रश्न विचारले जातात. पण ही तोंडी परीक्षा ह्मणजे उपांग होय.

आपण मुख्य ह्मणून घेतलेल्या विषयासंबंधीं कांहीं भाग प्रोफेसराच्या सूचनेवरून अगर स्वतःचे आवडीवरून निवडून त्यावर सांगोपांग, माहितीपूर्ण व सयुक्तिक निबंध, पदवी इच्छिणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यास प्रथम फाकुल्टेट्कडे सादर करावा लागतो. ती मग तो निबंध त्या विषयाच्या दोन प्रोफेसरांकडून तपासविते; व तो चालण्यासारखा--घेण्यासारखा आहे, असें त्यांचें मत पडलें ह्मणजे मग तोंडी

परीक्षेसाठीं त्या विद्यार्थ्यास आव्हान होतें व वरच्याप्रमाणें तोंडी परीक्षा होते. निबंध छापवून दोनएकशें प्रती युनिव्हर्सिटीला नजर कराव्या लागतात. या छपाईचा खर्च व डिग्रीची फी मिळून आठशें -हजार मार्क सरासरी शेवटीं एकदम खर्च करावे लागतात.

यावरून लक्ष्यांत येईलच, कीं, पदवी मिळते ती केवळ युनिव्हर्सिटीच्या मर्जीवर किंवा फक्त नुसतीं व्याख्यानें ऐकून मिळत नाहीं. व्याख्यानें ऐकावीं लागतातच; अशीं आठवड्यांत सरासरी १२ साधारण विद्यार्थी ऐकतो; शिवाय यूबुंगेन्ला हजर रहावें लागतें, नव्हे स्वतः त्यांत विवेचनें वगैरे लिहावीं लागतात. पण जास्त परिश्रम शेवटीं दाखल करावयाच्या निबंधावर करावे लागतात. तोंडी परीक्षा सोप्या असतात हें खरें, पण मुख्य विषयाविषयीं फार बारकाईनें पाहतात. त्याविषयीं विद्यार्थ्यांत एक ह्मण आहे 'एर् फर्लांग्ट् त्सुफील् ( छेः, तो फार किसून किसून विचारतो ! )'; व ह्मणूनच ६ सेमेस्टरांत पदवी उपटण्याच्या भरीस कोणी पडत नाही. हुषारी व उद्योग या दोहों तहि साधारण बरा गणलेला विद्यार्थी साधारणतः आठव्या सेमेस्टरांत डिग्री घेतो. कितीहि हुषार असलें तरी प्रिलिमिनरी पावेतों झोंपा घेऊन, मग दिव्याखालीं पोपटपंची करणारांची अर्थात्च येथें डाळ शिजणार नाहीं. निबंधाला नियमित व सतत उद्योगावांचून भागत नाहीं. कारण, हा निबंध परीक्षेच्या मंडपांत तीन तासांत डोकें खाजवून पांढऱ्यावर काळें केलेल्या निबंधासारखा असून सोय नाहीं.

इंग्लंडांतील ऑक्सफर्ड अगर केंब्रिज येथें भरलेल्या टर्म्सपैकीं कांहीं व तसेंच पारिस येथील आकाडेमी येथीलहि कांहीं जर्मनींत इकडल्या बरोबरीनें गणल्या जातात; ह्मणजे केम्ब्रिजच्या अंडर-ग्रॅड्ला इथें तीन सेमेस्टरांत पदवी मिळवितां येते. आपल्याकडल्या किती टर्म्स् जमेंत धरायच्या हा प्रश्नच इकडे अजून येण्याचें कारण नव्हतें. पण तशी कोणीं खटपट केल्यास इंटरमिजिएटनंतरच्या कांहीं टर्म्स्

मानल्या जाण्याला हरकत नाहीं. त्याचा तादृश उपयोग होणें मात्र कठीण. कारण भाषेची अडचण दूर करतांकरतांच दोनतीन सेमेस्टर इकडे वाया जायचे! व पुढें परीक्षेची तयारी ह्मणजे गेली बेरीज सहासातच्यावर!

Ph. D. ( वास्तविक D. Ph. ह्मटलें पाहिजे ) ही डिग्री अगदीं क्वचित् प्रसंगीं परीक्षा न देतां, तशीच सन्मानार्थ मिळत असावी, असें वाटतें. येथें एकहि उदाहरण माझ्या ऐकिवांत नाहीं. पण एक-दोन अमेरिकन-इंग्लिश प्रोफेसरांना त्यांच्या विद्वत्तेबद्दल व जर्मन-युनिव्हर्सिटीच्या दृष्टीनें त्यांच्या कामगिरीबद्दलहि दिल्याचें पुसटपुसट ऐकतों; नक्की माहिती नाहीं. माझ्या माहितींतलें एकच उदाहरण डॉ. भांडारकर यांचें होय. संस्कृतसंबंधानें पुस्तकें, निबंध वगैरे नव्या —जिला इकडे शास्त्रीय व चिकित्सक ह्मणतात त्या—पद्धतीनें यांनीं लिहिले, त्या वेळीं प्रो. कीलहॉर्न हे पुण्यामुंबईंत असत. त्यांची व डॉ. भांडार-करांची रुचि व व्यवसाय एक असून दोघांचें सख्य असे. ते इकडे आल्यावर गॉटिंगेन् ( गोत्रांगण ? ) युनिव्हर्सिटींत संस्कृतचे अध्या-पक होते. त्या युनिव्हर्सिटीकडून त्यांच्या योग्यतेबद्दल सन्मानार्थ डॉ. भांडारकर यांना त्यांनीं डिग्री देवविली, असा तिचा इतिहास मला येथें कळला.

'माझा अभ्यास किती दिवसांचा?' याचें उत्तर सोपें आहे. मला सरकारनें दोन वर्षें स्कॉलर्शिप देऊं केली. पैकीं एक सप्टेंबर अखेर संपली. गेल्या वर्षांत मुख्यत: जर्मन भाषा काबीज करण्यांत वेळ गेला. माझा विषय जो तुलनात्मक-व्युत्पत्तिशास्त्र त्याला लॅटिन व ग्रीक आवश्यक असतें. पैकीं लॅटिन ही गेल्या वर्षीं बेतापुरती केली, व व्युत्पत्तिशास्त्रावर लेक्चरें ऐकिलीं. पुस्तकेंहि पुष्कळ वाचलीं. यंदां ग्रीक शिकायचें आहे; व बरोबरच गॉथिक ( इंग्रजी व जर्मनची वडील बहीण ) थोडें वाचायचें आहे. विषय मोठा आहे; त्याचेंहि वाचन व लेक्चरें ऐकणें चालू राहीलच. झालें; हा माझा अभ्यासक्रम!

रॉटेन्बुर्ग, १३ ऑक्टोबर, १९११.

मागील आठवड्याचें लांबलचक पत्र मिळालेंच असेल. त्यानंतर मध्यें एक आठवडा टाकून लिहिण्याचा निश्चय केला होता; पण लगेच सोमवारीं म्यूनिच्ला शाळा पाहण्यासाठीं गेलों; तेथून तीन दिवसांनीं काम आटोपून परत जातांना रोटेन्बुर्ग येथें काल संध्याकाळीं उतरलों. या दोन्ही ठिकाणच्या हकीगती लिहिण्याचा मोह आवरेना, म्हणून गांवांतून चक्कर मारून येऊन आतांच बारांच्या ठोक्याला लिहायला बसलों.

म्यूनिच्ला उत्तमपैकीं तीन शाळा पाहण्याची परवानगी मिळाली होती. पैकीं एक विटेल्स्बारवर गिम्नासिउम् ही पांचसहा वर्षांपूर्वीं नवीनच स्थापन झाली असल्यामुळें जागा, खोल्यांची मांडणी, आंतील शालोपयोगी सामान व एकंदर व्यवस्था यांत आतांपर्यंत ज्या सुधारणा झाल्या अगर सुचविल्या गेल्या आहेत, त्या सर्वांचा समावेश ही शाळा बांधतांना केला आहे. उदाहरणार्थ, खोल्यांच्या ओळींमधून रुंद कॉरिडोर अगर सोपा दोन्ही टोंकापर्यंत काढलेला आहे. यांत दोन तासांच्या मधल्या वेळांत मुलांनां फराळ वगैरे करतां येतो. मुख्य इमारतीच्या मागें मोठें प्रशस्त आंगण असून त्याच्या दोन्ही बाजूंला 'वनस्पतिशास्त्र' शिकवतांना लागणाऱ्या झाडांची छोटीशी बाग आहे. मधल्या मोठ्या सुटींत व इतर लहान पंधरा मिनिटांच्या सुट्यांतहि मुलांनां या मोकळ्या आंगणांत बागडतां येतें, व त्यामुळें एकामागून एक मास्तर येऊन त्यांच्या शिकवणीनें डोकें भणभणून जात नाहीं. दोन तासांमध्यें फक्त एक मास्तर जाऊन दुसरा येण्यापुरतीच पांच मिनिटांची भिकारी सुटी येथें कोणत्याहि शाळेंत माझ्या पाहण्यांत आली नाहीं. येथें धर्मशिक्षणाच्या एका क्लासांत मी पाऊण तास बसलों होतों. हा क्लास क्याथोलिक मुलांचा असून 'अनाथांची सेवा व त्यांनां मदत' या ख्रिस्ततत्त्वाचा मुळापासूनचा इतिहास मास्तर

सांगत होता. प्रॉटेस्टंट् मुलांनां निराळा क्लास आहे. ज्यू असतील त्यांनांहि वेगळें धर्मशिक्षण मिळतें. ह्मणजे केवळ कोठें तरी, कसें तरी, सहज-गत्या गप्पागोष्टीच्या रूपानें ऐकून धर्मसंबंधीं खुळ्या कल्पना मुलांच्या डोक्यांत भरण्यास येथें वावच रहात नाहीं. धर्मशिक्षण येथें एक मुख्य व आवश्यक विषय असल्याचें मीं मागें लिहिलेंच आहे.

दुसरी रेआल्–गिमनासिउम् बुधवारीं पाहिली. हींत जवळजवळ चार तास होतों. ही शाळा जुनी असून सोपा अंधाराचा आहे व जागाहि अपुरती आहे. नवी इमारत लवकरच मिळेल, असें रेक्टर सांगत होता. येथें इंग्रजीच्या एका क्लासांत मीं बसलों. मास्तर कच्चा असून उच्चार वगैरे नीट नव्हते. भाषान्तर करण्यांत त्यानें वेळ घालवला. नंतर ड्रॉइंग व फिजिक्सच्या खोल्या मुद्दाम जाऊन पाहिल्या. दोहींतहि सामान भरपूर असून फिजिक्समध्यें बारा मुलांनां एकदम स्वत: यंत्रें पाहतां येऊन त्यांनीं प्रयोग वगैरे करून पहावे, अशी सोय केली आहे. टुर्नेन् अगर व्यायाम सर्व शाळांतून आवश्यक असून त्यासाठीं एक तालीमखाना असतो. चवथ्या वर्गाच्या मुलांची लोखंडी काठ्यांची तालीम व पहारीचे खेळ मीं पाहिले. सहासहा मुलांनां एकदम पहारीचे खेळ करतां यावे, अशी व्यवस्था आहे. पॅरॅलल् बारहि एकदम आठजणांनां करीत असतांना पाहिलें; तालीम पाहण्याचा थोडा नाद असल्यानें करमणूक होऊन मौजहि वाटली. या शाळेंत लॅटिन् ऐच्छिक आहे. त्याऐवजीं फ्रेंच व इंग्लिश आवश्यक आहेत.

तिसरी ओबररेआल्शूल गुरुवारीं पाहिली. हींत टेक्निकल्–हाय-स्कूलसाठीं, व इतर धंदेशिक्षणासाठीं मुलें तयार करावयाचीं असल्या-मुळें लॅटिन–ग्रीक अजीबात नसून, अर्वाचीन भाषा व प्राणि- वनस्पति रसायन--यन्त्रादि शास्त्रांचें शिक्षण खालच्या वर्गापासून तों नवव्यापर्यंत वाढत्या प्रमाणावर दिलें जातें. सातव्या वर्गांत मुलें यंत्रशास्त्राचा प्रयोग करीत होतीं, तें मीं पाहिलें. येथें आठ टेबलें असून प्रत्येकावरील एका

यंत्राभोंवतीं तीनतीन मुलें बसून प्रयोग चालला होता. प्रॅक्टिकल ह्मणजे मास्तर अगर प्रोफेसरानें स्वतः प्रयोग करून मुलांनां फक्त हाताला हात लावून त्याचें श्रेय घेण्यास सांगणें, अशी इकडे कल्पनाहि नाहीं. मास्तर करून दाखवील ती प्रत्येक गोष्ट मुलांच्या हातून एकएकदां गेलीच पाहिजे, या तत्त्वावर सर्व प्रकारचें शास्त्रीय शिक्षण दिलें जातें. यामुळें ॲपॅरेटस्‌करितां बराच खर्च करावा लागतो, हें उघडच आहे. दुसऱ्या वर्गांत (यांतील मुलें नऊ वर्षांचीं असतील!) पक्ष्यांची बाह्य व अन्तर्रचना हा विषय चित्रांच्या व पक्ष्यांच्या सांपळ्यांच्या मदतीनें सोपा करून मास्तर समजावून सांगत होता, तेथेंहि मी बसलों. अगदीं नेहमींच्या मुलांच्या माहितीचे प्राणी व झाडें यांविषयीं सामान्य ज्ञान पहिल्या व दुसऱ्या वर्गांतून दिलें जातें. शेवटीं पुनः एका इंग्रजीच्या वर्गांत गेलों. या वर्गाचा मास्तर हुषार असून उच्चार वगैरे स्पष्ट व यथायोग्य करी. तरी त्याचा There, Then यांतील thचा 'झेअर-झेम'च्या जवळजवळ होणारा उच्चार हंसूं येण्यासारखा होता. तास संपतांच "तुमची 'direct' अगर 'Conversational' ह्मणतात ती रीत नाहीं," असें मीं विचारतां, किंचित् ओशाळल्यासारखें दाखवून "आमच्याकडे जुनी व नवी या दोन्ही पद्धतींचें मिश्रण आहे. बऱ्याच ठिकाणीं मुलांनां जर्मनद्वाराच भाषान्तर वगैरेच्या रूपानें सांगावें लागतें," वगैरे वगैरे समर्थन त्यानें केलें. रेक्टरहि नंतर तेंच ह्मणाला. या शाळेचा फिझिक्सचा मास्तर फार हुषार आहे. नेहमीं लागणारें सोपें यन्त्रादि सामान तो स्वतः करतो व मुलांकडून करवतो. अशांपैकीं इलेक्ट्रोमेटरचा साधेपणा वगैरे पाहून मला आश्चर्य वाटलें. या शाळेंतील मुलांनां युनिव्हर्सिटींत फक्त वैद्यक बाजू मोकळी असल्याचें रेक्टरनें सांगितलें. अशा आणखी कितीएक ध्यानांत ठेवण्यासारख्या रीति व उपकरणें यांविषयीं बारीकसारीक गोष्टी आहेत. त्या विस्तार फार होईल ह्मणून लिहीत नाहीं.

काल रात्रीं रोटेन्‌बुर्गला आलों. हें एक आठनऊ हजार वस्तीचें लहानसें पण टुमदार शहर आहे. मिड्ल्‌एजेस्‌च्या वेळच्या शहरांपैकीं हेंच काय तें जसेंच्या तसेंच कायम राहिलें असल्यामुळें हजारों प्रवासी तें पहाण्यासाठीं येतात. याच्याभोंवतीं एकेरी–कांहीं ठिकाणीं दुहेरी–दगडी कोट असून त्याला जागजागीं दरवाजे व बुरूज आहेत. दरवाजे बहुतेक दुहेरी आहेत. परचक्रापासून लोकांचें संरक्षण करण्यासाठीं असा तट मिड्ल्‌एजेस्‌मध्यें प्रत्येक शहराला असे. या तटानें आपल्या वेड्यावांकड्या, निर्जल परंतु आवडत्या नगरची आठवण झाली; नगर मोठें आहे इतकेंच! आंतील रस्ते निरुंद, वांकडेतिकडे, अस्वच्छ असून अनेक लहान बोळांनीं एकमेकांस जोडले आहेत. दोन्ही बाजूंचीं घरें दोनपासून तीन मजल्यांचीं असून मजल्यांच्या मानानें ठेंगणीं आहेत. तळमजल्याच्या भिंती दगड अगर विटांच्या, व वरच्या लांकडी थट्टी–चुन्यानें माचलेल्या अशा आहेत. वरचें छप्पर फारच निमूळतें असून वरतीं थापड्यांचीं कौलें कडांनीं चुन्यांत माचलेलीं अशीं आहेत. खिडक्या लहान गवाक्षासारख्या असून आपल्याकडील फडताळांसारखीं दारें त्यांस आहेत. बऱ्याच घरांनां आंतल्या बाजूनें कांचेच्या खिडक्या अलीकडे एकसवाशें वर्षांत बसवलेल्या आहेत. लांकडी काम हल्लींपेक्षां बरेंच जास्त दिसतें. आढ्याला आपल्या घरांसारखा खालच्या बाजूनें लांकडी कडीपाट असतो. दारें साधारणतः लहान, दगडी कमानींत फळ्या बसवून केलेलीं अशीं आढळतात. आंत शिरतांच तोंडीं एक अंधाराचा बोळ प्रत्येक घराला साधारण असतो. भिंतीला आंतून चित्रविचित्र रंगाचा कागद सारखा चिकटविणें ही नवी सुधारणा आहे. चांगलें अंधाराचें दगडी तळघर प्रत्येक घराला असतें. भिंतींत अंधाराचीं कोठारें क्वचित् ठिकाणीं आहेत. आणखी एक विशेष ह्मणजे चौकाच्या ठिकाणीं टांकीं अगर कारंजीं जागजागीं आहेत. यांस ब्रुनेन (इं० Fountain) ह्मणतात.

मिड्ल्एजेस्मध्यें (मध्ययुगांत) कशी रहाणी असेल, याची पुसट कल्पना येथें होते. असो.

माझी प्रकृति बरी आहे. आज संध्याकाळीं शिसपेन्सिली व लोखंडी पत्र्यांचीं चित्रें, खेळणीं यांसाठीं प्रसिद्ध असलेल्या न्यूर्नबर्ग्ला जात आहें.

लाइप्झिक, २७।१०।११.

गेल्या आठवड्यांत रा. मोहनी यांना पत्र लिहिलें आहे, तें वाचायला मिळालें असेलच. त्यानंतर आतां नुकतीच युनिव्हर्सिटी उघडल्यामुळें उद्योगाला सुरुवात झाली आहे. ग्रीक, गॉथिक या भाषा व चैनीखातर येथील कान्टच्या नंतरचें तत्त्वज्ञान आणि जर्मन शिक्षणाचा इतिहास वगैरेवर लेक्चरें ऐकत असतों. शाळा पाहण्याचें, त्यांचे रिपोर्ट व इतर शिक्षणविषयक माहिती मिळवण्याचें मला जें वेड लागलें आहे, त्याची पूर्तता होण्यासाठीं जर्मन शिक्षणाचा इतिहास हा विषय ऐकत असतों.

अलीकडे येथें शरदृतूचा शेवट होत असल्यामुळें नेहमीं जोराचा गार वारा वाहतो. झाडांचीं पानें बहुतेक शुष्क व पिवळी होऊन गळूं लागलीं आहेत. वनांत फिरायला गेलें ह्मणजे पानांच्या राशी तुडवून जावें लागतें. प्लाटान् वगैरेसारखीं थोडीं खेरीजकरून बाकी सर्व झाडें पानांवांचून खराट्यासारखीं झालीं आहेत. त्यामुळें फिरायला जाऊन डोळ्यांला समाधान होण्याचें दूरच राहून मन जरा उदास होतें व हिंवाळा आतां जवळ आला असें वाटून जरा मन कचरतें. गेल्या हिंवाळ्याचा मासला ठाऊक असल्यामुळें असें वाटत असल्यास नवल नाहीं.

अर्थात्च उघड्या हवेवरचे टेनिस्, फुटबॉल इत्यादि खेळ, (इकडे क्रिकेटचें नांवहि नाहीं.) बोटिंग, पोहणें, फिरायला जाणें वगैरे सर्व लोपून घरांतले बैठे खेळ, बॉल्स (तरुण मुलांमुलींचा नाच), नाटकगृहें, संगीत-

शाळा, हॉटेलांतील नाचायच्या जागा वगैरेंनां आतां मुक्तद्वार झालें आहे. प्रत्येक थिएटरांत कोठें नाटक, कोठें तमाशा, कोठें गाणें, कोठें नाच वगैरे रोज आहेच; व प्रत्येकांत बरीच गर्दी असते, हें सांगणें नकोच. आपल्याकडे जसें वाईट लोकांच्या हातीं पडल्यामुळें नृत्य व अंशतः गायनहि जरा हलकें समजलें जातें, व एका विशिष्ट धंद्यांतल्या बायांशिवाय तें कोणी पत्करीत नाहीं, तसें इकडे नाहीं. स्त्रियांच्या व पुरुषांच्याहि अंगीं जी संपन्नता (accomplishment) असायला पाहिजे, त्यांत नृत्य व गायन हीं इकडे मुख्य समजलीं जातात, त्यामुळें नाचण्यांत कुशल असून, त्याचा धंद्याप्रमाणें उपयोग करणारी एकादी स्त्री हीन समजली जात नाहीं. उलटा इकडल्या रिवाजाप्रमाणें तिला मान मिळतो. अर्थात् त्यांतले हेतु नेहमीच चांगले नसतात, ही गोष्ट निराळी! अशी एक इटालियन मुलगी—अथवा बाई म्हटलें असतां जास्त शोभेल; कारण तिची बत्तिशी उलटायला एकादेंच वर्ष कमी असेल—रिटा साकेटो या नांवानें प्रसिद्ध आहे, ती येथें आली होती. तिचा नाच पहायला इतर मंडळीबरोबर आम्हींहि गेलों होतों. अशा नाचांच्या वेळीं आपण ज्याला असभ्य कोटींत काढूं असा पोषाक केलेला असतो; पण सभ्यपणाच्या बढाया मारणाऱ्या यूरोपियांनां त्याचें कांहींच वाटत नाहीं! या दिवशीं एकंदर पांचसहा प्रकारचे नाच साकेटोनें करून दाखविले. त्यांतील दुसऱ्या म्हणजे फ्रेंच नाचांत या बाईनें अभिनय खरोखरीच चांगला केला. राजकन्या उत्तरा व मालविका यांच्या तोडीचा होता कीं नाहीं, हें मात्र सांगतां येत नाहीं; शिवाय बृहन्नडा व राजा अग्निमित्र यांसारखा मर्मज्ञहि मी नाहीं एक नाच इंडियन म्हणून केला, तो मोठ्या औत्सुक्यानें पाहूं लागलों. या वेळीं रिटानें पोषाक फारच विचित्र केला होता. डोक्यावर पितळेचा टोप व त्यावर मद्रासकडील देवळांच्या आकृतीचा पुष्कळ घुंगारांनीं सजवलेला कळस; कानांत मुसलमानी बायांप्रमाणें

एक लाख गुंघरें, दंडावर व पुढें हातांत कांकणें व बोटांत लांब सुयांसारख्या नख्या असें कांहींसें दिसत होतें. बाकीच्या पोषाकांत जराची (खोट्या!) रेलचेल केली होती. प्रथम रंगभूमीवर आल्यावर ही कलावंतीण (असें ह्मटल्याबद्दल यूरोपीयांची क्षमा मागावी लागेल!) मांडी घालून बसली व तिनें हात व मान हवीं तशीं वांकडींतिकडीं हालविलीं. मग उठून नाच केला तो मात्र बरा—कांहीं अंशीं आपल्या धर्तीवर होता. असो. अशा प्रकारें त्या रात्रीं दोन तास १० पावेतों करमणूक करून परतलों. इंडियन नाचाविषयीं अर्थात्च सर्वांनीं 'असेंच नाचतात का?' ह्मणून विचारलें. मींहि सरळपणें वाटलें तें सांगितलें, कीं, "पोषाक असा नसतो, बैठा नाच ह्मणजे फार्स आहे, पण शेवटचा नाच कांहीं बरा होता," वगैरे वगैरे. हिंवाळ्यांत या लोकांचीं करमणुकीचीं साधनें कोणतीं, हें तुह्मांला मासलेवजा लिहावेंसें वाटलें, ह्मणून आजचें पत्र होय.

प्रवासानंतर विश्रांति पाहिजेच होती, व रा. जोशी मंगळवारपावेतों येथें येणार, त्यांची व्यवस्थाहि लावणें आहे. यास्तव सुटी अजून एक महिना असतांहि, आतां आणखी कोठें जाण्याचा विचार तूर्त नाहीं. एका पत्रांत इषारा दिल्याप्रमाणें प्रवासवर्णनाची या पत्रीं घूपार्ति करून स्वतःला व तुह्मांलाहि कांहीं आठवडे विश्रांति देण्याचा विचार आहे.

चार दिवसांच्या म्यूनिच् येथील मुक्कामांत तेथील लोकांविषयीं माझें मत चांगलें झालें आहे. साधारण व्यवहारांतसुद्धां बर्लिन् येथील लोकांमध्यें—व साधारणतः प्रशियाच्या लोकांमध्यें—जो एक प्रकारचा शिपाईगिरीचा ताठपणा, तोरा व तुटकपणा कधींकधीं दिसतो तसा म्यूनिच्च्या लोकांत मुळींच दिसत नाहीं. वीस वर्षांच्या वरच्या प्रत्येक माणसाला दोन वर्षें सक्तीचें शिपाईशिक्षण मिळालें असल्यामुळें शरीरसामर्थ्य, ऐट, धोपटपणा वगैरे गुणांबरोबर ताठपणा आंगाबरोबरच वाग-

णुकींतहि शिरल्यास नवल नाहीं; पण तुटकपणा, माणुसकीची कमतरता हीं असावयाला खरें ह्मटलें असतां कारण नाहीं. पण कांहीं ठिकाणीं 'ओफित्सीयरी' ( इकडे मिलिटरी ऑफिसरला ओफित्सीयर ह्मणतात, ओफित्सीयरी ह्मणजे त्यांचें वर्चस्व व सुळसुळाट ) हांच सर्वस्व होऊन बसल्यामुळें या जोडीचा प्रादुर्भाव होतो; म्यूनिच्‌ला मात्र रस्त्यावरचा शिपाईसुद्धां--कीं जेथें तुटकपणा वगैरे शोभून जाईल-बहुतेक ठिकाणावर असतो. अशांपैकीं चिनामधील बॉक्सर बंडाच्या वेळीं तिकडे जाऊन आलेल्या एका शिपायाला रस्ता विचारीत असतां, त्याचें माझें थोडें विनोदी संभाषण झालें. त्यानें तिकडे शीख, गुरखे वगैरे एकदोन पलटणें पाहिलीं होतीं. 'त्यांतील शिपाई कसे सारेच धिप्पाड असतात व तुह्मींच असे कसे बटु?' वगैरेसारखे गमतीचे प्रश्न त्यानें मला विचारले!

'तुमच्याकडे साप असतात, वाघहि आहेत, मग माणसें कशीं जीवंत रहातात?' वगैरेसारखे वेडगळ प्रश्न तर मला इतर ठिकाणींहि विचारले गेले. पण एकाद्या साधारण माणसालासुद्धां हिंदुस्तान मोठें आहे, तेथें हिमालय, गंगा वगैरे असून सृष्टिसौंदर्य अपूर्व आहे, हिंदुस्तानची संस्कृति फार जुनी-यूरोपच्याहि बरीच आधींची आहे, वगैरे गोष्टी ठाऊक असतात.

जशी स्वित्झरलंडांत, त्याचप्रमाणें किंचित् कमी प्रमाणांत म्यूनिच येथेंहि अमेरिकन लक्ष्मीपुत्र व तरुणी यांची ऑगस्टच्या शेवटींशेवटीं व सप्टेंबरच्या आरंभीं बरीच गर्दी असते. याचें कारण या वेळीं येथील प्रसिद्ध वाग्नर कवीचीं सुंदर गायनपूर्ण नाटकें ( ऑपरा ) करून दाखवितात. हीं म्यूनिच येथें व जरा वरती-पण बव्हेरिया प्रांतांतच-बायरॉईट या शहरींच फक्त करतात; त्यामुळें या ठिकाणीं यूरोप व अमेरिकेच्या गायनप्रिय व गायनपटु लोकांची अत्यंत गर्दी होत असते; अर्थात्‌च या दोन शहरीं इंग्रजी समजणारे बरेच जर्मन लोक आहेत.

ते इंग्रजींत बोलण्याचा प्रयत्न करतात, तेव्हां मात्र हंसल्यावांचून राहवत नाहीं. असो.

म्यूनूशेन् ( इं० म्यूनिच् ) येथीलहि शाळा पाहण्याचा माझा पहिल्यापासून हेतु असल्याचें मी एप्रिलच्या एका पत्रांत तुह्मांला लिहिलें असावें त्यासाठीं लागणारी परवानगी ब्रिटिशमंत्र्याच्या मार्फत मिळवायची असते, ह्मणून इंग्लिश मंत्रिगृहाचा पत्ता काढून एका सोमवारीं गेलों.

या वेळीं या बव्हेरियन लोकांच्या कांहीं अस्पष्ट वर्णोच्चारानें थोडा घोंटाळा केला तो असा:- एका शिपायाला एंग्लिश गेझान्ट- शाफ्ट् (British legation) कोठें आहे, ह्मणून विचारतां त्यानें पारर् स्ट्रास ह्मणून सांगितलें-निदान मीं तसें स्पष्ट ऐकलें. माझ्या ठिकाणापासून हा रस्ता बराच लांब होता; पण मी पायींच तेथवर गेलों. वाटेनें आणखी दोघांनां विचारलें, त्यांनींहि स्पष्ट पारर् ह्मणून सांगितलें. अर्धा तास चालून आतां जवळ आलों असें वाटून चवथ्या एकाला विचारतां 'तुह्मांला ट्रामनें स्टेशनवर गेल्यावर अमुक ठिकाणीं तें सांपडेल,' असें त्यानें सांगितलें. स्टेशनपासून तर मी इतक्या लांब आलों आणि हा गृहस्थ पुनः परत जायला सांगतो, या मूर्खपणाला काय ह्मणावें ? असें वाटून मीं आपला बेडेकर त्याच्यापुढें केला व ' या नकाशांत तो रस्ता कोठें आहे तो दाखवाल काय ?' असें ह्मटलें. त्यानें बोट ठेवतांच तो Barer-strasse बारर्पारर् नव्हे-हें लक्ष्यांत येऊन, पुनः परत ट्रामनें तितका मागें गेलों! या 'प' 'ब'प्रमाणेंच 'क' 'ग'चा उच्चार हे जर्मन लोक अस्पष्ट करतात-निदान आपणांला तरी 'क' कीं 'ग' हें लवकर कळत नाहीं. असाच घोंटाळा गॉसल नांवाच्या विद्यार्थ्याच्या संबंधानें माझा झाला होता. प्रथम मला ' koessel ' असें त्याचें स्पेलिंग असावेसें वाटलें होतें ! असो. ब्रिटिश मन्त्री सर व्हिन्सेंट कॉरबेट यांची भेट मुळींच त्रास न पडतां झाली. हे फारसे ह्मातारे जरी

नाहींत, तरी त्यांचे केस पांढरे झाले आहेत. उंच सडसडीत बांध्याचे असून चेहरा तरतरीत आहे. दिवाणखान्यांत मी थोडा विसांवतों, तोंच भोंवतीं कुलुंग्या कुत्र्यांची सेना असून, खेळाचा पोषाख ह्मणजे पांढऱ्या फ्ल्यानेलची पाटलोण, साधा पट्टयांचा इस्तरीवांचून शर्ट व वर झिरझिरीत, गुंड्या असलेला कोट–अंगावर असलेले, सर व्हिन्सेंट आंत येऊन नमस्कारचमत्कार झाल्यावर ' तुह्मांला कोणती मदत मजकडून होण्यासारखी आहे ?' असें बोलत खुर्चीवर बसले. मी बर्लिन येथील ब्रिटिश कॉन्सल् पत्र दाखवल्यावर, त्यांनीं परवानगी मिळवून देण्याचें कबूल केलें.

नंतर इतर गप्पाछप्पा, म्यूनिचच्या जर्मन सरकारचा ब्रिटिश मंत्र्यांशीं असलेला सलोखा, शाळा वगैरेविषयीं बोलतांना हल्लींचे हिंदुस्तानचे व्हाइसरॉय माझे मेहुणे आहेत वगैरे त्यांनीं सांगितलें. हिंदुस्तानाविषयींहि आमचें थोडें बोलणें झाल्यावर मी रजा घेऊन परत आलों.

बुधवारीं सकाळीं सवाआठ वाजतां गाडींत बसलों. दोनतीन तास गेल्यावर बाम्बर्ग स्टेशनांत एक जरा भुरकट दिसणारा इंग्लिश तरुण गृहस्थ डब्यांत आला. त्यालाहि लाइप्झिक्ला यायचें असल्यामुळें बरीच सोबत एकमेकांनां झाल्यासारखें होऊन बोलणेंहि बरेंच झालें. औपचारिकपणा सर्व बाजूला ठेवून ' मी आस्ट्रेलियन मास्तर असून ट्रॅव्हलिंग् स्कॉलर्शिप मिळून इंग्लंडांत शिक्षणाविषयीं जास्त शिकण्यासाठीं आलों आहें ' वगैरे त्यानें सरळपणानें सांगितलें. तेव्हां ऑस्ट्रेलियाविषयीं बरीच माहिती मीं त्याला विचारली. त्यांत मुख्य विषय शिक्षण हा होता, हें सांगणे नकोच.

ऑस्ट्रेलियांतहि प्राथमिक शिक्षण सक्तीचें असून, प्रत्येक स्त्रीपुरुषाला चांगलें लिहितांवाचतां येतें, असें त्यानें सांगितलें. तेथील शिक्षणपद्धत, नांवाजलेल्या सर्व यूरोपियन शिक्षणपद्धतींतील चांगल्या गोष्टी निवडून त्यांची बनवली असल्यामुळें फारच चांगली आहे असें त्याच्या

बोलण्यांत आलें. एवढ्यासाठीं बऱ्याच दिवसांपासून ऑस्ट्रेलियानें आपले शिक्षक, इन्स्पेक्टरादि विद्याखात्याचे अधिकारी इंग्लंड, जर्मनी, अमेरिका वगैरे ठिकाणीं पाठविण्याचा उपक्रम सुरू ठेविला आहे. बहुतेक शाळा सरकारी असून त्यांतील मास्तर, उपकरणें वगैरे पहिल्या प्रतीचीं आहेत. ज्या कांहीं थोड्या शाळा खाजगी आहेत, त्या सर्व देवळांच्या ताब्यांत असून यूरोपांत दोनतीन शतकांपूर्वी जशा देवळांच्या शाळा गचाळ असत तशाच याहि आहेत. त्या बंद तरी करवाव्या अगर आपल्या ताब्यांत तरी घ्याव्या, असा सरकारचा विचार आहे, असें त्यानें सांगितलें. युनिव्हर्सिटीशिक्षणासंबंधीं बोलतांना त्यानें आपल्या सिडने युनिव्हर्सिटीचे फार गोडवे गाइले. व्हिक्टोरिया, सिडने, मेलबोर्न, आडलेड वगैरे प्रत्येक मोठ्या शहरीं युनिव्हर्सिटी असल्याचें त्यानें सांगितलें.

जर्मनींतील सक्तीच्या लष्करी शिक्षणासंबंधानें बोलतांना त्यामुळें पुरुषाला शोभणारे जे मर्दुमकीचे गुण आंगीं येतात, त्याबद्दल त्यानें त्यांची बरीच स्तुति केली. पण विसाव्या वर्षानंतरचीं दोन, ह्मणजे तरुणपणाचीं अमोलिक वर्षें त्यावेळीं इतर सर्व व्यवसाय बाजूला ठेवून सैन्यांत शिरावें लागल्यामुळें, पुष्कळ तरुण माणसांचें नुकसान होतें; पुष्कळांच्या आपापल्या आवडीच्या धंद्यांतील अमोलिक संधि यामुळें फुकट जाऊन त्यांनां मागें रहावें लागतें, हें त्यानें कबूल केलें. 'तुमच्याकडे कसें आहे?' असें विचारतां 'आमच्याकडेहि सक्तीचें लष्करीशिक्षण अलीकडे सुरू केलें आहे; पण वरचे दोष त्यांत येत नाहींत. स्वित्झरलंडप्रमाणें आमच्याकडेहि शाळेच्या शिक्षणांतच आठवड्यांतून नियमित वेळीं असें शिक्षण दिलें जातें, व अशा ठरींव आठवड्यांत मिळालेलें शिक्षण पुरें होऊन जर्मनपद्धतींतले दोष सहज टाळतां येतात,' वगैरे त्यानें सांगितलें. यानंतर व्यापार, शेती, गुरांची जोपासना वगैरे अनेक विषयांवर मीं त्याला माहिती विचारली. व्यापारांत ऑस्ट्रेलिया बराच

पुढें आलेला आहे; तरी मेंढ्यांचे प्रचंड कळप पाळून लोंकर करण्याचा व्यापार फार मोठा आहे, वगैरे माहिती त्यानें दिली.

**लाइपूझिक**, १० नोव्हेंबर, १९११.

माझी प्रकृति बरी आहे, व इतर व्यवसाय सर्व ठीक चालले आहेत.

रा. जोशी यांचा युनिव्हर्सिटींत प्रवेश करून देण्याची व्यवस्था मला करावी लागली; पण त्रास पडला नाहीं. फक्त जवळ पास (इं. पासपोर्ट) नसल्यानें कांहीं घोंटाळा होतो कीं काय, असें वाटलें होतें; पण आयडेन्टिटी सर्टिफिकेट होतें, तें मी युनिव्हर्सिटीच्या रिस्टर (इं. रेजिस्ट्रार)ला नीट समजावून सांगितल्यावर सर्व सुरळीत झालें.

आक्टोबर ३१ तारखेला येथें युनिव्हर्सिटीच्या रेक्टरची बदली होत असते. गेल्या वर्षाचा रेक्टर शिक्का-किल्ल्या, माल व वस्त्रें नव्या वर्षाच्या होणाऱ्या रेक्टरच्या हवालीं करतो. त्या वेळेचा समारंभ पाहण्यासारखा असतो. आपल्याकडे पदवीदानसमारंभ आहे इकडे पदवीदानाची ठराविक वेळ नसल्यामुळें त्यासाठीं समारंभाचें कारण फारसें पडत नाहीं. त्याऐवजीं हा रेक्टर-प्राणप्रतिष्ठेचा समारंभ युनिव्हर्सिटीच्या भव्य शृंगारलेल्या दिवाणखान्यांत (याला औला ह्मणतात) मोठ्या थाटानें साजरा करतात. प्रथम येथें विद्यार्थ्यांचीं जीं निरनिराळीं मंडळें आहेत, त्यांपैकीं प्रत्येकाचे तीनतीन प्रतिनिधि आपापलें निशाण-तलवारी लटकावून शिपाईवेषांत युनिव्हर्सिटीसमोरील मैदानांत जमतात. गेल्या एकतीसला अशीं तीसएक निशाणें होतीं. नंतर युनिव्हर्सिटीचे अधिकारी (सिन्डिक, डेकान्, रेक्टर) आपापले दर्जाचे पोषाक घालून, माळा, बिल्ले लटकावून येतात, व ही सर्व मंडळी मिरवणुकीच्या थाटांत युनिव्हर्सिटींत शिरून दिवाणखान्यांत येतात. निशाणवाले चारी बाजूंनीं भिंतीशीं उभे राहतात; मध्यें खुर्च्यांवर प्रोफे-

सर, मिलिटरी अधिकारी (यांच्यावांचून जर्मनींत कोणत्याहि समारंभाला शोभा येत नाहीं ! ) जर्मनीच्या वरिष्ठकोर्टा (राइश्-गेरिश्ट् ) चा अध्यक्ष व निमंत्रणावरून आलेले इतर सभ्यगृहस्थ बसतात, त्यांच्यामागें विद्यार्थी असतात. पुढें उंच शृंगारलेल्या व्यासपीठावर संपणाऱ्या वर्षाचा रेक्टर चढून जाऊन साधारणत: रिपोर्टवजा भाषण करतो. यंदाच्या रिपोर्टांतील विशेष ह्मणजे एका वर्षांत युनिव्हर्सिटीला लहानमोठ्या मिळून दहा लक्ष मार्कांच्या देणग्या मिळाल्या हा होय ! काय हें दातृत्व व विद्यावृद्धिविषयीं आस्था ! यांपैकीं दोन लाख अमेरिकेंत धंदा करून मृत्यु पावलेल्या एका जर्मन डॉक्टरानें ( वैद्य या अर्थी ) दिले ! मुलांची संख्याहि यंदां ५००० झाली. एकंदर वर्षांत ५७७ लोकांनीं पदव्या (D.Ph.) घेतल्या वगैरे भाषण झाल्यावर लगेच मावळत्या रेक्टरनें किल्ली-शिक्का-मोर्तब-माळ वगैरे नव्याच्या हातीं त्या वेळेचीं ठरीव वाक्यें ह्मणून दिलीं व आपल्या अंगावरील वस्त्रें तेथेंच भरसमाजांत काढून त्याच्या अंगावर चढवलीं. हें जरा मला चमत्कारिक दिसलें. हा जाणाऱ्या रेक्टरच्या आंगावरचा शेंदूर उतरण्याचा प्रकार दोघांनीं थोडा वेळ बाजूला जाऊन केला असता, तर चांगलें दिसलें असतें. असो. नंतर नव्या रेक्टरचें क्रिश्चानिटीवर लांबलचक भाषण झालें ! कारण हा 'धर्म' फाकुल्टेटचा प्रोफेसर पडला ! इकडे मोरोको-कांगोची कुतरे-तोड फ्रान्स व जर्मनी करीतच आहेत, दुसरीकडे इतालीच्या त्रिपोली येथील अंगावर शहारे आणण्यासारख्या अमानुषपणाची ओरड वर्त-मानपत्रांतून चाललीच आहे, व देवळांत अगर युनिव्हर्सिटीच्या व्यास-पीठावरून हे लोक शांतपणें क्रिस्ताच्या उदात्त तत्त्वांचें, त्याच्या नम्र-पणाचें, लोकांसाठीं सुळावरसुद्धां जाण्यास तयार होण्याइतक्या त्याच्या सहानुभूतीचें सारखें गाणें गात असतात ! यूरोपीयांच्या स्वभावांतील हा चमत्कार पाहून मला नेहमीं आश्चर्य वाटतें. असो.

आज सहज जेवतांना फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड येथील पुरुषांच्या गॅलन्ट्री ( स्त्रियांशीं वागण्यांत सभ्यपणा )ची तुलना चालली होती.

मजवर बोलण्याची पाळी आली, तेव्हां मला जर्मन लोकांच्या गॅलंट्रीचीं स्वतः पाहिलेलीं एकदोन उदाहरणें सांगावीं लागलीं. मागें मी बर्लिनला होतों, त्या वेळीं एक दिवस ट्रामधून गांवांत चाललों असतां ट्राममध्यें गर्दी अतोनात होऊन एका बिचाऱ्या बाईला उभें राहण्याची पाळी आली. पांचचार जणांनीं एकदम ट्राममध्यें शिरून तीनचार जणांनीं पटकन् रिकाम्या जागा पटकावाव्या, व आपणांला मात्र खजील होऊन कोंपऱ्यांत उभें राहण्याचा प्रसंग यावा, याचा सध्यां तुह्मांला मुंबईला अनुभव येत असेलच. इंग्लंडप्रमाणें सर्व यूरोपभर पुरुषांमध्यें अशी गॅलन्ट्री असेलसें मला वाटलें होतें; पण कोणी उठलें नाहीं. तें पाहून मी उठून त्या बिचारीला जागा दिली, तों उलट पांचचार गृहस्थ मला हंसूं लागले. असो. ही गोष्ट सांगतांच टेबलासभोंवतीं माझ्या शेजारीं बसलेले दोघे जर्मन जरा खजील झाले.

लाइप्झिक्, २४ नोव्हेंबर, १९११.

माझें एरव्हीं बरें चाललें आहे, काळजी करूं नये. घरचीं चोहोंकडून पत्रें येतात व कुशल (कांहीं वेळीं अकुशलहि) वृत्त कळतें. त्यानें तीन दिवस तरी—पत्रें मिळाल्याचा एक व पुढचे दोन—मनाला उद्योग लागून मनाला समाधान होतें. या तीन दिवसांत पत्रांचीं किती पारायणें होतात हें निश्चित सांगतां येत नाहीं. पुढचे तीन दिवस उद्योगांत ठीक जातात; पण शुक्रवार मात्र फार मोठा वाटतो. सर्वच घड्याळें हळू जातातशीं वाटतात! सूर्य बिचारा तोंडहि दाखवीत नाहीं; धुकें व ढग यांतून वाट काढतांकाढतां त्याला मारामार पडते. कधींकधीं त्यांतून तोंड काढतां आलेंच, तरीसुद्धां आपल्यावर रेंगाळण्याचा आळ न यावा ह्मणून बिचारा पांच वाजतांच नाहींसा होतो! त्यामुळें वेळ दाखवण्याचा सर्व बोजा गरीब घड्याळांवर पडून त्यांनां वाईटपणा घ्यावा लागतो! तरी घराकडे पत्रें लिहिण्यांत गुरुवार थोडा व शुक्रवार अर्धा जातो ह्मणून ठीक आहे!

गेल्या आठवड्यांत मात्र मध्यंतरीं मनाला कांहीं उद्योग मिळाला ह्मणायचा. बुधवारीं संध्याकाळीं येथील क्युन्स्ट्लर् हौसमध्यें इंग्रजी चहा व तीन लहान नाटकी चुटक्यांची करमणूक होती. ही करमणूक येथील गरीब इंग्रजी देवळाच्या मदतीसाठीं असून, त्याचे उपाध्याय मि. नॉडर यांनीं मला मुद्दाम घरीं येऊन आमंत्रण दिल्यामुळें, चहासाठीं एक मार्काचें (मार्क=१२ आणे), व चुटक्यांसाठीं दीड मार्काचें अशीं टिकिटें काढून गेलों. या घरीं राहणारे व इतर ओळखीचे मिळून दहाबाराजण आह्मी पांच वाजतां क्युन्स्टलर् हौसमध्यें गेलों.

हें क्युन्स्ट्ल् हौस व अशाच त्सेंट्राल थिआटर, क्रिस्टाल पालास्ट वगैरेसारख्या ठिकाणीं गेझेलशाफ्टस् रॉयम (इं. Society rooms) ह्मणून मोठमोठे शृंगारलेले दिवाणखाने असून, असले चहा, एकाद्या क्लबाचीं लेक्चरें, एकाद्या सत्कृत्यासाठीं भरलेल्या लहान-सभा, नाटकी चुटके, वगैरे समारंभांसाठीं भाड्यानें दिले जातात. ज्या साल (saal =दिवाणखाना, शाळा)मध्यें आजचा समारंभ होता, ती फुलझाडें, वेलीच्या कमानी वगैरेनीं शृंगारली असून तींत स्वच्छ चादरींचीं तीसचाळीस मेजें चहा घेण्यासाठीं मांडून ठेविलीं होतीं. प्रत्येकावर कांचेच्या सुबक पेल्यांत फुलें अगर लतापल्लव शोभेसाठीं ठेविलीं होतीं. अशा एका मोठ्या टेबलाभोंवतीं आह्मी बसलों. सभोंवार प्रत्येक टेबलाभोंवतीं निरनिराळा सभ्य पोषाक (गेझेलशाफ्ट्स क्लाइड) करून स्त्रीपुरुष व मुलें आनंदांत गुलगुल गोष्टी करीत, हंसत, थट्टा करीत बसलीं होतीं. चहा देण्याला भाड्याचीं माणसें नव्हतीं; कारण संगीत शिक्षण व इतर कामासाठीं येथें आलेल्या तरुण इंग्लिश मुलींनीं तें काम खुषीनें व हौसेनें आपल्या अंगावर घेतलें होतें. या वेळचा यांचा पोषाक मोठा मौजेचा होता. संध्याकाळच्या पुढील कार्यक्रमासाठीं (नाटक, गाणें व शेवटीं नाच) पोषाक बदलण्याचा

त्रास पडूं नये ह्मणून पांढऱ्या रंगाचा, क्वचित् गुलाबी, अस्मानी छटा असलेला सभ्य पोषाकच याहि घालून आलेल्या होत्या; पण तो खराब होऊं नये ह्मणून कमरेपासून खालीं पांढरें झालरीचें मळकापड अगर सोधनें (शुर्त्स), व डोकीवर पांढरी झालरीची छोटीशी टोपी बांधून त्यांनीं स्वतःला दासी ( Bar-maid )चें मजेदार स्वरूप दिलें होते, व मोठ्या हौसेनें सर्व पाहुण्यांनां चहा, बिस्किटें, केक्स वगैरे व्यवस्थेशीर पुरविण्याचें काम चालविलें होतें. मधुनमधून तरुण मुली व कांहीं गृहस्थहि लॉटरीचीं टिकिटें घेऊन येत, व आपल्या मधुर भाषणानें जमलेल्या पाहुण्यांनां त्या चारपांच प्रकारच्या टिकिटांपैकीं दोनतीन तरी घ्यायला लावीत! लॉटरींत मिळणारे पदार्थ, तीनचार पौंड उत्तम इंग्लिश चहा, दोनतीन बाहुल्या, हातानें नक्षी भरलेल्या उशा, तीनचार सिगार्स व इतर आठदहा किरकोळ जिन्नस होते. येथील लोकांनां इंग्लिश चहा ह्मणजे कांहीं अपूर्व आहे असें वाटतें. मुख्य कारण त्यांनां स्वतः चांगला चहा कोणता तें कळतहि नाहीं, व मिळतहि नाहीं, व मिळाला तरीहि तो बिलकुल तयार करतां येत नाहीं. त्याचें कांहींतरी बेचव कढत पाणी करून ठेवतात! घर सोडल्यापासून लंडनचे थोडे दिवस खेरीज करून मला 'खरा' चहा अजून प्यायला मिळाला नाहीं! तरी घरवाली बाई आपल्याकडून रोज पराकाष्ठा करते! तें असो ह्मणा; पण याचा फायदा घेऊनच लॉटरीमध्यें चहाची योजना मुद्दाम करण्यांत आली होती, व त्याचीं टिकिटें जर्मन आयांमध्यें फार खपलीं. बाहुल्यांवर त्यांच्या अठरा वर्षांच्या लहान मुलींच्या उड्या पडल्या, व सिगार्सच्या टिकिटांवर अर्थात् व फ्याशनेबल तरुण जर्मन मंडळींनें हल्ला केला!

चहा व नाटकी चुटके यांत एक तासाचा ( सहा ते सात ) अवकाश होता. त्या अवकाशांत तेथेंच थांबणाऱ्या मंडळीसाठीं शेजारीं एक दिवाणखानावजा खोली तयार केली होती, व मोठी साल (शाला)

रिकामी करून नाटकाच्या खुर्च्या मांडण्याची तयारी इंग्लिश मंडळी करतात तोंपर्यंत पाहुण्यांच्या करमणुकीसाठीं एका कोंपऱ्यांत अमेरिकन केक्स विकायला ठेवल्या होत्या. चांगल्या असतील, नाहीं असें नाहीं; पण त्या स्थलकालमानानें महाग मिळणाऱ्या केक्स घेऊन एकदम तोंडांत कोंबणाऱ्या मंडळीकडे पाहून मला हंसूं आल्याखेरीज राहिलें नाहीं ! याशिवाय, हात पाहून दैव सांगणारी एक वृद्ध बाई एका बाजूला बसलेली होती. तिच्याभोंवतीं, आपलें भावी बरेंवाईट कळावें, या उत्सुकतेनें तरुण जर्मन व कांहीं इंग्रजसुद्धां मुलींचा गराडाच जणूं पडला होता. मी राहतों त्या घरीं राहणाऱ्या रोमानियन मुलीला आपलें दैव कळण्याची उत्कंठा लागली; पण तिला तर इंग्रजीचें अक्षर समजत नव्हतें ! तेव्हां मीं दुभाषेपणाचें काम पत्करून तिच्या जिवाला ठिकाणावर आणलें ! तिला अर्थातच त्या बाईनें सर्व चांगलें सांगितलें. एखादी न पटेलशी गोष्ट सांगून सध्यांच आपणावर होत असलेला अर्ध्या मार्कांचा वर्षाव बंद पाडण्याइतकी भोळी साहजिकच ती नव्हती ! उदाहरणार्थ, तूं फार हुषार आहेस व श्रीमंत होशील, असें ज्ञातारीनें सांगून मुकाट्यानें मिळालेला सबंध मार्क खिशांत टाकला ! अर्ध्या मार्कांच्या ठिकाणीं फुकट सबंध मार्क खर्च करण्याची ही आपली आटोकाट हुषारी मागाहून त्या रोमानियन मुलीच्या लक्ष्यांत आली, तेव्हां तिला काय वाटलें याची कल्पनाच करावी !

या व अशाच आणखी करमणुकींत एक तास संपला, व चुटक्यांची वेळ झाली. प्रेक्षकसमुदाय चांगली जागा आधीं पटकावण्यासाठीं गर्दीनें सरसावला व सरासरी सव्वासातला सुरुवात झाली. एकंदर तीन चुटके होते. चुटकेच ते; घटकाभर हंसवण्यापलीकडे त्यांत कांहीं तथ्य नव्हतें. प्रेक्षकहि तें जाणून होते; पण तितकेंच इंग्रजी, खुद्द इंग्रज लोकांकडून बोललें जाणारें इंग्रजी, आपल्या कानांवरून जाईल एवढ्याच हेतूनें बरेच जर्मन लोक आले होते. कोणत्याहि गोष्टीची उपयुक्तता तेव्हांच

जोखून तिचा फायदा घेण्याची जर्मन लोकांची नैसर्गिक प्रवृत्ति प्रसिद्ध आहे. तिचें हें एक लहानसें उदाहरण होय. युनिव्हर्सिटींतील इंग्रजीच्या प्रोफेसरानें आधल्या मंगळवारच्या आपल्या लेक्चरांत या समारंभाचा उल्लेख करून, आपल्या विद्यार्थ्यांनां 'इंग्रजांच्या तोंडून निघालेलें इंग्रजी ऐकण्याच्या या संधीचा उपयोग अवश्य करून घ्या,' असें सांगितल्याचें मला कळलें. हीहि गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

सव्वानऊ वाजतां नाटकें संपलीं. नंतर इकडील पद्धतीप्रमाणें तरुण मुलांमुलींचा नाच (जर्मनींत दोनतीन मुलांच्या आया देखील हौसेनें नाचतात! याला इंग्लंडप्रमाणें 'सोसायटी'चें बंधन नाहीं!) व्हायचा होता. पण त्यांत कांहीं विशेषसें न वाटल्यामुळें व भूकहि पोटांत मावे-नाशी झाली ह्मणून मी तेथून परतलों.

येथें इंग्लिश रहिवाशांची संख्या सत्तरऐंशींहून अधिक नसेल. यांपैकीं बरेचसे धार्मिक असतील यांत शंका नाहीं; पण दर रविवारीं अकरा वाजतां प्रार्थनेच्या वेळेला हजिरी वीसवर नसते! चर्चला जाणें आवश्यक नसून, फक्त सवड, सोय व मर्जी यांवर अवलंबून असतें. हें कसेंहि असलें, तरी परवां चर्चच्या मदतीसाठीं सर्वजण मिळून, त्यांनीं नेटानें व हौसेनें तो दिवस साजरा केला, व अंगावर पडेल तें काम करून चर्चला चौदापंधराशें मार्क जमवून दिले. या गोष्टीपासून बरेंच शिकण्यासारखें आहे.

पुन: गेल्याच आठवड्यांत शनिवारीं रात्रीं आठ वाजतां स्तेंद्राल थिआटरच्या दिवाणखान्यांत अन्तर्राष्ट्रीयविद्यार्थीमंडळाच्या (इन्टर्नात्स्यो-नालर् स्टुडेंटेन् फराइन्—निरनिराळ्या राष्ट्रांतील विद्यार्थ्यांचें मंडळ) विद्यमानें बर्लिनच्या एका प्रोफेसराचें व्याख्यान झालें. हें विद्यार्थीमंडळ गेल्या जुलईत स्थापन झाल्याचें मीं तुह्माला कदाचित् लिहिलें असावें. जर्मन व येथें अभ्यासासाठीं आलेले परदेशचे विद्यार्थी यांची एकमेकांशीं

ओळख होऊन एकमेकांविषयीं व त्यांच्या देशांविषयीं खरी माहिती एकमेकांनां व्हावी, ह्मणून हें मंडळ स्थापन झालें आहे. त्याच्या कार्यक्रमांत चांगल्या माणसांकडून व्याख्यानें देववणें हा एक भाग आहे. त्याप्रमाणें पहिलें व्याख्यान परवां झालें. विषय इंटर्नात्सयोनालर् विझेन्शाफ्टस् बेट्रीब (इं. International literary & scientific industry) हा होता. त्याविषयीं कांहीं लिहिण्याची ही वेळ नव्हे. श्रोतृसमाज विद्यार्थी व इतर सभ्यगृहस्थ व स्त्रिया मिळून २०० च्यावर होता. यांत रानवट दिसणाऱ्या रशियन विद्यार्थ्यांचा भरणा बराच होता, यांत नवल नाहीं. येथील एकंदर एकवीस युनिव्हर्सिट्यांतून जे चारएक हजार परदेशीय विद्यार्थी आहेत त्यांत निम्याच्यावर (२०५०) रशियन असून, त्यांपैकीं बरेचसे लाइप्झिकच्या वांट्याला आले आहेत. इतर कारभारांत ढवळाढवळ करण्याची यांनां सवय असल्यानें हे प्रोफेसरांनां आवडत नाहींत, व गेल्या 'Immatriculation' (विद्यार्थी युनिव्हर्सिटींत घेण्या)–च्या वेळीं रेक्टरनें याबद्दल त्यांची कानउघाडणीहि केली होती. व्याख्यानाच्या दिवशींहि यांचा खरखरीतपणा सहज दिसून येई. माझ्या पुढच्या ओळींत खुर्चीवर एक तरुण स्त्री चुकून दुसऱ्याच्या जागेवर बसली. तो गृहस्थ आला तों बाईची जागा शेजारची असून ती आपल्या जागेवर बसली आहे असें त्याच्या लक्ष्यांत आलें व तो तिला ऊठ ह्मणूं लागला. इतक्यांत व्यवस्थापकांपैकीं एक विद्यार्थी तेथें येऊन 'कांहीं हरकत नाहीं, तुह्मी शेजारीं बसल्यास चालेल,' वगैरे सांगूं लागला. पण त्या गृहस्थानें न ऐकतां त्या बाईला पलीकडे बसावयाला लावलें. तो रशियन हें लक्ष्यांत यायला फारसा वेळ लागला नाहीं. माझ्या उजव्या बाजूला पुढें एक रशियन विद्यार्थी व दोन त्याच्या सोबतिणी (आप्तसुद्धां असतील) बसल्या होत्या. सर्व लेक्चरभर त्या कुजबुजत होत्या; कागदावर कांहीं चित्र काढून, खालीं कांहींतरी मूर्खपणाचें लिहून, तोंड दाबून खजबजल्यासारखें हंसणें

हाहि त्यांचा उद्योग चालू होता ! पुरुषांबरोबर स्त्रियांनींहि व्याख्यानाला जाण्याची इकडे 'मोड' ( fashion ) आहे; पण तें व्याख्यान न समजलें, तर असले धंदे करण्याची जर्मन स्त्रियांत तरी 'मोड' नाहीं, अशी माझी समजूत आहे. जरा मागें एक ३५।४० वर्षांचे तांबड्या फ्रेंच-सारख्या दाढीचे गृहस्थ आपल्या बायकोजवळ व मित्राजवळ मोठमोठ्यानें तिरस्कारयुक्त कुजबुजून व्याख्यात्यांबद्दल आपली नापसंती दर्शवीत होतेसें वाटतें ! त्यांच्या 'न्यत, दा' वगैरे रशियन शब्दांनीं, आकृतीनें व हावभावांनीं, ते कुठले याची शंका ठेवली नाहीं !

असो. हिंवाळ्यांत अभ्यासाखेरीज वेळ कशा तऱ्हेनें घालविण्याची इकडे चाल आहे, याचे हे दोन मासले दिले आहेत. शिवाय, रविवारीं मराठी वाचन होऊन आनंद होतो. येथें मराठी पुस्तकें कसचीं मिळणार, अशा समजुतीवर मीं इतके दिवस चौकशीहि केली नव्हती. येथें हारासोवित्सचें 'Oriental Book-shop' आहे; त्या दुकानांत संस्कृताशिवाय हिंदी, बंगाली, गुजराती व विशेषतः मराठीहि पुस्तकें असल्याचें समजून आश्चर्य वाटलें. मोरोपंतांचीं दहा पर्वें त्या दुकानांत सोळा मार्कांनां मिळतात.

लाइपूझिक्, १२ जानेवारी, १९१२.

हिंवाळ्यांत प्रवास करणें कोठेंहि वाईटच, मग थंड यूरोपांत तर तो नकोसा व्हायला पाहिजे. पण यंदांचा हिंवाळाच चमत्कारिक ! आह्मी निघालों तेव्हां हवा इकडील वसंत ऋतूची, ह्मणजे थोडा गारठा व अधुनमधून पाऊस, कधीं थोडें धुकें, अशी होती. त्यामुळें एवढेंच झालें, कीं, जेथें ह्मणून उतरून शहर वगैरे पाहण्याला गेलों, तेथें पावसानें अटक केली. शिवाय, एकट्याची गोष्ट निराळी असते. स्वित्झर्लंडांत फिरलों, तेव्हां ऊन्ह, पाऊस ( सुदैवानें त्यानें फक्त एक-दांच पण अवघड ठिकाणीं गांठलें होतें ! ) अवघड चढ वगैरेंस

न जुमानतां, मनसोक्त रीतीनें सृष्टिशोभा पाहतां आली. या वेळेला मी एकटा नव्हतों.

ता. २३ डिसेंबर शनिवारीं कोलनकडे जाण्याला निघालों. दुसऱ्या दिवशीं क्रिस्टमस्साठीं आपापल्या घरोघर धांवा घेणाऱ्या माणसांची गाडींत अतोनात गर्दी! प्रथम तर गाडींत जाण्यायेण्याच्या बोळांत (कॉरिडोर)उभें रहावें लागलें,व शेवटीं एका राउखर्-विडी ओढण्याच्या डब्यांत- जागा मिळाली. त्याचा मला त्रास मात्र झाला! असो. रात्रीं अकरा वाजतां कोलन( Koln, इंग्रजी Cologne )ला पोहोंचलों. दुसऱ्या दिवशीं प्रथम थोडा वेळ प्रसिद्ध ऱ्हाइन् नदीच्या कांठीं जाऊन, तो जोराचा गढूळ प्रवाह, त्यावर उतारूंच्या व मालाच्या बोटींचा सुळसुळाट, कोळ्यांचा मच्छीचा व्यापार, जरा वर मोठ्या पुलावरून जाणाऱ्यायेणाऱ्या आगगाड्यांचा धडधडाट वगैरे पाहून व ऐकून करमणूक झाली. माइन्त्स् ( इं. मेयेन्स )पासून वरती कोब्लेंत्स, कोलन, डयुसल्डोर्फ् वगैरे शहरांचा बराच मोठा व्यापार ऱ्हाइन नदीवरून चालतो. वेस्ट्फालियाच्या व्यापाराचा राजमार्गच ही ऱ्हाइन नदी आहे, असें ह्मटलें असतां चालेल. नंतर माझ्या रीतीप्रमाणें ह्मणजे बाजार, जुनें शहर, गरीब लोकांचा भाग हीं फिरून पहायला पावसामुळें वावच राहिला नाहीं; ह्मणून फक्त प्रसिद्ध डोम देऊळ पाहून परतलों. ही फारच मोठी, जुन्या गॉथिक शिल्परीतीची, सातआठ शतकांच्या प्रचंड ओघांत काळसर झालेली इमारत आंतूनहि भव्य आहे. सौंदर्यापेक्षां विस्तार व भव्यपणा यांचा मनावर अधिक परिणाम होतो. आंतील छप्पन मोठमोठ्या खांबांवर नाना कमानींमुळें जाळीदार दिसणारें छत अप्रतिम आहे. देवळाचें जडजवाहीर, वरील सज्जांतील संगीतवाद्यें वगैरे न पहाण्याचें ठरल्यामुळें परतून, भोजनादि उरकून विश्रांति घेतली. यूरोपीय लोकांनां अत्यंत प्रिय असणारें केज (इं. cheese) अथवा चख्खा येथें प्रथमच चाखलें. कारण लाइप्झिक् व इतर ठिकाणीं पाहिलेल्या चख्ख्याच्या भपकेंनेंहि याला घाण नव्हती.




कलोन येथील ' डोम् ' ( देऊळ ).

## ब्रसेल्स.

हायलिगेन् आबेंड्-पवित्र रात्रीच्या दिवशीं-ब्रसेल्सकडे निघालों. जर्मन-बेलजियन् सरहद्दीजवळ ' व्हरव्हिये (Verviers)' येथें सुखाची व जलद जर्मन गाडी सुटून, आपल्या सदर्न मराठ्याच्या साध्या गाडीहूनहि भिकार, त्रासदायक व गैरसोयीच्या अशा बेलजियन गाडीनें निघालों. ' नीट स्पूवेन ( Niet spuwen ) थुंकूं नये, ' असें प्रत्येक डब्यांत ढोबळ अक्षरांनीं लिहिलें असूनहि थुंकण्याचा अमंगळ प्रकार चालूच असे ! बेलजममधून जातांना सरासरी अर्धा मार्ग पावेतों पाऊस लागला. बर्फाचा तर कोठें मागमूस नव्हता. स्वच्छ पांढरें बर्फ व क्रिस्टमस यांची सांगड यंदां तुटली ह्मणायची ! पाण्यानें भरलेल्या ओढेवजा नद्या, हिरवेंगार गवत व वेली, भाजीपाल्यांचीं शेतें वगैरे वसंताचीं पूर्वचिन्हेंच सर्वत्र दिसत. वाटेनें धुरकटलेलीं लोखंडादींच्या कारखान्यांचीं अनेक गांवें लागलीं. अशा देखाव्यांतून दुपारीं दीडच्या सुमाराला बेलजमच्या राजधानींत उतरलों. भाषेची ( फ्रेंच ! ) नेणीव, ह्मणून एका इंग्लिश बोललें जाणाऱ्या हॉटेलचा आश्रय केला. बेलजम हा पूर्वीं जरी फ्रेंच अंमलाखालीं असे, तरी आतां बरेच दिवस स्वतंत्र देश आहे. असें असूनहि येथें फ्रेंच भाषेचें प्राबल्य पाहून आश्चर्य वाटलें ! अगदीं अलीकडे पुनः त्यांची फ्लेमिश भाषा बोलणेंलिहिणें वगैरे प्रचारांत आणण्याचा तरुण बेलजमचा प्रयत्न चालू आहे. तेथील पार्लमेंटमध्येंहि नुकताच फ्रेंचला बहिष्कार घातल्याचें ऐकतों. ही समाधानाची गोष्ट आहे. त्यापेक्षांहि हास्यास्पद प्रकार ह्मणजे दोन अस्सल हिंदी गृहस्थांची यूरोपांत गांठ पडली असतां त्यांनां तिऱ्हाइती इंग्रजींत एकमेकांशीं बोलण भाग पडावें, हा होय !

क्रिस्टमसच्या पहिल्या सणाचा हा दिवस ( ता. २५ डिसेंबर ) असल्यामुळें बाजार वगैरे बंद होते. शिवाय, पाऊस व थोडथोडा

चिखलहि होता. स्टेशनपुढील मुख्य चौकांत, कीं, जेथें सर्व बाजूंनीं विजेचे दिवे आदिकरून आधुनिक सर्व सोयींनीं व सुखाच्या साधनांनीं भरलेलीं मोठमोठीं हॉटेलें आहेत–तेथेंहि केरकचरा बराच पाहून आश्चर्य वाटलें, व जर्मन शहरें फारच स्वच्छ असतात ही कल्पना या विरोधानें दृढ झाली. थोडेंसें हिंडून जार्डें बोटानिक ( इंग्रजी Botanical gardens ), जुनें मशिदीसारखें दिसणारें देऊळ व कांहीं मुख्य रस्ते हीं पाहिलीं. हे रस्ते चारी बाजूंनीं सरळ गेलेले आणि मध्यें खोल व टोंकाशीं चढते असून दिव्यांनीं वगैरे रम्य दिसले. बाजार बंद होता तरी तावदानांतून मांडलेल्या सुंदर चिजा पाहण्यास लोकांच्या झुंडीझुंडीच्या लोटत होत्या. दुकानेंहि विजेच्या दिव्यांनीं फारच सुरेख शृंगारलेलीं होतीं. लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं मुंबईला मोती बाजार व कापडबाजार सजवतात त्याची आठवण अर्धे तप मुंबईला घालवलेल्या महाराष्ट्रीयाला होणें साहजिक आहे. स्टेशनचौकांतील हॉटेलें व उपहारगृहें ( रेस्टोराँ )यांतून संध्याकाळीं फ्याशनेबल लोकांची अतोनात गर्दी होती. संगीताच्या गजरांत जेवण, दारू, गप्पा, धूम्रपान व नंतर सणाचा नाचरंग हीं सुरू होतीं. येथील लोक दिसण्यांत, ढबींत, पेहरावांत विशेष फ्रेंच धर्तीवर दिसले. असो. दुसऱ्या दिवशीं कॅलेकडे निघालों.

वाटेंत जकाततपासणी झाल्यावर लील शहरीं गाडी बदलून कॅलेएक्स्प्रेसनें जायचें होतें. तिचें जास्त हंशील भरतेवेळीं भाषेची अडचण आली; तेव्हां लिहून, खुणांनीं व एका फ्रेंच सभ्यगृहस्थाच्या मदतीनें निभलें गेलें. त्याच भल्या माणसानें लील येथें योग्य गाडींत बसवून दिलें. एकाच उदाहरणावरून ठोकळ मत बनवणें ठीक नव्हे; तरी पण, ‘ फ्रेंच लोक तोंडसफाई तेवढी करतात, स्वतःला यत्किंचित्हि झिजवण्याचा प्रसंग ते टाळतात,’ वगैरे वगैरे त्यांच्या निंदेचाहि अवास्तव अतिरेक झाला आहे, असें मला वाटतें.

कॅले येथें फ्रेंच बोटींत बसल्यावर पर्सर् (कारखाननीस अगर खजीनदार) जवळून टिकिट घेतांना, त्यानें आमचें जर्मन नाणें फ्रेंचच्या बद्दल घेतांना उघडउघड लुच्चेगिरी केली! त्याचें मोडकें इंग्रजी व आमचें फ्रेंचच्या नांवानें शून्य; शिवाय, मला बोटहि लागूं लागली; ह्मणून पंचायतींत न पडतां त्यानें मागितलें तें मुकाट्यानें द्यावें लागलें. तेंच डोव्हर येथें इंग्लिश गार्डानें लंडनचें टिकीट देतांना आमच्याकडून रास्त तितकेच जर्मन पैसे घेतले. याप्रमाणें फ्रेंच व इंग्रजी प्रामाणिकपणाचा हातोहातीं मामला पाहून जरा मौज वाटली.

**लंडन.**

सायंकाळीं पांच नंतर चेअरिंग क्रॉसला उतरलों व तर्र झालेल्या गाडीवाल्याच्या कॅबमधून किलबर्न्‌ला आलों. हा 'बॉक्सिंग डे' अथवा कुस्त्यादि खेळांचा दिवस असल्यामुळें व पावसामुळेंहि लंडन शहर बरेंच शांत दिसलें.

मी लंडन येथें आठ दिवस होतों. मला काम फक्त मित्राला शहर दाखविण्याचें होतें. तें त्याला रोज थोडथोडें नेऊन दाखवीत होतों. या खेपेला मीं नव्या अशा थोड्याच गोष्टी पाहिल्या. उ० व्हिक्टोरिया व आल्बर्ट म्यूझियम, व प्रसिद्ध ब्रिटिश म्यूझियममधील लायब्ररी इत्यादि. ही लायब्ररी फारच मोठी आहे. ही घुमटाकार असून त्याच्या आंतून व बाहेरून पुस्तकांच्या घडवंच्यांनीं केवळ मढवल्यासारखी दिसते. हींतील वाचनालयांत पुष्कळ माणसें काम करीत बसलीं होतीं. ओरिएंटल् सेक्शन्–हिंदी हस्तलिखित ग्रंथसंग्रह–फारच मोठा आहे. तो डॉ. बारनेट्–त्याचे व्यवस्थापक–यांनीं फिरून दाखविला. येथें किती हिंदी विद्यार्थी वाचण्यासाठीं येतात ह्मणून विचारतां 'फारच थोडे' असें त्यांनीं सांगितलें! याशिवाय एकदां ड्रूरीलेन् नाटकगृहांत किस्मेट् नांवाचा खेळ पाहिला. यांतील सांगायची मुख्य गोष्ट ह्मणजे, नायकाचें व

दुसऱ्या एका चांगल्या पात्राचें अशीं कामें करणारे नट ऑक्सफर्ड केंब्रिज्चे ग्रॅज्येट् आहेत, व हा खेळ मुसलमानी असल्यामुळें, त्यांच्या रीतिभाती पहाव्या ह्मणून हे दोघेहि दोनचार महिने त्या लोकांत राहून आलेले आहेत. याखेरीज लंडनविषयीं जास्त कांहीं लिहिण्यासारखें या खेपेला नाहीं.

नंतर बुधवारीं—नव्या वर्षाच्या तिसऱ्या दिवशीं—दहा वाजतां हायजिया हौस (मीं येथे येऊन उतरलों होतों) ला रामराम ठोकला. येथें आठ दिवस होतों; पण चवथ्यापांचव्या दिवशीं कोठें इंग्रजी भोजनबंधूंची आमचेकडे पाहून मान हालवून स्मित करण्यापर्यंत मजल आली होती.

संध्याकाळीं सात वाजतां पारिसला आलों. येथें एक गुजराती गृहस्थ स्टेशनावर येऊन त्यांनीं सर्व व्यवस्था लाविली. र्‍यूद ला व्हिक्तुआर् (Street of Victory)च्या कोंपऱ्यावर हॉटेलांत उतरलों. येथें आणखी एका गुजराती गृहस्थांची गांठ पडून ओळख झाली. हे दोघे व आणखी शंभरएक गुजराती व्यापारी येथें जवाहिराचा धंदा करतात; यांनां प्राप्ती फारच नामी होते. कारण, पारिसला ऐषआरामाचा कळस आहे! पण यांचें येथें दुकान अगर पेढी कांहीं नाहीं. फेरीवाल्यासारखा धंदा करतात. एकमेकांवर विश्वास नाहीं, जूट नाहीं वगैरे वगैरे मुंबईचे व्यापारी दोष यांच्याबरोबर तसेच यूरोपांत आले आहेत!

रात्रीं 'दुवाल'नांवाच्या, लंडन येथील 'जे लायन्स' धर्तीच्या उपाहारगृहांत जेवलों. तळलेले अगदीं पुरीवजा केलेले बटाटे चवदार लागले. इतर पदार्थांनींहि फ्रेंच स्वयंपाकाच्या प्रसिद्धीविषयीं खात्री पटविली. 'जे लायन्स' इतका सभ्यपणा मात्र पारिसमध्यें कसा असेल? तेव्हां तरुण दासींचें डोळे मुरडणें, इतर अंगविक्षेप व आणखी कांहीं लीला गिऱ्हाइकांबरोबर येथें चालतात. शिवाय, टिप्स् (चिरीमिरी) आहेतच;

या जरा पद्धतशीर, ह्मणजे बिलाच्या शेंकडा दहाप्रमाणें घेतात, एवढेंच काय तें! इतर ठिकाणीं टिप्स्ला प्रमाणच नाहीं!

जेवल्यावर थोडे पारिसचे प्रसिद्ध बुलवर (Boulevard!) नांवाचे राजरस्ते पहावे ह्मणून, बुलवर इतालिएँकडे अर्धा तास फिरलों. पारिसच्या खऱ्या धंद्याला नुकतीच कोठें सुरुवात होत होती! रेस्टोरॉंतून संगीत चाललें होतें, व त्यांचे पुढील मोकळया पडव्यांतून स्त्रीपुरुषांची गर्दी, शांपे, पोर्ट वगैरे घेऊन स्वतःला या व नाटक–नाच –तमाशादि अन्यरीतीनें रमवण्यास जमूं लागली होती. दिव्यांचा लखलखाट तर पुसूंच नये!

दुसऱ्या दिवशीं गुरुवारीं (ता. ४ जानेवारी) सकाळीं शहर पाहण्यास निघालों. माझी शहर पाहण्याची रीत तुह्मांला ठाऊकच आहे. बहुतेक पायीं, कधीं ट्राममधून तर कधीं बसच्या वरच्या मजल्यांत उघड्या जागेवरून रस्त्यांची, त्यांवरील व्यापारांच्या गर्दीची, साधारणतः इमारतींची वगैरे ठोकळ कल्पना चांगली येते. पण अगदीं नवी, विसाव्या शतकाच्याहि पुढें धांव घेणारी अमेरिकन रीत आहे का ठाऊक? एक मोटर भाड्यानें करून, तींतून तास दीडतास शहरांतून भरकन् झपाटा मारून आलें, कीं, झालें शहर पाहणें! यापेक्षां कमी सुधारलेली रीत ह्मणजे घोड्याची गाडी तासाच्या बोलीनें करणें, ही होय. रस्त्यानें जातांना कळत न कळत थांबल्यासारखें करून गाडीवाला रस्त्यांचीं, इमारतींचीं, स्मारकांचीं वगैरे नांवें ओरडत असतो. गिऱ्हाइक खिडकींतून लांब मान काढून एकीकडे पहातें, तों तो पुढील चारपांच नांवें घेऊन घोड्याला चाबूक ओढायला तयारच. यावरून लक्षांत येईलच, कीं, माझी रीत या मानानें सर्वांत मागसलेली आहे!

बुलवरमधून आह्मी जात असतां, चित्रांचीं कार्डें घेऊन फेरीवाले पुढें येत, व तीं नको ह्मटलें कीं दुसरीं, मग आणखी निराळीं, शेवटीं

त्रींवर ताण, अशीं असभ्यपणाच्या चढत्या प्रमाणाचीं काडें हळूच ई करायला भीत नसत! ही पारिसची दिवसाढवळ्या उगीच णूक! जरा पुढें जावें तों 'तुह्मांला पारिस फिरून दाखवितों' ह्मणून ईपुढें करीत वाटाडे (गाइड) ह्मणवणारे लोक आडवे येत. यांच्या डाक्यांतून निघावें ह्मणजे मग इकडेतिकडे पाहण्यास उसंत सांपडे! प्रमाणें एका बुलवरमधून दुसऱ्या 'माडलेन' बुलवरांत आलों. येथें क पारथेनानच्या धर्तीचें एक जुनें देऊळ आहे. त्याच्यापुढून ऱ्यू यालमधून 'प्लास द ओबेलिस्क'नांवाच्या, भव्य इमारती, पुतळे, कारंजीं नीं शोभिवंत दिसणाऱ्या विस्तीर्ण चौकांत आलों. याच्या शेजारीं रच व्यवस्थित बाग आहे. त्यांतून जगत्प्रसिद्ध 'लूव्र (Louvre)' डे गेलों. हा पूर्वीं राजवाडा असे. तेथें आतां बरेच दिवस (कांहीं तर्के तरी!) पदार्थसंग्रहालय, उत्तम चित्रांची ग्यालरी वगैरे असून जसारख्या सामान्यजनांची पायरव पडत असते! प्रूद्रों, आंजेलो, वें, व्हान् डाइक (खरोखरी 'फान डाइक' फ्लेमिश नांव), डाव्हिंचो गैरे प्रसिद्ध चिताऱ्यांनीं रंगवलेलीं अप्रतिम चित्रें पाहून थक्क झालों! गांतील पहिल्या नंबरचें चित्रसंग्रहालयच तें! फ्लारेन्स व ड्रेसडेन ंचा दर्जा या बाबतींत पारिसचे बरोबरीचा लागतो. तीन तासांत कती पाहून होणार! पण वेळ नसल्यानें नाइलाज झाला. खरोखर लूव्र' ग्यालरी नीट रीतीनें पहायची ह्मणजे भरपूर एक महिना पाहिजे. री पुसटपुसट तरी मला कल्पना आली. शिवाय, उत्तम वस्तु एकदम ाहून टाकण्यांत इतकी मजा नसते. त्यांतील कांहीं तरी पहायचें ाहिलें आहे, तें आपण केव्हां तरी पाहूं, या आशेमध्येंहि कांहीं गोडी आहे.

परत येतांनाहि पाऊस होताच. त्यामुळें रस्त्यानें भुईबरोबर पाणी चिखल झाला. बाजूच्या पायरस्त्याच्या कडेनें जात असतांना एकादी ोटर अगर बस् जवळून गेली, कीं, कपड्यांस 'पारिसी' चिखलाचा

शिडकाव मिळे! शिवाय, बारीकसारीक चिठ्याचपाट्या, सिगारचे तुकडे, अर्ध्या जळलेल्या काड्या वगैरेंनीं पारिसच्या प्रसिद्ध सौंदर्याला गाल-बोटच लावलें, असें वाटे. शहर स्वच्छ कसें ठेवावें, हें यांनां अजून जर्मन लोकांपासून शिकायला पाहिजे! पण हाडवैऱ्याकडून बरेंहि शिकणें ह्मणजे जिवावरची गोष्ट आहे! पारिसच्या पोलिसअधिकाऱ्यांनीं 'रस्त्यावर निरुपयोगी टिकिटें व इतर चिठ्या वगैरे टाकूं नये' अशा आशयाचा नवाच हुकूम फर्मावल्याचें, व पारिसचे खुशालचंद लोक त्याविरुद्ध गैरसोयीच्या मिषानें तक्रार करणार असल्याचें कालच येथे वर्तमानपत्रांत वाचलें व मौज वाटली!

संध्याकाळीं शांजेलीजे याच्या (Champs Eliese) नांवाच्या विस्तीर्ण रस्त्यावर फिरावयाला गेलों. याच्याएवढा व सारखा जगांत दुसरा रस्ता नाहीं, असें सांगतात! दोन्ही बाजूंनीं भव्य फशानेबल इमारती कार्ल्टन्सारखीं अगदीं आजतागायत व माणशीं दरदिवशीं दोन-दोनशें पावेतों फ्रांक (सरासरी सवाशें रुपये) घेणारीं अतिस्वस्त (!) हॉटेलें पहातपहात प्लास द ला एतुआल (Etoil) कडे गेलों. येथे 'आर्क द त्रियुंफ' नांवाचा एक भव्य कमानीदरवाजा फ्रेंच लोकांनीं मिळविलेल्या अनेक विजयांच्या (विशेषतः नेपोलियनच्या वेळीं) स्मरणार्थ उभारलेला आहे. लंडन येथील मार्बल् आर्च्, वेलिंग्टन् आर्च् हीं याच्या पासंगालाहि लागणार नाहींत! याच्यावरून दिवसा पारिसचा एकंदर देखावा फार अजब दिसतो. वाटेनें आह्मांला पुनः एक गाइड भेटला, व एका थिएटरकडे नेतों असें ह्मणाला. त्यानें या थिएटरचे विशेष गुण ह्मणून जे सांगितले, ते सभ्यपणाच्या हिंदी कल्पनांप्रमाणें येथे लिहिणें अशक्य आहे! नंतर दुसऱ्या बाजूनें बुलवर होसमॉंकडे गेलों. यावर प्रॉंटॉं (Prin Temps) सारखीं सौंदर्य, भव्यपणा व भपका यांत राजवाड्यांनांसुद्धां बगलेंत मारणारीं ऑफिसें व दुकानें पाहून आश्चर्य वाटलें. रात्रीं सिनेमांत दिल्लीदरबारचीं चित्रें पहावयाचीं होतीं पण भिडूनें मागें घेतल्यानें तें तसेंच राहिलें.

शुक्रवारीं ( ता. ९ ) सकाळीं एका फ्रेंच् सोसायटीच्या सेक्रेटर ( Secretaire )ला भेटण्यासाठीं बुलवर सॉं जरमें (st. germains) कडे गेलों, हा लव्रच्या मागच्या बाजूनें वाहणाऱ्या सेन् नदीच्या पलीकडे आहे. हिजवरील पांचसात पुलांपैकीं 'पां दे झा ' पॉं द नेफ्, पॉं दे झालेक्झांद्र ( Pont des Arts, pont de neuf, pont des Alexanders )' हे चांगले आहेत. पलीकडे जाऊन एका जॉंदार्म –पोलिसला पत्ता सांगून रस्ता विचारतां, त्यानें वाट दाखविली. तिनें जाऊं लागलों तों पायपिटी मात्र फार झाली; मी स्वत: ज्या रस्त्यानें जाणार होतों, तोच जवळचा होता असें दिसून आलें ! हा पारिस— जॉंदार्मचा थोडा मासला ! इच्छित स्थळीं गेलो, तों सेक्रेटर नुकताच देज्युने ( सकाळचा फराळ )ला गेला असल्याचें त्याच्या दासीनें सांगितलें. ही वेळ बारा वाजण्याची होती ! परत कलोन द व्हॉंदोम, ऱ्यूद् लोपरा, जगद्विख्यात ( पांढरें जग ! ) सुंदर आपराहौसवरून घरीं आलों, व जरा विश्रांति घेऊन बांधाबांधी करून रात्रीं आठ वाजतां कोलनकडे परत निघालों.

वरती, पारिस ( फ्रेंच उच्चार ' पारी ' )च्या खऱ्या धंद्याचा उल्लेख केला आहे. या धंद्याला रात्रीं नऊपासून एकपावेतों भर असतो, व गरीबश्रीमंत, लहानथोर आपापल्यापरीनें त्याला हातभार लावीत असतात. हा धंदा ह्मणजे ऐषआराम, चैन, ख्यालीखुशाली, नाना-तऱ्हेची इष्कबाजी वगैरे होय. याचा दररात्रीं पारिसला कळस होतो ! संगीत, नाटकें, नाचरंग, तमाशे यांनां रात्र पुरेनाशी होते. दारू ही अर्थात् सर्व गोष्टींचा सामान्य गुणक असते, हें सांगायला नकोच. शिवाय, मोठमोठ्या फराशनेबल रिस्टोरांमधील विशिष्ट जागीं जुवेबाजी अलोट चालते. आणखीहि केवळ जुवेगिरीचेच ह्मणून अड्डे असतात. डिटेक्टिवरूपानें कायद्याची यांजवर अर्थात् करडी नजर आहे; पण या डिटेक्टिवांवरहि या अड्ड्यांचे हेर असतात ! पोलिस डिटेक्टिव्ह

आसपास आल्याचा सुगावा लागला, कीं, एकदम या जुवेगिरीच्या सभांनां सामान्य रिस्टोरांचें स्वरूप देतां यावें, अशा खुबीच्या व्यवस्था केलेल्या असतात, असें माहितगार लोक सांगतात: वगैरे किती लिहावें? अर्थात्‌च रात्रीं नानातऱ्हेच्या विषयसुखांत दंग झालेले 'पारी' चे लोक सकाळीं दहाअकरापावेतों निद्रा व आळस यांत गढून गेल्यास नवल नाहीं. ज्याची कीर्ति आपण हिंदुस्तानांतहि ऐकतों तें हें पारिस! सुधारणा सुधारणा ह्मणतां ह्मणतां धार्मिक, नैतिक, सामाजिक बंधनें हळुहळू झुगारून देऊन, स्वेच्छाचार, चहाटळपणा यांचें शिखर पारिसने गांठलें आहे, व पारिसची फ्याशन उचलण्यांत भूषण मानणारीं इतर यूरोपीय राष्ट्रें मागून धांव घेत आहेत. लग्न करणें जास्त खर्चाचें, जबाबदारीचें, काळजीचें माहेरघर आहे, आणि त्यानें स्वैरपणाला थोडा आळा बसतो, यामुळें येथील स्त्रीपुरुषांनां अविवाहित स्थिति बरी वाटावी, यांत नवल नाहीं. पण अविवाहितपणाची व्याप्ति ब्रह्मचर्यापर्यंत तर राहोच, पण साधारण नियमनापर्यंतहि नसल्यानें शारीरिक, मानसिक व सांपत्तिकहि ऱ्हास बराच होत आहे. फ्रान्सची लोकसंख्या, विशेषत: पुरुषांची संख्या दिवसेंदिवस खालावत चालली आहे, व राष्ट्रीय गुणांचा हळुहळू ऱ्हास होऊं पहात आहे. हें मशहूरच आहे. कोणतेंहि भारदस्त वृत्तपत्र घ्यावें, त्यांतहि हेच विचार आढळतात.

हें सर्व पाहून, ऐकून व त्याचा विचार करून हें नेपोलियनचें पारीस का? असें मजसारख्या प्रवाशाला वाटणें साहजिक आहे. तर मला पारिसचा खरा अनुभव कांहींच नाहीं असें ह्मणण्यास हरकत नाहीं. खरें खरें पारिस पहायला व जाणायला दोनतीन महिन्यांचा तरी अवधि पाहिजे. पण पारिसचें वैशिष्ट्य इतकें ढळढळीत आहे, कीं, इंग्रजी ह्मणीप्रमाणें, जाणारायेणाराला तें सहज वाचतां येतें. मी तें वर लिहिल्याप्रमाणें वाचलें!

असो. याप्रमाणें पारिस सोडून कोलनला उतरलों व तेथून एक तासभर बॉनला प्रो. याकोबी यांनां भेटण्यासाठीं गेलों. प्रवासाला निघायच्या पूर्वींच यांच्याशीं पत्रव्यवहार करून भेटायचा दिवस व वेळ ठरवून ठेविली होती. त्याप्रमाणें गेलों, तों हे आमचीच वाट पाहत बसले आहेतसें दिसलें. नमस्कारचमत्कार झाल्यावर त्यांच्या लायब्ररींत बसून गप्पा मारल्या. जर्मनींतील प्रोफेसरांचें जीवितसर्वस्व जर कांहीं असेल, तर तें त्याची कवडीकवडी करून जमवलेली लायब्ररी होय. 'कवडी कवडी' ह्मणण्याचें कारण, यांनां पहिलीं निदान दहा वर्षें तरी युनिव्हर्सिटींत प्रिव्हाटडोत्सेंट व औसरओर्डेन्ट्लिशर् ( एक्स्ट्रा-ऑरडिनरी ) प्रोफेसर ह्मणून केवळ पदरमोड करून काम करावें लागतें. असो. पुस्तकें उंचउंच उघड्या शेल्फवर नीट व्यवस्थेनें दिसलीं. "हल्लीं माझा ज्योतिषाचा अभ्यास चाललेला असून मी वेदिक कॅलेन्डर तयार करीत आहें" असें त्यांनीं सांगितलें. प्राकृत—विशेषतः जैन प्राकृतचा आपला अभ्यास शेवटपर्यंत चालू ठेवणार, असेंहि ते ह्मणाले. नंतर अर्धाएक तास बऱ्याच इकडच्यातिकडच्या गप्पा झाल्या. त्यांत त्यांनीं हिंदुस्तानांत गेल्या वेळच्या आपल्या कांहीं आठवणी सांगून, कदाचित् पुनः एकदां तिकडे सफर करून येऊं, असें ह्मटलें. नंतर आह्मी परवानगी घेऊन निघणार, तों 'तुमच्या गाडीला पाऊणतास अवकाश आहे, मलाहि या वेळेला उद्योग नाहीं; तुह्मीं शहर बहुतकरून पाहिलें नसेलच. चला, आपण शहरांत व नदीच्या बाजूनें चक्कर मारून येऊं,' असें त्यांनीं ह्मटलें व लगेच ओव्हरकोट, टोपी चढवून ह्मातारा आपला खरोखरीच आमच्याबरोबर निघाला! यांचें वय साठांच्या वर होऊन गेलेलें; आमची ओळखहि नवीच. तेव्हां यूरोपांतील इतर ठिकाणच्या अनुभवांच्या मानानें आह्मांला हा प्रकार अपूर्व वाटला, व या वृद्ध सरस्वतीपुत्राविषयीं आमचा आदर दुणावला, हें लिहिणें नकोच. मग आह्मी प्रथम युनिव्हर्सिटीच्या बाजूकडे, व

नंतर नदीकांठाकडे फिरलों. बॉन हें व्यापाराचें ठिकाण नसल्यामुळें येथें इतर यूरोपियन शहरीं न आढळणारी शांतता भासली. शिवाय ऱ्हाइन् नदी, तिच्यावरील मोठा पूल व कांठावरील उद्यानें यांनीं त्या शांततेला सौंदर्याची जोड दिल्यामुळें मनाला संतोष झाला. 'मोठमोठे ऑफिसीयर वगैरे पेन्शन घेतल्यावर आपलें शेष आयुष्य स्वस्थपणें, निरामय स्थितींत घालवण्यासाठीं या ठिकाणीं येतात,' असें प्रोफेसरांनीं सांगितलें. नंतर आह्मी एकदोन चौकांत फिरून स्टेशनवर आलों. गाडीला थोडा अवकाश होता, ह्मणून स्टेशनवरील रेस्टोरांत थोडा वेळ बसून गप्पा मारीत कांहीं प्यालों, व गाडी आल्यावर प्रोफेसरांचे मनःपूर्वक आभार मानून परत कोलनाकडे आलों, व लगेच पुढें निघून शनिवारीं रात्रीं घरीं पोहोंचलों.

लाइप्झिक्, १६।१।१२.

येथें एका आठवड्यांत ह्मणजे ता. १५ च्या सुमाराला थंडीनें जो कडाका उडवून दिला, तो कांहीं विचारूं नये. फारन्हाइट फ्रीझिंग पॉइंट्च्या खालीं पंचवीस अधिक डिग्री थंडी गेली होती. नदी गोठल्यामुळें कोनेवित्सपर्यंत तिच्यावर पायाला पातीं बांधून (skates) धांवायला सांपडून लोकांनां आनंद झाला; पण गरीब लोकांचे मात्र हाल मनस्वी झाले. असें दहा वर्षांत कधीं झालें नव्हतें असें ह्मणतात. थंडीमुळें कामेंहि शिथिल चालून बरेच लोक बेकार होतात, व मुख्य ज्या ऋतूंत पोटांत ऊब तरी अवश्य पाहिजे, त्यांतच त्यांनां उपासमार पडून आणखी हाल होतात. काल असे हजारों गरीब बेकार मजूर येथील रादहौस् (टाउन्हाल्) समोर जमून ब्युर्गर्माइस्टरजवळ आपली दाद लागेल तर पहात होते. गरीब बिचारे प्राणी!

गेल्या आठवड्याच्या शेवटीं बर्लिन् येथें माझ्या लॅटिन् मास्तराला भेटायला गेलों होतों. चार दिवस त्याच्या सहवासांत आनंदानें गेले.

यूरोपांतील मुख्य शहरांच्या–फॅशनच्या–शिरस्त्याप्रमाणें बर्लिन येथेंहि अर्थात् संध्याकाळपासून चैनीच्या धंद्यांचा विशेष भर असतो! पारिसचें वळण यथाशक्ति गिरवायचें हा स्तुत्य हेतु सर्व शहरांत दृष्टीला पडतो!

शनिवार व सोमवाररोजीं राइश्टाग् (पार्लमेंट)च्या राहिलेल्या निवडणुकीची धांदल बऱ्याच शहरांतून होती. बर्लिन्‌ची पाळी सोमवारीं होती. सर्व रस्ताभर हस्तपत्रकें, 'अमक्याला निवडा, तमक्याचा धिक्कार!' वगैरे शब्दांच्या पाट्या घेऊन फिरणारे मजूर वगैरेंची फारच गर्दी! विशेष मौज रात्रीं साडेदहाला मतें घेणें बंद होऊन, त्याचा काय निकाल झाला हें हळुहळू वर्तमानपत्रांच्या जादा अंकांतून निघूं लागलें तेव्हां पहायला सांपडली. त्सेन्ट्रुम् (क्याथोलिक), कान्सरव्हाटिव्ह, लिबरल, सोशियाल् डेमोक्राट् वगैरे पक्ष आपापले विजय प्रसिद्ध करून टिमकी वाजवीत होते. हस्तपत्रकें वांटणाऱ्या मजुरांवर जणूं हल्ला केल्याप्रमाणें माणसें तुटून पडत व त्यांच्या हातून तीं हिरावून घेत. कोलन शहर, ज्याला जर्मनींतील रोम ह्मणतात व जें आजपर्यंत क्याथोलिकांच्या ताब्यांत होतें, तें यंदां सोशलिस्टांच्या ताब्यांत आलें, त्याबद्दल केवढा आनंद व गोंधळ! सोशलिस्ट पत्रांना केवळ हर्षवायु होण्याची पाळी आली. आन्टिसेमिटिस्टेन् (ज्यूविरुद्ध) एक लहानसा पक्ष आहे. याचे सातआठ प्रतिनिधि राइश्टागमध्यें असतात, ते या खेपेला कमी झाले, तों एका पत्राला स्फुरण येऊन त्यानें 'नीडर (धिक्कार! वगैरे) मिट डेन आन्टिसेमिटिस्टेन,' असें ठळक अक्षरांनीं छापवून हस्तपत्रकें वांटिलीं! सर्व रस्ताभर हस्तपत्रकांचा जणूं सडा पडला होता! आह्मांलाहि थोडें स्फुरण येऊन गर्दींत घुसलों व हस्तपत्रकें जमवूं लागलों. तरी तेहत्तीस जागा निवडून यायचें गुरुवारवर राहिलें होतेंच! असो. बर्लिनहून मंगळवारीं रात्रीं परत आलों. काल शेवटीं निवडणुकींचा अखेरचा निकाल लागला. त्सेंट्रुम्पक्ष जो आजवर जडीक असे त्याच्या दहा जागा यंदां सोशलिस्ट व लिबरल यांनीं

हिसकावून घेतल्या. सबंध राइशटागच्या ३९७ जागांपैकीं आतां त्सेन्ट्रुम् कथाथोलिकांनां ९३ जागा मिळाल्या. दुसरा पक्ष कान्सरव्हेटिव्; याचेंहि बरेंच नुकसान होऊन त्याला चव्वेचाळीसएक जागा राहिल्या. यंदांच्या निवडणुकींत अपूर्व यश सोत्स्याल डेमोक्राटां(Socialists) नां आलें. गेल्या पार्लमेंटांत यांनां ५३ जागा होत्या, त्या आतां ११० झाल्या. यावरून लोकमताचा वारा कसा वाहत आहे, हें सहज दिसून येईल. शिवाय, मतदारांच्या संख्येवरून पाहतांहि तेंच दिसतें. त्सेन्ट्रुम कान्सरव्हाटिव , लिबराल, फ्रायसिनिग (४४ जागा) व इतर बारीक-सारीक पक्षांनां जितकीं मतें मिळालीं, त्यापेक्षां किती तरी जास्त सोशलिस्टांनां मिळालीं.

याप्रमाणें जर्मनीचें नवें पार्लमेंट सोशलिस्टमय जरी नाहीं, तरी इतर कोणत्याहि एका पक्षापेक्षां त्यांत सोशलिस्ट जास्त आहेत हें खरें. पण याचा राज्यकारभारावरावर बिलकूल परिणाम होणार नाहीं, हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. कारण, प्रधानमंडळ निवडण्याचा अधिकार येथील पार्लमेंटाला नाहीं. कायसर् स्वतःला वाटेल तें प्रधानमंडळ नेमतो. अर्थात् तें कसें असेल, याची कल्पना करावी, व या मंडळाला साहजिकच त्सेंट्रुम् व कान्सरव्हाटिव्ह व अंशतः लिबरल (?) यांचा पाठिंबा असतो. बजेट पास नापास करणेंहि या सभेकडे नाहीं. यामुळें किती जरी सोशलिस्ट् पार्लमेंटांत असले, तरी त्यांचें हल्लींचें स्वरूप कायम राहील तोंपर्यंत त्यांचें कांहीं चालणार नाहीं, हें उघड आहे. तेव्हां या पार्लमेंटांत सोशलिस्टांनां जोराचीं निषेधपर वगैरे भाषणें करण्यापलीकडे इतर कांहींहि करतां येणें शक्य नाहीं. फारच त्यांनीं गडबड केली व प्रधानमंडळाचें चाललें नाहीं, तर पुनः निवडणुकी आहेतच! असो.

**लाइप्झिक्**, २ फेब्रुवारी, १९१२.

इकडे माझें ठीक चाललें आहे; प्रकृति चांगली आहे. हिंवाळ्यानें यंदां बऱ्याच उशिरां पण आकस्मिकच उचल खाल्ली. गेल्या पंधराव्या

तारखेच्या सुमाराला इतकी थंडी पडली, कीं, नदी सुद्धां गोठून गेली. फारन्हाईट् फ्रीझिंग पॉइंट ३२" च्या खालीं २९ पासून ३० डिग्रीं-पर्यंत पारा उतरला होता, इत्यादि मागल्या पत्रीं लिहिलेंच आहे. आंतून जाडें दुहेरी अंडरवेअर, घट्टसें लोकरीचें जाकीट, कोट व त्यावर दहा शेरांचें ओव्हरकोटाचें ओझें घातलें तरी बाहेर पडतांच थिजून जाण्याची पाळी येत असे. खोलींत कितीहि शेक केला असला तरी शेगडीपासून दूर झालें, कीं अंगांत हुडहुडी भरे! व्यायामानें मात्र कांहीं वेळ टिकणारी ऊब येई. या थंडीच्या तडाक्यांत येथील मित्र-मंडळींनीं 'स्केटिंग् शिका ह्मणजे थंडी इतकी भासणार नाहीं,' असें सांगितलें. गेल्या वर्षींहि असें सांगत असत; पण कोणत्याहि नव्या गोष्टी-कडे माणसाची–फयाशनूच्या बाबतींत नेहमीं नव्यासाठीं हपापलेल्या इकडील स्त्रिया खेरीजकरून–साधारणतः साशंक वृत्ति असते; तिला अनुसरून ती गोष्ट कानावेगळी टाकली होती. यंदां मात्र मनावर घेतली आहे. आज आठदहा दिवस जवळच्या बागेंतील तळ्यावर बर्फावरून धांवायला जात असतों.

प्रथम पायांला खाली तीं पितळीं पातीं बांधून उभें राहतांच पाय लटलटूं लागले! मग कसें तरी कठड्यांनां धरून तळ्यांत उतरलों, तों पाय चोहींकडून निसटून तळ्यावर नमस्कार घालायची पाळी आली. ह्मणून घसरण्याची खुर्ची पुढें धरून तिच्या आधारानें एक तास-भर फिरलों. असें पांच दिवस खुर्चीच्या व कधीं माणसांच्या हाताच्या आधारानें धांवतां येऊं लागलें. दमलेंसें दिसलें, कीं, शाळेंतील मुलें ( मी गेल्या मे महिन्यांत पहायला गेलेल्या टोमास् शाळेचीं तीं असा-वींत. कारण त्यांच्या टोप्या हिरव्या बनातीच्या होत्या. ) भोंवतीं जमून 'तुह्मी खुर्चीवर बसा, आह्मी फिरवितों,' असें ह्मणून मला फिरवीत. त्यांच्या त्या बोलण्याची, प्रश्न विचारण्याची मला मौज वाटे. एक ह्मणतो– 'कांहो, डेल्फी तुमची आतां राजधानी झाली नाहीं का?' मीं खरें

चांभारदादा, आणि असलें वाचन व बहुश्रुतपणा, ही सांगड आपल्या महाराष्ट्रांत न पाहिल्यामुळें मला किती आश्चर्य वाटलें असेल याची कल्पनाच करावी!

**लाइप्झिक्**, ९ फेब्रुवारी, १९१२.

गेली डाक रवाना केली, तेव्हां वाटलें होतें, कीं, थंडीनें आतां तरी आवरतें घेतलें असेल. कारण थंडीचा सर्व भर जानेवारींतच असतो, असा इकडे समज आहे. पण पाहतों तों गेले रविवार व सोमवार हे दोन दिवस मागल्या तडाख्याच्या दिवसांनांहि बरे ह्मणवूं लागले. या दोन दिवशीं थंडी-२०″ सेंटिग्रेड ( शून्याच्या खालीं २० ह्मणजे फारेन् हाइट् फ्रीझिंग पॉइंटच्या खालीं ३६ डिग्री ) होती. याचें आश्चर्य करतों, तों लगेच परवांपासून पारा चढायला लागून बर्फ वितळत आहे, व जिकडेतिकडे ओलें, शिडशिडीत, चिखल असें झालें आहे. अशी ही इकडील हवा चंचल आहे.

गॉटे कवीचें फाउस्ट काव्य ( नाटक ) तुह्मीं वाचलें असेलच; निदान नांवानें तरी ऐकून ठाऊक असेलच. तें मीं मूळ जर्मनमध्यें वाचलें होतें. त्याचा वर्षांतून एकाद्या वेळेला रंगभूमीवर प्रयोग करून दाखवतात. तो पहाण्याची इच्छा गेल्या एप्रिलपासून होतीच; पण एप्रिलमध्यें ती दुणावण्याचें कारण असें झालें, कीं, त्या वेळीं मी बर्लिनूला होतों, व डॉयचेस् थेआटरमध्यें फाउस्ट होणार आहे, ह्मणून ऐकलें. लगेच टिकिटासाठीं गेलों, तों टिकिटें दोन दिवस आधींच पार खपून गेलेली! त्यामुळें निराश झालों. पण असा खो मिळाल्यामुळें उलट फाउस्ट एकदां तरी पाहण्याची इच्छा मात्र दुणावली. ती परवां तृप्त करून घेतां येऊन आनंद झाला.

सर्व थिएटर अर्थातच गच्च भरलें होतें. त्यांच्या कविश्रेष्ठाच्या सर्वांत सरस कृतीचा अभिनय व्हायचा, मग गर्दीला काय पुसावें? नाटक

मोठें असल्यामुळें ४॥ वाजतांच सुरुवात झाली, व सहा शास्त्रें, अठरा विद्या, चौसष्ट कला इतकें संपादूनहि चित्तशान्ति न मिळाल्यामुळें अस्वस्थ, काय करूं न करूं असें झालेला व ह्मणूनच मोहाच्या जाळयांत पडण्याला सहज पात्र झालेला असा 'डॉ. फाउस्ट' रंगभूमीवर आला. त्यानें आपलें काम बरें केलें. अस्थिर झालेलें मन व श्रद्धेचा अभाव आणि अतिज्ञानानें आलेला बुद्धिवादीपणा या त्रयीनें त्याच्यावर अंमल बसवल्यामुळें मेफिस्टो (सैतान=नानातऱ्हेचीं निंद्य विषयसुखें व अश्रद्धा)ला त्याला सहजच खालीं ओढतां आलें, व त्यामुळें गरीब, भोळया, श्रद्धाळु मार्गारेटला फशीं पाडण्याचें दुष्ट कृत्य त्याच्या हातून करवलें, वगैरे कथावृत्ताचें चित्र मुख्य नटांनीं चांगलें रेखाटलें. मध्यें एक पडदा पडला, व स्टेजमॅनेजराच्या किरकोळ हयगयीमुळें मोत्यांचा एक सर तुटला त्यामुळें रसभंग होण्याची पाळी आली होती, पण मार्गारेटच्या अप्रतिम अभिनयानें सर्व सांवरून घेतलें. असो. या फाउस्टनें प्रत्येक विचार करण्याऱ्या माणसाला ज्ञानचक्षूंनीं आपलें हृदय शोधायला लावावें असें याचें कथानक आहे. पण प्रेक्षकांपैकीं कितीजण असें करीत असतील? अशा तऱ्हेचे विचार करीत रात्रीं साडेअकरा वाजतां घरीं आलों व निजलों.

लाइप्झिक्, ११ फेब्रुवारी, १९१२.

गेल्या गुरुवारीं व्युत्पत्तिशास्त्राचे माझे गुरु प्रो. ब्रुगमान् व तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर फोल्केल्ट यांनां अनुक्रमे सकाळीं व दुपारीं भेटावयाला गेलों होतों. त्या भेटी ताज्याच असल्यामुळें, व जर्मन प्रोफेसरांचें अभ्यासाचें, बसायचें ठिकाण कसें असतें याची तुह्मांला कल्पना यावी ह्मणून, त्याविषयींच या पत्रीं लिहिण्याचें योजिलें आहे.

प्रो. ब्रुगमान् यांच्या घरीं अकरा वाजतां गेलों. हें घर युनिव्हर्सिटीचें असून त्यांतील प्रत्येक मजल्यावरील दोन्ही बाजूंला दोन प्रोफेसरांनां

राहण्याची सोय आहे. वहिवाटीप्रमाणें दरवाजावरची घंटा वाजवतांच दासीनें दार उघडलें, व मी आंतील सोप्यांत जाऊन, माझें कार्ड दासीच्या हातीं पुढें पाठवून तेथें टोपी-ओव्हरकोट खुंटीवर काढून ठेविलीं, व बाजूच्या आरशांत हातरुमालानें तोंड पुसून केस सांवरीत उभा राहिलों. इतक्यांत दासी परत येऊन 'हेर् प्रोफेसर लेज्ट् बिटेन् (प्रोफेसर तुह्मांला आंत बोलावतात)' असें ह्मणाली, व मी तिच्या मागें सोप्यांतून पुढच्या खोलींत (फोर् त्सिमर=घरचा मालक कामांत असला तर पाहुण्याला कांहीं वेळ बसण्यासाठीं छोटा दिवाणखाना) गेलों. दिवाणखान्याच्या (प्रोफेसरांची बसण्याची व अभ्यासाची खोली) दाराशीं प्रोफेसर येऊन हस्तस्पर्श–नमस्कारादि झालें, व मी त्या सरस्वतीमंदिरांत एका शृंगारलेल्या टेबलाजवळ मोठ्या मऊ खुर्चीवर बसलों, व प्रोफेसर समोर बसले. सरस्वतीमंदिरच तें ह्मणायचें! कारण, जिकडे पहावें तिकडे भिंतींशीं उभ्या केलेल्या सफाईदार घडवंच्यांतील फळ्यांवर नाना प्रकारचे लहानमोठे ग्रन्थ! मध्येंहि कपाटवजा एकदोन घडवंच्या पुस्तकांच्या भाराखालीं दडपल्यासारख्या दिसत होत्या! खिडक्यांच्या बाजूंनीं प्रसिद्ध जर्मन कवि गॉटे व शिलर यांचे संगमरवरी छातीपर्यंतचे पुतळे सुंदर तबकड्यांवर ठेविले होते. याशिवाय इतर सामान ह्मणजे पडल्यापडल्या वाचतां यावें ह्मणून एक साधें कोच, छापील व हस्तलिखित कागदांचा ढीग, दौत, टांक, पेन्सिली, ब्लॉटिंगपॅड वगैरेंनीं व्यापलेलें मेज, त्याच्या बाजूला कागदांचे तुकडे टाकण्याची टोपली व विरुद्ध कोपऱ्याला बंबासारखी उंच लोखंडी शेगडी, हें होय. वरच्या फळ्यांवरचीं पुस्तकें काढण्यासाठीं एक लहान, हलकी व निरुंद शिडी यांत विसरतां कामा नये. प्रत्येक घडवंचीवर आठएक आडव्या फळ्या असल्यामुळें या शिडीची आवश्यकता असते. असल्या या वाङ्मयात्मक वातावरणांत बसल्यावर दुसरे विचार तरी कसले यायचे? तेव्हां आमच्या गप्पा साधारण असल्याच विषयांवर झाल्या.

ओघानें गोष्ट निघाली असतां प्रोफेसर सांगूं लागले, ' यूरोपांत व अमेरिकेंतहि हल्लीं जे प्रसिद्ध व्युत्पत्तिशास्त्राचे प्रोफेसर आहेत, त्यांपैकीं बरेचजण १८८९ च्या सुमाराला माझे विद्यार्थी होते. त्यानंतर अलीकडे बरेच दिवसांत माझ्या विद्यार्थ्यांत कोणी प्रोफेसर नव्हता !' नंतर त्यांनीं आपल्या गुरूची ह्मणजे त्यांच्यापूर्वीं येथें व्युत्पत्तिशास्त्राचे प्रोफेसर कुर्तियुस होते, त्यांची एक गोष्ट सांगितली. "मी विद्यार्थी असतांना व्युत्पत्ति व व्याकरण यांविषयीं कुर्तियुसचीं कांहीं मतें बरोबर नाहींत, असें मला आढळून आलें. एके दिवशीं मीं त्यांनां तसें कळविलें असतां 'याच विषयावर मी आज तीस वर्षे विचार करीत आहें; तरी माझें तेंच मत आहे. तुह्मी याचा आठच दिवस विचार करून जी नवी टूम काढली ती मला कशी पटावी ?' असें त्यांनीं सांगितलें." वगैरे. बड्या माणसांच्या या छोट्या गोष्टीला हंसण्यापलीकडे गत्यंतर काय आहे? त्याप्रमाणें आह्मी दोघेहि हंसलों. नंतर प्रो. ब्रुग्मान् यांनीं आपल्या 'ग्रुन्ड्रिस्' ( व्युत्पत्तिशास्त्रांतील प्रमेयांचा बडा ग्रन्थ—याचे तीन भाग असून प्रत्येक भागांचीं दोन, तीन पुस्तकें आहेत ) च्या दुसऱ्या आवृत्तीपैकीं कांहीं भागाची हस्तलिखित प्रत मला दाखविली. 'विषय मोठा गहन असल्यानें नेहमीं त्यावर निरनिराळ्या ठिकाणच्या विद्वानांचे निबंध वगैरे प्रसिद्ध होतात. ते चाळून बरे असतील तर त्यांचा समावेश, चुकीचे असतील तर त्यांचें खंडन, इत्यादि शोध मला या माझ्या प्रतींत घालावे लागतात, व ज्या ज्या ठिकाणीं त्यांचा संबंध येईल तीं तीं ठिकाणें पुन: पाहून दुरुस्त करावीं लागतात. याप्रमाणें आज एकादा भाग संपवून ठेवावा, तों पुन: त्यांत कांहीं नव्याचा समावेश करण्याची पाळी येते ! असें हें त्रासदायक काम आज २५ वर वर्षे मी करीत आहें. अशा रीतीनें चाललें तर ही १८९७ सालीं आरंभलेली दुसरी आवृत्ति माझ्या वयाच्या सत्तराव्या वर्षीं ( १९१८ च्या सुमाराला ) संपेल ! तो शेवटचा दिवस येऊन मी कधीं मोकळा होईन असें मला

झालें आहे.' असे त्यांनीं त्या वेळीं उद्गार काढले ! एकाच विषयाला आपलें तनमनधन अर्पण करून व त्यांत मोठी कामगिरी बजावून, ७० वर्षांनंतर विश्रान्ति घेण्याचा निश्चय करणाऱ्या या पंडिताकडे, त्याच्या पुस्तकसंग्रहाकडे, त्याच्या कामगिरीचा प्रत्यक्ष पुरावा देणाऱ्या त्या हस्तलिखित प्रतीकडे पाहून, व हे त्याचे आपल्या कामाविषयींचे शब्द ऐकून मला काय वाटलें, हें लिहितां येत नाहीं !

प्रो. फॉल्केल्ट् हेहि वृद्ध गृहस्थ आज बरींच वर्षे येथें तत्त्वज्ञान शिकवतात. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कान्ट व आपल्याकडील अद्वैतवादी यांच्या मतांत कांहीं साम्य असल्याचें ठाऊक असल्यामुळें, व पुढेंहि त्याचा उपयोग होईलसें वाटल्यामुळें, येथें अर्थात् त्या विषयावरचीं युनिव्हर्सिटींतील व्याख्यानें या विन्टरसेमेस्टरमध्यें ऐकूं लागलों, व आतां या महिनाअखेर तीं लवकरच संपणार ह्मणून त्यांवरील व्याख्याते प्रो. फॉल्केल्ट यांनां एकदां भेटावेंसें वाटलें. यांच्याहि भेटीचा दिवस गुरुवारींच, पण वेळ निराळी ह्मणजे ४ ते ५ होती. साडेचारच्या सुमाराला त्यांच्या घरीं गेलों, तों दारावर 'आज परीक्षा घेणें असल्यामुळें भेटीची वेळ ४–४½ पर्यंतच आहे,' अशी चिठी पाहून, आपण अगदीं बेतावर आल्याबद्दल समाधान वाटलें. घंटी वाजवतांच दासी आली, तिजबरोबर चिठी पाठविली व फोर्त्सिमर् (पाहुण्यांनीं वाट पहायची खोली; या घराला दोन्ही बाजूंनीं खोल्या व दालनें असलेला 'प्यासेज' प्रो. ब्रुगमानच्या घराप्रमाणें न हता.) मध्यें टोपी, डगलें, काठी खुंटाळ्यावर ठेविलीं. नंतर आंत गेलों व नमस्कारचमत्कार होऊन एका खुर्चीवर बसलों. येथेंहि चोहींकडून भिंतीला कपाटवजा घडवंच्या पुस्तकांनीं गच्च भरलेल्या दिसल्या. शिडीहि अर्थात् होतीच. शिवाय, दारांवांचून बैठीं फिरतीं छोटीं छोटीं कपाटें प्रोफेसरांच्या दोन्हीं बाजूंनीं टेबलाशेजारीं होतींच. टेबलावरहि पुस्तकें, वह्या, हस्तलिखितें यांचीहि रेलचेल ! याप्रमाणें चोहींकडे दृष्टि फिरवून थोडा खुर्चीवर स्थिरावतों, तों प्रोफे-

सर ह्मणतात 'तुह्मी जवळजवळ तीन सेमेस्टर आमच्या लाइप्-झिकला आहां-ठीक चाललें आहेना?' यांनां मी प्रथमच आज भेटतों, पण यांनां तर माझी बरीच माहिती दिसते! ह्मणून प्रथम मी जरा आश्चर्यचकितच झालों; पण थोड्या विचाराअंतीं लक्ष्यांत आलें, कीं, युनिव्हर्सिटींतचा मीं जे दाखले वगैरे दाखविले होते त्यांत मी प्रोफेसर असल्याबद्दल स्पष्ट उल्लेख होता, व या युनिव्हर्सिटीच्या नियमांप्रमाणें कोणत्याहि हुद्यावर अगर नोकरीवर असलेल्या माणसाला सरळपणें युनिव्हर्सिटीचा विद्यार्थी होतां येत नाहीं! तेव्हां येथील सेनेटनें हा प्रश्न विद्याखात्याच्या मंत्रिमंडळाकडे ड्रेस्डेनला अभिप्रायासाठीं पाठविला. त्यांनीं सेनेटलाच याविषयीं बरें दिसेल तें करण्याविषयीं लिहिल्यामुळें, व सेनेटमध्यें प्रोफेसर विण्डिश व प्रो० ब्रुगमान् यांनीं माझी बाजू संभाळल्यामुळें, सेनेटनें बहुमतानें मला युनिव्हर्सिटींत घेण्याचें ठरविलें. अर्थात्च सगळ्या सेनेटच्या सभासदांनां, सगळ्या वृद्ध प्रोफेसरांनां मला प्रत्यक्ष पाहिलें नसलें, तरी असा असा एक गृहस्थ हिंदुस्तानांतून आलेला आपल्याकडे आहे, असें ठाऊक असलें पाहिजे, आणि त्यामुळेंच या प्रोफेसरांचें आजचें हें बोलणें आहे हें माझ्या ध्यानीं आलें. नंतर मीं कान्टविषयीं काय काय वाचायला पाहिजे, ह्मणून विचारतां त्यांनीं तीनचार पुस्तकें दाखवून त्यांचीं नांवें टिपून दिलीं, व 'इतर कोणत्याहि प्रकारची माहिती देणें शक्य असल्यास मी आनंदानें देईन, तुमच्याकडून कळलें मात्र पाहिजे,' वगैरे ह्मटलें. नंतर आभार मानून मीं रजा घेतली. बाहेर दोन गृहस्थ भेटीसाठीं आलेले वाट पहात बसलेच होते.

याप्रमाणें या दोघां वृद्ध गृहस्थांनां-एकाचें वय ६३ असल्याचें मला ठाऊक आहे, व दुसऱ्याचें थोडें जास्त असावें-एकाच दिवशीं भेटण्याची पाळी आली, व सारा दिवस साधारण त्याविषयींचेच विचार होते. शिक्षणाचें व्रत घेतलेल्या इकडील माणसांचा जाडा विद्याव्यासंग,

अव्याहत उद्योग, शिस्त, काम करण्याची चिकाटी व एकाच आवडीच्या विषयाला धरून त्यासंबंधींच्या ज्ञानांत, माहितींत, भर घालण्याचे प्रयत्न वगैरे गोष्टी स्पष्ट डोळ्यांपुढें दिसूं लागल्या. आपल्या अभ्यासक्रमांत नेहमीं नेहमीं व्यत्यय येऊं नये, पण जिज्ञासु विद्यार्थ्यांनां कांहीं विचारायचें असल्यास सवड मिळावी, ह्मणून आठवड्यांतून एकदां अगर दोनदां हे एक तास भेटीसाठीं खुला ठेवतात, याला 'स्प्रेश स्टुंड' ह्मणतात. अशा 'स्प्रेश स्टुंड'मध्यें मी दोघांच्याहि गांठी घेतल्या. असो.

पत्र येथेंच पुरें करणार होतों; पण परवां माझ्या ओळखीच्या फ्रॉयलाइन् कॉइट् नांवाच्या मास्तरणीनें चहाच्या वेळीं एक गम्मत सांगितली, ती मजविषयींच असल्यामुळें तुह्मांलाहि मौज वाटेल ह्मणून येथें देत आहें. तिच्या मैत्रिणीचा एका वर्गावर भूगोलाचा तास होता; हिंदुस्तानाविषयीं माहिती सांगतांना, 'तेथील लोकांची संस्कृति फार जुनी व चांगली आहे; ते फार बुद्धिवान् असत, जिज्ञासु असत; हल्लींहि तसेच आहेत. तेथें मिळणाऱ्या ज्ञानावरच तृप्त न राहतां ते इकडील विद्या संपादण्यासाठीं चार समुद्र ओलांडून येऊं लागले आहेत,' वगैरे तिनें सांगितलें. नवें कांहीं आपणांला माहित झालें असेल तें चालू विषयाशीं विसंगत न दिसतां विद्यार्थ्यांनां सांगण्याच्या इकडल्या पद्धतीला अनुसरून, मास्तरीणबाईनीं हिंदुस्तानाविषयींची आपली माहिती पुढील वाक्यानें संपविली 'आपल्या युनिव्हर्सिटींतहि तिकडून एक प्रोफेसर आला आहे!' हें वाक्य ती संपवते न संपवते तों दहापंधरा मुली मुलांच्या पद्धतीप्रमाणें एकेक पाय व हात पुढें करून उभ्या राहिल्या व सर्वजणी उत्सुकतेनें व एकदम 'डेन् केनेन् वीअर, डेन् केनेन् वीअर—आह्मांला तो ठाऊक आहे, तो बर्फावर धांवायला येत असतो,' असें ह्मणाल्या. हा आविर्भाव आकस्मिकच झाल्यामुळें मास्तरिणीला एकदम आश्चर्य वाटलें, हें उघड आहे. नंतर मुलींनीं विचारलें 'तर मग तुह्मीं मागें आह्मांला दाखविलेलें टुरबान् त्याचेंच कां?' मास्तरीण ह्मणाली 'होय, पण त्यांची

माझी ओळख नाहीं.' गेल्या उन्हाळ्यांत फ्रॉ. कॉइट्च्या विनंतीवरून मीं आपला डोकीचा रेशमी रुमाल शाळेंत दाखविण्यासाठीं दिला होता, त्याला उद्देशून हा वरचा प्रश्न होय. हें सांगतांना फ्रॉ. कॉइट्ला हंसें आवरेना. मग आह्मीहि पुष्कळ हंसलों.

लाइप्झिक्, २३ फेब्रुवारी, १९१२.

परवांची थंडी जशी अकस्मात् आली, तशीच घाईघाईनें नाहींशी सुद्धां झाली. अलीकडे दहाबारा दिवस इकडे वसंतांतल्यासारखी सुरेख हवा पडली आहे, त्यामुळें सर्वांनां आश्चर्य वाटून राहिलें आहे. इक-डील वसंत ह्मणजे एप्रिल व मे हे दोन महिने. फेब्रुवारींत हेमन्ताचा सरता अंमल असायला पाहिजे. पण यंदां सगळेंच चमत्कारिक झालें आहे. चंचलपणा, क्षणांत नाना प्रकारचे रंगढंग यांत येथील तरुणींनां या सृष्टीनें यंदां हटविलें, यांत शंका नाहीं!

अलीकडील एकदोन महिन्यांत माझ्या पत्रांत नेहमीं हवेविषयीं कांहीं तरी मजकूर असतोच, याचें मलाच नवल वाटूं लागलें आहे. यूरोपांत दीड वर्ष राहिल्यामुळें इकडील पाणी (अथवा हवा ह्मटलें असतां जास्त शोभेल) लागलें ह्मणायचें कीं काय? कांहीं इतर गोष्टींतहि पाण्याचा परिणाम झाला, असें ह्मणणें भाग आहे. उदाहरणार्थ, चिनांतील राज्य-क्रान्ति व प्रजासत्ताक शासनपद्धति. खरें ह्मटलें असतां मी प्राच्य तेव्हां मला आनंद झाला पाहिजे, कीं, हें जुनें राष्ट्र, भरतखंडाच्या बरोबरीनें जुनी व उच्च ज्याची संस्कृति, आतां आपल्या नव्या परि-स्थितीला, नव्या कर्तव्याला, नव्या जबाबदाऱ्यांनां जागें झालें आहे! व मनापासून तसा आनंद होतोहि; पण थोडें वाईट वाटतें. तें असें, कीं, जुलमी, एकतंत्री शासनपद्धतीखालीं चिरडून गेलेल्या या चिनी लोकांमध्यें लोकतंत्री शासनपद्धतीला लागणारी हुषारी, तरतरी, कार्यक्षमता व विशेषें-करून एकी हे गुण हवे तितके आहेत का? आजच एकदम एवढी

उलथापालथ करण्यांत घाई झाली नाहीं का ? ही जुन्या पायावर उभारलेली, नवी यूरोपीय तऱ्हेची इमारत लवकरच ढांसळणार तर नाहीं ना ? वगैरे एक कीं दोन ? नाना तऱ्हेचे कुतर्क मनांत येतात. हा परिणाम या पाण्याचा असूं शकेलहि. 'प्राच्य लोक एकतंत्री शासनपद्धतींत अनादि कालापासून वाढलेले. त्यांनां हें नवें अमृत कसचें पचतें ? तें ओकून पडणारच,' असल्या तऱ्हेच्या विघ्नसंतोषीपणाचीं भविष्यें इकडील मुत्सद्दी ह्मणविणारे बरेच लोक करून चुकले आहेत. सामान्यजनसमूहाचें शहाणपण इतकें धांव घेत नाहीं; पण एकाद्या सामान्य शिकल्यासवरलेल्या गृहस्थाला विचारावें, ह्मणजे तो आपलें डोकें हालवितो, धडकी भरल्यासारखे खांदे उडवितो, व आंबट तोंड करून शहाणपणाचें मौन स्वीकारतो ! या वातावरणाचा परिणाम मजवर झाला असेल ! पण अखेरीला युवानशिकाई, सुनयत्सेनसारखी विचारी मुत्सद्दी मंडळी शिरोभागीं आहेत, तीं राज्याचा शकट या संकटांतून न भितां न अडखळतां रेटून नेतील, अशी आशा व प्रबळ इच्छा उत्पन्न होते, व पूर्वेचें पाणी पूर्वेला जाऊन मिळतें !

या संबंधांत कांहीं प्रसिद्ध चिनी स्त्रियांचें वर्तन व भाषण कांहीं मजेदार व कांहीं मनन करण्यासारखें आहे. चिनी स्त्रियांनां निवडणुकीचे हक्क मिळवून देण्यासाठीं लंडनहून कंबर बांधून निघालेली प्रेसिडेन्ट् युवानशिकाई यांची पुतणी त्यांनां जुलमी, देशद्रोही वगैरे शेलकीं विशेषणें देते, तेव्हां हंसूं येतें. तसेंच दक्षिणचिनांतील एका शहरच्या ( नांव आठवत नाहीं, नानकीन असावें. ) मुलींच्या शाळेंतील सर्वजणींनीं 'आह्मांला आतां सुया हातीं धरून कंटाळा आला आहे; त्याऐवजीं आतां बंदुकी कां धरूं देत नाहीं ?' अशा अर्थाचें पत्र क्रांतिकारक पुढाऱ्यांनां पाठविलेलें ऐकून हंसूं येतें, व मौज वाटते. पण मिसेस सुनयत्सेनचें एका वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीशीं झालेलें भाषण— भाषण कसचें ? पांचचार वाक्येंच—वाचून मात्र आश्चर्य वाटतें. नवरा

अज्ञातवासांत असतां, आपल्या देशांतच राहून, त्याच्या महत्कार्यासाठीं फंड वगैरे गोळा करण्याचें जिकिरीचें काम या निश्चयी बाईनें जुन्या लोकांनां भिऊन पण नेटानें केलें. कारण, तशी गुणगुण त्या वेळच्या अधिकारी वर्गाला कळली असती, तर तिला कारागृहच पहावें लागलें असतें! वरील मुलाखतीच्या वेळीं तिनें ही सर्व हकीगत सांगून शेवटीं एक वाक्य उच्चारलें, तें फारच लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ते हेंच 'आपलेंच सुख लांबणीवर टाकण्यासाठीं लोक कसे (वेड्यासारखे) झटत असतात!' या एका सूत्रमय वाक्यांत या क्रान्तीचा इतिहास भरला आहे असें मला वाटतें.

**लाइप्झिक्**, १ मार्च, १९१२.

आपल्या तिकडे सध्यां सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणासंबंधानें जोरानें चळवळ सुरू आहे. त्याचा आपल्याकडे सध्यां मनुच आहे असेंच ह्मणायला हरकत नाहीं. पण सर्व प्रांतिक सरकारें शिक्षणासंबंधी अनुमतिस्वरूपाच्या बिलाच्या देखील विरुद्ध असल्यानें हिंदुस्तान सरकार अशा विरोधाच्या भाराखालीं दडपून जाऊन बहुतकरून नामदार गोखल्यांच्या उत्कृष्ट बिलाला वाटाण्याच्या अक्षता लावील, असें वाटतें! तरी पण कालांतरानें या श्रमांचीं गोड फळें चाखायला मिळणार अशी भरपूर आशा आहे. तीमुळेंच, तिकडे आपले लोक चळवळ करीत आहेत व आपण इकडे प्राथमिक शिक्षणाच्या माहेरघरीं असूनहि त्याच्या रीतींचें, सुपरिणामांचें वगैरे निरीक्षण न करणें ह्मणजे लांछन आहे असें अलीकडे मला वाटूं लागलें आहे. या विचारांचें रूपान्तर कृतींत लवकरच झालें हें कळविण्यास आनंद वाटतो.

इकडील दुय्यम प्रतीच्या शाळा बर्लिन, म्यूनिच येथें जाऊन व खुद्द लाइप्झिक्लाहि पाहिल्याचें मागें वेळोवेळीं लिहिलेंच आहे. या खेपेला टर्म संपत आली व सदोदित वाचनाचाहि कंटाळा आला; ह्मणून येथील कांहीं प्रमुख प्राथमिक शाळा पाहण्याचें ठरवलें. कोणत्या पहाण्या

हें विचारून इतर माहिती मिळविण्यासाठीं शाळाखात्याचे इन्स्पेक्टर ओबर्शूलराट् म्यूलर् यांच्याकडे गेलों. त्यांनीं विचारलेली माहिती सांगून चार शाळांच्या हेडमास्तरांनां आपल्या नांवाचें कार्ड दिलें, व 'पुनः कांहीं माहिती लागल्यास लिहा, मी ती आनंदानें पुरवीन,' ह्मणून सांगितलें.

त्याप्रमाणें गेल्या सोमवारीं सकाळीं बेत्सिर्क्शूल नं० ३ पाहण्याला गेलों. आपल्याकडील मराठी शाळेसारखीच ही शाळा; तेव्हां हिचेंहि अस्तित्व गोंगाटामुळें दोन रस्त्यांपलीकडे असतांहि कळून येईल असें वाटायला कांहीं हरकत नव्हती; पण तशांतला प्रकार मुळींच नव्हता. दाराशीं जातों तों उगीच निमित्तानें बाहेर येऊन भटकणारीं मुलेंहि कोठें दिसलीं नाहींत. आंत शिरून खोल्यांच्या ओळींच्या पुढील बोळां-तून ( गांग् अगर कॉरिडर ) शाळेच्या शिपायाच्या खोलीकडे चाललों. तेथेंच पुढें भिंतींत कोनाडा करून मुलांनां पाणी पिण्यासाठीं केलेल्या तोटीवर एक सात वर्षांचा छोकरा घाईघाईनें भाकरीचा तुकडा ( ब्रिले-ग्टेस ब्रॉडशेन्-भरलेली भाकरी ) चावून हात धूत असतांना दृष्टीला पडला; त्याला नंबर १५ ची खोली कुठें आहे ह्मणून विचारतांच गड-बडीनें हातांतलें टमरेल तोटीजवळ टाकून (टाकून ह्मणण्यापेक्षां तें त्याच्या हातून पडलें ह्मटलें असतां ज्यास्त शोभेल ! ) 'थांबा सांगतों अं !' ह्मणून त्यानें विचारण्यासाठीं वर्गाकडे धांव मारली. मीं त्याला थांबवलें व 'मला सांपडेल, तूं धावूं नको,' ह्मणून पुढें गेलों. डिरेक्टरची खोली वरच्या मजल्यावर होती, तिकडे जातांना वाटेंत मुलांच्या नेहमीं-नेहमींच्या सरावांतलीं, त्यांनां नेहमीं दिसणाऱ्या गोष्टींचीं रंगीत चित्रें भिंतीला लावलेलीं दिसलीं-उ० कुत्रीं, खेळणारीं मांजराचीं पिलें, मुलांचे खेळ, माणसांसह घरें, घोडे, झाडें, बाग, खेडीं वगैरे.

डिरेक्टरच्या सामानानें खचलेल्या, परंतु नीटनेटक्या खोलींत जाऊन त्याला चिठ्ठी दाखवून उद्देश सांगितला. पहिल्या व सातव्या

वर्गांत शिक्षण चालू असतांना जायचें ठरलें. त्याला अर्धा तास अवकाश होता, त्यांत हेडमास्तराला माहिती विचारली, ती येणेंप्रमाणें मिळाली:-

इकडे प्राथमिक शिक्षण सक्तीचें आहे, हें तुह्माला ठाऊकच आहे. मूल सहा वर्षांचें झालें ह्मणजे त्याला शाळेंत घातलेंच पाहिजे, नाहीं तर आईबापांनां शिक्षा होते. गरीब लोकांनां फी देण्याची ऐपत कोठली? ह्मणून त्यांचीं मुलें फी देत नाहींत. अशा फी न देणाऱ्या मुलांसाठीं ही व आणखी नऊ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा लाइप्झिकला आहेत. उगीच नांवापुरती ह्मणजे उभ्या वर्षांत ४॥ मार्क फी त्यांच्याकडून घेतात. या शाळांस बेर्गिक्शूल ह्मणतात. जरा बऱ्या स्थितींतल्या २० मार्क फी देऊं शकणाऱ्या लोकांच्या मुलांसाठीं ( लहानसहान धंदेवाले, कारकून, सरकारी नोकर व व्यापारी वगैरे ) ब्युर्गर्शूल व त्यावरच्या पायरीच्या स्थितींतील मुलांसाठीं होअर ब्युर्गर्शूल ( यांत वर्षाची ६० मार्क फी पडते. ) अशीं दोन्ही मिळून २७ शाळा आहेत. ह्मणजे एकट्या लाइप्झिक येथें प्राथमिक शाळांची संख्या ६७ आहे. आपल्या सबंध पुणें जिल्ह्यांत तेवढी असेल कीं नसेल, ही शंकाच आहे!

यांत एक गौण असें आहे, कीं, शिक्षणासारख्या गोष्टींत गरीब, मध्यम, श्रीमंत असा पंक्तिप्रपंच होतो. ही गोष्ट इकडील शिक्षणविषयपटु लोकांच्या डोळ्यांत सलत असून तीविरुद्ध त्यांचे प्रयत्न चालू आहेत. 'आइनहाइट्लिश फोल्क्शूल अगर सर्व दर्जांच्या मुलांसाठीं एकच शाळा' असण्याविषयीं विद्याखात्याकडे त्यांचें मागणें आहे. पण फार दिवस रूढींत पडून गेलेली गोष्ट अन्यथा करण्याला दरबारी चक्र किती नाखुष असतें, हें प्रसिद्धच आहे.

याखेरीज शिक्षणांत वगैरे कांहींहि भेद नाहीं. धर्म, स्वभाषा, अंकगणित, स्वदेशाचें ज्ञान ( Heimat-Kunde ) आणि ड्रॉइंग व इतर हस्तकौशल्याचीं कामें हीं वर सांगितलेल्या तिन्ही प्रकारच्या फोल्क्स-

शूलांतून ( प्राथमिक शाळा ) सारखींच होतात. असें सारखें शिक्षण चार वर्षं असतें. पुढें मात्र ऐपत व इच्छा या मानानें गरीब-मध्यम-श्रीमंत यांचें शिक्षण वेगळाल्या दिशांनीं होतें. ऐपत व इच्छा असेल त्यांचीं मुलें दहाव्या वर्षानंतर आपण ज्याला हायस्कूल ह्मणूं ( इकडे गिम्नासिउम्, रेआल् गिम० व ओबररेआल शूल ह्मणतात. ) त्यांत जातात व नऊ वर्षं अभ्यास करून युनिव्हर्सिटींत शिरतात. साधारण व्यापारधंदे-कारकुनी वगैरे करणारांसाठीं, दहाव्या वर्षानंतर रेआलशूलमध्यें सहा वर्षं शिकून झाल्यावर टेक्निकल हायस्कूल, हान्डेल्स् ( कमर्शल ) हायस्कूल वगैरे साधनें असतात.

बाकी राहिला अगदीं गरीब, काबाडकष्ट-रोजमजुरी वगैरे करणाऱ्या लोकांचा वर्ग. यांच्या मुलांचें आणखी चार वर्षं याच बेलिर्फ-शूलांतून शिक्षण होतें. ह्मणजे चवदाव्या वर्षीं हीं मुलें हें शिक्षण संपवून बाहेर पडतात. या चार वर्षांत स्वभाषेचें विस्तृत ज्ञान, स्वदेशाचा मुख्यत: अलीकडचा इतिहास, भूगोल, सृष्टिज्ञान ( वनस्पति व प्राणी यांची सोपी ठोकळ माहिती ) हे विषय अधिक होतात. ड्रॉइंग जास्त असतेंच. मुलींसाठीं शिवण, कशिदा वगैरे शिकण्याची सोय असते; गाणें अगदीं पहिल्यापासूनच असतें. एकूण या शालांतून बाहेर पडलेल्या मुलांस स्वभाषेचें चांगलें ज्ञान ( लिहिणेंवाचणें अर्थातूच ), आपल्या देशाची व त्याच्या इतिहासाची चांगली माहिती, जगाचें-त्यावरील लोक, त्यांचे रीतिरिवाज, व्यापारधंदे वगैरे-ठोकळ ज्ञान, व्यवहारापुरतें गणित, डोळे व हात यांस चांगलें वळण लागून कोणत्याहि वस्तूचें साधारण नीट निरीक्षण करतां येण्यापुरतें ड्रॉइंग, कोंवळ्या भाविक मनोवृत्तींची वाढ होण्यापुरतें गायन इतक्या गोष्टी साधारणत: येत असतात.

मुलें व मुली निरनिराळ्या वर्गांत बसवतात; पण मुलींची संख्या निराळा वर्ग करण्यापुरती नसली तर त्यांना मुलांबरोबर बसवतात.

जोंवर स्त्रीपुरुषत्वाच्या भावना मुलांत विशेष तऱ्हेनें जागृत झाल्या नाहींत तोंवर, ह्मणजे सरासरी चवदाव्या वर्षापावेतों मुलांमुलींचें शिक्षण एकत्र होण्यास कांहीं हरकत नाहीं, असें तत्त्व यांस मान्य आहे. रूढीमुळें पृथक वर्ग करतात एवढेंच काय तें. शाळेच्या तिसऱ्या वर्षापासून मुलांस ड्रिल् ( फिझिकल ) व कसरत आठवड्यांतून दोन तास नियमानें असतात. मुलींनां साजेसे खेळ, धांवणें, फेर वगैरे करावें लागतें. शारीरिक शिक्षणाकडेहि याप्रमाणें लक्ष्य दिलें जातें. शिवाय, मुलें निरोगी रहावीं, इतर ठिकाणीं संपादलेले रोग शाळेंत पसरूं नयेत ह्मणून शाळेचे डॉक्टर असतात, ते नेहमीं तपासतात, औषधें देतात, संसर्गजन्यरोगी मुलांनां तो रोग जाईतों इतर मुलांत बसूं देत नाहींत, वगैरे.

पहिल्या वर्गांत शिक्षण चाललें होतें तेथें मी बसलों; यांतील मुलें सात वर्षांचीं होतीं. यांनां पहिलीं दोन वर्षें फक्त लिहिणेंवाचणें, वस्तुपाठ व सोपें पाटीवर ड्रॉइंग हीं आठवड्यांतून १६ तास असतात; तीं सुद्धां तासवारीनें जुळविलेलीं नसून मुलांचें लक्ष्य व कंटाळा यांच्या प्रमाणानें चालतात. यामुळें या एका तासांत मला तिन्ही पहायला सांपडलीं. विशेषत: पाटीवर घोडा, हरण, गाडी, घर, मनुष्य वगैरे काढायला सांगितलें असतां मुलांत फारच उत्साह दिसून येई, व कांहीं खरीं बरींच चित्रें काढीत. अगदीं लहानपणीं खोड्या करण्याचा जो स्वाभाविक कल त्याचा फायदा अशा रीतीनें घेतला जातो. सर्व समजत असून जिभेंत कांहीं दोष असल्यामुळें बहुतेक बोलतां न येणारा व बिलकूल दांत आले नसून रेघांशिवाय दुसरें कांहीं काढतां न येणारा अशीं दोन मुलें मास्तरनें मला दाखविलीं. "यांचें कसें होणार?" असें विचारतां "येथें अशा शारीरिक व विशेषत: मानसिक दुबळ्या मुलांसाठीं हिल्फस् शूल आहे, तेथें यांस ईस्टरनंतर पाठवणार आहों," असें मास्तरनें सांगितलें. या शाळेंत खाण्यापिण्याची नियमित व्यवस्था व मोठ्या

श्रमानें मानसिक दोष हळुहळू दूर करून मुलांना शिक्षणाला लायक करण्याचा प्रयत्न करतात, व त्याला यशहि चांगलें आल्याचें समजतें.

नंतर सातव्या ह्मणजे वरून दुसऱ्या, मुलींच्या क्लासांत गेलों. सरासरी चवदा वर्षांच्या मुली असाव्या. यांचा टवटवीतपणा, अल्लड-पणाचें चेहऱ्यावरील तेज हीं पाहून याच वयांत असलेल्या आपल्या-कडील मुलींची कलाहीनता, खल्लडपणा यांची विरोधानें आठवण झाली. हें वय इकडे पोरपणांत मोडतें, व शरीराची व मनाची वाढ करणें हेंच या वेळचें मुलींचें व त्यांच्या वडील पालकांचें कर्तव्य समजलें जातें. आपल्याकडे चौदाव्या वर्षी-अंगांत पात्रता नसतांहि पत्नी-पणाची जबाबदारी बिचाऱ्यांवर येऊन दोनतीन वर्षे सुद्धां लोटलेलीं असतात, व कांहींवर तर आया होण्याचा प्रसंग येतो! असो. या क्लासांत मुलींच्या भूगोलज्ञानाची चांचणी चालली होती. विचारतांविचारतां हिंदुस्तानाविषयीं प्रश्न निघाला. तेव्हां तेथील साधारण वस्ती, लोकांचे स्वभाव, उद्योगधंदे, व्यापार वगैरेचें ठोकळ ज्ञान मुलींस बरें असल्याचें दृष्टीला पडलें. भूगोलज्ञानाची तात्या पंतोजींची कल्पना अर्थात्च येथें नाहीं. तास संपतांच मास्तरच्या विनंतीवरून एकदोन मिनिटें मुलींला चार शब्द मीं त्यांच्याच भाषेंत सांगितले. जातांजातां मास्तरनें आणखी माहिती विचारली; ती मी सांगत असतां मुली उत्सुकतेनें ऐकत होत्या. गंगेविषयीं गोष्ट निघतांच मास्तरनें 'तुह्मी गंगेवरती गेलां होतां का?' ह्मणून एकदम विचारलें. मी थोडा ओशाळलों तर खराच; पण मग 'हिंदुस्तान ह्मणजे एक खंडच आहे; मी गंगेपासून फार दूर राहतों; व्यवसाय असल्याशिवाय उगीच जाणें क्वचित्च घडतें,' वगैरे सांगून वेळ निभावली, व बारांनंतर घरीं परत आलों.

आजच या टर्मचीं अखेरचीं लेक्चरें झालीं. आतां सहासात आठवडे सुटी आहे. ती मी येथेंच घालवणार आहें. कांहीं लायब्ररींत जाऊन वाचीत बसणें व कांहीं शाळा पाहण्यास जाणें यांत ती तेव्हांच जाईल.

इतक्यांत सकाळचें वर्तमानपत्र वाचलें. त्यांत बर्लिन येथील स्त्रियांच्या परिषदेंतील एक गमतीचा ठराव वाचला, तो असा:—

'निदान एक वर्षभर तरी गृहकृत्याचें शिक्षण योग्य तऱ्हेनें घेतल्याचा दाखला असल्याशिवाय कोणत्याहि तरुण स्त्रीला लग्न करण्याचा अधिकार नसावा!' हा ठराव गेल्या मंगळवारीं बर्लिन येथें सभेपुढें आला होता. पुढील हकीकत अजून कळली नाहीं! असो.

**लाइप्झिक्**, ८ मार्च, १९१२.

या आठवड्यांत बहुतेक वेळ आळसांत, मजेंत, गप्पांत जात आहे. कांहीं दिवस ल्याटिन, ग्रीक व व्युत्पत्तिशास्त्र बिलकूल बाजूला ठेवलें आहे; वाचनाचा नाद सुटत नाहीं, ह्मणून कुठें गॉटेचें इफिगेनिय व निवडक कविता, हाय मात्सारखें १० वर्षांपूर्वी प्रेक्षकांनां वेडावून सोडणारें सामाजिक नाटक वगैरे वाचणें भाग पडतें. या हायमातची मजा अशी सांगतात, कीं, तें नवें होतें तेव्हां प्रत्येक रात्रीं त्याचा प्रयोग होई व थिएटर गच्च भरलेलें असे! गेल्या वर्षी रोझेन् काव्हालियर नांवाच्या हलक्या नाटकाची सद्दी होती, तर यंदां बर्लिन येथें पोलिनश विर्ट्शाफ्ट व या शहरीं शॉन हेलेनासारख्या अचरट खेळांनां ऊत आला होता! एकूण काय, कीं फ्याशनेबल यूरोप कांहींना कांहीं तरी 'नव्या'साठीं हपापलेला असतो; मग तें कितीहि किंमतीचें असलें तरी हरकत नाहीं. जशी कपड्यालत्त्याच्या तशीच या करमणुकीच्या साधनांच्या बाबतींतहि ही गोष्ट सहज दिसून येते.

येथें या आठवड्यांत भरत असलेल्या मेस (बाजार, यात्रा) मध्यें फिरणें हेंहि एक तूर्त करमणुकीचें साधन आहे. पेटर, ग्रिमाइश व नॉयमार्क्ट् या तिन्ही मोठ्या रस्त्यांनीं दुकानांतून निरनिराळ्या वस्तु—बारीक सुईदोऱ्यापासून तों मोठमोठ्या यंत्रांपावेतों—नमुन्यादाखल मांडून ठेवलेल्या असतात. त्या पाहण्यासाठीं मजसारख्या रिकाम्या प्रेक्षकांची तर गर्दी असतेच; पण त्या पाहून भाव ठरवून सट्टे करण्यासाठीं लांब-

लांबचे व्यापारीहि येथें खूब जमतात. त्यामुळें या मेस–रस्त्यांतून फिरत असतां इंग्रजी, फ्रेंच, डच, जर्मन, इटालियन, रशियन, स्वीडिश या भाषांची एकच खिचडी होऊन, बायबलांतील बेबेल ( Babel )च्या मनोऱ्याच्या गोष्टीची आठवण होते. फरक इतकाच, कीं, त्या मनोऱ्यावर परमेश्वरानें भाषाभेद उत्पन्न केल्यामुळें कोणाचें कोणाला उमजेनासें झालें. येथें मात्र बहुतेकांस निदान दोन भाषा (त्यांत बहुधा एक फ्रेंच ) येत असल्यामुळें सर्व व्यवहार सुरळीत चालतो. जपानी व्यापारीसुद्धां या यात्रेला आलेले पाहून मला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. व्यापारी जगांत आपलें अस्तित्व स्थापन करण्यापुरती औद्योगिक प्रगति जपानानें थोड्याच काळांत केली, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. यांत हेंहि एक लहानसें कारण आहेसें मला वाटतें, कीं, जपानी लोक जे इकडे येत गेले व अजून येताहेत ते येथील व्यापार, उद्योगधंदे, कलाकौशल्य, विद्या वगैरे लक्ष्य लावून शिकून आपलींशी करून घेऊन गेले व जात आहेत; आमचे जे अगदीं बोटांवर मोजण्यापुरते लोक इकडे येतात, त्यांची दृष्टि केवळ आपल्या नांवामागें ' डॉक्टर ' हें उपपद लावून घेण्यावर असते; त्यामुळें प्रथम दोनतीन सेमेस्टरांत तें आपणांला मिळावें यासाठीं ते खटपट करतात; व एकाद्या लहानशा युनिव्हर्सिटींत तें मिळालें,कीं, त्याच्या भपक्यानें आपल्या देशबांधवांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं ते चालते होतात. ही शोचनीय गोष्ट आहे, हें कोणीहि कबूल करील ! हिंदुस्तानांतून इकडे येऊं इच्छिणारांचीं मला दोनतीन पत्रें अशींच आलीं, कीं, ' कमींत कमी किती सेमेस्टरांत आह्मांला डिग्री मिळूं शकेल !' परवां नाताळांत व आधींहि कांहीं जर्मन प्रोफेसरांनां मी भेटलों असतां, त्यांनीं याविषयीं उल्लेख करून, ही शोचनीय गोष्ट आहे असें ह्मटलें; व तशी खरी स्थिति असल्यामुळें मला कांहीं उत्तर देतां आलें नाहीं ! दोन सेमेस्टरांत, व इंग्रजींत निबंध लिहून डिग्री

मिळावी यासाठीं येथील २१ युनिव्हर्सिट्यांस अर्ज करून, एकीकडून 'हो' ह्मणवून घेतलेल्या एका हिंदी गृहस्थाचें ताजें उदाहरण माझ्या डोळ्यांपुढें होतेंच ! असो. मेससंबंधीं लिहितांना सहजच भलतीकडे वाहवलों; कारण, हा विषय नेहमीं माझ्या मनांत घोळत असतो.

या मेसला आलेल्या व्यापारी पाहुण्यांनां इकडे थट्टेनें मेस-ओंकेल् ( बाजारी काका ) ह्मणतात. मेसच्या आठवड्यांत जिकडे जावें तिकडे हे काका आपले ठेवलेलेच ! कॉफीहौसेस्मधून तर यांच्या गर्दीविषयीं पुसूंच नये. पण जिकडे जातील तिकडे यांची नजर मुख्य मुद्यावर असल्यामुळें आपलीं नांवाचीं कार्डें, बाड, जिनसा व भावांच्या चोपड्या व मागण्या टिपून ठेवण्याचें नोटबुक हीं यांच्या बगलेंत असतात, व कोठेंहि बसल्या जागीं तेव्हांच सट्टे होतात. या आठ दिवसांत व्यापारीरूपाच्या केवढ्या मोठ्या घडामोडी येथें होतात, यांची कल्पना करवत नाहीं !

मेससाठीं मुद्दाम बांधलेली मेस-पालास्ट् ( वाडा ) ह्मणून एक जंगी इमारत आहे. निरनिराळ्या ठिकाणच्या वेगवेगळ्या नमुन्यांनीं ही सर्व गच्च भरलेली असते. त्या सर्वांत जर्मनींतील काच व चिनी मातीचीं भांडीं व इतर जिनसा फारच सुंदर असून मला फार आवडल्या. संगमरवरी दगड व धातूंचे पुतळे व इतर चित्रेंहि कांहीं ठिकाणचीं अप्रतिम होतीं. हा सबंध वाडा फिरून झाल्यावर एकंदर यूरोपांतील व्यापार, उद्योगधंदे व कलाकौशल्य यांची वाढ कशी झपाट्यानें होत गेली व अजून होत आहे याची मूर्त कल्पना येऊन आश्चर्य वाटलें. आपल्या हयातींत आपल्या देशाची औद्योगिक प्रगति, इतकी जरी नाहीं तरी याच्या खालोखाल झालेली आपल्या दृष्टीला पडेल काय ? हा विचार वारंवार मनांत घोळूं लागला. हें व्हायचें असेल तर, हल्लींपेक्षां जास्त हिंदी लोक, केवळ व्यापार व उद्योगधंद्यांचें शिक्षण मिळविण्यासाठीं यूरोपांत आले पाहिजेत, व त्यांची दृष्टि नुस्त्या डिग्रीवर नसून खऱ्या ज्ञानाकडे असली पाहिजे, असें मला वाटतें.

परवां या मेसपालास्ट्मध्यें आकस्मिक एक हिंदी गृहस्थ भेटला. दोघांचें थोडावेळ बोलणें झालें. हा बंगाली गृहस्थ विणकाम वगैरे शिकण्यासाठीं इकडे आज जवळजवळ तीन वर्षें आहे. दोन वर्षें एका विणण्याच्या शाळेंत ( इकडे प्रत्येक धंद्याला शिक्षण लागतें ) राहून, आतां येथून जवळच एका सूत काढण्याच्या गिरणींत प्रत्यक्ष काम चाललेलें पाहून अनुभव मिळविण्यासाठीं आला आहे. डिग्रीच्या वगैरे भानगडींत न पडतां, धंद्याला लागणारें खरें व्यापारी ज्ञान मिळविण्याचा त्याचा हा स्तुत्य उद्योग पाहून बरें वाटलें. आह्मी दोघे इंग्रजींत बोलतांना ऐकून, त्याच्या जर्मन मित्रानें आपलें आश्चर्य व्यक्त केलें. दोन हिंदी ह्मणविणाऱ्या गृहस्थांना एकमेकांशीं बोलण्यांत इंग्रजीवांचून गत्यंतर असूं नये ही खरोखरीच आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ?

**लाइपूझिक्**, १५।३।१२.

अलीकडे थंडी बहुतेक कमी होऊन वसंतराजाचा पुनः प्रवेश होऊं लागला आहे. त्यामुळें हवा स्वच्छ, दिवस बहुतेक निरभ्र व सूर्यप्रकाशाचे, वनांत झाडांना हळुहळू पालवी फुटूं लागून चोहींकडे मंद सुगंध दरवळून गेलेला, हिंवाळ्यांत दक्षिणप्रदेशाकडे नाहींशीं झालेलीं पांखरें आतां यायला लागून त्यांचे जुने सोबती जे आयश, फिष्ट, लिंड, बिर्क, कास्टानिय इत्यादि वृक्ष त्यांच्या पुनर्दर्शनानें सुखाचे त्यांचे आलाप, इत्यादि गोष्टींचा आतां दिवसेंदिवस मिलाफ होऊं लागला आहे. त्यामुळें सकाळीं जेवणापूर्वीं अगर नंतर दुपारीं जवळील वनांत सहल करण्याचा मोह अनावर होतो, व ती एकटाच अगर मित्रासह करीत असतांना सर्व इंद्रियें अगदीं तृप्त झालीं नाहीं तरी त्यांना पराकाष्ठेचें सुख होतें. अशा सहली एकट्यानेंच करणें मला फार आवडतें; कारण, अशा वेळीं सृष्टिसौंदर्याचा व तज्जन्यसुखाचा स्वैर अनुभव घेतां येतो. नदीच्या कांठानें झाडींतून फिरायला जाणें हें आतां माझ्या

नित्यक्रमांतलें झालें आहे. अलीकडे नदीवर तुरळक होड्याहि दिसूं लागल्या आहेत. गेल्या वर्षी मी वल्हवायला शिकलों; पण यंदां अजून हवेंतील थंडी साफ नाहींशी झाली नाहीं ह्मणून धजत नाहीं.

बर्फाच्या तळ्यावरून धांवणें आतां पुढच्या वर्षाखेरीज नाहीं. यंदां अवघें पंधरासतराच वेळ जातां आलें; पण तेवढ्यांत बरें येऊं लागलें होतें. यामुळें थंडी कमी कशी लागते हा तुमचा प्रश्न आहे. बर्फा-वरून घसरतां यावें ह्मणून पायांनां पातीं बांधावीं लागतात हें तुह्माला कदाचित् ठाऊक असेल. हीं पातीं बुटाइतकीं लांब, १॥ पासून २ इंच उंच, व फक्त ⅛ इंच रुंद असतात. ही रुंदीची बाजू अर्थात् बर्फावर टेंकायची असते. वरच्या बाजूला (लहान दोन चौकोनांसारखें) त्यांवर बूट असतो. थोडासा जोर घेतला, कीं, गुळगुळीत बर्फावर आपल्या शरीराला अल्प श्रमांत फार गति येते, व माणूस तळ्या-भोंवतीं फार जलद फिरतें. इतकें, कीं, पंधरावीस मिनिटांत घाम येऊं लागतो. मोकळ्या शुद्ध हवेंतील गतीमुळें जी ऊब येते, ती सर्व दिवस-भर कायम राहते. विस्तवाजवळ बसून किंवा खोली गरम करून आपण जी उसनी ऊब आणतों, ती किती टिकाऊ आहे हें विस्तवा-जवळून जरा दूर झालों, कीं, आपणाला तेव्हांच जाणवतें. तसें या गतीमुळें उत्पन्न झालेल्या उबेचें नाहीं; ह्मणून थंडी कमी लागते हें उघड आहे.

इकडील मुलांनां हिंदुस्तानाविषयीं साधारण माहिती असते, व ती ते आपल्या बालजिज्ञासेनें वाढवतात, ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे खरीच. त्यांचें शिक्षणच या पद्धतीचें, कीं, त्यांचें ज्ञान व जिज्ञासा हीं बरोबरीनें वाढावीं. साधारण कोणत्याहि वर्गाच्या १४ वर्षांच्या मुलाला अगर मुलीला स्वदेशाची तर उत्तम माहिती असतेच; पण परदेश—आशियापावेतों सुद्धां—कोठें कसे आहेत, त्यांची सांपत्तिक, राजकीय स्थिति काय आहे, त्यांतील लोक कोण, कसे व किती आहेत,

याहि गोष्टी ठोकळ मानानें त्यांनां ठाऊक असतात. चतु:सीमा, शहरें, नद्या इत्यादिकांच्या नांवांची संध्येसारखी घोकंपट्टी, व पंतोजींनीं एकाद्या शहराचें नांव ओरडून छडी उभारल्याबरोबर नकाशावर त्या स्थळीं डोळे मिटून बोट ठेवणें ह्मणजे भूगोलज्ञानाची समाप्ति झाली, अशी इकडे खुळ्या माणसाचीहि समजूत नाहीं !

ही मुलांची गोष्ट झाली. प्रबुद्ध, युनिव्हर्सिटीशिक्षणाचा थोडा तरी गंध लागलेल्या, ज्यांनां इकडे ' गेबिल्डेट (सुसंस्कृत)' ह्मणतात अशा माणसांनां सिंधु-गंगा, त्यांवरील कमळें व कमलनयना, प्रमदा हे शब्द तर वहिवाटलेले असतातच; पण आपली जुनी भाषा, जुनी संस्कृति, जुनें वाङ्मय यांविषयीहि ठोकळ ज्ञान त्यांनां असतें. ऋग्वेद, रामायण, महाभारत, गौतमबुद्ध, अशोक, कालिदास व त्याचें शाकुन्तल हीं भाषांतररूपांत पुष्कळशीं वाचणें जरी त्यांस अशक्य असलें, तरी नांवानें तरी ठाऊक असतात. येथें कांहीं लोक बुद्धधर्मानुयायी आहेत, हें सांगितलें असतां तुह्मांला प्रथम खरेंहि वाटणार नाहीं ! पण आपणांला 'बोधि धर्मी ' ह्मणविणारे थोड्या शेंकड्यांनीं गणण्याइतके लोक जर्मनींत आहेत; यांचा सेक्रेटरी या शहरींच असतो.

अलीकडेअलीकडे मात्र येथें मिशनरी लोकांनीं बराच उपक्रम मांडल्याचें तुरळक ऐकतों. दक्षिणहिंदुस्तानांत कांहीं जर्मन मिशनरी आहेत, व ते भले गृहस्थ असावे. पण त्यांचीं जवळचीं माणसें व चेले-मंडळ, तेथील कनिष्ट लोकांत मिसळून त्यांवरून चुकीचे सामान्य सिद्धांत ठरवतात, व आपली अर्धीकच्ची माहिती इकडे पसरण्याचा प्रयत्न करतात. यांच्याकडे विशेष कोणी लक्ष्य पुरवीत नाहीं, व जें थोडें या विषयावर लिहिलें जातें तें व्यवस्थेशीर, सत्याला फारसें न सोडून असें असल्यामुळें, कांहीं विशेष होत नाहीं, ही समाधानाची गोष्ट आहे.

**लाइप्झिक्**, २२ मार्च, १९१२.

नुकतेंच कांहीं प्राथमिक शाळा पाहिल्याचें एका पत्रांत लिहिलें होतेंच. त्यानंतर परवां एक फोर्ट बिल्डुंगजशूल (इं. Continuation school) पहायला गेलों होतों. ज्यांनां वरचें दुय्यम प्रतीचें शिक्षण मिळवण्याची ऐपत नसते, अशीं मुलें प्राथमिक शाळांत आठ वर्षें शिकतात, हें तुह्मांला आतां ठाऊक झालेंच आहे. हीं मुलें चौदाव्या वर्षींच मोकळीं होतात, व गरिबी असल्यामुळें उद्योगधंद्याच्या मार्गें लागतात. कोणत्या तरी व्यापारांत अगर धंद्यांत त्यांनां लेअरलिंग–कामशिकाऊ ह्मणून बरींच वर्षें काढावीं लागतात. या काळामध्यें मिळविलेलें शिक्षण विसरून वायां जाऊं नये व व्यापार–धंदेशिक्षणाला मदत व्हावी ह्मणून या फोर्ट बिल्डुंगज शूलची कल्पना निघून १८७२–७३ सालीं बरीच रूपाला आली. प्रथम यांत दोनच वर्षें शिकावें लागे. आतां १९०० च्या नंतर तीन वर्षांचें शिक्षण सक्तीचें झालें आहे.

फोल्क्स शूलमधून मुलगा (मलगीहि) याविषयीं शेवटीं वर्तणुकीचा व तेथील शिक्षण पुरें झाल्याचा दाखला घेऊन बाहेर पडला, ह्मणजे त्याला कोठें तरी धंद्यांत कामशिकाऊ ह्मणून गुंतविलें जातें; पण तसा तो अडकविला न गेला तरी त्यास लगेच फोर्टबिल्डुंगज शूलमध्यें–जर्मन भाषा, व त्यानें निवडलेल्या धंद्याचें शिक्षण यांसाठीं–तीन वर्षें पाठवावें लागतें.

या मुलांनां घरचें अगर जेथें शिकाऊ ह्मणून राहिले असतील तेथचें काम करतां येऊन शिक्षण मिळावें, ह्मणून शाळेची वेळ जुळेशीच ठेविली आहे. सकाळीं एकाददुसरा तास असतो; यांत जे कोठें गुंतलेले नाहींत त्यांनां सोईचें पडतें. पण शाळेची मुख्य वेळ दुपारची.

---

(टीपः—परकी शब्दांतील शेवटच्या अक्षरांचा पाय मोडला नसेल, तेव्हां त्यांचा उच्चार 'मद्रास गव्हर्मेन्ट, गुड गव्हर्मेन्ट' यांतील शब्दांच्या शेवटल्या अक्षराचा मद्रासी लोक जसा उच्चार करतात तसा करणें.)

चार वाजतां धड्याला आरंभ होऊन सायंकाळचे सात वाजतां शाळा सुटते. यामुळें सकाळचा सगळा वेळ व दुपारचे दोन तास मुलांना आपल्या घरकामासाठीं मोकळे सांपडतात.

आठवड्यांत शिक्षण सहाच तास असतें; व यांत जर्मन भाषा, निवडलेल्या धंद्याची तात्त्विक व व्यावहारिक माहिती, त्या त्या धंद्याला उपयोगी पडणारें (अंक) गणित, व बहुतेकांना ड्रॉइंग इतके विषय शिकवले जातात. पैकीं जर्मन भाषा फोल्कस् शूलमध्यें आठ वर्षें सारखी झालेलीच असते, तेव्हां या तीन वर्षांत तींतील वाङ्मयाला कांहीं वेळ देऊन, मुख्य लक्ष्य, आपापल्या धंद्यासंबंधीं पत्रव्यवहार मुलांना करतां यावा, या गोष्टीकडे असल्याचें शाळेचे डिरेक्टर हेर् कोल् यांनीं सांगितलें. यासाठीं आठवड्यांतून दीडतास दिला जातो. निवडलेल्या धंद्याचें सप्रयोग ज्ञान आठवड्यांतून एक तासभर मिळतें. उदाहरणार्थ—सुतार, चांभार, शिंपी, आचारी वगैरेच्या धंद्याला लागणारे जिन्नस, ते कुठें कसे तयार होतात, त्यांचा काटकसरीनें व्यवस्थेशीर व किफायतशीर उपयोग कसा करावा इत्यादि माहिती, धंद्याची हल्लींची स्थिति, मालाला गिऱ्हाइक कोठें कसें आहे वगैरे सर्व गोष्टींचा या धंदे माहिती–बेरूफस् कुण्ड--मध्यें समावेश होतो. भटाऱ्यांचा एक वर्ग चालला होता. पहायला येतां काय म्हणून डिरेक्टरनें विचारलें असतां मीं नाहीं म्हटलें. पण त्या वेळीं असा विचार आला, कीं, आपल्या मुंबईला निदान खाणावळवाल्यांपुरती तरी त्या धंदे-शिक्षणाची सक्ति असती तर खाणावळींत जेवण्याचा प्रसंग येऊन पडलेल्या विद्यार्थ्यांचे हाल किती तरी कमी झाले असते. ती ठराविक उग्रट वास (?) येणारी चमत्कारिक आमटी, व अर्धकच्चे फुलके तरी त्यांच्या कपाळचे खास चुकले असते! हा गमतीचा विचार त्या वेळीं कसा आला, कोणाला ठाऊक?

धंदोपयोगी-( हा समास कानाला जरा कसासाच वाटतो, नाहीं ? )- गणिताला एक तास-कोठें थोडा जास्त वेळ मिळतो. ड्रॉइंग बहुतेक धंद्यांस लागतेंच; ह्मणून तें मुद्दाम आवश्यक ठेवलें आहे; त्यालाहि दीडएक तास आठवड्यांतून पडतो. पण वाणी, उदमी, हिशेबठिशेब लिहिणारे कारकून, जिन्नस विकणारे व दुकानांतील इतर व्यवस्था करणारे इत्यादि लोकांनां ड्रॉइंगची जरूर नसते व त्यांस तें ठेविलेलेंहि नाहीं. त्याऐवजीं अशा लोकांस अक्षर लिहिणें ( अगदीं गांवठी नांव हवें असल्यास 'खर्डे गिरवणें !' ) लघुलेखन, यंत्रलेखन, जमाखर्च वगैरे शिकविलीं जातात.

अशा तऱ्हेनें निरनिराळे उद्योग पुढें करूं इच्छिणाऱ्या मुलांनां आठवड्यांतून सहा तास त्या त्या विषयांतील प्रवीण माणसांकडून शिक्षण मिळतें. याप्रमाणें या फोर्टबिल्डुंग्जशूलमध्यें भावी लोहार, सुतार, गवंडी, शिंपी, चांभार, साळी, माळी, पुस्तकें बांधणारे, भटारी, आचारी, वाढपी, घराऊ मोलकरी अगर चाकर, न्हावी इत्यादि हातकसबी लोक व लहानमोठे सवदेवाले, वाणी, इतर दुकानदार, चोपडी-वाले दिवाणजी, दिवाबत्तीवाले मशालजी इत्यादि लोक तयार होतात. हें शिक्षण या लोकांनां इतकें आंगवळणीं पडलें आहे, कीं, त्यावांचून- फोर्ट्बिल्डुंग्जशूलच्या दाखल्यावांचून-कोठेंहि कामधंदा मिळणेंच अशक्य होऊन बसलें आहे.

एवढ्यानेंच संपलें असें मात्र नाहीं. फोर्टबिल्डुंग्जशूलमधून तयार झालेल्या मुलाला पुढें एकदोन वर्षें केवळ आपल्याच एका धंद्यासाठीं ह्मणून असलेल्या 'फाखशूल' ( इं. Special Schools ) मध्यें काढावीं लागतात. उ० एंजिनूड्रायव्हर, अगर फिटर यांच्यासारखीं यंत्राचीं कामें ज्यांनां करायचीं असतात त्यांच्यापुरतेंच टेक्निकल स्कूल असतें; ( लहानसहान ) व्यापाऱ्यांसाठीं व्यापारी शाळा असते. सुतारादि कसब्यांसाठीं गेवेर्बशूल असतें, वगैरे वगैरे. यांतून सरासरी

एकोणिशी संपतांसंपतां मुलगा सुटतो, तों त्याला सैन्यामध्यें दोन वर्षें सक्तीची चाकरी करण्याची वेळ येते. तें झालें, कीं, त्यानें आपला उद्योगधंदा उभा करावा!

जसें इकडे गरिबांच्या लहानसहान व्यापारधंदे करूं जाणाऱ्या मुलांनां आपापलें काम ओळखून, त्यांतच विशेष ज्ञान मिळवायचें असतें, तसेंच चार वर्षांनंतर फोल्क्सशूल सोडून दुय्यम शिक्षणाकडे जाणाऱ्या मुलांनांहि आपण पुढें काय करणार आहोंत हें साधारणपणें ठरवून एक विशिष्ट मार्ग धरावा लागतो. प्रथमच दोन धोपट मार्ग फुटतात. एक ल्याटिन-ग्रीक या भाषांचें प्राबल्य असलेल्या 'गिम्नासिउम्'कडे व दुसरा नव्या भाषा व आधुनिक शास्त्रें यांचें वर्चस्व असलेल्या रेआलशूलकडे. पहिला मार्ग नऊ वर्षांनीं युनिव्हर्सिटीत मिळून मोठमोठ्या सरकारी नोकऱ्या, धर्म राजनीति-न्याय-शिक्षण-सैन्य आदि हुद्यांत व वकिली, वैद्यकी यांसारख्या उच्चप्रतीच्या स्वतंत्र धंद्यांत संपतो. दुसऱ्या रेआलशूलच्या तितक्याच अवधीच्या (नऊ वर्षें) मार्गाला, पुढें पुनः दोन फाटे फुटतात; एक उच्चप्रतीचीं व्यापारी कॉलेजें-हान्डेल्स होखशूलेन् व दुसरा यंत्ररसायनादि शास्त्रांचीं कॉलेजें-टेश्निशहोख्शूलेन्. एकांतून बडेबडे व्यापारी निपजतात, तर दुसऱ्यांत बडेबडे शास्त्रज्ञ, यांत्रिक, एंजिनीयर वगैरे तयार होतात. असो.

या त्रोटक हकीगतीवरून तुमच्या लक्ष्यांत आलेच असेल, कीं, जर्मनीमध्यें शिक्षणाच्या बाबतींत प्रथमपासून वर्गीकरणाचें तत्त्व बिंबलें आहे. जितके व्यापारधंदे जितक्या तऱ्हेच्या नोकऱ्या, जितक्या तऱ्हेचे इतर उद्योग तितक्यागणित शाळा व कॉलेजें जर्मनींत आहेत. इतकेंच नव्हे तर एकाच धंद्यांत अमुक हुद्यापावेतों जाऊं इच्छिणारांसाठीं अमुक प्रतीची शाळा, असें असें शिक्षण, इतकी बारीक निवड आहे. त्यामुळें त्या त्या कामांत वाकबगार-तरबेज माणसें तयार होतात. आपल्यासारखें सामान्यशिक्षण मिळालेला, ज्याला विशिष्ट धंद्यांचें, उद्योगाचें,

व्यवहाराचें शिक्षण मिळालेलें नाहीं, असा माणूस येथें बिलकूल खपायचा नाहीं. त्याला कसलेंहि काम मिळणें कठीण. मिळालेंच तर नालायक ह्मणून तेव्हांच त्याची हकालपट्टी व्हायची !

यामुळें आपल्याकडे शिकलेल्या माणसाला, उ० एकाद्या ग्राज्युएटाला परीक्षेचा निकाल लागल्याबरोबर 'आतां पुढें मीं काय करावें ?' हा प्रश्न जसा दत्त ह्मणून पुढें उभा राहतो, तसें इकडे फारसें होत नाहीं. पहिल्यापासून वर्गीकरण, निवड व त्या त्या विषयासाठीं भरपूर साधनें अशी इकडील रीत असते. व 'पुढें काय करायचें,' याचा विचार वेळींच होत असतो. यामुळें युनिव्हर्सिटीच्या पंचमेळ खिचडीसारख्या-यांतील थोडें त्यांतील थोडें अशा-भाराभर भरतीवजा ज्ञानाच्या चरकांतून पिळून निघालेला व ह्मणूनच कांहींहि काम आपल्या जबाबदारीवर स्वतंत्रपणें करण्यास असमर्थ व नोकरी मिळवून पोट भरण्यासाठीं आशाळभूत, असा गरीब बापडा ग्राज्युएट येथें 'दुर्मिळ चीज' ह्मणून अजबखान्यांत ठेवण्यापुरता एकादासुद्धां आढळत नाहीं, यांत नवल नाहीं. 'एक ना धड भाराभर चिंध्या' या ह्मणीला येथें वावच नाहीं. जीवनकलहच इकडे फार बिकट झाल्यामुळें इकडेहि अडचणी येतात त्या निराळ्या.

वर्गीकरण-निवड इतकी सूक्ष्मपणें येथें अमलांत येते, तेव्हां येथील सामान्य माणूस एकतर्फी ज्ञान व संस्कार यांमुळें एका दृष्टीनें कच्चा राहील, साधारणतः नागरिकामध्यें जो गुंडपणा, जो चौकसपणा लागतो तो त्यांत येणार नाहीं, असें प्रथमतः वाटेल. पण तसें न व्हावें ह्मणून इकडील विशिष्ट शिक्षणांतहि सोय केली आहे. आपल्या वाङ्मयाचें, इतिहासाचें चांगलें ज्ञान, जगाची सामान्य माहिती, एकाददुसरी परकी भाषा वगैरे गोष्टी, वर्गीकरण कितीहि झालें तरी त्यांतील प्रत्येक शाखेला आधारभूत ह्मणून समजल्या जातात, व त्यांचें योग्य शिक्षण दिलें जातें.

सर्व जर्मनींतील शिक्षणप्रसाराची व वर्गीकरणाची मजल कोठवर पोंचली आहे, याची तुह्मांला ठोकळ कल्पना यावी ह्मणून लाइप्झिक् येथील सर्व तऱ्हेच्या शाळा–कॉलेजें यांचा थोडा हिशोब देतों. व्यापार-धंदा, कलाकौशल्य, विद्या, विस्तार, सौंदर्य वगैरे सर्व तऱ्हेनीं लाइप्-झिक् हें जर्मनीच्या मुख्य शहरांत मोडतें. तेव्हां सर्व जर्मनीचें तें निद-र्शक ह्मणून समजण्यास कांहीं हरकत नाहीं.

लाइप्झिक् येथील शिक्षणसंस्थाः–

१ जुनी प्रसिद्ध युनिव्हर्सिटी; विद्यार्थिसंख्या सहा हजार.

२. १९११ आक्टोबरांत नवेंच स्थापन झालेलें बायकांचें कॉलेज, अगर युनिव्हर्सिटी. हींत आरंभींच येथील व परदेशच्या मिळून ९०० विद्यार्थिनी जमल्या.

३. गायनवादनादि संगीत कलांचें प्रसिद्ध कॉलेज. यास कान्झर-व्हाटोरिउम् ह्मणतात. यांत देशीदेशीचे विद्यार्थी–विशेषतः स्त्रिया येतात. न्यूझीलंडांतून किनरी वाजवण्यास शिकण्यासाठीं येथें आलेली एक मुलगी याच घरांत राहते.

४. व्यापारी शिक्षणाचें एक कॉलेज. याला हान्डेल्स् होख्शूल ह्मण-तात. यांतहि परदेशचे विद्यार्थी बरेच असतात.

५ गिम्नाझिएन् ( लॅटिन–ग्रीकचें वर्चस्व ) एकंदर चार आहेत. याशिवाय रेआल् गिमनासिउम्–हींत ग्रीक अजीबात कमी व त्याऐवजीं फ्रेंच अगर इंग्रजी, व थोडीं आधुनिक शास्त्रें. एकूण ५. एक ओबररेआल् शूल–यांत ल्याटिनहि नसतें. नव्या भाषा व शास्त्रें यांचें प्राबल्य असतें.

६. रेआलशूलेन्- ज्यांत जुन्या भाषांना फांटा मिळून नव्या एक-दोन भाषा व आधुनिक शास्त्रें यांचें प्राबल्य असतें–अशीं पांच.

६ (अ.) प्रिव्हाद्शूलेन् अगर खाजगी शाळा. यांत 'रेआल्शूल'सारखें शिक्षण दिलें जातें. एकूण ६.

७. मुलींसाठींच अशा दोन मोठ्या शाळा. यांस हॉअर टॉश्टरशूल ह्मणतात. एकीला जोडून मास्तरिणींसाठीं कॉलेज आहे. त्याला लेरेरिनेन् सेमिनार ह्मणतात.

८. सरकारी धंदेशिक्षणाची शाळा, अथवा कॉनिग्लिश गेवेर्बेशूल. हींत एंजिनड्रायव्हर, फिटर, सुतार, चितारी, भिंतीचे कागद तयार करणारे व लावणारे, (येथें भिंतींना आंतून रंग नसतो, तर फुलें अगर नक्षी काढलेला कागद सर्वभर चिकटविलेला असतो), तांबट व धातूंचें कांतीव काम करणारे, व लांकडांवर चित्रें कातणारे-इत्यादि तयार केले जातात.

९. व्यापारी शिक्षण, छापणें, पुस्तकें बांधणें, पुस्तकें विकणें, इत्यादि व इतर धंदे यांसाठीं निरनिराळ्या ३० शाळा. आपल्याकडे सर्व धंद्यांचीं वाचक अशीं निवडक चारपांचच नांवें घ्यायचीं असलीं ह्मणजे 'न्हावी-तेली-तांबोळी-कोळी' असें थोडक्यांत ह्मणण्याची चाल आहे. तिला अनुसरूनच मीहि 'न्हावी-तेली-तांबोळी-कोळी' यांसुद्धां सर्व धंद्यांच्या शाळा येथें आहेत असें सांगतों, ह्मणजे झालें. एक नाट्य-शालाहि आहे. या तिसांशिवाय, गायनाच्या खाजगी वीसएक शाळा आहेत. एकूण ५०.

१०. म्युनिसिपल फोर्ट्बिल्डुंग्ज्‌शाळा चार आहेत. एकींत मुलींचीहि सोय आहे. शिवाय मुलींसाठीं त्यांनां उपयुक्त असे धंदे शिकविण्याकरितां एक फाव्शूल वेगळें आहेच. याला स्टेटिश शूल फयूर फावेन् बेरूफ असें नांव आहे. एकूण ५.

११. प्राथमिक शिक्षणाच्या शाळा. आजारीपणानें अगर नैसर्गिकच अशक्त मेंदू असलेल्या मुलांसाठीं एक हिल्फ्स् शूल (मदत शाळा) आहे, तें धरून यांची संख्या ६४ आहे.

याविषयीं अगदीं त्रोटक वृत्त मीं फर्ग्युसोनियन्‌ला पाठवलेल्या पत्रांत लिहिलें आहे. यावरून वर्गीकरण व निवड या तत्त्वांवर उभारलेल्या

शाळावैचित्र्याची थोडीबहुत कल्पना येईल, अशी आशा करून वरील कंटाळवाणी आंकडेमोडी पुरे करतों.

मुलींचें शिक्षण साधारणतः मुलांसारखेंच होतें. ह्मणजे ६ पासून १४ वर्षांपावेतों यांचा वेळ फोल्कस्शूलमध्यें जातो. मुलें व मुली यांचे वर्ग वेगळे बसविण्याची इकडे चाल आहे ह्मणून मागें लिहिलेंच आहे. गरीब मुलींसाठींहि 'फावेन्बेरूफशूल'सारख्या धंदेशिक्षणाच्या शाळा असतात. यांत दाया, घरकामाच्या दासी, शिंपिणी, दुकानांतून हिशेब ठेवणाऱ्या व विकणाऱ्या मुली, सैंपाकिणी, मास्तरिणी वगैरे तयार होतात. वरच्या प्रतीच्या मास्तरिणींसाठीं लेरेरिनेन्सेमिनार असते. युनिव्हर्सिटीप्रवेश मिळवूं इच्छिणारांसाठीं मुलांसारखी एकादी गिम्नासिउम्हि असते. तींतून उत्तीर्ण झाल्यावर त्या युनिव्हर्सिटींत जातात. नवीं बायकांसाठींच अशीं कॉलेजें हळुहळू होऊं लागलीं आहेतच. पण मध्यम स्थितींतल्या व वरच्या दर्जाच्या मुलींचा एक मोठा वर्ग राहतो; यांनां धंद्यांत पडण्याचीहि जरूरी नसते, व युनिव्हर्सिटी-पदव्यांचीहि हांव नसते. अशांसाठीं दहा वर्षें शिक्षण देणाऱ्या ( सहापासून सोळाअखेर ) 'होअर मेडशेन्शूल' (श्रेष्ठ प्रतीची मुलींची शाळा अथवा 'होअर टॉख्टरशूल' ( श्रेष्ठ प्रतीची कन्यांची शाळा ) ह्मणून शाळा असतात. यांत जर्मन, फ्रेंच व इंग्रजी या भाषा, इतिहास, भूगोल, गणित, सृष्टिज्ञान ( Natur-kunde=प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांतील ठळक ठळक माहिती), ड्रॉइंग, शिवणकाम, गायन इत्यादि विषय साधारणतः शिकविले जातात. फी वरच्या क्लासांत सालीना सरासरी सहा पौंड असते. या व इतर मुली येथील संगीत विश्वविद्यालयांत नियमानें दोनतीन वर्षें तरी शिकतातच. या विद्यालयांत ( कॉन्झरव्हाटोरिउम् ) मुलेंहि जातात, पण मुलींचा भरणा जास्त.असो.

इकडे आतां हवा उत्तम असल्यामुळें प्रकृतीहि चांगली आहे. या महिन्याच्या आरंभापासूनच वसंती हवा सुरू झाली असल्याचें एका

पत्रांत लिहिलेंच आहे. पण शास्त्रोक्त ज्योतिषी वसंत ११ तारखेला ह्मणजे काल सकाळीं सुरू झाला, व वासंतिक समयाला शोभेल अशीच बहारीची निरभ्र, स्वच्छ सूर्यप्रकाशाची हवा काल होती.

जगांतील हालहवाल तुह्मांला तेथेंहि कळत असेलच. वर्तमानपत्रांचा अतिशय मोठा उपयोग जर कांहीं असेल तर तो हाच होय, कीं, आपण ज्या जगांत राहतों त्यावर काय घडामोडी चालल्या आहेत, हें त्यांत कांहीं अंशानें वाचायला सांपडतें. येथें मी एक जर्मन वर्तमानपत्र व एक साप्ताहिक आणि एक इंग्रजी पत्र (कधीं कधीं) वाचीत असतों; पण त्यांत एडिटर या व्यक्तीच्या बऱ्यावाईट, खऱ्याखोट्या कल्पना–युक्तिवाद, हीं डोक्यांत कोंबण्यापेक्षां, वर्तमानसार समग्र वाचून आपलीं स्वतःचीं मतें बनविण्याकडे माझा नेहमीं कल असतो; त्यामुळें पक्षाभिमानानें, आपल्या पत्राचा बोज रहावा व विस्तार व्हावा, या हेतुत्रयानें प्रेरित झालेल्या एडिटरसाहेबांच्या लेखणीच्या करामतीच्या आटोक्यांत सांपडून आपल्या विचारांचें स्वत्व गमावण्याची पाळी येत नाहीं. याचा अर्थ संपादकीय अग्रलेख वाचूं नयेत असा नाहीं; पण साधारण दिशा ही असावी असें मला वाटतें. उदाहरणार्थ, गेल्या सोमवारीं ब्रिटिश् पार्लमेंट्मध्यें आरमारखात्याचे मंत्री मि. चर्चिल् यांचें भाषण झालें. त्यासंबंधानें इकडील वर्तमानपत्रांतून अग्रलेखांचा तडाखा उडून राहिला आहे! व सर्वांचे प्रयत्न, त्या भाषणांतून जर्मनीला धमक्या–भीति घालणें वगैरे ओढूनताणून काढून त्याबद्दल उलट शिव्यांचा वर्षाव करण्यांत होत आहेत. असेंच इंग्रजी पत्रांचेंहि. मात्र जेथें पक्षाभिमान–बोज–विस्तार या त्रयीचा संबंध येत नाहीं अशा विषयांवर कांहीं वेळीं खरोखरच वाखाणण्यासारखे अग्रलेख येतात. याचें ताजें उदाहरण ह्मणजे कॅ. आमुण्ड्सेन् यांची दक्षिणध्रुवाकडील यशस्वी सफर होय. असो. सहज ओघ आला ह्मणून लिहिलें. याविषयीं सर्वांचें मत सारखें असणें शक्य नाहीं, हें मी जाणून आहे.

येथें ऱ्हाइन् नदीच्या जवळच रूअर नदीच्या कांठीं ऐसन् म्हणून शहर आहे. त्या ठिकाणीं हेर् क्रुप् या गृहस्थांचा लोखंड-पोलादाचीं अजस्र यंत्रें व तोफा करण्याचा प्रचंड कारखाना आहे. यांतील एकंदर व्यवस्था, टापटीप, इतक्या कामकरी लोकांची स्वच्छ हवेंत आरोग्यांत प्रशस्तपणें राहण्याची सोय, तेथेंच जवळ मजुरांची मुलांसाठीं शाळा, इत्यादि गोष्टी यूरोपांत प्रसिद्ध आहेत. एवढ्या प्रचंड कारखान्यांतली काटकसरहि अपूर्व आहे, यत्किंचित्‌हि पदार्थ वायां जाऊं देत नाहींत. याविषयीं आज लिहिण्याचें कारण, आजच सकाळीं पत्रांतून वाचलें, कीं, जपानी यंत्रशास्त्रज्ञांचें एक मंडळ हा कारखाना पाहण्यासाठीं मुद्दाम ऐसन् येथें आलें आहे! जपानी लोकांनीं आज पन्नास वर्षांवर चालवलेला राष्ट्रसुधारणेचा प्रयत्न अपूर्व आहे! आपली जुनी संस्कृति केवळ त्याज्य न मानतां, पाश्चात्य संस्कृतींतील चांगल्या व आवश्यक गोष्टींचें निरीक्षण करून आपल्या राष्ट्रांत त्याचें बीजारोपण ते आजपावेतों करीत आहेत. आपली शिक्षणपद्धति सुधारण्यासाठीं, १८९० च्या पूर्वीं वेळोवेळीं आपलीं हुषार माणसें यूरोप व अमेरिका खंडांत निरनिराळ्या वाखाणल्या गेलेल्या पद्धतींचा अभ्यास करण्यासाठीं त्यांनीं पाठविलीं, व त्यांनीं परत जाऊन सुचवलेल्या सुधारणा अमलांत आणल्या. शेवटीं १८९० त जर्मन पद्धतीच उत्तम आहे असें निदर्शनाला येतांच, देशकालपरिस्थितीला अवश्य ते फेरफार करून तिचें अवलंबन करण्यांत आलें. जसें शिक्षणांत तसेंच इतर बाबतींत. आज हें जपानी यांत्रिकमंडळ ‘ क्रुप् ’ चे कारखाने पाहण्यासाठीं आलें आहे ! आपली सुधारणा करण्याच्या या उत्कट इच्छेचें व जीवापाड मेहनतीचेंच हें एक फळ होय. अशा व इतर गोष्टींविषयीं डॉ. इशिबाशि नांवाच्या जपानी गृहस्थाशीं माझें नेहमीं बोलणें होतें, व बऱ्याच गोष्टी कळतात.

यापासून हिंदी तरुणांनीं फार शिकण्यासारखें आहे. आपली संस्कृति जुनी, चांगली आहे हें खरें आहे. पण वाढत्या कालाबरोबर व बदललेल्या परिस्थितीप्रमाणें तिच्यांत जो फरक, जी सुधारणा वेळोवेळीं व्हावयाला पाहिजे ती झालेली नाहीं. आपलें तें सर्वथैव चांगलें, त्यांत आम्ही काळाला अनुसरून कांहींहि फरक करणार नाहीं, असें म्हणून आतां चालायचें नाहीं. आपलें स्वत्व जर राखावयाचें असेल, तर स्वतःची योग्य व अवश्य ती सुधारणा करूं लागलें पाहिजे. लोकांमध्यें चांगलें व या काळीं आपणांला आवश्यक असें दिसेल त्याचा योग्य फेरफारांसह अंगीकार केलाच पाहिजे. तें आपलेंसें करून टाकल्यावर मग परकेपणा व त्याला नेहमीं चिकटून असलेला द्वेष कोठें राहिला? पण हें होण्याला—म्हणजे आपले दोष पाहून ते सुधारणें, इतर ठिकाणीं जें बरें व हितावह असेल तें आपलेंसें करणें या गोष्टींत—तरुण मंडळींनीं आपली कंबर बांधली पाहिजे. पाश्चात्य संस्कृतीच्या दोषांविषयींच्या कर्णपरंपरेनें ऐकलेल्या कल्पना बाजूला ठेवून, दक्षपणानें व निकट सहवासानें तिचें निरीक्षण करायला आपण शिकलें पाहिजे. तिच्यांतले ठळक दोष दाखवून तिचें हंसें करण्यांत येतें, हें मी जाणून आहें. कांहीं दोषांची सत्यताहि मला कबूल आहे. पण या अशा हंसण्याच्या प्रकारांत तींतील कांहीं अनुकरणीय गोष्टींची आपण उपेक्षा करतों, व तसें करणें चांगलें नाहीं, असें मला वाटतें. त्याविषयीं आपल्या तरुणांनां मला हेंच सांगायचें, कीं, पूर्वीचे सर्व दुर्ग्रह व दुराग्रह बाजूला ठेवा; व आपली सुधारणा व्हावी, आपलें हित व्हावें, यासाठीं घरकोंबडेपणा बाजूला ठेवून चांगल्या गोष्टींच्या शोधांत देशपर्यटनाचा अंगीकार ( शक्य असेल त्यांनीं ) करा ! देशाटन केल्यानें नुसतें चातुर्यच येतें असें नाहीं; तर त्यानें आपल्या डोळ्यांत अंजन पडतें; लोक कोठें आहेत, व आपण कोठें आहों, याचा लख्ख प्रकाश हृदयांत पडतो, व आत्मसुधारणेची कळकळ लागते.

पाश्चात्य सुधारणेला शिव्या देतच आपल्या नाकपुडीएवढ्या बेटांत जपानी लोक बसून राहिले असते, तर ते आज कोठें असते ?

**लाइप्झिक्, २९ मार्च, १९१२.**

बरेच दिवस ' चीन व प्रजासत्ताक शासनपद्धति ' हा वर्तमानपत्रांस एक मोठा विषय होऊन बसला होता. पण शेजारच्या घराला आग लागल्यामुळें सगळे आतां जागे होऊन लष्करच्या भाकरी भाजण्याचें तूर्त बंद आहे. जिकडेतिकडे कोळशांचा संप व त्यानें उडविलेल्या हाहाःकाराची चर्चा सुरू आहे. आजमितीला इंग्लंडांत कोळशांच्या खाणींतील दहा लाख व इतर धंद्यांतले पांच लाख इतके मजूर बेकार झाले आहेत ! कोळसा हें सर्व धंद्यांचें जीवन असल्यामुळें, पुष्कळ धंद्यांच्या नाड्या बंद पडत चालल्या आहेत. रोजच्या चरितार्थाच्या जिनसांस इंग्लंडांत आतां दोन महिन्यांपूर्वींपेक्षां तिप्पट किंमत पडते ! ट्रेड् युनिअन्स्‌जवळ पैसा असल्यामुळें त्यांनीं मजुरांनां थोपवून धरलें आहे, व आज तरी हा वाढता ताण केव्हां व कसा निघेल व मध्यंतरीं तो किती अनर्थ करील, याची कोणाला कल्पनाहि करतां येत नाहीं !

भूगोलावरील दक्षिणध्रुव शोधून काढल्याचें तुह्मांला तेथेंहि कळलेंच असेल. त्या ठिकाणीं नॉरवेचें निशाण रोवून कॅ. आमुण्डसेन् हा धाडशी गृहस्थ सध्यां ऑस्ट्रेलियांत परत आला आहे. त्यानें आपल्या प्रवासाचें तारेंतून पाठविलेलें वर्णन मीं वाचलें, तेव्हां मला किती आश्चर्य वाटलें, हें लिहवत नाहीं ! या कॅपटनूला सध्यां चोहींकडून अभिनंदनपर तारा व पत्रें येत आहेत. या शोधाचा भूगोल व खगोल शास्त्रावर कोणता मोठा परिणाम होईल हें पाहणें आहे. हा आमुण्डसेन् पुढें उत्तरध्रुव प्रदेशाकडे मोहिम करणार असल्याचें ऐकितों ! केवढा हा धाडशीपणा !

इंग्लंडचें पाहून येथेंहि वेस्टफालियामध्यें खाणींतील मजुरांचा संप सोमवारपासून सुरू झाला आहे. तीनएक लाख मजूर बेकार आहेत.

पण येथील संप लवकर मोडेल; कारण येथील यूनियन्‌जवळ पैसा नाहीं, कामकऱ्यांत तितकें शहाणपण नाहीं, व वेळ आली तर येथील सरकार आपल्या मामुल वहिवाटीप्रमाणें संपवाल्यांवर शस्त्र चालवील !

ऑक्सफर्ड येथील सर्व विद्यार्थ्यांनीं या संपाच्या दिवसांत आपण खाणींत उतरून शक्त्यनुसार कोळसा पुरविण्याचें काम करण्याचें योजिलें आहे. त्यांच्या प्रयत्नानें अर्थात् कोळसा कितीसा निघणार ? पण देशाच्या सध्यांच्या आपन्नस्थितींत आपणांकडून अंशत: मदत व्हावी या उदात्त इच्छेनें प्रेरित होऊन, कोळशांचें काळें काम करण्यासहि मागेंपुढें पहायचें नाहीं—या कळकळीचें, कर्तव्यपरतेचें, जुटीचें यथार्थ गौरव करण्यास ही दुर्बल लेखणी असमर्थ आहे.

गेल्या शनिवारीं येथील इंग्लिश देवळांत पुढल्या दिवशींच्या ईस्टर्‌सणाची तयारी व देऊळ फुलांपानांनीं शृंगारणें चाललें होतें. त्याचे उपाध्याय मि. नॉडर यांची व माझी 'ब्रह्मी भाषा व देवता' या त्यांच्या कामासंबंधांत गेल्या वर्षीं ओळख होऊन, आह्मी कधींकधीं भेटत असूं. त्यांनीं पहायला व मदतीला बोलावलें ह्मणून गेलों. सव्वाशेंच्या वर फारशी इंग्रजी मंडळी येथें नसल्यामुळें देऊळ बेताचेंच आहे. त्यांतील वेदी, व्यासपीठ व प्रार्थनागीत गाणारांची जागा एवढेंच शृंगारायचें होतें ! तेव्हां कुठें लोकांनीं केलेल्या गुच्छाला गांठ देणें, एखादी चूक ठोकणें, हिरव्या पानांचें तोरण अडकवणें व विशेषत: बाया व्यासपीठाला फुलांनीं सजवीत होत्या त्यांची मांडणी सुबक झाली कीं नाहीं, हें दूर उभें राहून पाहणें—वगैरे किरकोळ मदतीपलीकडे मला कांहीं उद्योग नव्हता. तीनचार तरुण मुली, दोनतीन 'वृद्ध मुली' व दोनतीन बाया मिस्तर नॉडरला मदत करीत होत्या. दोनतीन रंगांचीं नार्सिसस्, डॅफोडिल्, पिंक् वगैरे फुलें व हिरव्या पानांचे तुरे यांचे गुच्छ बांधण्यांत दिसून येणारी त्यांची चतुराई व अभिरुचि वाखाणण्याजोगी होती. एका वृद्ध मुलीच्या मनांत पांढऱ्या फुलांचा एक गुच्छ वेदी-

वर ठेवण्यासाठीं करायचा होता, तीं फुलें एका वृद्ध बाईनें वेदीपुढच्या कठड्याला तोरण बांधण्यांत खर्च केलीं, तेव्हां त्यांचें अर्धें थट्टेचें गुरगुरणें ऐकून मला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं.

दुपारीं दोन रशियन बाया या घरीं जेवायला आल्या होत्या. त्यांचें देऊळ येथें नसल्यामुळें कारफ्राटायग्–येशूच्या पुण्यतिथीचा शुक्रवार– करायला ड्रेसडेन् येथें त्या मुद्दाम गेल्या होत्या. त्याविषयीं व ईस्टरविषयीं त्यांनीं बरीच मजेची हकीकत सांगितली. रशियांत खेड्यापाड्यांतून व शहरांतूनहि पुनरुज्जीवनाच्या रात्रीं ह्मणजे शनिवारीं रात्रीं १२ वाजतां देवळांत माणसें जमायला लागतात. आधीं जमलेलीं माणसें मागाहून येणारांनां, ‘ क्रिस्त मृतांतून उठला आहे–’असें ह्मणतात, त्याला ‘खरेंच कां तो पुनः जिवंत झाला आहे ? ’ असा प्रति सवाल मागाहून येणारे करतात अशा रीतीनें जितकीं माणसें येतील तितक्या गणिक प्रश्नोत्तरें झाल्यावर प्रार्थना व पूजा होते, व सर्वजण आपापल्या घरीं जातात. दुसऱ्या दिवशीं ओस्टर–सोन्टाग् ( ईस्टरचा रविवार )च्या दिवशीं खेड्यापाड्यांतले सर्व लोक, माणमागणिक दोनदोन रंगवलेलीं अंडीं नेऊन उपाध्येबोवांच्या झोळींत टाकतात. अशा रीतीनें भटजीबोवांची चांगलीच तुंबडी भरते ! मुलांबाळांच्या कुटुंबांत, ईस्टरसाठीं मुलांनां देण्याचीं अंडीं व इतर खाऊ घरांत सांदीकोपऱ्यांत व बागेंत लपवून ठेवण्याची चाल आहे. तीं या रविवारच्या दिवशीं शोधून काढण्यांत मुलांची जी धांदल होते ती पुसूंच नये. ही चाल रशियासारखीच येथेंहि आहे. पण तिचें प्राबल्य खेड्यांपाड्यांतून व छोटेखानी शहरांतून फार आहे.

मित्रमंडळी अगर दाट ओळखीचीं माणसें या दिवशीं एकमेकांनां भेटलीं असतां, ग्ल्युक्लिश ओस्टर्न्, उण्ड फील आयर ( सुखकर ईस्टर व खूब अंडीं तुह्मांस मिळोत ! ) अशी सलामी करण्याची गमतीची चाल येथें आहे.

गेल्या रविवारीं ईस्टरची मौज पाहण्यासाठीं प्रथम येथील टॉमास् किर्श नांवाच्या देवळांत गेलों. त्या वेळीं दहा वाजले होते. दरवाज्या-जवळ जातों तों भराभर माणसें बाहेर पडतांना दिसलीं. 'उशीर झाला, सर्व आटोपल्यावर आलें!' असें ह्मणत आंत शिरतों, तों नुकतीच वृद्ध उपाद्धेबुवांच्या प्रवचनाला (प्रेडिग्ट्) सुरुवात झाली होती! प्रार्थना-संगीत ऐकण्यापुरती तेवढी खूब गर्दी जमली होती! तें संपतांच अर्धे-अधिक देऊळ रिकामें झालें. नंतर बायका व मुलें यांनींच बहुतेक भर-लेल्या श्रावक मंडळीला (गेमाइण्ड) पांढरी झालर गळ्याभोंवतीं बांध-लेल्या उपाध्यायानें उपदेश केला.तो बराच लांबलचक व कंटाळवाणा असा मला वाटला. नंतर ज्यांनां बाप्तिस्मा (आबेंडमाल्) पुनः घेण्याची इच्छा होती असे थोडे लोक खेरीजकरून सभा बरखास्त झाली, व मी वेस्ट्स्ट्रासमध्यें एका क्याथोलिक देवळांत गेलों.

येथें उपाध्येबोवांचें भाषण संपत आलें होतें. पण गर्दी कोण झाली होती? बसण्याचें तर राहोच, पण उभें रहाणेंसुद्धां अडचणीचेंच! टॉमसचर्चमधला साधेपणा येथें दिसत नव्हता. कोपऱ्यांनीं येशू, मेरी वगैरेंच्या मूर्ति उभ्या केल्या होत्या. वेदीच्यासमोर चांदीच्या कळसांचीं चारपांच निशाणें उभीं होतीं. यांवर बायबलांतील वाक्यें जरीनें भर-लेलीं होतीं. खुर्च्यांच्या रांगांमधून दरवाज्यापावेतों तांबड्या पायघोळ अंगरख्याचा भालदार हातीं दंड घेऊन फिरत होता. उपाध्येबोवांचें प्रवचन संपल्यावर वेदीवरील देव्हाऱ्यापुढें त्यांचें मंत्र पुटपुटणें, इकडले दिवे तिकडे ठेवणें, मूर्तीला दाखवणें, तीनदां उजवा गुडघा टेंकून सिंहासनापुढें मान वांकवून डोकें ठेवणें वगैरे कवाईत चालली होती. मधूनच वरून कुठून तरी घंटीचा आवाज ऐकूं आला ह्मणजे श्रावक-समुदाय बांकावरून घसरून, पुढील फळीवर गुडघे टेकी, व मोठ्यानें पुटपुटे. इत्यादि विधि पंधरावीस मिनिटें चालला होता. येथील उपाध्ये-बोवांचा पोषाक पांढरा होता. वरून गळ्यांतून चढवायची रेशमी

कफनी त्यांच्या आंगावर होती; तीवरील जरीची नक्षी दुरून मला जपानी अक्षरांच्या रांगेसारखी दिसे !

सर्व संपून उपाध्येबोवा वेदीवरील डावे हाताच्या खोलींत गेले; मंडळी हळूहळू गुडघे टेंकून, छातीवर ' क्रॉस ' करून जाऊं लागली. मी पुढें होऊन वेदीच्या पायऱ्यांजवळ गेलों. माझ्या उजव्या हाताला येशूच्या मूर्तिसमोर एक गरीब वृद्ध बाई हातांत बायबल व पांढऱ्या मण्यांची माळ घेऊन जमिनीवर गुडघे टेंकून बसून जप करीत होती. दुसऱ्या बाजूला मेरीच्या तसबिरीसमोर पायऱ्यांवर एका बाईनें गुघडे टेंकले होते. मधुनमधून पुरुष, बायका व मुलें पुढें येऊन गुडघा वांकवून परत जात. एक तरुण सुंदर व नॉयमोडिश ( इंग्रजींत–अपटुडेट ) निरुंद असा झगा घातलेली मुलगी पुढें येऊन, जपून गुडघे टेकून, सावधगिरीनें उठून, 'झगा कोठें खराब तर झाला नाहींना ?' असें दर्शविणाऱ्या मुद्रेनें मागेंपुढें वळून पाहत पाहत गेली ! तेव्हां मला मौज वाटली.

वेदीवरील उजव्या हाताच्या खोलींत क्वचित् एकाददुसरा माणूस जात असे, व आपलें पाप उपाध्येबोवांच्या कानांत ओकून, 'आतां आपण खरेच मोकळे झालों,' या आनंदांत परत येई. या खोलीला बाइश्ट स्तिमर, ( इंग्रजी–रूम् ऑफ कन्फेशन् ) ह्मणतात.

धर्मश्रद्धेच्या कामांत क्याथोलिक लोक सुधारकांपेक्षां कांकणभर ज्यास्त आहेत, अशी माझी समजूत आतां अगदीं ठाम झाली आहे.

*मी प्रथम ज्या ठिकाणीं उभा होतों, तेथें लोखंडी गजांवर लहानशी पाटी असून ' खिशेकापूंनां जपा ! ' असें तिजवर लिहिलें होतें. प्रथम* मला आश्चर्य वाटलें; पण चोराला देऊळ काय अगर रस्ता काय सारखेंच, असें लक्ष्यांत आलें. येथील इंग्लिश देवळांतील बाप्तिस्मा घेण्याचा चांदीचा पेला ( ज्यांतून पवित्र द्राक्षासव पितात तो ) चोरीला गेला असल्याचेंहि स्मरण झालें !

इतकें होतें तों साडेबारा वाजले व घरीं जेवणासाठीं परतलों. जेव-
ांना पुन: अशाच गप्पा झाल्या. जेवायला येणाऱ्या कांहीं पाहुण्यांनीं
स्टरसाठीं ह्मणून मायब्लूमेन्, नार्सिसेन्, नेल्केन् वगैरे फुलें घर-
ाल्या बाईला नजर केलीं. असो.

१६ एप्रिल, १९१२.

इकडे हवा ग्रहणानंतर चांगली झाली आहे. आतां मात्र हिंवाळा
ासखास गेला. जातांना त्यानें किंचित् प्रसाद दिला होता, पण आतां
र्व ठीक आहे.

माझा अभ्यास, जाणेंयेणें यासंबंधानें पुढें लिहीन ह्मणून ह्मटलें
ोतें. त्या वेळीं त्याच विषयावर माझी व प्रोफेसरांची भवति न भवति
ोऊन अपुरेंच सोडून जायचें नाहीं असें ठरलें; त्याप्रमाणें सेक्रेटरीला
लेहिलें, व गेल्याच आठवड्यांत एक वर्षाची अधिक सवड मिळाल्याचें
लेहून आलें. अर्थात्च आतां परत येणें पुढल्या वर्षावर गेलें! हें बरें
व वाईट दोन्हीहि झालें, नव्हे?

या खेपेला लिहिण्यासारखें कांहीं नाहीं. टिटानिक् गलबत आटलां-
टेक महासागरांत बर्फाच्या पर्वताशीं टक्कर खाऊन बुडाल्याचें तुह्मीहि
ऐकिलें असेलच. तोच विषय सध्यां येथें आबालवृद्धांच्या तोंडीं झाला
आहे. त्या अनर्थावर जो तो आपापल्यापरीनें बरेंवाईट ह्मणूं पाहत
आहे. जर्मन वर्तमानपत्रें इंग्लिश बोर्ड ऑफ् ट्रेड्ला नांवें ठेवीत आहेत,
कीं, त्यांनीं उतारूंच्या संरक्षणापुरत्या होड्या गलबतावर असाव्या असा
चोख निर्बंध केला नाहीं! कोणी व्हाइट्स्टार कंपनीला नांवें ठेवतात,
कीं, जर्मन बोटींच्या वेगावर ताण करण्याची त्यांनीं कॅप्टन्ला आज्ञा
देल्यामुळें हा अनर्थ ओढवला! कोणी कप्तान्ला शिव्या देतात.
बर्फाचा डोंगर आसपास असलेला पाण्याच्या व हवेच्या थंडोष्णते-
वरून त्याला समजायला हवें होतें, असें त्यांचें ह्मणणें। तें कांहींहि
असो. २३०० माणसांपैकीं ७०० च जिवंत राहिलीं, हा महाअनर्थ

होय हें मात्र खरें. त्या वांचलेल्यांचीं नांवें वाचूं लागलों, तेव्हां आश्चर्य वाटलें. त्यांत बहुतेक स्त्रिया व मुलें आहेत ! होड्या वल्हवण्यापुरते नावाडी व उरलेल्या जागेंत जुजबी पुरुष आहेत. पांचसात कोट्यधीश जहाजावर होते; पण ते कोठें बोटींत सांपडले नाहींत ! यावरून स्वतःला मृत्यूच्या जबड्यांत देऊन, दुर्बलांना सुरक्षित ठेवण्याची काळजी जहाजावरील पुरुष मंडळींनीं घेतली, हें उघडउघड आहे, व याबद्दल त्यांचे जेवढे धन्यवाद गावे तेवढे थोडे आहेत ! यूरोपीयांचें हें धैर्य, हा दिलदारपणा व दुर्बळांचें संरक्षण आधीं करणें हाच धर्म ही दृढभावना हीं आपण शिकायला हवीं आहेत.

या अनर्थात उघड्या पडलेल्या कुटुंबांच्या मदतीसाठीं लंडनच्या मेयर वगैरेंनीं लगेच फंड सुरू केल्याचें आजच वाचलें.

१९ एप्रिल, १९१२.

कालच लेक्चरें सुरू झालीं. पण अजून मी इन्स्टिट्यूटमध्यें वाचायला जाऊं लागलों नाहीं. कालपासून लायब्ररींत मात्र जाऊं लागलों आहें. जर्मनशिक्षणासंबंधीं आंकडेशास्त्राचा जरा व्यासंग लागला आहे. आंकडे कोरडे शुष्क वगैरे सर्व खरें; पण त्यांनीं जेव्हां कांहीं गोष्टींसंबंधानें डोक्यांत चक्क उजेड पडतो, तेव्हां त्यांचें महत्त्व वाटतें. उदाहरणार्थ, प्राशियांतील शाळांची संख्या जवळजवळ ३९१०० आहे असें वाचून प्रमाण काढलें, तेव्हां १००० माणसांप्रत एक शाळा, अथवा १० चौरस किलोमेटर ( १ $\frac{३}{५}$ किलो० = १ मैल ) क्षेत्राला एक शाळा पडते, असें दिसून येऊन आश्चर्य वाटलें. असो.

परवांच्या दिवशीं सकाळीं येथील शाळाइन्स्पेक्टरची परवानगी घेऊन हिल्फ्स् शूल ( मदतशाळा ) पहायला गेलों. रोगट व शारीरानें कृश–हलक्या मेंदूचीं, अशा मुलांसाठीं ही शाळा आहे. फोल्क्स् शूलमध्यें एकदोन वर्षें काढूनहि शारीरिक व मानसिक दुबळेपणामुळें

जीं मुलें वर्गाबरोबर चालण्याला असमर्थ असतात, त्यांना या शाळेंत पाठवतात. येथें तीं साधारणपणें सहा वर्षें राहून चवदाव्या वर्षी मोकळीं होतात. मेंदूमध्यें ग्रहणशक्ति कमी असल्यामुळें, हात, डोळे व कान या बाह्येन्द्रियांच्या सतत उपयोगानें मेंदूमध्यें जागृति उत्पन्न करण्याची खटपट या शाळेमध्यें मुख्यतः होते, व पुष्कळ अंशीं ती सफल होते. अशा तऱ्हेनें सर्व स्नायूंच्या द्वारा मेंदूमध्यें चेतना उत्पन्न करण्याचे प्रयत्न अगदींच जेथें चालत नाहींत, अशीं मुलें नाइलाजास्तव परत घरीं पाठविलीं जातात.

या शाळेंत सध्यां अशीं अभागी मुलें ४९० आहेत. आईबापांचें दारिद्र्य, दुर्वर्तन व दारूबाजी इत्यादिकांचें फळ भोगण्याचें यांपैकीं बहुतेकांच्या कपाळीं आलें आहे, असें डिरेक्टरच्या बोलण्यांत आलें. मुलींपेक्षां मुलांचें प्रमाण जास्त आहे. मेंदूला आपलें काम करायला लावण्याच्या प्रयत्नांबरोबर शरीराची काळजीहि घेतली जाते. उदाहरणार्थ, फारच अशक्त–रक्तहीन अशा ७०।८० मुलांना दूध पिण्याला मिळतें. जवळजवळ १०० मुलें तेथेंच जेवतात, व त्याबद्दल रोजीं दहा फ्रेनी (एक आणा) काय तीं ५९ मुलेंच देतात. आठवड्यांतून एकदां सर्वांनां आंघोळ घालण्याचीहि सोय आहे. महिन्यांतून चारपांच वेळां कोणातरी मास्तराबरोबर पंधरापासून वीस जणांच्या टोळ्या शहराबाहेर मोकळ्या हवेंत खेड्यापाड्यांनीं फिरायला जातात. दरक्लासांत पंधरा–फार तर अठराच्या वर मुलें असत नाहींत.

एका वर्गांत पांचपर्यंत आंकडे मोजायला एक मास्तर शिकवीत होता. तेथें व दुसऱ्यांत अक्षर–ओळख चालली होती तेथें थोडाथोडा वेळ होतों. दहांच्यानंतर फराळाच्या मोठ्या सुटींत सर्व मुलें आंगणांत फिरत होतीं, त्यांत फिरून पाहिलें. 'इकडे ये' असें तीनतीनदां मास्तरनें ओरडून हातांनीं खुणा करून दाखविल्याशिवाय तो काय ह्मणतो हें न समजण्याइतका वेडगळपणा पुष्कळांत आहे, असें मीं

त्या सुटींत पाहिले. त्यांची कींव तर आलीच; पण त्यांच्यासाठीं म्युनिसिपालिटी किती खटपट व पैसा खर्च करते असें वाटून आश्चर्य वाटलें. असो. या वेड्यांच्या बाजारांत तुह्मांला जास्त ओढूं इच्छित नाहीं. मी प्रत्यक्ष त्यांत जाऊन आलों हें बस्स आहे!

प्रशिया, बर्लिन् शहर वगैरे ठिकाणच्या यांच्या संख्येबद्दल मी 'फर्ग्युसोनियन्'मध्यें आपल्या इंग्रजी पत्रांत लिहिलेलें वाचण्यांत आलें असेलच.

गेल्या आठवड्यांत आमच्या आळींत एक मोठें लग्न झालें. नवरा मुलगा घरंदाज पण दरिद्री, व नवरी सामान्य कुळांतली पण श्रीमंत. तिला ग्रेफिन् (सरदाराची बायको) ह्मणवून घ्यायला हवें होतें, व मोडक्या जहागीरदाराला पैसा हवा होता. तेव्हां दोघांचें टिपण उत्तम जुळलें हें सांगणें नकोच! व ह्मणूनच हे आठ दिवस आमचे येथें यावर चर्चा चालली होती. मी लग्नविधि पहायला देवळांत गेलों होतों. इंग्रजी विधिसारखाच यांचाहि विधि असतो; पण यांच्यांत कन्यादान—अथवा वधूदान ह्मणणें जास्त बरें—करायला कोणी भाऊ अगर बाप इंग्रजांप्रमाणें जवळ लागत नाहीं. वधू आपल्या हाताचें दान स्वतःच करते!

बारा वाजतां वधू आपल्या बापाच्या घरांतून निघतांना आह्मीं पाहिली. तिचा सर्व पोषाक पांढरा शुभ्र होता. बूट देखील पांढऱ्या रेशमाचे होते. डोक्यावर मर्टल वेलीची कौमार्यदर्शक माळ असून, तिच्यावरून पाठीवर झिरझिरित पांढरा रेशमी बुरखा लोंबत होता. जिन्याच्या पायऱ्यांवर गालिचे अंथरले असून, त्यांवरून वधू उतरत असतां पुढें दासी फुलें व पानें फेंकीत होत्या. खालीं दाराशीं काळें सामान घातलेल्या काळ्या कुळकुळीत घोड्यांची काळी गाडी होती. ती वरानें आणिली होती. त्याचा पोषाक सैन्यांतील लेफ्टेनंटचा असल्यामुळें कमरेला तलवार लटकत होती व हातांत कडकडित मिलिटरी हातमोजे होते. वधू गाडीजवळ येतांच वरानें तिला हात देऊन आंत

बसविलें व तो चढल्यावर गाडी देवळाकडे गेली. वधूनें व वरानें आपापल्या ठिकाणांहून परस्परच देवळाकडे जाऊन तेथें भेटावें अशी चाल कोठेंकोठें आहे. देवळाजवळ वधूवरांच्या घरची व आप्तमंडळी उत्तमोत्तम पोषाक करून जमली होतीच. देवळाच्या दरवाज्यांत सर्व-जण व्यवस्थितपणें जुळून जोडीजोडीनें थाटांत आंत गेलीं. सर्वांच्या पुढें पांढराशुभ्र पोषाक केलेलीं लहान मुलें—या मिरवणुकींत अशीं सहा मुलें होतीं—नंतर एकमेकांच्या हातांत हात घालून वधूवर, नंतर एकापेक्षां एक वरचढ पोषाक केलेल्या वधूच्या सहा करवल्या वराच्या टोकण्याबरोबर हातांत हात घालून चाललेल्या, नंतर इतर मंडळी अशी ही मिरवणूक उपाध्येबोवांनीं वेदीपर्यंत नेली. तेथें बायबलावर हात ठेवून दोघांनीं एक-मेकांशीं प्रामाणिकपणें वागण्याच्या शपथा घेतल्या. उपाध्येबोवांचा शुष्क उपदेश नंतर १५ मिनिटें वधूवरांनां पाजला गेला. मध्येंच ऑरगेलचें गाणें होत होतें. नंतर सर्व मंडळी उठली, व पुनः प्रथमप्रमाणेंच जोडीजोडीनें गालीच्यावरून देवळाच्या बाहेर आलीं. यानंतर तीन वाजतां वधूच्या घरीं भोजनाचा समारंभ झाला. हा कोणीकोणी हॉटेलांत करतात. 'वेडिंगकेक' वधूच्या हातानें कापण्याचा समारंभच कायतो या वेळीं मुख्य असतो. ही केक वधूच्या घरच्या श्रीमंतीला अनुरूप मोठ्या आकाराची व मजलेदार असते. हे मजले वधू कापीतोंवर जसेच्या तसे चांगले रहावे याविषयीं फार काळजी घेतली जाते. यासंबंधीं परवां नुकतीच एका मजेदार खट-ल्याची हकीगत 'डेलीमेल'मध्यें आली होती. ही केक सैंपाकघरांतून आणून टेबलावर ठेवतांठेवतां फुटली. त्याबरोबर अपशकून झालासें वाटून वधूनें तोंड गोरेंमोरें केलें व वधूच्या आईला हुंदके आवरेनात! तिनें केक करणाऱ्या भटाऱ्यावर फिर्याद केली, व बरेंचसें नुकसान भरून मागितलें. त्यांत आह्मांला फार वाईट वाटून आह्मीं किती अश्रू गाळले तें जजसाहेबांनीं लक्ष्यांत घ्यावें असें शेवटीं वधूच्या आईनें कोर्टांत सांगितलें.

जज्ज विनोदी होते. त्यांनीं केक फुटल्याबद्दल अमुक रकम द्यावी असें ठर-विलें, व 'तुमच्या अश्रूंची किंमत मला ठरवतां येत नाहीं याबद्दल दिल-गिरी वाटते,' असें ह्मणून निकाल दिला. असो. वधूवर जेवण कसेंबसें उर-कून हातीं लागेल त्या गाडीनें 'हनीमून्'साठीं कोठें तरी दूर ठिकाणीं निघून जातात. पाहुणे मंडळी मात्र अन्नावर यथेच्छ ताव मारून व अगणित बाटल्यांचा फन्ना उडवून, नंतर नाचाला आरंभ करतात. तो किती तरी वेळ चालतो. वधूच्या आईबापांनां या वेळीं कसें वाटत असेल याची त्यांनां परवाहि नसते.

लग्नाच्या आधल्या संध्याकाळीं कुठेंकुठें 'पोल्टर् आबेंड्' नांवाचा विधि असतो. या वेळीं घरांतील जुनें चिनीमातीचें सामान बाहेर काढ-लेलें असतें. तें घेऊन पाहुणेमंडळी घराच्या दारावर आपटून फोडतात! काय ही रूढी !

२९ एप्रिल, १९१२.

हवा चांगली असल्याचें मागल्या पत्रांत लिहिलेंच आहे. मधून-मधून ढग येतात, थोडा वारा येऊन पाऊसहि पडतो, पण एकंदरींत दिवस बरे असतात. त्यामुळें वल्हवणें, टेनिस, फूटबॉल, हॉकी आदि मोकळ्या खेळांनां सुरुवात झाली आहे. स्वतः टेनिसला आरंभ केल्याचें मागें लिहिलेंच आहे.

येथील लोकांचें या मोकळ्या खेळांकडे अगदीं अलीकडे लक्ष्य लागूं लागलें आहे. त्यापूर्वीं त्यांचें विशेष लक्ष्य फक्त तालीमखान्यासारख्या कोंडलेल्या जागीं करण्याच्या एकेरी व्यायामाकडेच असे. प्राथमिक व दुय्यमप्रतीच्या शाळांतून असा व्यायाम पूर्वींपासून आवश्यक आहे. याला टुर्नेन् ह्मणतात, व त्याला आठवड्यांतून प्रत्येक वर्गांत दोन तास दिले जातात. युनिव्हर्सिटीचे व इतर विद्यार्थी यांसाठीं, व इतर माणसांसाठीं अशा व्यायामाच्या मंडळ्या स्थापन केलेल्या असतात, व

त्यांनां टुर्न्‌फरायन् ह्मणतात. या प्रत्येकीचा एक तालिमखाना असतो. त्यांत जोर, बैठका, जोड्या, डंबेल्स, पहार, सर्व तऱ्हेच्या (पारालल, डबल, सिंगल) बार्स्, घोडा, धांवत येऊन टेबलावरून कोलांटी उडी मारणें, फळीवरून हुशी घेऊन लांब उडी मारणें इत्यादि अनेक तऱ्हेच्या कसरती खेळांची व्यवस्था असते. येथें लाइप्झिक्‌ला अशा किती तरी 'टुर्न्‌फरायन्' आहेत; व त्यांचे तालिमखाने शहराच्या निरनिराळ्या भागांत आहेत.

येथून जवळच डोरोथीएन् रस्त्यावर युनिव्हर्सिटीच्या आश्रयानें काढलेला तालिमखाना आहे; तो पहायला गेल्या वर्षी फेब्रुवारीच्या १९ तारखेला माझ्या ल्याटिनमास्तरबरोबर गेलों होतों. तेव्हांचे त्यावरील त्रोटक विचार येथें देतों:—' सहा वाजतां लवकर जेऊन स्पेश्ट्‌बरोबर डोरोथीएन्‌स्ट्रास या ठिकाणीं कसरतीचे खेळ पाहिले. सिंगल बार (अथवा पहार)चे खेळ साधारण झाले; आपणाकडे याच्यापेक्षां चांगले सुद्धां करतात; पण पारालल बारचे, घोड्याचे (लांकडी) खेळ चांगले झाले. दीडतास वेळ मजेंत गेला. नवल हें, कीं, तालिममास्तर युनिव्हर्सिटीचा डी. पीएच्. आहे!'

प्रत्येक शिक्षकाला पांचसहा महिने टुर्न–लेरर्–कुर्सुस् घ्यावा लागतो. यासाठीं ड्रेस्डेन् येथें एक मोठी सरकारी शाळा आहे. बर्लिनजवळ 'स्पांडाऊ' या ठिकाणींहि एक आहे; त्याशिवाय आणखी पुष्कळ आहेत.

पण 'स्पोर्टक्लुब'–मोकळ्या खेळांसाठीं मंडळें–हीं इकडे नवी टूम आहे. मोकळ्या हवेवर खेळल्यानें वजनांत जरी पुष्कळशी भर पडली नाहीं, तरी ताकद, चपलता, चतुराई हीं येतात; पण दुसरा फायदा ह्मणजे वारापाण्याला फारसा न जुमानणारा काटकपणा व विशेषतः मनाला मिळणारें शिक्षण हा होय. अकरा, पंधरा (अगर आणखी अशी संख्या) माणसांनीं जुटीनें खेळणें, कांहीं ठराविक नियम करून ते पाळणें, आपणच आपणांपैकीं एकजणाला मोहोरपी ह्मणून नि

डल्यावर त्यावर विश्वास, आपल्यासारख्याच दुसऱ्या मंडळाशीं सलोख्याची स्पर्धा, जयापजय माणुसकीनें सोसणें व विशेषतः एक प्रकारची शिस्त, कीं, जीवांचून कोणताहि व्यवहार सुरळीत चालत नाहीं, इत्यादि इष्ट असे संस्कार या मोकळ्या खेळांचें परिमित सेवन केल्यानें मनावर होतात, ही गोष्ट आतां या लोकांच्या मनांवर पुरतेपणीं ठसली आहे. ह्मणून ते टेनिस, फूटबॉल, हाकी इत्यादि खेळांनां उत्तेजन देत आहेत. या कामीं इंग्लंडची बरोबरी करणें हें यांचें सध्यां ध्येय होऊन बसलें आहे. यामुळें एकादा इंग्लिशमन भेटल्यास तरुण खेळाडू मंडळी खेळाच्या विषयावर त्याचा सल्ला घेऊं पाहतात; मग तो खरोखरी 'स्पोर्ट्समन्' असो अगर नसो! याच घरीं कांहीं दिवस मि. लव्हडे ह्मणून केंब्रिजचा गृहस्थ राहत असे; त्याला हॉकी चांगलें खेळतां येतें, असें समजतांच त्याला मेंबर करण्यांत आलें, व त्याला चांगलाच मान देऊं लागले. प्रत्येक सामन्यांत तो असायचाच! व त्याला न्यायला 'औटो' ह्मणजे मोटर घेऊन कधींकधीं खेळे या घरीं येत असत! थोडक्यांत सांगायचें ह्मणजे सर्व जर्मनीभर या मोकळ्या खेळांविषयीं आदर उत्पन्न झाला असून, तिकडे तरुण मंडळीचें बरेंच लक्ष्य लागत आहे. क्रिकेट मात्र अजून कोठेंच माझ्या पाहण्यांत आलें नाहीं! फूटबॉलच फार! हॉकी, टेनिसहि पुष्कळ खेळतात; असो. 'जिकडे जावें तसें व्हावें' या ह्मणीप्रमाणें मीहि टेनिसच्या नादीं बराच लागलों आहें.

१० मे, १९१२.

अधुनमधून एकाद दिवशीं पाऊस पडतो, तो वगळला ह्मणजे हवा सध्यां फारच नामी आहे. रविवारीं सकाळीं दोनतीन तास वनांतून भटकतांना जो आनंद होतो, तो विचारूंच नये! सर्व झाडें पालवीनें डबरलेलीं, कांहींनां तुरळक मोहोरहि आलेला असल्यामुळें सर्व वनभर दरवळणाऱ्या मंद सुगंधानें अतिशय आल्हाद होतो. लहानमोठ्या

पक्ष्यांच्या ( यांपैकीं बहुतेक आपल्याकडे नाहींत–उत्तरहिंदुस्तानाच्याहि उत्तरेस असतील ! ) मंजुळ आवाजानें कानांची तृप्ति होते, व या एका मोठ्या सहलीनें सहा दिवसांच्या वाचनानें तापलेलें डोकें शांत व पुढील श्रमांसाठीं ताजेंतवानें होतें. रविवारचें रानावनांतून भटकणें या दिवसांत तरी मी कधींहि चुकवीत नाहीं.

सेमेस्टर केव्हांच सुरू होऊन सध्यां युनिव्हर्सिटीचें काम जोरांत चाललें आहे. मी आपल्या या सहामाहीच्या अभ्यासाचें या पूर्वींच लिहिलें आहे असें मला वाटतें. त्याशिवाय नवें सांगायचें ह्मणजे मी प्रो. फोल्केल्ट् यांच्या यूबुंग्‌ला जात असतों हें होय. या यूबुंग्ज् काय असतात, याची कल्पना तुह्मांला आहेच. या यूबुंग् अगर सेमिनारचा विषय ' गॉटे कवीचें संसार–दर्शन ' ( लेबेन्स् आन्‌शाऊंग्–जीवन-विचार ) हा आहे. त्याच्या प्रासंगिक छोट्याछोट्या कविता पाळीप्रमाणें एकेकजण टीकेसाठीं घेऊन त्यांवर आपला निबंध वाचतो. नंतर त्यावर प्रोफेसर व विद्यार्थी यांमध्यें प्रश्नोत्तररूपाचा वादविवाद होतो, व त्याचा निष्कर्ष ह्मणून काय ठरलें तें आपल्या मतांसह प्रोफेसर शेवटीं सांगतात. यांच्या या यूबुंग्‌ला बरेच ह्मणजे जवळजवळ ६० विद्यार्थी आहेत. तत्त्वज्ञान व मानसशास्त्र या दृष्टीनेंच मुख्यत: विचार येथें व्हायचा असला, तरी गॉटेची प्रतिभाशक्ति, त्याच्या काव्यांतील प्रसादादि गुण, शब्द व अर्थ यांच्या अप्रतिम जुळणीची हातोटी इत्यादींचाहि विचार चांगला होतो. आतांपर्यंत दोनच यूबुंग्ज् झाल्या; पण तेवढ्यांतच गॉटेची ओळख विशेष होऊं लागली, असें मला वाटूं लागलें आहे. त्याचें ' वसंताचें गाणें,' 'फुलांचे कौतुक,' 'प्रतिभेच्या उमाळयाचे उद्गार ' ' वादळाचें गाणें ' इत्यादि लहान वीणाकाव्यें (Lyrical) कोणाच्याहि हृदयाला उचंबळून सोडण्यासारखीं आहेत ! असो.

दुसऱ्या ज्या यूबुंग्‌ला जात असतों, ती माझ्या विषयाचीच दर गुरुवारीं संध्याकाळीं ७ ते ९ पर्यंत होत असते; इला आह्मी फक्त बाराच

जण आहों. सध्यां जुन्या ग्रीक शिलालेखांवरून ग्रीक शब्दांचीं रूपें, त्यांचे अर्थ, वाक्यरचना वगैरेंचा ल्याटिन-संस्कृतांशीं तुलनात्मक विचार होत असतो. प्रो. ब्रुगमानच्या या यूबुंग्ज् अतिशय मनोरंजक व बोधप्रद असतात, यांत शंका नाहीं; पण वस्तुतःच वरील व या यूबुंग्ज्मध्यें जमीन-अस्मानाचा फरक आहे. वरच्यांत कवीच्या अंतरंगांत प्रवेश करायचा असतो, व प्रेमानें, गोडीगुलाबीनें त्याचें हृद्गत काढून घ्यायचें असतें; तर यांत त्यानें लिहिलेल्याचे तुकडे तुकडे करून त्यांतील प्रत्येक अवयवाची चिकित्सा करीत बसायचें असतें. उत्तम तऱ्हेच्या फुलबागेंत स्वैरसंचार करून तींतील फुलझाडांचें, लतांचें कौतुक करीत, फुलांचा सुवास घेतघेत, त्यांच्या रंगारूपाचें अवलोकन करीत फिरणें, व एकादें फूल घेऊन त्याच्या पाकळ्या काढून, तोडूनतोडून त्याची ऑरडर ठरवीत बसणें-यासारखाच जवळजवळ वरील दोन्ही यूबुंग्ज्चा प्रकार आहे. दोहोंचाहि तितकाच उपयोग आहे. बोधप्रदपणा दोहींकडे सारखाच येईल; पण हृदयंगमपणा पहिलीच्याच वांट्याला जाईल, यांत शंका नाहीं.

चिनांतील राज्यक्रान्तीविषयीं तुह्माला काय वाटतें, असें मीं विचारलें. त्यासंबंधीं 'जगांत काय चाललें आहे, त्याचें मला काय करायचें आहे?' हा तुमचा विचार अगदीं साहजिक आहे; मलाहि पूर्वीं असेंच वाटत असे. पण या जगांत आपणांला रहायचें आहे. त्याचा जोंवर संबंध तुटलेला नाहीं, तोंवर त्यांतील व्यापारांकडे, उलाढालींकडे आपण डोळे मिटून चालायचें नाहीं; निदान या युगांत तरी खासच नाहीं! आपणांला ज्याअर्थीं परमेश्वरानें अस्तित्व दिलें आहे, त्याअर्थीं तें आपण प्रस्थापित करणें भाग आहे. यासाठींच इतरांनीं तें कसें स्थापित केलें आहे, कांहीं करण्याचा प्रयत्न करीत आहेत, हें पाहणें अत्यंत हितावह-नव्हे अवश्य आहे. पूर्वीं आपण या गोष्टीकडे दुर्लक्ष्य केलें---त्याला कारणें असतील-त्यामुळें आज आपण किती मागें आहोंत! इतःपर तरी

असें दुर्लक्ष करून चालणार नाहीं. आपणांला जर आपली उन्नति करून घेणें आहे, तर इतरांनीं आपली उन्नति कशी करून घेतली, याची आपण नीट चौकशी केली पाहिजे; त्यांचे मार्ग, त्यांच्या चुका यांचें नीट निरीक्षण केलें पाहिजे. एकूण जगांत काय चाललें आहे, याशीं आपणांला खरोखरीच पुष्कळ करायचें आहे. असो.

रा. ××× गेल्या रविवारीं हायडल्बर्ग येथें सुखरूप पोंचले. त्यांचें कालच पत्र आलें आहे. स्थिरस्थावर झाल्यावर भेटीला येणार असल्याचें लेहितात. ते आले ही चांगली गोष्ट आहे. असेंच आणखी कितीतरी होतकरू तरुणांनीं जगाच्या या भागाकडे—डोळे उघडून पाहण्यासाठीं, चुका टाकून योग्य तें उचलण्यासाठीं—आलें पाहिजे. मात्र ' बार ' उटकावण्याचा नाद आतां जितका कमी होईल तितकें चांगलें. आजवर या बाजूची फारच भरती झाली. त्यानें फायदे झाले असतील—नाहीं असें नाहीं—पण तोटेहि बरेच झाले. ' ज्यूरिस्ट—इंग्लंड रिटर्न्ड ' असें ह्मणवून घेण्यांत प्रौढी मिरवण्यापलीकडे त्यांतील पुष्कळांनीं कांहींच येथून नेलें नाहीं, व तेथेंहि केलें नाहीं.

अमेरिकेंत एका गृहस्थानें पांचचार हिंदी विद्यार्थी शिकावे एतदर्थ-साठीं स्कालर्शिपा ठेवल्याचें केसरी-अगर ज्ञानप्रकाशांत वाचल्याचें आठवतें. त्याचा फायदा कितीजण घेतात पाहणें आहे !

१७ मे, १९१२.

हवा चांगली आहे; पण मधुनमधून पाऊस पडला ह्मणजे त्यानंतर जरा थंड होते; तशी आज थंड आहे.

गेल्या सोमवारीं रा ××× हायडल्बर्गहून मला भेटण्यासाठीं आले, ते बुधवारीं रात्रीं परत गेले. त्यांची भेट झाल्यानें बरें वाटलें. त्यांच्याशीं पुण्याच्या गप्पा मारायला सांपडल्या. माहेरचें माणूस भेटल्यासारखें झालें. तरतरीत व सरळ आहेत. कांहीं तरी करून दाखवितील, यांत

शंका नाहीं. त्यांच्यासारख्या इतर होतकरू तरुणांनीं–अर्थात् शक्य असेल तर–इकडे येऊन विशेषत: आधुनिक शास्त्रांचें प्रयोगसिद्ध ज्ञान संपादावें, व परत हिंदुस्तानांत त्याचा योग्य उपयोग करून शास्त्रीय, औद्योगिक व व्यापारी बाबतींत देशाला वर आणण्याचे प्रयत्न करावे, असें मला मनापासून वाटतें. या बाबतींत आपले खंडबंधु जे जपानी लोक त्यांचें अनुकरण आपण करायला हवें.

काल हिमेल्–फार्टस् टॉग्–क्रिस्ताच्या स्वर्गारोहण दिवसाची सुटी होती, ह्मणून सगळें शहर बाहेर फिरण्यासाठीं वनांत व भोंवतालच्या खेड्यांपाड्यांतून लोटलें होतें. आठवड्यांतून मजा मारायला एक दिवस जास्ती मिळाला; मग काय पहावें ? शहरांतील तोच तो नित्यक्रम, वेळाशीं व कामाशीं अगदीं बांधलेपणा, यामुळें माणसें अगदीं कंटाळून जातात व अशी सुटी मिळाली ह्मणजे त्या सगळ्याचें उट्टें काढायचा प्रयत्न करीत असतात. सध्यां इकडे वसंत असल्यामुळें वनांत फिरण्याचीहि बहार आहे, व तिचा अनुभव असल्या दिवशीं हे लोक हटकून घेतात. शहरांतील कुंद, अस्वच्छ हवेंत पांचसहा दिवस सारखे काढायचे असल्यामुळें, खुल्या, ताज्या हवेचें महत्त्व यांनां पूर्णपणें कळून चुकलें आहे. अगदीं पाळण्यांतल्या मुलापासून तों केंस पिकलेल्या ह्मातार्‍यापर्यंत सर्वजण बाहेर पडतात. ट्रॅममधून कोठें जाईन ह्मटलें तर उभें राहण्यापुरतीसुद्धां जागा मिळण्याची मारामार ! व ट्रॅममधून जायचें तरी कुठें ? वनांत ? तेथें तर माणसें सुटीच्या दिवशीं मुंग्यांसारखीं अगणित असतात.

ह्मणून फिरायला जायचें रहित करून, एक मास्तरीण व तिला भेटायला आलेली तिची सुखवस्तु ( जमीनदाराची मुलगी ) मैत्रीण यांबरोबर टेनिस् खेळायला गेलों. नुकताच पाऊस पडून गेल्यामुळें खेळाचे चौक भिजले होते, पण इंग्लंडप्रमाणें ते गवताचे नसून वाळूसराचे असल्यामुळें पाणी बरेंचसें जिरून वरचें तेव्हांच सुकून

गेलें, व आह्मांला खेळतां आलें. मास्तरीण चांगली खेळणारी नसल्या-मुळें खेळ बेताबाताचाच झाला. सातनंतर खेळ संपवून परत निघालों, तों मास्तरिणीनें माझी वाहवा करायला सुरुवात केली. मला अर्थात् वाण परत देणें भाग पडलें, व स्त्रियांनां द्यायचें तें—ह्मणून सव्याज देऊं लागलों. 'मैत्रिणीला फार दिवस संवय नाहीं ह्मणून तिचा खेळ नेहमींसारखा झाला नाहीं, वगैरे ह्मटलें,' तोंवर ठीक चाललें होतें; पण मास्तरिणीला 'तुह्मींहि फारसे खेळलां नाहीं' ह्मणून ह्मणायला जातों, तों बाजू अंगावर आली! कारण, यंदां नुकतीच ती मजबरोबर बरेच दिवस खेळली होती. त्याचा तिनें उल्लेख केल्यावर तिघेंहि मोठमोठ्यानें हंसलों! इतर खेळणारांलां नवल वाटलें असेल!

यानंतर अर्थात्च दोघांनींहि अहोरूपं करण्याचें टाकून दिलें व इतर गोष्टींकडे वळलों. (कालच्या) त्या विचित्र पावसाविषयीं विचारतां, हिमेल्फार्टच्या दिवशीं पाऊस पडतोच असा साधारण ठोका असल्याचें मास्तरीण सांगूं लागली. इकडे सुद्धां असे ठोकताळे पुष्कळ प्रचलित आहेत. उदाहरणार्थः—मेच्या ११।१३ तारखांनां वादळ वगैरेसारखें किंवा एकदम थंडी—बर्फ—असे अजब प्रकार होतात, असा लोकांचा—विशेषतः खेड्यापाड्यांतलि व शेतकरी लोकांचा समज आहे. चंद्र वाढत्या कलेचा असला ह्मणजेहि हवेंत एकदम चलबिचल होते, हा समज सार्वत्रिक आहे; वगैरे. अशा तऱ्हेनें या लोकांचे आचारविचार, समज, श्रद्धा, ठोकताळे यांवर विश्वास वगैरे गोष्टींत लक्ष्य घालण्यानें मनाला चांगली करमणूक होते.

२४ मे, १९१२.

आजपासून दहा दिवस फिंग्स्टेन् (इंग्रजी व्हिटसन् टाइड्) ची सुटी आहे. टेनिस, बोटिंग वगैरे करीत असतों. अभ्यास तर आहेच ठेवलेला.

आपल्याकडे सुद्धां गुजरातेंतील दुष्काळपीडितांसाठीं फंड गोळा करण्याचें काम चाललें आहे असें वर्तमानपत्रांवरून समजतें. लवकर व पुष्कळ जमो ! हेंच ह्मणायचें, दुसरें काय ?

येथें अशा धर्माच्या कामीं फंड गोळा करण्याची नवीन टूम गेल्या वर्षापासून निघाली आहे. आश्चर्य हें, कीं, येथील प्रतिष्ठित अशा बायकांनीं ही क्लृप्ति काढून, सर्व व्यवस्था स्वत: केली व एका दिवसांत दीड लाख मार्क जमवून, गरीबांच्या मुलांसाठीं दिले ! गेल्या वर्षी मी कदाचित् याविषयीं लिहिलेंहि असेन.

यंदांहि गेल्या शनिवारीं येथील बायकांनीं अनाथ–दुबळया लोकांच्या व मुलींच्या इस्पितळासाठीं पुन: पैसे जमविले. तरुण मुली व विद्यार्थी यांनां त्यांनीं रस्ते वांटून दिले, व त्यांनंतर कृत्रिम 'मार्गारेट' (इं० डेझी) फुलें येणाराजाणाराला दहा फेनीला ( सवाआणा ) विकण्याचा उपक्रम करविला. हें काम तरुण मंडळींनीं फार उत्साहानें केलें. तरुण मुली व विद्यार्थी 'मार्गारेट विकत घेतां का ?' ह्मणून हंसतहंसत आडवीं आलीं असतां, 'नाहीं' ह्मणण्याचा विचित्रपणा व हिडिसपणा कोणीहि दाखविला नाहीं. सकाळीं सातपासून रात्रीं अकरापावेतों हा फुलांचा विक्रय चालला होता. दोनचार दिवसांनीं गणती झाली, तेव्हां दोन लाख मार्क या एका दिवसांत उत्पन्न झाले, असें कळलें. कोणालाहि शक्तीबाहेर चट्टा नाहीं, ज्यांनींत्यांनीं आपखुषीनें दिलें. कोणावरहि कोणत्याहि तऱ्हेची वाईट दिसेल वगैरे अशासारखी सक्ति झाली नाहीं. तरुण मंडळींनीं तारुण्याला शोभेल असें उत्साहानें काम केलें.

कळसूत्र हलविणारी संभावित बायकांची मंडळी व उत्साहानें काम करणारी–सेवा करणारी तरुण मंडळी, यांच्या एकोप्यानें एका दिवसांत जें काम केलें, तें लॉटऱ्या, वर्गणीच्या याद्या इत्यादि अनंत खटाटोपांनीं इतक्या लवकर झालें नसतें, असें मला वाटतें.

परसेवेचें तत्त्व मोठें कठीण आहे. भलताच उठून करूं ह्मणेल, तर होणें नाहीं. त्याला योग्य वळण, योग्य शिक्षण पाहिजे. असें योग्य वळण देण्याला येथील प्रतिष्ठित स्त्रिया तयार झाल्या, व त्या शिक्षणाचा पहिला धडा—ह्मणजे अनुभविक माणसांच्या हाताखालीं लोकसेवेचें प्रत्यक्ष थोडेंसें काम करणें—हा धडा येथील तरुण मुलांमुलींनीं गिरविला. मला तो सगळा दिवस आठवून अजूनहि त्याचें कौतुक वाटत आहे! पोटाचा रोजगार ज्याच्यात्याच्यामागें आहेच; व तो आपल्या इकडल्यापेक्षां येथें जास्त बिकट आहे. तरी वेळ आली असतां अनाथांची सेवा करण्याची संधि हे लोक वायां जाऊं देत नाहींत. मोठ्या उत्साहानें तिचा उपयोग करतात. टिटानिकच्या अनर्थानें अनाथ झालेल्यांच्या मदतीसाठीं इंग्लिश स्त्रियांनीं दोन आठवड्यांत जंगी फंड उभारला, यांतील इंगित हेंच आहे. असो.

लाइप्झिक्, १६ जून, १९१२.

इकडील युनिव्हर्सिटीविद्यार्थ्यांचा चारपांच वर्षांचा काळ कसा जातो, याची कल्पना माझ्या पत्रांवरून तुह्मांला आली असावी अशी खात्री आहे. त्यांचे दोष जे कांहीं आहेत ते स्वैरपणा, अनियमितपणा यांमुळें आले आहेत. तासचे तास बीअर पीत बसून लंबोदर बनणें, विद्यार्थी-मंडळांच्या कांहीं तरी कुरापती काढून एकमेकांशीं मारामाऱ्या व तरुण मुलींबरोबर वात्रटपणा हे दोष महशूर आहेत. हे हळुहळू जावे, इंग्रजी विद्यार्थ्यांप्रमाणें खेळाचें महत्त्व यांनां कळूं लागून त्यांनीं खेळाडू (चांगल्या अर्थी) व्हावें, व शारीरिक आणि मानसिक शिक्षणवाढ सारखी होऊं द्यावी, एवढ्यासाठीं येथील युनिव्हर्सिटीनें, प्रसिद्ध इतिहासज्ञ प्रो. लाम्प्रेश्ट यांच्या या बाबतींतील युक्तिवादाला, खटपटीला व प्रयत्नांला वश होऊन गांवापासून अगदीं जवळ नाहीं व लांबहि नाहीं अशी मोठी जागा विकत घेतली आहे; व तेथें ऑक्स्-

फर्डच्या धर्तीवर विद्यार्थिवसतीगृहें, टेनिसक्रिकेटादि खेळांचीं मैदानें, व्यायामशाला, व निरामय अभ्यासासाठीं सर्व नवीन उपकरणांनीं परिपूर्ण अशीं इन्स्टिटयूटस् इत्यादि बांधण्याचें ठरविलें आहे. यांतील हेतु अर्थात् विद्यार्थ्यांच्या अतिस्वच्छंदी वर्तनाला आळा घालून उघड्या खेळांकडे व अभ्यासाकडे त्यांचें सारखेंच लक्ष्य रहावें हा आहे. याविषयीं येथील राजाच्या जन्मोत्सवादिवशीं प्रो. लाम्प्रेश्ट यांनीं एक उत्तम व्याख्यान दिलें. दुसऱ्या दिवशीं विद्यार्थ्यांची स्वतंत्रता अशानें हे हिरवूं पाहत आहेत, जगांतील इतर कोठल्याहि विद्यार्थ्यांनां नसलेला हा जर्मन विद्यार्थ्यांचा विशिष्ट हक्क तुडविला जात आहे, वगैरे हाकाटी कांहीं वर्तमानपत्रांतून सुरू झाली हें सांगणें नकोच. पण सर्व समंजस माणसांनां विद्यार्थ्यांनीं बीयरचे भोपे बनावें व इतर तदनुषंगिक गोष्टी कराव्या हें नावडेसें झालें आहे. तेव्हां प्रो. लाम्प्रेश्ट यांचा दीर्घोद्योग फळाला येईल यांत शंका नाहीं. पण हें काम अत्यंत खर्चाचें असल्यामुळें कालावधि लागेल इतकेंच काय तें.

दुसरें लिहायचें, ह्मणजे गेल्या गुरुवारीं ( ता. १२ ) येथील इन्टरनात्स्योनालर स्टुडेंटेन् फराइन् ( इं. इंटरनॅशनल स्टूडंट्स् असोसिएशन ) च्या विद्यमानें प्रसिद्ध रसायनशास्त्रवेत्ते प्रो. ओस्टवाल्ड यांचें झालेलें व्याख्यान हें होय. प्रोफेसर मजकूर अलीकडे पेनशन घेऊन सार्वजनिक कामाकडे बरेंच लक्ष्य घालतात; अद्वैत ( मोनिझम् ) पंथाचे हेकेलच्या नंतर हे चिटणीस आहेत, व विशेषतः सुधारलेल्या सर्व राष्ट्रांतील व्यवहार, दळणवळण सुलभ चालण्यास एस्परांटो, अगर ईडोसारख्या सोप्या, समंजस, कृत्रिम भाषेची आवश्यकता आहे, असें ह्मणणारांपैकीं हे एक असून, त्या बाबतींत यांनीं चांगला पुढाकार घेतला आहे. यूरोपांतील प्रसिद्धांतली प्रसिद्ध व्यक्ति प्रत्यक्ष पहायला मिळून तिचें बोलणेंहि ऐकायची संधि वायां कशी जाऊं द्यावी ? ह्मणून मी गेलों. विषय ' राष्ट्रांमधील दळणवळण सुलभ होण्यास आवश्यक असणाऱ्या

गोष्टी' हा होता. वजनें, मापें, क्षेत्रफळादि मोजण्याचीं साधनें, नाणीं यांत एकवाक्यतेची जरूरी व ती कशी घडवून आणतां येईल, याचें प्रोफेसरांनीं विस्तृत विवेचन केलें. नंतर यूरोपांत–अमेरिकेंतहि दररोज हरएक विषयावर इतकें वाङ्मय प्रसिद्ध होत आहे, त्याच्या बाह्यांगाला कांहीं ठराविक सर्वसम्मत स्वरूप असावें ( पुस्तकांचे आकार, लांबी-रुंदी वगैरे ) असें सांगितलें, व दळणवळणाचें मुख्य साधन जी भाषा तिजकडे वळून, एकदोन अगर जास्ती परकी भाषा ( स्वभाषा ही अवश्य आहेच ) शिकत बसून वृथा परिश्रम करण्याच्या ऐवजीं, समजण्यास सोपी, नानातऱ्हेचे अपवाद आदि अडचणीरहित, सरळ, सर्वसम्मत अशी एकादी कृत्रिम एकच भाषा जर राष्ट्रांमधील व्यवहारापुरती अस्तित्वांत आणली तर किती चांगलें होईल, याविषयीं विस्तृत विवेचनांत त्यांनीं व्याख्यान संपविलें. दीड तास भाषण झालें. बोलणें हलकें पण विनोदी होतें. हल्लींच्या भाषा-व व्याकरणशास्त्रज्ञांस प्रोफेसरांनीं दोष दिले ! वगैरे वगैरे. ते लिहीत बसण्यांत अर्थ नाहीं. भाषण भौतिकशास्त्रांत आमरण परिश्रम केलेल्या माणसाला साजेल असेंच अर्थात् झालें. व्यावहारिक, काटेतोल बुद्धिवादाला अनुसरून शुद्ध कोरडें, असें एकाद्या रासायनिक पृथक्करणासारखें व्याख्यान झालें; त्यांत मनोविकार-भावनादींची मवारी वगैरे नव्हती.

× × × ×

त्यानंतर एके दिवशीं एका जर्मन् गृहस्थाबरोबर होडीनें नदीवर सहल करण्यासाठीं गेलों. हवा किंचित् वादळी होती; मध्येंच वारा सुटे, ढग येत, पावसाचा फटकारा येई व पुनः सर्व निवळे. दोघांनांहि तसल्या होडीचा अभ्यास नसतांहि, औसलेगर बोट भाड्यानें केली.

हिला वल्हीं फार लांबलांब असून तीं बाहेरून मारलेल्या कड्यांत खेळतीं अडकविलेलीं असतात; त्यामुळें नवख्या माणसाला तीं आवरणें जड जातें. शिवाय बसतेवेळीं पाय एका आडव्या फळीला

वाद्यांनीं बांधून, एक फूट पट्टीवर मागेंपुढें घसरणाऱ्या तबकडी-वर बसायचें असतें. वल्हीं पाण्याबाहेर असतांना शरीर पुढें पायांकडे न्यायचें, ह्मणजे मेटाखुटी आल्यासारखे गुडघे छातीशीं येतात, व मग वल्हीं पाण्यांतून रेटतांना शरीर मागें घसरवून नेट घ्यायला सांपडतो. ह्मणजे वल्हीं पुढें ओढतांना शरीर मागें जात असतें. शिवाय पाण्याशीं वल्ह्यांच्या पातळ चापट टोकांचा काटकोन करण्यासाठीं, मनगटें फिर-वावीं लागतात. अशा या त्रिविध गतीच्या तडाक्यांत नवख्या माण-साची त्रेधा कशी उडते तें परवां चांगलें समजलें! थोड्या वेळानें जरासें जुळून होडी झुळकन् पाण्यावरून जाई, तेव्हां आनंद वाटे; पण मध्येंच वारा येऊन वल्हीं मागें नेणें सुद्धां दुरापास्त होई व होडी जोराच्या प्रवाहांत लागून एकाद्या वळणाच्या जागीं किनाऱ्याची भेट घेऊन आंत बसणारांनां पाण्यांत फेंकून देण्यास पाही! हवा अनिश्चित असल्यामुळें नदीवर होड्यांची गर्दी नव्हती हें एक बरें होतें. अशा तऱ्हेनें दीडतासाच्यावर सफर होऊन करमणूक झाली. करमणूकच ह्मणायची तर काय? अडचणीचे प्रसंग बऱ्यापणीं पार पडून गेले ह्मणजे मागून त्यांपासून करमणूकच होते!

मात्र आतां औस्लेगर्‌मध्यें जाण्याची भीति नाहींशी झाली; व दोघांनींहि लवकरच पुनः औस्लेगरच भाड्यानें करून जलसहल करण्याचें ठरविलें आहे.

× × × ×

असाच एका दिवशीं वनांत फिरत असतांना, माझे मित्र इतिहास-संशोधक डॉ. मेंकग्ल्युकर्ट् यांची आई व बायको परत जातांना भेटल्या. नमस्कारचमत्कार, कुशलप्रश्न वगैरे झाल्यावर डॉक्टरीण-बाईनीं 'चलतां कां आमच्या घरापर्यंत, माझा तान्हा मुलगा पहा-यला?' ह्मणून पाचारण केलें. संध्याकाळीं जेवणाची वेळ होत आली होती, तरी हेंहि एक काम केव्हां तरी करायचेंच होतें; ह्मणून त्यांच्या-

बरोबर गेलों. वाटेंत इकडल्यातिकडल्या गप्पा झाल्या. यांनां महाभारतांतील वेंचे, कालिदास वगैरे ( अर्थात् जर्मन रूपांतरांत ) वाचण्याचा नाद आहे हें मला ठाऊक होतें, ह्मणून 'सध्यां काय वाचीत असतां?' असें मीं त्यांनां विचारलें, तों सावित्री आख्यान वाचीत असल्याचें त्यांनीं सांगून, 'आपणांला सावित्री फार आवडते' असें ह्मटलें. 'दमयंतीपेक्षांहि सावित्री चांगली, ऱ्यूकर्टच्या ( १९ शतकाच्या आरंभींचा जर्मन कवि ) काव्यांपैकीं, हीं रूपान्तरेंच आह्मांला बरीं वाटतात,' वगैरे त्या ह्मणाल्या. 'तुमच्याकडील स्त्रिया सावित्रीला मान देऊन तिचें उदाहरण डोळ्यांपुढें वागवीत असतील नाहीं?' या प्रश्नानंतर मीं थोडक्यांत ज्येष्ठी पौर्णिमेची हकीगत सांगितली. इत्यादि गप्पांत घर गांठलें, व डॉक्टरीण बाईंनीं फ्लॅनेलमध्यें गुरफटलेलें पांढरें स्वच्छ गोजिरवाणें व सशक्त असें सहा आठवड्यांचें अर्भक दाखवायला आणलें. आई, आजी त्याचें प्रेम घेऊं लागल्या, मीहि त्याच्या मऊ गालाला भीतभीत बोट लावून थोडें बोबडें बोलून 'ओंकेल्' अगर काका ही पदवी मिळविली, व जेवायला राहण्याच्या आग्रहाला 'आणखी केव्हां तरी येऊन अवचित मंगळवार करीन, असें उत्तर देऊन परत आलों; असो.

२१ जून, १९१२

अलीकडे दोनचार दिवसांपासून हवा नामी गरम पडूं लागली आहे व दोनतीन दिवस पाऊसहि नाहीं; त्यामुळें चोहींकडे गांवांत, वनांत आनंदीआनंद आहे. शास्त्रीय रीतीनें ग्रीष्मऋतूला आज संध्याकाळ आरंभ होणार असल्यामुळें त्याला थोडें ज्योतिषी महत्त्व आहे. शिवाय सर्व वर्षांतला मोठ्यांतमोठा दिवस आजचा. पहाटे अडीचच्या आधींच उजाडलें व रात्रीं साडेनवांनंतर मावळणार! कंटाळा येईपर्यंत दिवस आपला पुरतोच आहे!

काल रात्रीं आठ वाजतां युनिव्हर्सिटींत एका हॉलांत कालिकतच्या एका जर्मन मिशनऱ्यानें 'हिंदी विद्यार्थी' या विषयावर व्याख्यान दिलें. मला इन्स्टिटयूटमध्यें सात ते नऊ यूबुंग् असल्यामुळें जायला झालें नाहीं; नाहीं तर ऐकलें असतें, उपाध्येबोवा विद्यार्थ्यांविषयीं काय ह्मणतात तें. निदान आज सकाळीं वर्तमानपत्रांत तरी सारांशरूपानें वाचायला मिळेल, असें वाटलें होतें; पण कोणींहि तें छापलें नाहीं! कदाचित् वक्त्यांनांच न छापूं देणें शहाणपणाचें वाटलें असण्याचा संभव आहे.

आपणांविषयीं लोकांच्या काय कल्पना झाल्या असतात, त्यांनां काय वाटतें, हें कळणें जितकें मनोरंजक तितकेंच हितावहहि असतें. ह्मणून ही संधि गेल्याचें वाईट वाटलें. तरी दुसऱ्या एका गृहस्थाचें 'आजचें हिंदुस्तान' या विषयावर बर्लिनला झालेलें व्याख्यान प्रो. विण्डिश यांनीं वाचायला दिलें; त्यामुळें वरील संधीची भरपायी मिळाल्या-सारखें वाटतें. कारण हें व्याख्यान भटजीबुवांच्या धर्माचें घोडें पुढें ढकलणाऱ्या एकतर्फी व्याख्यानापेक्षां फारच महत्त्वाचें होतें. व्याख्याते बर्लिनचे प्रोफेसर असून जर्मन युवराजांबरोबर गेल्या सालच्या आरंभीं आपल्या हिंदुस्तानांत त्यांची तिसरी खेप झाली. दर्जानें गेल्यामुळें अर्थातच त्यांचा सन्मान विशेष झाला, व पहिल्या दोन खेपांपेक्षांहि या खेपेला त्यांनां बडा अधिकारीवर्ग व लोकपक्षाचे पुढारी यांशीं हिंदुस्तानसंबंधीं अनेक प्रश्नांची वाटाघाट करण्याची संधि अधिक मिळाली. सुरेंद्रनाथ बानर्जी, सर जॉन ह्युएट अशा गृहस्थांशीं त्यांचीं संभाषणें झालीं. त्या सर्वांचा निष्कर्ष ह्मणून त्यांनीं जें व्याख्यान दिलें, तें छापून प्रसिद्ध झालें. पंचेचाळीस एक पानें आहेत.

हिंदुस्तानाची नैसर्गिक ठेवण, तीमुळें रहिवाशांवर झालेले शारीरिक व मानसिक परिणाम, त्यांच्यांतील आर्य–द्रविड–शिथियन–मोंगलादि वर्णभेद, धर्मभेद, जातिभेद, आचारविचार--व मुख्यतः भाषाभेद--

त्यांचे बरेवाईट परिणाम, इत्यादींचें त्यांनीं थोडक्यांत मार्मिक चेत्र काढलें आहे. या सगळ्या खिचडीमुळें राज्यकर्त्यांनां पुष्कळसे ायदे व थोडेसे तोटे कसकसे आहेत तें त्यांनीं दाखविलें आहे. एक-ाष्ट्रीयत्वाच्या कल्पनेचा आतांशीं कोठें सुकट अंकुर दिसतो आहे, सें त्यांनीं ह्मटलें आहे तें मला अगदीं पटलें. तथापि मूळच्या वैदिक थवा ब्राह्मणधर्मांत नसलेल्या वेडगळ कल्पनांनीं या अंकुराला धक्के ंचत आहेत, असें त्यांनीं दाखविलें आहे. शिक्षणासंबंधीं यांचें मत ुकीचें झालेलें दिसतें; कारण सामान्य जनसमूहाला शिक्षण मिळालें र आपला आजपर्यंत कायम असलेला पहिला दर्जा जाईल, असें श्रेष्ठ र्णाच्या लोकांनां वाटत असल्याचें त्यांनीं लिहिलें आहे! शिवाय, स्वस्थतेविषयीं लिहितांना तिच्यासंबंधीं गुणदोष त्यांनीं बंगाली व ेशेषतः पुणेकरांच्या माथीं मारणारांचा अनुवाद केला आहे. या दोन ाबतींत व्हालेन्टाइन् चिरोलसाहेबांसारख्याचा स्पष्ट प्रतिध्वनि लेक्च-ांत दिसतो. चिरोलचें पुस्तकहि व्याख्यात्यांनीं वाचलें असल्याचें टलें आहे. असो. मला या लेक्चरमध्यें हिंदी लोकांनीं अत्यंत लक्ष्य-र्वक विचार करण्यासारख्या बऱ्याच गोष्टी दिसून आल्या.

**लाइप्झिक्**, २८ जून, १९१२.

हवा उत्तम आहे. अजून उन्हाचा त्रास होऊं लागला नाहीं. आज ाहे अशीच हवा राहत गेली तर पुढच्या महिन्याच्या मध्यंतरीं उन्हाळा ांहींसा भासेल, पण मग लवकरच सुटी सुरू होऊन कोणीकडे री पर्वतांत उधळायला सांपडेल.

गेल्या जानेवारींत बर्लिनला दोनतीन दिवस जाऊन आलों, त्यावर ुठें बाहेर गेलोंच नाहीं. सबंध ईस्टरची सुटी येथेंच कांहीं वाचनांत, कांहीं जरा आळसांत काढली. त्यामुळें कंटाळल्यासारखें झालें होतें. तक्यांत घरवाल्या बाईच्या मुला-सुनेनें एक दिवस भेटायला बोला-

वलें; तीच पडल्या फळाची आज्ञा घेऊन गेल्या रविवारीं फ्रांकेन्-बर्ग् नांवाच्या गांवीं गेलों. गांव बारातेरा हजारांचा लहानच आहे, पण टुमदार आहे. शिवाय सभोंवार डोंगर-झाडी वगैरे असल्यानें इथल्या-सारखें जिकडे पहावें तिकडे सपाट दिसून कंटाळवाणें होत नाहीं. सरासरी सहा तास तेथें होतों. जेवायच्या आधीं सुमारें एक वाजतां तेथें पोंचतों, तों हेर् वाल्टर आपल्या दोन मुलांनां घेऊन स्टेशनवर आले होते. स्टेशनपासून घर अगदीं जवळ; व भलत्याच वेळीं नाक-पुडीएवढ्या शहरीं ड्रोश्क ( घोड्यांची गाडी ) कुठली मिळणार, ह्मणून पायीच गेलों. त्यांचे सासूसासरेहि त्याच गाडीनें भेटायला आले होते. घराभोंवतींच्या छोट्याशा बागेंतून-( लहान शहरांतून-अगर मोठ्या खेड्यांत ह्मटलें असतां जास्त बरें दिसेल--राहण्याचा हा फायदा, लाइप्झिकला घराभोंवती बाग स्वप्नांतसुद्धां आणायला नको ! ) घरांत गेलों. तों स्वैपाकादि घरकाम करतांना कमरेभोंवतीं बांधलेल्या शुर्त्स-( कपडे खराब होऊं नयेत ह्मणून पुढें कंबरेला बांधलेलें सोंधनेवजा वस्त्र, इंग्रजी एप्रन ) सह तशीच फ्राऊ सूसान ( आवडीनें हाक मारायची ह्मणजे फक्त सूस् ह्मणतात, ) आमचें स्वागत करण्याला दाराशीं आली व हस्तस्पर्श करून आह्मांला एका लहानशाच पण नीटनेटक्या टुमदार दिवाणखान्यांत घेऊन गेली. तेथें पंधरावीस मिनिटें विश्रांति घेऊन, सर्वांनां भुका लागलेल्या होत्या, तहानहि लागली होती, ह्मणून लगेच शेजारच्या दालनांत जेवायला गेलों. मेजवानीचा बेत होता. चार गेंग ( इंग्रजी कोर्सेस) होते, पैकीं मुख्य पदार्थ स्वतः फ्राऊसूसा-ननें केले होते. शेवटचें पक्वान्न घट्ट व थंड 'एर्डबेंअर आईस्क्रेम' ( इं. स्ट्राबेरी आइस्क्रीम ) होतें. शिवाय अशा मेजवानीला दुसऱ्याच्या प्रकृतिसाठीं परोपकारबुद्धीनें दारू पिणें अवश्य असतें, तिच्याहि तीन-चार तरी मोठ्या बाटल्या सासरे-जांवयांनीं मिळून खपविल्या. मज-साठीं, व बायकांच्या दारूंत मिसळण ह्मणून सेल्टर्स्-वासर होतें.

जेवायच्या आधीं चार वर्षांच्या छोट्या योआखिम्‌कडून बोबड्या शब्दांनीं गोविंद ह्मणविला ( गेबेट=प्रेस् इं.) व दोन तास गप्पा मारीतमारीत जेवण झालें. शेवटीं कॉफी, केक्स वगैरे झालीं. जेवल्यावर हेर् वाल्टरनीं मला घरांतील चांगलेंचांगलें कोचें-टेबलें-खुर्च्या-कपाटें आदि सामान, ( हें अर्थात् लग्नाच्या वेळेला बायकोनें माहेरच्या पैशांनीं थाटायचें असतें ! ) तसबिरा, इतर शोभेच्या कांचा-दगडांच्या वस्तु, बसायची खोली-तींतील सामान, पोष्टांच्या तिकिटांचा आलबम् वगैरे दाखविलीं. बसायच्या खोलींत मी, हेर व फ्राऊ वाल्टर आणि त्यांचे श्वशुर गप्पा मारीत पाऊणतास बसलो. तीं दोघें सिगार्स व फ्राऊ सुसान तोंडाला सोन्याचा कागद असलेली एक बारीक सिगारेट ओढूं लागलीं. त्यानंतर खालीं बागेंत मुलें खेळत होतीं, तेथें झाडाखालीं खुर्च्या टाकून बसलों. इकडच्या तिकडच्या शिळोप्याच्या गप्पा खूब झाल्या. मी पाहुणा ह्मणून आपणहि संकोचांत पडलीं नाहींत, अगर मलाहि संकोचांत पडूं दिलें नाहीं. ह्मातारे सासरेबुवा व मीहि मुलांच्या मागें धावणें, हुलकावण्या देणें वगैरे खेळ खेळलों.

थोरल्या मुलीचा पुढल्या रविवारीं वाढदिवस-त्यासाठीं यायला पुनः जुळायचें नाहीं, ह्मणून तिच्या आजीनें बरोबर बाहुल्या वगैरे खेळाचे जिन्नस वाढदिवसाची भेट ह्मणून आणले होते. ते प्रथम एके ठिकाणीं ठेवून सर्वांनां दाखविले व त्यांची रीतीप्रमाणें प्रशंसा झाल्यावर ते मुलीला दिले. या विधीला बेशेरुंग ह्मणतात. लवकरच बाहुलीची वेणी घालतांना एडिथनें तिचें टक्कल उघडें पाडण्याची वेळ आणली होती, ही गोष्ट निराळी !

नंतर साडेपांचांच्या सुमाराला असाच गप्पागोष्टींत चहा झाला व तो संपतो तों संध्याकाळीं गाडीची वेळ होऊन एकच धांदल झाली आजीबाईनां आपली टाश ( यूरोपीय बायकांच्या हातांत-विशेषत बाहेर कोठें जातांना-हातरुमाल, पैशाचें छोटें पाकीट वगैरे ठेवण्यासाठ

झोळणेवजा पाकीट असतें तें )च सांपडेना! ती मग सांपडली. मुलांबाळांसह सर्वजण स्टेशनवर आह्मांला पोंचवायला आलीं. वाटेंत हेर् वाल्टरनीं आपली कचेरी, वखार (हे व्यापारी आहेत) वगैरे दाखविलीं. स्टेशनवर पुनः गप्पांला वेळ मिळाला. फ्राऊ सूसाननें आपल्या बागेंतील गुलाब, नेलक (इं. पिंक) इत्यादि फुलांचा सुंदर गुच्छ मला दिला, व शेवटीं दोघांनीं 'पुनः केव्हांतरी सवडीनें येऊन दोन दिवस आमच्याकडे रहाच,' असा मनःपूर्वक आग्रह केल्यावर, गर्दी फार असल्यामुळें सेकंड्क्लासाचीं तिकिटें काढून आह्मी परतलों. पांचसहा तास चांगले गेले. आदरातिथ्याची प्रेमळ रीत व मनःपूर्वकपणा पाहून आनंद झाला. पाहुणचाराच्या सुखांत व शीतळ वेळीं जास्त रमणीय प्रदेशांतून जात असतांना गाडींतील तीन तासांचा कंटाळा आला नाहीं.

नंतर काल रात्रीं आठ वाजतां येथील संस्कृतचे प्रो. विण्डिश् यांच्याकडे जेवायला व गप्पा मारायला गेलों होतों. अमेरिकेंतील येल् युनिव्हर्सिटींतील संस्कृतचे प्रोफेसरहि भेटायला आलेले जेवायला होते. शिवाय येथीलच आणखी एक प्रोफेसर लिन्डनर होते. प्रथम गप्पा होतात तों जेवणाची वर्दी आली. तास दीडतास जेवण झालें. प्रो. लिन्ड्नर् मोठे विनोदी असल्यामुळें बरीच करमणूक झाली. येथें दारू मात्र कमी खपली! माझ्याकरितां ताज्या लिंबांचें सरबत व सेल्टर्स् वासर हीं होतीं. जेवल्यावर बसायच्या दिवाणखान्यांत एकदोन तास गप्पा झाल्या. या गप्पा ह्मणजे ठराविक विषयावर अशा थोड्याच असायच्या? दर पावतासाला कांहीं तरी निराळाच विषय निघे. प्रो. लिन्डनर्नीं कांहीं प्रोफेसरांच्या मार्मिक थट्टा करून आह्मांला हंसविलें. एका नव्या प्रोफेसरांनीं इराणी लोकांच्या धर्मावर पुस्तक लिहिलें, तें कसें आहे असें फ्राऊ गेहाइम्राद् प्रोफेसर विण्डिशनीं (इतकी सगळी नामावळी उच्चारावी लागते!) विचारल्यावर ते ह्मणाले "होय, मीं

तें वाचलें; आपणांला अवेस्ता समजत नाहीं हें दाखविण्याची लेखकाची इच्छा दिसते; या पलीकडे कांहीं नाहीं!"

सहज बोलतांबोलतां येथील धर्मज्ञानाच्या प्रो. ग्रेगरीची गोष्ट निघाली. हे रस्त्यानें बोडकेच जातात; मग पाऊस—वारा—बर्फ कांहींहि असो! प्रोफेसराच्या दर्जाच्या माणसाला तें शोभत नाहीं असें कोणी ह्मटलें, तों "इहलोकच्या अनवश्यक वस्तूंची हळुहळू सवय मोडायची ग्रेगरीची इच्छा असल्यास काय वाईट आहे?" असें त्यांनीं हळूच ह्मटलें.

मध्येंच, "येथील दोन मिशनरी बायांनां उत्तरहिंदुस्तानांत परोपकार करण्यासाठीं जायचें आहे, तेव्हां हिंदुस्तानीचें एकादें व्याकरण तुह्मांला ठाऊक असल्यास सांगा," असें डॉक्टर् थि. विण्डिश्नीं (प्रोफेसरांचे वडील चिरंजीव) मला ह्मटलें.

बारा वाजतां रात्रीं रजा घेऊन अमेरिकन प्रोफेसरांनां होटेलांत, व प्रो. लिन्डनर् यांनां स्टेशनावर (हे एका खेड्यांत राहतात) पोंचवून साडेबाराला घरीं येऊन निजलों.

कालच्या जागरणामुळें प्रकृति जरा बरी नाहीं, तरी टेनिस खेळून आलोंच. पत्र लिहायचा आळस करणार होतों, पण ह्मटलें, जर्मनींतील पाहुणचाराच्या चालीरीतींची हकीकत ताजेपणींच लिहावी.

**लाइप्झिक्**, १९ जुलै, १९१२.

इकडे आतां उन्हाळा चांगलाच भासूं लागला आहे. सुती पातळ कपडे घातले तरी त्रास होतो. एकादा पाऊस पडेल तर बरें. युनिव्हर्सिटी बंद झाल्याशिवाय ह्मणजे ऑगस्ट दहावीपावेतों कोठें टिरोल उत्तरइटाली वगैरेकडे जातां येत नाहीं.

गेल्या रविवारीं येथून दोन तासांच्या रस्त्यावर वायमार गांवीं गेले होतों. तेथें सभोंवतीं वनश्री बरी आहे ह्मणून कळलें होतें; पण मुद्दाम

हेंच ठिकाण निवडण्याचें कारण प्रसिद्ध *गॉटे कवि या ठिकाणीं पन्नास अधिक वर्षें राहिला होता, हें होय. गॉटेचें वायमार, म्हणून याची प्रसिद्धि आहे. त्या वेळचा येथील संस्थानिक फार रसिक होता, व त्यानें त्या वेळीं जर्मनींत चमकणारीं कविरत्नें आपल्या दरबारीं जमविलीं होतीं. त्यांतील मेरूमणि गॉटे हा होय. संस्थानिकाच्या निमंत्रणावरून १७७५ च्या अखेर गॉटे वायमारला आला, व अखेरपर्यंत म्हणजे १८३२ पावेतों येथेंच होता. शेवटींशेवटीं संस्थानच्या कारभाऱ्याचें काम त्यानें केलें. तत्त्ववेत्ता हेर्डर्, कवि वीलान्ड् हेहि पंचवीस तीस वर्षें वायमार येथें त्याच वेळीं होते. जर्मनीचा दुसरा प्रसिद्ध व गॉटेइतकाच लोकप्रिय कवि शिलर् हाहि १७९९ पासून पुढचीं सहा वर्षे वायमारला जाऊन राहिला होता, व तेथेंच निवर्तला. या वेळीं वायमार सर्व जर्मनीचें काव्य-कला-विनोदांत अग्रस्थान होऊन बसलें होतें, व त्याला 'डास् क्लासिश वायमार' म्हणत. इसवी सनाच्या चौथ्या व पांचव्या शतकाच्या दरम्यान सार्वभौम चन्द्रगुप्त विक्रमादित्याच्या अमदानींत अयोध्या शहर जसें विद्यापीठ होऊन बसलें होतें, तसेंच जर्मनींत अठरा व एकोणीस शतकांच्या दरम्यान वायमार होऊन बसलें होतें.

रविवारीं सकाळीं वायमारला गेलों व तेथें पोंचल्याबरोबर प्रथम उत्तर-टोंकापासून दक्षिणटोंकापर्यंत विहंगमदृष्टीनें शहर पाहिलें. आपल्या नगरपेक्षां लहान—३२ हजार वस्तीचें पण फारच टुमदार शहर आहे. एक छोटेंसें नाटकगृह—याच्या पुढच्या चौकांत गॉटे व शिलर हातांत हात घालून उभे आहेत असा एक भव्य पुतळा आहे--अजबखाना, संस्था-निकांचे दोनतीन राजवाडे, व जागजागीं चौकांत संस्थानिकांचें व

---

* गॉटे =Goethe. जर्मन् Œ या संयुक्त स्वराला जुळेल असा स्वर व उच्चार इंग्रजींत व मराठींतहि नाहीं. गोटे, गॉटे, गेटी, गोएथ हे सर्व चुकीचे उच्चार होत. ओंठ वाटोळे करून किंचित् पुढें आणावे व मग 'ओ' म्हणण्याचा प्रयत्न करावा; म्हणजे जर्मन् Œ चा खरा उच्चार होतो.

कवींचे पुतळे व छोटेखानी बगीचे, कारंजीं यांनीं शहराला शोभा आली आहे. अशा रीतीनें शहर एकदां नजरेखालीं घालून शिलर व गॉटे ज्या ठिकाणीं राहिले होते तीं घरें पहायला गेलों.

शिलरच्या घरीं गेलों, तों रविवारीं दोन वाजल्यानंतर हें घर पाहण्याची मनाई आहे, असें तेथील रक्षकानें सांगितल्यावर मी खट्टू झालों. तेव्हां 'हें पाहण्यास अर्धा मार्क पडत असतो, तुह्मी बंद झाल्यावर आलांत तरी एक मार्क द्याल तर दाखवितों,' असें त्यानें सुचवितांच एक मार्क चटकन् त्याच्या हातावर टाकून वरच्या मजल्यावर शिलरच्या राहण्याच्या चार लहान खोल्या होत्या तेथें गेलों. आपल्या माघकवीसारखाच शिलर दरिद्री होता, तेव्हां जरूर तेवढ्या थोड्याशा साध्या खुर्च्याटेबलांशिवाय तेथें फारसें कांहीं नव्हतें, हें योग्यच झालें. त्याचें लिहिण्याचें ओबडधोबड व अगदीं हलकें टेबल, निजायची लहान चिंचोळी खोली, ज्यावरती त्याचें प्राणोत्क्रमण झालें तो बिछाना, वगैरे त्या वेळीं होतीं तशींच जपून ठेविलीं आहेत. गरिबींतच साधारणत: सर्व आयुष्य कंठून वयाच्या शेचाळीसाव्या वर्षीं शिलर मरण पावला. ज्यानें काव्यरूपी एवढीं अमूल्य रत्नें सर्व लोकांच्या उपयोगासाठीं मागें ठेविलीं त्याला गरीब कसें ह्मणावें! शिलरची कविता स्वतंत्रतेच्या विचारांनीं परिपूर्ण भरली आहे, ह्मणून त्याला फ्रायहाइट्स् डिश्टर (स्वतंत्रतेचा शाहीर) ह्मणतात. गॉटेच्या घरीं जातों तों तेथें निराळाच थाट! शिलरच्या एका खोपट्यांतील नाकपुडी एवढ्या चार खोल्या कोणीकडे, व हें गॉटेसारख्या रंगेल कवीचें व कारभाऱ्याचें तिमजली घर—अगर वाडाच तो-कोणीकडे! हा वाडा गुणज्ञ संस्थानिक कार्ल औगुस्ट् यानें आपल्या कारभाऱ्याला नजर केला होता. वरचे दोन मजलेच काय ते पहाण्यासारखे आहेत; कारण बसणेंउठणें, भेटी घेणें, अभ्यास-काम करणें, निजणें इत्यादि गॉटेचा सर्व वापर यांतच असे. सामान तरी किती, व किती प्रकारचें? इटालींतून आणलेल्या विविध

वस्तु ( पुतळे, चित्रें आदि ), स्वत: काढलेलीं चित्रें, त्या वेळच्या प्रसिद्ध चितान्यांनीं बक्षिस दिलेलीं चित्रें वगैरे वस्तु जाड कापडानें मढवून निळा रंग दिलेल्या भिंतींवरून, कपाटांतून वगैरे ठेवलेल्या जशाच्या तशा राखल्या आहेत. गॉटेचा प्रथम चितारी होण्याचा विचार होता, म्हणून त्या वेळेच्या पद्धतीप्रमाणें इटालींत रोम, फ्लॉरेन्स, व्हेनिससारख्या शहरीं शिकण्यासाठीं तो व टिशबाइन् असे दोघे गेले होते. पण ती उत्तरइटालींतील वनश्री कुंचल्यानें कापडावर रंगविण्यापेक्षांहि लेखणीनें कागदावर विशेष खुबीनें आपणांला चित्रवितां येते, असें त्याच्या लक्ष्यांत येऊन, आपल्या बुद्धीचें वळण त्यानें ओळखिलें, व पुढील सर्व आयुष्य सरस्वतीच्या सेवेंत घालविलें. या वेळीं त्यानें जीं चित्रें काढलीं आहेत, तींहि त्याच्या दिवाणखान्यांत आहेत.

गॉटेला विवाहित–अविवाहित अशा अनेक मैत्रिणी होत्या, त्यांचींहि चित्रें भिंतीवर टांगलेलीं आहेत. सुस्वरूप, मर्दानी बांध्याच्या, बुद्धि-वान्, साधारण श्रीमंत व कालिदासाप्रमाणें अत्यंत रंगेल अशा या कवीला तरुणपणीं अनेक मैत्रिणी असाव्या, यांत नवल नाहीं. त्यांपैकीं एक मैत्रीण विशेष सलोख्यामुळें बरीच प्रसिद्ध आहे. हिचें नांव फ्राऊ फॉन् स्टाइन्. विवाहितस्थितींतहि हिची गॉटेशीं दाट मैत्री जमली —नव्हे दोघांचें प्रेम जडलें. गॉटे रोम--व्हेनिस वगैरे ठिकाणीं फिरत असतां दोघांचा प्रेमाचा पत्रव्यवहार होत असे. तिनें त्याला नाना-तऱ्हेच्या वस्तु भेटीदाखल नेहमीं पाठवाव्या, असें फार दिवस चाललें. पुढें एकदां कांहीं गैरसमज होऊन दोघांचें बिनसलें, तेव्हां हिनें आपल्या सर्व वस्तु रागारागानें परत मागितल्या. त्यांत चुकून तिच्या स्वत:च्या दोन लहान तसबिरा तेवढ्या राहिल्या. त्या अर्थात् अजून सर्वजण पाहतात.

गॉटेच्या मुलांच्या व नातवंडांच्याहि तसबिरा आहेत. मुलगा सतरा वर्षांचा झाल्यावर गॉटेनें आपल्या बायकोशीं लग्न लाविलें. त्यापूर्वीं

ती त्याच्या घरांत सर्व व्यवस्था पाहणारी कारभारीण ह्मणून असे. अशा स्थितींत त्यांनां मुलगा झाला. तो सतरा वर्षांचा होईतों गॉटेनें कारभारिणीशीं लग्न लाविलें नव्हतें, मग लावलें. मेहेरबानीच केली ह्मणायची तिच्यावर व मुलावर !

त्याची अभ्यासाची व काम करण्याची खोली दुसऱ्या मजल्यावरच एका पाखयाला आहे. तींतील पुस्तकें, कागद, लिहिण्याचें सामान वगैरे अगदीं मरणाच्या आधीं त्यानें जसें ठेविलें होतें तसेंच व्यवस्थित राखिलें आहे. मरणाच्या--ह्मणजे वयाच्या ८३ व्या वर्षीं दिसेनासें झाल्यामुळें तो सांगे तें त्याचा मित्र लिहून काढीत असे. याच खोलीला जोडून त्याची निजायची खोली आहे. शेवटींशेवटीं दम्याच्या व्यथेनें त्याला पीडिलें होतें. मरणापूर्वीं चार दिवस पडून बरें वाटेना ह्मणून बिछान्याशेजारीं एक आरामखुर्ची ठेवून त्याला बसता ठेविला होता, तींतच त्याचा एके दिवशीं सकाळीं अंत झाला. त्याचे शेवटचे शब्द ' मेअर लिश्ट मेअर लिश्ट ! ( आणखी उजेड–आणखी उजेड ) ' हे होत. त्याला निरनिराळ्या वेळीं साठ, सत्तर, ऐशींच्या वाढदिवशीं मिळालेल्या नजराण्याच्या वस्तु एका कपाटांत व्यवस्थित ठेविल्या आहेत. त्यांत विशेष सांगण्याजोगें ह्मणजे बादशहा नेपोलियननें दिलेलें आपल्या मुखवट्याचें सोनेरी पदक हें होय. शिवाय त्याची जन्मभूमि फ्रान्कफुर्ट येथील लोकांनीं त्याला दिलेली सोन्याची लोरबेअर् ( इं० लॉरेल–वैजयंती ) माळ ही पाहण्यासारखी आहे.

घराच्या मागें लहानसें परडें आहे. यांत खुद्द गॉटेनें लावलेलीं कांहीं झाडें आतां खूब विस्तारलीं आहेत. कुंपणाच्या भिंतीवर त्याच्या वेळीं वेल पसरलेले असत, त्यांच्या आश्रयानें फिरतफिरत तो कविता रचीत असे. तें पाहतांनां बारामतीच्या मोरयाच्या देवळाची मला आठवण झाली. येथें आपला कवि मोरोपंत फिरत असे व भिंतीवर आर्यांचीं चरणें लिही. नंतर गांवाला लागूनच पूर्वबाजूला इल्म् नदीच्या

कांठीं--उडी मारून पलीकडे जातां येईल इतकें रुंद हिचें पात्र आहे !--एक मोठें उपवन आहे. माणसांनीं व्यवस्थित लाविलेलेंच खरें; पण त्यांत नैसर्गिकपणा बऱ्याच अंशीं राखल्यामुळें फारच रमणीय झालें आहे. या वनांत एका वृक्षाच्छादित टेंकडीच्या पायथ्याशीं एक छोटेंसें दुमजली घर एकटेंच आहे. याला गॉटेचें गार्टन्--हौस् ( बागेंतील घर ) ह्मणतात. येथें उन्हाळ्याचे चार महिने तो राहत असे. गॉटेचें घर ह्मणूनच पहावेंसें वाटतें, बाकी त्यांत कांहीं विशेष नाहीं. नंतर बागेमध्यें आरामशीर दोनतीन तास फिरलों. त्या मोकळ्या स्वच्छ हवेनें डोकें शांत झालें व आनंद वाटला. संध्याकाळीं सातांनंतर वायमार सोडलें, व घरीं आलों. तेथील फ्रीडहोफ् ( स्मशान ) हि फार मोठें, शांत व रमणीय आहे; त्यांत नैसर्गिक झाडी चांगली आली आहे. अखेरच्या झोंपेला तें ठिकाण चांगलें शोभतें. यांत एका चांगल्या जागीं गॉटे, शिलर यांच्या कबरी आहेत.

म्युन्शेन ( म्यूनिच् ), ७ आगस्ट, १९१२.

गेल्या आठवड्यांत पाठविलेल्या कार्डावरून मी आतां फिरतीवर आहें, असें कळलेंच असेल. मात्र त्यांत ' उद्यां प्रवासाला जातों,' ह्मटलें होतें तें न जुळून सोमवारीं निघणें झालें. चारआठ दिवस हवा उत्तम असलेली पालटून ढग येऊन बुरबुर सुरू झाली. अपशकुनच ह्मणायचा ! पण शकुनवन्ती समुद्रापलीकडे चालत नाहीं असें लक्ष्यांत येऊन उल्हासानें नाउम्बुर्गला आलों. शहर लहानसेंच आहे; पण येथें एक जुनें अकराव्या शतकांतलें देऊळ पाहण्यासारखें आहे. तिकडे जातांना सबंध भिजलों; देवळांत जायचें, तेव्हां सचैल स्नानच झालें ह्मणायचें, इच्छा नसतांहि ! देवळाचे तीन भाग तीन निरनिराळ्या वेळीं बांधले गेले असल्यामुळें शिल्पांत भिन्नता दिसते. तें गॉथिक व नव्या रोमन अशा दोन तऱ्हांचें आहे. नक्षीकाम सुबक

आहे. तें दाखवितांना तेथील गुरव ( क्युस्टर् ) मोठ्या अभिमा-. व आवेशानें—अमुक पहा तमुक पहा—हें दुसरें कुठेंहि सांपडणार नाहीं, तो अमुक बिशप आला होता तोहि असेंच ह्मणाला—वगैरेसारखें भाटाप्रमाणें सांगत होता ! मजबरोबरच एक जर्मन बाई दोनतीन तरुण मुलींसह पहाण्यास आली होती, ती बरीच बोलकी असल्यामुळें दोघांचेंहि जुळलें; पण मला मात्र पळून जायची पाळी आली ! तेथून एक वाजतां निघून 'येना' गांवीं आलों. हा गांव युनिव्हर्सिटीसाठीं प्रसिद्ध असून, येथें विद्यार्थीमंडळांचें ( फर्बिंडुंगेन अगर कोअर ) फार बंड आहे. त्यांची लहर लागली तर रस्त्यांत टेबलेंखुर्च्या मांडून बीअर पीत बसतात, पण पोलिसचें त्यांच्यापुढें कांहीं चालत नाहीं, असें सांगतात. युनिव्हर्सिटीला सध्यां सुटी असल्यामुळें मला हें प्रत्यक्ष पहायला सांपडलें नाहीं.

'येना' ( अगर आपण तिकडे जेना असा उच्चार करतों ! ) हें १८०६ मध्यें जर्मन लोकांचें नेपोलियन बरोबर झालेलें युद्ध—व त्यांचा झालेला भयंकर पराभव—यांसाठींहि प्रसिद्ध आहे. हा पराभव जर्मन लोकांना फार फायद्याचा झाला. कारण येथपासून राजे, मुत्सद्दी, विद्वान् आदि लोक जर्मनराष्ट्र एक कसें होईल व त्याची भरभराट होऊन तें पुनः डोकें वर काढण्यास कसें समर्थ होईल, याविषयीं मनःपूर्वक खटपट करूं लागले. इतर गोष्टींमध्यें शिक्षणाच्या बाबतींत जर्मन राष्ट्र आज सर्वांच्या पुढें आहे, हें त्या पराभवानंतरच्या जागृतीचेंच फल होय. संपत्तिपेक्षां आपत्तिपासूनच पुष्कळ वेळीं फार मोठे फायदे होतात, यांचें हें मूर्तिमंत उदाहरण होय. असो.

असें हें पराभवाचें ठिकाण—रणमैदान पहावें, हा मुख्य, व एका भाषाभिज्ञ प्रोफेसरांना भेटावें हा गौण, असे दोन हेतु येनासारख्या खेडवळ ठिकाणीं उतरण्यांत होते; पण दोन्हीहि साधले नाहींत. येनाला उतरतों, तों पाऊस जोरानें पडूं लागला. त्यामुळें पायीं जाण्याची

..ष्टच राहिली! मोटर आम्निबस् मिळते, पण तिनें धांवत जाऊन पळत येण्यांत फारसें हंशील नव्हतें. शिवाय गांवांत शोध घेतां प्रो० डेल्ब्रुक् हवा पालटण्यासाठीं गेल्याचें कळलें! गांव थोडेंसें पाहण्यासाठीं पावसांतून गांवांत भटकण्यानें त्रास मात्र झाला! संध्याकाळीं साडेपांच वाजतां येना सोडून, दहांच्या सुमाराला 'न्यूर्नबर्ग' येथें आलों. येथें मागें एकदां आलों असल्याचें तुम्हांला लिहिलेलें आठवत असेलच. वाटेनें जशी सभोंवार फ्रान्केन्वाल्डमधील सृष्टीची तशीच डब्यांत मनुष्यस्वभावाची मौज पहात होतों. प्रथम अर्धातास माझ्या डब्यांत एक जोडपें होतें. त्यांतील पुरुष सृष्टीचा भोक्ता होता असें दिसलें. निदान तसें तो दाखवी तरी! प्रथमच आगगाडींत बसलेलें दहाबारा वर्षांचें मूल जसें या खिडकीकडून त्या खिडकीकडे धांवतें व 'आई, ही पहा नदी, हा बघ डोंगर, पहा कशीं झाडें पळतात!' वगैरे एकच गर्दी करून सोडतें, तद्वत्‌च या गृहस्थानें केलें. प्रथम एका खिडकीकडे धांवे व 'मारीया, कुक माल (पहा–पहा)' असें बायकोला (तीं नवराबायको असावीं असा माझा तर्क झाला) ओरडून सांगे. नंतर दुसऱ्या खिडकीकडे धांवून पुनः 'मारीया–कोम् कोम् (इकडे ये–ये), सीअ डी हेर्‌लिश्‌काइट् डेर् नाट्‌अर (पहा सृष्टीची अपूर्व शोभा!)' म्हणून खिडकींतून बिचारीचें डोकें पुढें ढकली. अशी सारा वेळ इकडूनतिकडे धांवपळ चालली होती. बायको बिचारी कंटाळून 'या इश सेअ अ.ल्लस् (मला किनी सगळें दिसतें!)' असें म्हणे, पण उपयोग काय? बाहेर सृष्टींत जसे देखावे बदलत तसेच माझ्या डब्यांतहि बदलत होते. पुढच्या स्टेशनावर सृष्टीचें भोक्तें जोडपें उतरून, एक क्याथोलिक उपाध्यांचें जोडपें (नवराबायको नव्हत! दोन पुरुष) डब्यांत आलें. हें बव्हेरियामधील असावें, हें त्यांच्या मृदु उच्चारांवरून व नित्वार, (प्रशिया–साक्सनीकडे 'निश्ट वा' असा उच्चार Niht wahr याचा करितात) t, d, यांचा बरोबर दन्त्य उच्चार करणें वगैरेवरून

ाव्हांच दिसलें. यापैकीं एकजण बोलका दिसला. ' कोण? कोठचे?' गैरे कुशल प्रश्न झाल्यावर भाषा, धर्म, रीतिरिवाज, अशा नाना- वेषयांवर बोलणें झालें. कॅथॉलिकधर्माविषयीं मी कांहीं बोलतांना, उपाध्ये- ोवांनीं प्रॉटेस्टंटांनीं पूर्वपरंपरा, धर्माचा इतिहास-तर्क वगैरे सोडून ऊन धर्माचें मातेरें केलें, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, रशी त्या धर्मांत स्थिति झाली असल्याचें सांगून, पूर्वींच्या क्याथोलिक वळांतील पुतळे, चित्ररूपानें दाखविलेले बायबलांतील गोष्टींचे देखावे, गैरे मोडूनतोडून विध्वंसकपणाचें काम त्यांनीं केलें आहे, वगैरेहि ळमळून सांगितलें! नंतर प्रशियन् व बव्हेरियन् लोक (दोन्ही र्मनच!) यांच्या स्वभावतुलनेकडे भाषण वाहवलें. प्रशियन् लोक फार ताठ, गर्विष्ठ, उद्धट, अविनयशील आहेत वगैरे शेलकीं विशेषणें यांनां देऊन, बव्हेरिअन् लोक सालस, सभ्य, पाहुणचारादि रीति र सोडणारे व एकंदरींत ' गेम्यूट्लिश् ' असल्याचें त्यानीं प्रतिपादिलें. गेम्यूटलिश् चें मराठींत हुबेहुब भाषांतर करणें कठीण आहे. पण एकं- र स्वभाव--चालचालणूक यांत मनमिळाऊपणा, गोडवेपणादि गुण असणें याअर्थीं ' गेम्यूटलिश् ' हा शब्द वापरतात. इंग्रजी सुद्धां समर्पक शब्द याला नाहीं!). बोलणें कुठवर वाहवलें असतें हें सांग- ात नाहीं; पण अस्तमान झाल्याबरोबर प्रार्थना करण्यासाठीं दोघांनीं आपलीं छोटीं बायबलें खिशांतून काढलीं, व भाषण बंद करावें लागल्या- बद्दल क्षमा मागून त्यांतील मंत्र मनांत वाचण्यास आरंभ केला. इतर गोष्टी कशाहि असल्या तरी श्रद्धेच्या व धर्माचीं मानलेलीं बंधनें सक्त पाळण्याच्या बाबतींत क्याथोलिक लोकच पदोपदीं श्रेष्ठ ठरतात. असो.

या उपाध्येबोवांचें संभाषण व वर्तन मला खरोखरीच 'गेम्यूट्लिश्' वाटलें. पुढें हे उतरून गेल्यावर एक ज्यू, एक वकील व एक अशील अशी मंडळी प्रवेश करती झाली. संभाषण अर्थात्च पैसा-कायदा—

हक्क वगैरेविषयीं क्लिष्ट, कर्णकटु असें झालें. या मंडळीला आपल्या भानगडींत मजबरोबर एकदोन शब्द बोलण्यापलीकडे फारसा वेळच सांपडला नाहीं. त्यांच्या चिरूटांनी माझें डोकें मात्र उठलें. असो.

न्यूर्नबर्ग्ला दहांच्या सुमाराला आल्याचें सांगितलेंच आहे. गांवांत गेल्यावर एका हॉटेलांत गेलों, तों तें पाहुण्यांनीं गच्च भरलेलें! रात्र बरीच झालेली, जरा पंचाईत पडली; पण तेथून एक माणूस बरोबर मिळाला, त्यानें लगेच जवळच्या दुसऱ्या हॉटेलांत बरीशी खोली पाहून दिली. न्यूर्नबर्गला जर्मन संगीतपरिषद् भरली आहे, त्याचें हें फळ असावें! शिवाय सर्व शाळांनां व युनिव्हर्सिट्यांनां सुटी झाल्यामुळें हे प्रवासप्रिय लोक जिकडे तिकडे सुळसुळाट करून सोडतात, यामुळें या वेळीं हॉटेलांतून रीघ मिळत नाहीं.

गेल्या खेपेला न्यूर्नबर्ग गडबडीनेंच कां होईना, पण एकदां डोळ्यां-खालीं घातलें होतें. त्या वेळीं तुम्हांला लिहिलेंहि असेलच. वहिवाटी-प्रमाणें प्रथम मुख्य रस्ते–बाजार वगैरेकडे भटकलों. एका मोठ्या चौकांत येथील भाजी व फळबाजार सकाळचे पांचसहा तास भरत असतो, त्यांतून फिरलों. त्या माळिणींचा मळकट भरड पोषाक, तिकोनी करून डोक्यावरून हनुवटीखालीं गांठ दिलेलें रंगीत फडकें, वहिवाटलेल्या माणसांशिवाय इतरांनां प्राण गेला तरी न समजणारें तोंडातल्या तोंडांत हेल काढून बोलणें वगैरेनीं अर्धा तास मोठी कर-मणूक झाली. कांहीं म्हाताऱ्या भाजीवाल्या खोल टमरेलांत शिजवि-लेल्या कसल्या तरी खळ्याचा लाकडी चाटूंनीं सकाळचा फराळहि तेथेंच उरकीत होत्या. मजसारखे 'बेडेकरां' दि मार्गदर्शक हातांत घेऊन फिरणारे प्रवासी आज फारच दिसले. शिवाय चोवीस माणसं सहा रांगांनीं बसण्याच्या चार घोड्यांच्या गाड्या सर्व शहरभर प्रवा-शांनां फिरवीत होत्या. एक माणूस गाडीवर मध्येंच उभा राहून 'हें अमूक, तें अमूक, हें यानें बांधिलें,' वगैरे बडबडत असे. किती जणांनां तें

समजलें असेल राम जाणे! अशा वाहनांतून शहर पाहण्याला 'रुंड्फार्ट् अगर (गांवाभोंवतीं) चक्कर' असें ह्मणतात. तीनचार मार्कांस गाडींत एक जागा मिळते. असो.

अशा रुंडफार्टचा मी चहाता नसल्यामुळें इतर पुष्कळांप्रमाणें पायींच फिरत होतों. या खेपेला नवें असें एक बुर्ग अगर गढी (छोटासा किल्ला) पाहिली. इ. स. अकराशेंच्या सुमारास ही बांधली गेली, व तेव्हांपासून आतांपर्यंत बरेच राजे व बादशहा तेथें कधींकधीं राहिले आहेत. त्यांचीं नांवें तेथें आहेत. हल्लींचा जर्मन बादशाहा तेथें तीन वेळ थोडके दिवस राहिलेला आहे. त्यांत दोनशें फूट खोलीची एक अंधारी विहीर आहे, तिच्या तळांतून संकटसमयीं पळून जाण्यासाठीं भुयारें आहेत. इतर वेळीं या भुयारांतून बंदिवान लोकांकरवीं किल्ल्यांत व गांवांतील राजवाड्यांत पाणी वाहविलें जात असे. खडकांतून खोदण्याचें कामहि बंदिवानांकडूनच सारखीं तेरा वर्षें करविलें गेलें. ही गोष्ट पौर्वात्य बादशाही अमलांतल्यासारखी कानाला लागते, नाहीं! तेथेंच एक उंच मनोरा आहे. त्यावरून शहराचा देखावा उत्तम दिसतो. लांबवर टेंकड्या व मैदानें दिसतात. तेथें १६१२ ते १६४८ पर्यंत झालेल्या धार्मिक युद्धांत जर्मन वीर वालेन्स्टाइन् याचा तळ असे. याविषयीं शिलर् कवीनें 'वालेन्स्टाइन्स लागर' नांवाचें रसिक काव्य लिहिलें आहे. इंग्रजी भाषांतर मिळाल्यास वाचावें. पंधराव्या शतकांत सर्व मध्ययूरोपाचा या न्यूर्न्बर्ग शहरामार्फत व्हेनिसशीं व ह्मणजेच तद्द्वारा हिंदुस्तानाशीं मोठा व्यापार चालत असे. त्यामुळें तेव्हांपासूनच न्यूर्न्बर्ग अत्यंत भरभराटींत होतें. हिंदुस्तानाला जलमार्ग खुला झाल्यापासून तो न्यूर्नबर्गचा व्यापार बुडाला, पण आतां खुद्द येथेंच देशी व्यापार प्रचंड चालून न्यूर्न्बर्गचें महत्त्व कायम राहिलें आहे. न्यूर्न्बर्ग् सहांपूर्वीं सोडून, साडेआठांला रात्रीं

म्यूनिच्‌ला आलों. येथेंहि जागेसाठीं दोन दारें फिरावें लागलें. पण हें होटेल फारच नामी मिळालें आहे.

( ता. ७ )

येथें कांहीं पहावयाचें राहिलें नाहीं. कारण ही म्यूनिचची तिसरी खेप. तेव्हां बँकेंतून ऑस्ट्रियन्, इटालियन् वगैरे नाणें घेऊन आज दुपारीं पुढें टिरोल् प्रांतांत (पश्चिम ऑस्ट्रिया) आल्प्स् पर्वतांत इन्स्ब्रुक् येथें जाणें आहे.

बोत्सेन् ( तिरोलप्रांत, ऑस्ट्रिया ) १९ आगस्ट, १९१२.

अकरा वाजतां धो धो पाऊस पडत असतांना म्यूनिचच्या बँकेंत जावें लागलें. तों रस्त्यांनीं दुतर्फा ही माणसांची गर्दी! कारण विचारतां, बव्हेरियाचा युवराज आपल्या नव्या नवरीसह होख्त्साइट्स् रायझ (लग्नानंतरचा प्रवास इं. हनीमून) करून परत आलेला त्या रस्त्यानें राजवाड्यांत जाणार होता, असें समजलें! मनुष्यस्वभाव कोठें गेलें तरी सारखाच. ' रात्र असो कीं दिवस असो, कीं, पर्जन्याची वृष्टि असो,' असला उत्सव, तमाशा पाहण्यास माणसें आपलीं एका पायावर तयार! मी तेथें न थबकतां बँकेंत जाऊन ऑस्ट्रियन व इतालियन नाणें घेतलें, व तेथें कोणच्या सालापर्यंतचें चालतें, कोणचें रद्द आहे हें त्या कारकुनाला विचारलें. त्यानें सर्व समजावून सांगून होतांहोईलतों चांदीचीं नाणी ( लिरा वगैरे ) वाजवून पहात जा ह्मणून मुद्दाम बजाविलें. शक्य तेवढें करून इतालींत या बाबतींत बनविलें न जाण्याचा विचार आहे.

म्यूनिच् एक वाजतां सोडून सहा वाजतां दक्षिणेकडे पूर्वआल्प्स्मधील टिरोल प्रांताचें मुख्य शहर इन्सब्रुक् येथें आलों. वाटेनें मुसळधार पाऊस, धुकें, ढग वगैरेमुळें सृष्टिशोभेवर पांघरूण पडलें होतें.

दर स्टेशनावर चढउतरणाऱ्या उतारूंचें निरीक्षण करण्यांत कांहीं करमणूक झाली. इन्स्ब्रुक हें चांगल्या हवेचें ठिकाण असल्यामुळें तेथें प्रवाशांची नेहमीच गर्दी असते. हिंवाळ्यांत बर्फ फार ह्मणून, व उन्हाळ्यांत डोंगरी हवा हुषारी आणणारी ह्मणून, प्रवाशांनां खंड असा मुळींच पडत नाहीं. अर्थात्च मला पुनः येथेंहि दोन घरें हिंडावीं लागून, एक 'इंग्लिश स्पोकन्' हॉटेल मिळालें. हीं 'इंग्लिश स्पोकन्' हॉटेलें मुख्यत्वेंकरून अमेरिकन्-इंग्लिश प्रवाशांसाठीं असून बरींच महाग असतात. त्या मानानें सुखांत, व्यवस्थेंत, थाटमाटांत कांहीं जास्ती असतें, असें नाहीं. उलट यांतील नोकरचाकरांत ताठपणा मात्र आलेला असतो. या होटेल डल ऑयरोपमध्यें हातपाकीट टाकून (या खेपेला अगदीं अवश्य तेवढेंच सामान भरून हातपाकीट घेतल्यानें लटांबर कमी झालें आहे!) पावसांतच गांवांत एक फेरी मारून आलों. गांव अगदीं नवा ह्मणूनच रस्ते, चौक, त्यांवरील इमारती एका वर्तीच्या, रेखलेल्या अशा दिसल्या. जरा मोठे असतें, तर याला बर्लिन् अगर लाइप्झिक् ह्मणायला हरकत नव्हती.

ता० ८ आगस्ट, १९१२.

सकाळीं गांव पहाण्यास निघालों. मोठ्या इमारती, चौकांतून कारंजीं व इतर स्मारकें वगैरे नव्या यूरोपीय शहराला अवश्य तें सगळें येथें आहे. कांहींसें जुनें सोळाव्या शतकांतलें एक देऊळ पाहण्यासारखें आहे. इंग्रजी इतिहास घोकतांना आठव्या हेन्रीच्या वेळेला ज्या बादशहा माक्सिमिलियनचें नांव आपण वाचतों, त्यानें मरतेसमयीं हें देऊळ बांधलें जावें अशी इच्छा प्रदर्शित केली होती (सन १५१९) तिचें हें फळ. देव्हाऱ्या (आल्टार)समोर देवळाच्या मध्यभागीं दुतर्फा खांबांच्यामध्यें या जर्मन् (खरें ह्मटलें असतां ऑस्ट्रियन्) बादशहाचें संगमरवरी दगडाचें स्मारक असून भोंवतीं निरनिराळ्या देशच्या

पूर्वीच्या राजांचे लढाऊवेषांत धातूचे बावीस पुतळे आहेत. पैकीं इंग्लंडचा राजा आर्थर् ( याच्याविषयीं पौराणिक कथांचीं गद्यें व काव्यें तुह्मांला ठाऊक असतीलच; पैकीं सर चार्लस् मालोरीचें Morte d' Arthur, व टेनिसनचें Coming & passing of Arthur, Holy Grail, Idylle of Kings, Round Table वगैरे प्रसिद्ध आहेत ) व गॉथिक लोकांचा राजा थिओडोरिच् अथवा डीटरिच् हे प्रसिद्ध आहेत. मध्ययुगांतील राजांचीं चिलखतें, ढाल, तरवारी वगैरे हत्यारें यांची चांगली कल्पना येते. नंतर एका राजाच्या डौली मूर्खपणाचें चिरस्मरण देणारें एक सोन्यानें मढवून काढलेल्या छपराचें घर पाहण्यालायक आहे. राजाच्या चिक्कूपणासाठीं—अगर दारिद्र्यामुळें त्याला ' रिकाम्या खिशाचा टाश (पिशवी)–फ्रीड्रिच्' असें नांव पडलें व चिडून तें घालविण्यासाठीं त्यानें तीन हजार डुकाट् मोडून हें छप्पर बनविलें अशी दंतकथा आहे ! जरा पुढें एक सुबक राजबाग आहे.पण इन्स्ब्रुक्चा—साधारण सर्व टिरोल प्रांताचाहि—विशेष या मनुष्यकृतींत नसून, अपूर्व सृष्टिशोभेंत आहे. डोंगरांतून धांवत फोंफावत येणाऱ्या पांढऱ्या भुरकट पाण्याच्या इन् नदीच्या कांठीं गांव वसलेला असून, नदीपलीकडे डोंगरांच्या ओळीचा एक तटच बनला आहे. थोडेंसें मळभ आलें असतांहि तीं बर्फाच्छादित शिखरें, त्यांच्या खालच्या बाजूला मानेला काळसर वस्त्र गुंडाळल्यासारखे कापुसलेले विरळ ढग, त्याखालीं देवदारु व लेर्श (इं.लार्च्; मराठी नांव असल्यास ठाऊक नाहीं, हें झाड उंच डोंगरावरच वाढतें; देवदारूशीं बरेंच साम्य आहे.) यांचीं वनें व नंतर हिरवेंगार शालूसारखें पसरलेलें गवत, मध्येंच कोठें तुरळकतुरळक घरें, व पायथ्याशीं नदीकांठची वस्ती हें मिश्रण गोड दिसे. नदीच्या पुलावरून हा रमणीय देखावा बराच वेळ पाहून वाल्टर् फॉन् डे फोगल् वायड नांवाच्या टिरोलच्या शाहीराच्या ( पोंवाडे–लावण्या करून गाणारा ) स्मारकाकडे, व तेथ



' किंग् आरथर् ' ( इन्स्ब्रुक् ).

हदारीच्या मारिया टेरेसीएन् स्ट्रासमधून, ऑस्ट्रियाचा राजा व
पेनची राजकन्या यांच्या विवाहस्मरणार्थ उभारलेल्या विजयतोरणा-
ाालून स्टेशनकडे आलों. लग्नासारख्या शौर्याच्या कामाच्या स्मरणार्थ
ाभारलेलें विजयतोरण येथेंच पहिल्यानें पाहिलें ! असो. बर्फाच्छादित
र्वतांच्या दर्शनानें पुन: त्यांच्या निकट सांनिध्याची प्रबळ इच्छा, पण
वेच्या अनिश्चितपणामुळें ती तशीच दाबावी लागून दुपारीं मुक्काम
ालविला, व दक्षिणेला तीन तासांच्या रस्त्यावर बोत्सेन शहरीं चार
ाजतां आलों. आल्प्स्च्या सिम्पलन् पास्, गोटा पास् व ब्रेनर् नांवाच्या
ीन खिंडींपैकीं सर्वांत लहान जी ब्रेनर पास तींतून आगगाडीचा रस्ता
असल्यामुळें सारा वेळ गाडींतील कॉरिडोर ( बोळ, उतारूंस या डब्यां-
तून त्यांत जाण्यायेण्यासाठीं ) मध्यें खिडकीशीं उभा होतों. लहानमोठे
ांचपंचवीस बोगदे, मध्यम उंचीचे डोंगर ( गाडी जींतून जाते त्या
खिंडीची जास्तींत जास्त उंची तेराशें सत्तर मेटर=पंचेचाळीसशें
सहासष्ट फूट आहे. ), त्यांतून उड्या घेत जाणारे फेंसाळ झरे, झाडें व
गवत यांच्या दाटीनें जिकडेतिकडे गर्द हिरवळ,व त्यांतून मुरडत गेलेले
जणूं स्फटिकानें मढवलेले पांढरे शुभ्र पाय-व गाडीरस्ते, यांत स्वित्सर-
लंदांतील आल्पस्चा विशाळ व भव्यपणा जरी नव्हता, तरी वैचित्र्य
व सौंदर्य पूर्ण भरलीं होतीं.

बोत्सेनला हॉटेल तेव्हांच मिळालें. पडशी त्यांत टाकून गांवांत
चक्कर मारली. आडवेतिडवे गेलेले रस्ते, बोळया, जुनीं घरें यांवरून
या गांवाचा जुनेपणा तेव्हांच दिसून येतो. दक्षिण व उत्तर यूरोप
यांच्या व्यापाराचें हें नाकें आहे. पूर्वीं व्हेनिसशीं याचें चांगलें दळण-
वळण असे. आज तें नसलें, तरी द्राक्ष–सफरचंदादि फळांचा, दारूचा
व गुरांचा धंदा व व्यापार येथें मोठा आहे. असो. आतां येथील एका
शिखरावरून टिरोल–आल्प्स्चें सिंहावलोकन करणें आहे.

**रीव्हा** ( गार्डासरोवरावर ), ११ आगस्ट, १९१२.

परवां बोत्सेनहून लिहिलेलें पत्र पावलेंच असेल. त्यानंतर एका डोंगरावरून टिरोल-आल्पस् शिखरांचा देखावा पाहणेंस जायचें, पण जें पहायचें त्यावर मेघांचें निळसर पांघरूण पडल्यामुळें तो बेत सोडून जवळच सव्वातासाच्या रस्त्यावर जरा उत्तरेकडे डोंगरांत मेराण ह्मणून श्रीमंत लोकांचें हवा खाण्याचें 'कूअर् ओर्ट' ( उपायाचें ठिकाण ) आहे तिकडे गेलों. कूअर-उपायासाठीं येणाऱ्या पाहुण्यांच्या सेझों ( इं. सीझन् ) मोसमाला अजून अवकाश होता. हा सेझों आक्टोबर-अखेर सुरू होऊन मेपावेतों चालतो. या अवकाशांत अपूर्व सृष्टि-शोभा व तिच्याच पोटांत मनुष्यानें विजेचे दिवे वगैरेनीं चित्रविचित्र केलेल्या बागा लावून आणलेली कृत्रिम शोभा यांचा ते यथेच्छ उप-भोग घेतात. नाच, गाणें, तमाशे, नाटकें वगैरेला या संधींत ऊत येत असतो; पण सध्यां सर्वच शांत होतें. त्यामुळे मला सृष्टिसौंदर्याचा यथेच्छ उपभोग घेतां आला. मेराण हें चोहीकडून उंचउंच डोंगरांनीं कोंडलेल्या विस्तीर्ण दरींत क्यूशेल्बर्ग् नांवाच्या डोंगराला टेंकून पास नांवाच्या छोट्या नदीच्या उजव्या कांठावर वसलेलें आहे. नदीच्या दोन्ही तीरांवर चैनी लोकांना शतपावली करण्यासाठीं होताहोईलतों डोंगरी झाडांच्या बागा केल्या आहेत, त्याहि चांगल्याच आहेत. पण गांवाच्या जरा वरतीं उंच कड्यांतून खडकांमधून नदी जोरानें धोंधों करीत वाहते, तेथें शोभा अपूर्व आहे. जन्मापासून सैरटपणानें नाचत-बागडत जाणारी ती; तिला खडकांचा प्रतिबंध कसा खपणार ? त्याशीं मोठ्या आवेशानें भांडतभांडत फेंसरूपी केस पिंजारीत ती मार्ग काढूं पाहते. भोंवतालचीं विशाल झाडें जात्याच शांतताप्रिय असल्यानें आपल्या शाखा भांडणाऱ्यांवर दोन्हीकडून लांबवून जणूं तें भांडण तोडूं पाहत आहेत ! भांडणाची मौज पहात बसणें हा मनुष्यस्वभावच

आहे. त्याला अनुसरूनच अशा मौज पहाणारांसाठीं सज्जा केलेला आहे; त्यावर किती तरी वेळ निवांत बसलों. सृष्टीच्या भांडणाची अशी कांहीं मौज आहे, कीं, त्यामुळें मनाला यत्किंचित्‌हि त्रास न होतां तें उलट रममाण होतें. असो. नंतर, डोंगरांत निरनिराळ्या ठिकाणीं पूर्वी संस्थानिक लोकांनीं हवा खाण्यासाठीं बांधलेले वाडे बरेच आहेत, त्यांपैकीं एक पाहण्यास गेलों. त्याला वाट चढाची, पण दोन्हीं बाजूंनीं द्राक्षांच्या घोंसांनीं लवलेल्या बागांतून होती. या टिरोल् प्रांतांत डोंगरावर द्राक्षांची लागवड फार आहे. हाच लोकांचा मुख्य धंदा असें ह्मटल्यास हरकत नाहीं. ते सुंदर घड पिकायला महिनाभर अवकाश होता, नाहीं तर कदाचित् कोल्होबाचें पाप मनांत आलें असतें. त्या बागांत जागजागीं निळसर पाण्याचे हौद दृष्टीला पडले; व वेलींच्या पानांवरहि निळसर डाग पडलेले पाहिले. शेतकीस आधुनिक शास्त्राची जोड आपल्याकडे अजून नसल्यामुळें, हें गूढ कळेना. ह्मणून वरच्या बाजूला एक झोंपडी दिसली तिकडे वळलों. तेथें एक सदृढ पण खुज्या बांध्याची माळीण काम करीत होती, तिला विचारिलें. तेव्हां हौदांत ब्लू व्हिट्रिओल् असून, वेलींस कीड लागूं नये ह्मणून तो वारंवार शिंपण्यासाठीं पाण्यात मिसळून हौदांत सतत तयार ठेवलेला असतो, असें तिनें आपल्या टिरोली–जर्मनभाषेंत सांगि- तलें. तिचीं तीं झोंपडीभोंवतीं कोंबड्यांचीं खुराडीं, बाजूला खताचा ढिगार, वगैरे उपकरणें व साधा गरिबीचा पोषाक पाहून आश्चर्य वाटलें. एवढ्या संपन्न बागेची मालकीण–निदान वाढविणारी तरी–पण तिला खालच्या त्या श्रीमंत व ऐषआरामी मेराणाचें वारेंहि शिवलेलें नव्हतें ! खाऊनपिऊन सुखी दिसली; पण कपडेलत्ते, एकंदर रहाणी यांमध्यें जी गरिबी शेतकऱ्यांच्या मागें उपजत लागलेली, तिचा प्रभाव या बाईवरहि दिसला; इकडील शेतकरी लोक आपल्याकडीलपेक्षां किती तरी सुखी ! पण यूरोपापुरतेंच पाहतां यांच्या श्रमाचें चीज व्हावें

तितकें होत नाहीं, हेंच खरें. यांनीं जिवापाड मेहनत करून द्राक्षांचे बाग करावे, व त्याचें फळ दलालांनीं मधल्यामधें उपटावें, असें आजपावेतों तरी चाललें आहे. असो. नंतर तसाच पुढें वर चढत राहिलों. तों एका ओढ्याच्या खोल दरींतून गोड स्वैरालाप ऐकून तिकडे वळलों. वाटेंत एका लोहाराचा कारखाना दृष्टीला पडला. लोहारदादांचें भट्टीशीं काम चालूच होतें, तों मी खिडकींतून डोकावलें. त्यांनीं तोंडांतून छातीपावेतों लोंबणारी ती फायफ–चिलीम तशीच ठेवून गुटेन्टाग् म्हणून एका डोळ्यानें मिचकावीत मला सलामी दिली. त्याच्या त्या राकट, तांबूस, एकाक्ष चेहऱ्यांत माणुसकी पूर्ण भरलेली दिसली, व दोनचार शब्द त्याशीं बोलून मी त्या ओढ्याकडे गेलों. हा जींतून गेला आहे त्या दरीला नाइफ् ताल् म्हणतात. तेथें बराच वेळ उभा राहून, त्याचें मंजुळ गाणें ऐकिलें. मी लक्ष्य लावून ऐकत होतों; पण तो न थांबतां तसाच आनंदानें बडबडत, उडतबागडत चालला होता. मजसारखीं हजारों माणसें तेथें येऊन गेलीं असतील; त्यांचा आतां पत्ताहि नसेल. पण हा आपला सतत आपल्या नादांत वाहत आहे. हें सृष्टीचें रहस्य आहे. हें रहस्य कवींनां कळतें. मजसारखीं प्राकृत माणसें पाहून आश्चर्य व आनंद करीत व स्वतःला धन्य मानीत परत जातात; यापेक्षां अधिक शक्ति त्यांनां नाहीं! अशा ठिकाणीं कवींनां काव्यस्फूर्ति होते. पण मजसारख्या साधारण जनांवर या अपूर्व गोडपणाचा परिणाम झाल्यावांचून राहत नाहीं, व आपल्या विचारांस साधा गद्य उच्चार देणें पुरें न वाटून पद्यांत त्यांचा उद्गार काढतात. या न्यायाला अनुसरूनच मी लाइप्झिक् येथील संस्कृत प्रोफेसरांनां चार ओबडधोबड पद्यें पाठविलीं. त्यांत कांहीं विशेष किंमत नाहीं, पण त्या वेळची मनाची स्थिति तीं कशीबशी दाखवितात. असो. या ओढ्याच्या कांठीं थोडा विसांवा घेतला व गोड पाणी प्यालों. इतक्यांत एक टिरोलर् आपल्या दोन मुलांसह दोन गाई चरायला नेत

होता, तें पाहून मला मौज वाटली. मुलांनां मी दोन बिस्किटें देतां तीं भीतभीतच त्यांनीं घेतलीं व बापानें माझे आभार मानले. कां कोणाला ठाऊक ? पण हीं टिरोलर् माणसें मला आवडतात. सृष्टीच्या सतत सहवासानें त्यांच्या वागणुकींत शहरी, बनावट असें कांहींच नसतें, व हीं सरळ, भोळीं व ह्मणूनच गोड असतात. त्या उपाध्येबोवानें बव्हेरियन् लोकांनां लावलेलें गेम्यूट्लिश् हें उपपद मला वाटतें यांनांच जास्त शोभतें. नंतर जरा ताजातवाना होऊन परत मेराणला आलों, व दुसऱ्या डोंगरांतील टिरोलाय् नांवाच्या खेड्यानजीक गेलों, तों संध्याकाळ झाली होती. बाजार वगैरे आटपून परत आपल्या गांवीं जाणारे टिरोलर् भेटले, त्यांशीं बोललों. कांहींजण फळें, व कांहीं दूध मेराणला विकून परत चालले होते. मुलेंहि दृष्टीला पडलीं. त्यांनां त्या चढाचें कांहींच वाटत नव्हतें. तीं वानरांसारखीं उडतबागडत चाललीं होतीं. !

त्या मुलांनीं मला त्या खेड्याचें नांव तिरोलाय असें सांगितलें. क्यूशेल्बर्गच्या शिखरावरच्या सपाटीवर हें वसलें असल्यामुळें येथून सभोंवार लांब पल्ल्यावर नजर फेंकतां येते. खालीं खोल विस्तीर्ण दरींत जागजागीं निरनिराळीं खेडीं दिसत, तेवढाच काय तो मनुष्यसंपर्क. बाकी जिकडेतिकडे सृष्टीच सृष्टि! हजारों लहान ओढ्यांच्या व पासर् आणि एच् या नद्यांच्या झांकारानें दरी दुमदुमून गेली होती. त्यांचे एकवटलेले भुरकट रंगाचे जोरानें वाहणारे प्रवाह वळणावळणांनीं सापासारखे झाडांमधून दृष्टीस पडत. दरींत व डोंगरांवर उंच-उंच झाडें, डोंगरांच्या लगत्यालाच सरासरी तेराचौदाशें फूट उंचीपावेतों द्राक्षांचे मांडव व नंतर पुनः रान असा देखावा नजर टाकावी तिकडे दिसून, त्या हिरवेगारपणानें मन प्रसन्न होई. शिखरावर बर्फ असण्यापुरते उंच पर्वत या भागांत नाहींत, तरी ते लहानसहान नाहींत. त्या वेळीं त्यांच्यावर तुरळकतुरळक अभ्रें होतीं, त्यांवर संधि-

प्रकाश पडून मोठ्या थोरल्या तांबूस वस्त्रासारखा भास होई. काव्य-प्रकाशांत अशा डोंगरांनां छाटी पांघरलेल्या मुनींची उपमा दिली आहे; ती तटस्थपणा, गंभीरपणा, वस्त्राची कल्पना वगैरेंत खाशी जुळते, पण विशालत्व व अचलत्वाची कल्पना तिनें येणें शक्य नाहीं; व तेवढ्या-साठीं ती उपमा तेथें दिलीहि नाहीं. संध्याकाळच्या कोंवळ्या प्रकाशांत अंगावर गहन हिरवी कफनी व डोक्यावर ताम्रमेघांची छाटी गुंडा-ळून तटस्थवृत्तीनें आकाशाला डोकें लावून अढळ बसलेले हे पर्वत –मुनि पाहून माझें मनहि कांहीं वेळ अचल व गंभीर झालें. शिवाय तें खेडें जरा दूर राहून, त्या सपाटीवर एकटा मीच असल्यासारखें झाल्यामुळें एक क्षणभरच भानावर नसल्यासारखें मला झालें. नंतर खालीं जाण्याचा विचार करून घड्याळ काढून पाहतों तों साडेसात होऊन गेलेले; सहांच्या गार्डानें मी परत जाणार होतों! मग हळुहळू उतरून मेराणांत जेवण वगैरे सारिले, व साडेनवांला परत निघून साडेदहांला बोत्सेन् गांठलें. हें अपूर्व सृष्टिसौंदर्य पाहून झालेल्या समाधानांत सुखानें झोंप आली. हा आल्पस् पर्वत ह्मणजे सुखाची खाण आहे. निराळ्या ठिकाणीं जावें ह्मणजे निराळाच अदृष्टपूर्व सौंदर्याचा प्रकार दृष्टीला पडतो!

मेराणला सृष्टिसौंदर्य पाहण्याच्या हावेंत किती चाललों याची मूर्त कल्पना दुसरे दिवशीं सकाळीं पायांनीं दिली. स्वित्सर्लंड् सोडल्या-पासून इतकें व अशा चढउताराचें आजंवर कधीं चाललों नव्हतों. एक वाजेपासून साडेसातपर्यंत सारखा मार्गी होतों; पायांवर नक्षत्र पडलें ह्मणतात नाहीं, तसेंच झालें!

**व्हेरोना**, १३ आगस्ट, १९१२.

बोत्सेनूहून बारा वाजतां (ता. ११) निघून चार वाजतां दक्षिणे-कडे (इतालीची उत्तर) 'गार्डा' सरोवराच्या कांठीं रीव्हा या गांवीं

आलों. येथें येण्याचा मुळांत बेत नव्हता, पण आल्प्समधील इतर सरोवरांप्रमाणेंच याची ख्याति ऐकून व मार्गदर्शकांत पाहून येथवर वांकडा वळलों. येथें पोंचण्यापूर्वींच गाडींतून घाटाखालीं हें सरोवर दृष्टीला पडतें. याचा आकार साधारणत: दुधीभोपळा अगर दोडका यासारखा दिसतो. ( जरा मोठ्या वांकड्यातिकड्या बुडखाचा दोडका ! ) डेंखाच्या ठिकाणीं रीव्हा खेडें एका भल्या थोरल्या काळ्या खडकी भिंताच्या आश्रयानें वसलें आहे. येथेंहि सध्यां सेझों नसल्यामुळें फारशी गर्दी नव्हती. सेझोंमध्यें जवळजवळ दीडलाख पाहुणे येथें जमतात ! व गांवांतील एकंदर घरें ह्मणजे हॉटेलें, या दृष्टीनें पाहतां हें अशक्य वाटत नाहीं. येथून तीनचार किलोमेटर ( १ कि० ≈ मैल ) लांबीवर डोंगरांत पोनाळे नांवाच्या ओढ्याचा धबधबा पहाण्यासारखा आहे. तो खालीं कोसळत असतांना पांढरा शुभ्र फेंसच नुसता दिसतो, पाणी असें ह्मणायला कांहीं राहत नाहीं. स्वित्सरलंडांतील धूलिनिर्झरासारखाच प्रकार. पण येथें प्रवाहाला पाणी व जोर दोन्हींहि जास्त व उंची कमी ह्मणून तुषारांची धूळ वाऱ्यानें विसकटल्यासारखी दिसत नाहीं. याला जाण्याला डोंगराच्या कपारीकपारींनें वळणाचा रस्ता मोठ्या कुशलतेनें बांधला आहे. तो धबधब्यावरून पुढें कोठें गेला आहे. धबधब्या-जवळच एका लांबचलांब खिंडींतून दुसरा ओढा येतो, या दोहींचें फेंसाळ पांढरें पाणी व तळ्याचें निळसर रत्नासारखें चमकणारें पाणी यांचा विरोध एकमेकांनां अधिक शोभा देतो. हें पाहून आल्यावर जेवून किनाऱ्यावर बांकाला टेंकून बराच वेळ बसलों. भोंवतालीं डोंगरांत कोठें कुअर स्थळें नसल्यामुळें लेमन सरोवराभोंवतीं लोसान्, मॉंट्रो, टेरिटे, व्हेही, गो वगैरे ठिकाणीं रात्रीं डोंगरांत जशी विजेच्या दिव्यांची चंगळ उडून जाते तसें येथें नाहीं. या बाबतींत गरीब टिरोली लोक इतके सुधारले नाहींत तरी ह्मणावें, अगर कूअर्–पाहुण्यांची टिरोलवर अजून कृपादृष्टि इतकी झाली नाहीं, असें तरी ह्मणावें ! दोन दिवसांचें

सारखें डोंगरांतून वणवणत फिरणें, त्यामुळें खाण्याच्या वेळा टळून झालेला अनियमितपणा व रीव्हा येथें जेवण्यांत शिळें, आंबटचिंबट खाण्यांत आल्यामुळें त्या रात्रीं प्रकृति अस्वस्थ होती. पित्त भडकून रात्रीं वांती वगैरे झाली. तेव्हां दुसरे दिवशीं अकरा वाजतां रीव्हाहून गाशा गुंडाळला.

११ आगस्ट, १९१२.

गार्डा सरोवरावरून जाण्याची हौस तेवढ्यांतच पुरवून घेतली. बोटीनें जवळच्या एका खेड्यांत उतरून तेथून आगगाडीनें व्हेरोनाकडे निघालों. प्रकृतीच्या अस्वस्थपणाच्या नादांत आदल्या रात्रीं उशाखालीं घालून ठेवलेली नोटांची पिशवी सकाळीं खिशांत घालायची विसरलों होतों. मोठ्या हॉटेलांत उतरण्याचा व टिरोलियन् लोकांच्या सचोटीचा प्रभाव ह्मणूनच निघतेवेळीं चाकरानें ( पोर्टिए ) विसरलेली पिशवी आठवण करून आणून दिली! नाहीं तर तीनशें लीराच्या ( इतालियन नाणें= दहा आणे ) पुंजीला व इतालींतील प्रवासाला एकदमच मुकण्याची पाळी आली होती !

हा तीन तासांचा ( एक ते चार ) प्रवास बरा झाला. एका मोठ्या स्टेशनावर वीस हेलर् ( ऑस्ट्रियन नाणें= दोन आणे )ला मला मोठा द्राक्षांचा घड मिळाला, त्यानें थोडी शांतता वाटली. सकाळचा फराळ व दोनअडीच वाजतां तीं द्राक्षें एवढ्यावरच काम भागवावें लागलें; कारण कॉफी–भाकरी वगैरे घेण्याला फुरसतच सांपडली नाहीं. आपण दक्षिणेकडे, उष्ण प्रदेशांत प्रवास करीत आहों, हें पदोपदीं भासत होतें. कारण, द्राक्षांच्या मांडवांमधून मका व तंबाखूची लागवड आतां दिसूं लागली. झाडेंहि लिंबासारखीं स्पष्ट दक्षिणेचा छाप असलेलीं भेटूं लागलीं. पुढें ऑस्ट्रिया व इताली यांच्या हद्दीवर जकात–तपासणी होऊन जरासा खोळंबा झाला. येथें व यापूर्वीं रीव्हा, मोरी वगैरे

दक्षिणटिरोलांत इतालियन भाषा ऐकूं येऊं लागली होती. हा दक्षिण-उत्तरेचा फरक माणसांतहि दिसे. आतां डब्यांत जीं माणसें चढत-उतरत तीं तांबूस-कृष्णवर्णाचीं, त्यांचे डोळे व केंस यांचा निळेपणा जाऊन घारेकाळेपणाकडे वळण, वगैरे दाक्षिणात्यांच्या खुणा त्यांच्यांत पुरतेपणीं दिसत. एकंदर हावभाव चालचलणुकींतहि हेंच दिसे. स्टेशनावरील व गाडींतील गडबड-गोंधळ, आरडाओरडा व थोड-थोडा अस्ताव्यस्तपणा हीं तेव्हांच निवडून पडत. उदाहरणार्थ-कोरिएरे डेला सेरा (इं. ईव्हनिंग कोरियर) हें पत्र घेऊन जेव्हां ती पत्र-विक्याची खुर्जी मूर्ति प्लॅटफॉर्मवर आली, तेव्हां त्याच्याभोंवतीं सर्व माणसें जणूं लढून पडलीं ! त्रिपोली-युद्धासंबंधीं वाचण्यास मिळावें ही उत्सुकता असणेंहि साहजिकच आहे ! अशा या मंडळींत मीहि दाक्षिणात्य ( + पौर्वात्य ) त्यांच्या भाषेची यत्किंचित्‌हि जाणीव नसतां त्यांच्या देशांत प्रवास करण्याची हांव धरून चाललों आहें-या कल्पनेनें जरा कसेंसेंच वाटलें. असो. इतालीच्या हद्दींत जसजसा जास्त येऊं लागलों, तसतशी वनश्री पूर्णपणें दाक्षिणात्य बनत चालली. लिंबाचे बागचेबाग आतां दिसूं लागले; व उत्तरयूरोपांत नाणावलेल्या बागांतूनहि क्वचित्‌च टिकणारीं व ह्मणून अक्षरशः दुर्मिळ अशीं चिप्रे-सुस् (इं. सायप्रस्, जर्मन्=त्सिप्रेस, हिंदी=सुरू ) झाडें घटकोघटकीं नजरेस पडूं लागलीं. हा सारा वेळ गाडी आदींजे (वर मेराणच्या वर्णनांत आलेली एच् ती हीच.) नदीच्या तीरातीरानेंच (डाव्या) चालली होती. शेवटीं चार वाजतां गाडी व नदी दोघीहि व्हेरोना शहरांत शिरल्या. मार्गदर्शकांतून आधींच पाहून ठेवलेल्या वरील आकाडेमिया होटेलाची गाडी दिसतांच तींत बसलों व येथें आलों. होटेलच्या व्यवस्थापकाला इंग्रजी येत असल्यामुळें फारशा भानगडी उपस्थित झाल्या नाहींत, हें भाग्यच ह्मणायचें !

**व्हेरोना.**

मी उतरलों आहें हें ठिकाण माझिनी रस्त्यांत शहराच्या साधारण मध्यभागीं असल्यामुळें, थोडीशी विश्रांति घेऊन कालच शहरांतील मुख्य भाग डोळ्याखालीं घालतां आले. प्रथम मंडईचें ठिकाण पियाझ्झा एर्बे ( =चौक एर्बे ) पाहिलें. हें पूर्वीचें फोरम् ( इं. फोरम् ) होय. इतालीच्या सद्दीच्या वेळीं प्रत्येक मोठ्या शहरांत फोरम् चौकाला फार मोठें महत्त्व होतें; येथेंच सार्वजनिक कामें, समारंभ वगैर होत असत. मध्ययुगांतहि अशा फोरम्च्या मध्यभागीं कायमचें छत्रासहित व्यास-पीठ उभारून त्यावरून न्यायनिवाडे, अखेरचे निकाल सांगत असत. असें व्यासपीठ=ट्रिबूना येथेंहि आहे. हल्लीं अर्थात् जुन्या ऐश्वर्याची आठवण व सध्यां पोरांस पत्ते आदि खेळण्याचें ठिकाण यापलीकडे त्याला कांहीं महत्त्व नाहीं. या एका काळच्या फोरम्मध्यें हल्लीं भाजी-बाजार भरत असतो. त्याचीं छत्रीवजा पालें कायमचींच उभीं केलेलीं दिसतात. सकाळीं सर्व तऱ्हेचा बाजार, व दुपारीं फक्त फळें—हल्लीं विशेषेंकरून कलिंगडें—बाजार येथें भरतो. चौकाच्या वरच्या बाजूला एका सुरेखशा रोमन्–स्तम्भाच्या मथळ्यावर एक संगमरवरी सिंह बसविलेला आहे. हा व्हेनिस संस्थानच्या ताब्यांत उत्तरइताली अस-तांनाच्या अमदानींतली खूण होय. चौदापंधराव्या शतकांत या प्रांतीं व्हेनिसचा चांगला जलजलाट असे. नंतर या शेजारींच दुसरा सुंदर चौक पियाझ्झा देइ सिञ्ञोरी ह्मणून आहे. येथें एक त्रिबुनाल ( Tribunal ) न्यायमंदिर, एक प्रेफेक्ट–राजमंदिर व तिसरें राजि-ओनें नांवाचें न्यायमन्दिर अशीं आहेत. याचे ते सुबक उथळ्यावरती सफाईदार खांब, त्यांवरील पल्लवादि नक्षी असलेलीं मथळीं, अशा दोन मथळ्यांवर असलेल्या सुंदर अर्धवर्तुळाकृति कमानी वगैरे काम सुंदर असून प्रमाणसूत आहे. बाराव्या व तेराव्या शतकांत येथें मास्तिनो व कान्ग्रांदे असे दोघे स्काला बंधु राहत असत. हल्लीं येथें

सरकारी कचेऱ्या आहेत. त्यामुळें आंत प्रवेश होत नाहीं. या चौकाच्या मध्यभागीं प्रसिद्ध इतालियन कवि दान्ते (इं. Dante )चा पुतळा आहे. फ्लॉरेन्स शहरांतून हांकून लाविलें असतां, त्याला स्काला घराण्यानें आश्रय दिल्यामुळें तो इ. स. १३०३ पासून येथें येऊन राहिला होता. त्याची स्मृति हा अलीकडे उभारलेला पुतळा देतो. राजिआनें मंदिराच्या चौकांत कुरुंदवजा दगडाचा खुला जिना, व जवळच नगर-मिनार ( तुर्रे चीव्हिका ) आहे. त्या मिनारवरून सभोंवतीं बऱ्याच मैलांवर पाहतां येतें. या चौकाच्या शेजारीं स्काला घराण्याचीं कांहीं स्मारकें ठेवलेलीं आहेत. त्यांपैकी एक गॉथिक नक्षीचें व गॉथिक भव्यपणाचें भलें जंगी देगडी थडगें असून त्यावर स्कालाचा घोड्यावर स्वार झालेला पुतळा आहे. याभोंवतीं लोखंडी कड्यांची भक्कम जाळी असून तींत या घराण्याचें चिन्ह अगर अंक जें सोपान (स्काला इं.=स्केल=शिडी) वारंवार गुंफिलेलें आहे. नंतर याच काळांतील ह्मणजे चौदाव्या शतकाच्या आरंभीं येथें वजनदार मानल्या गेलेल्या कापुलेती ( इं. कॅप्युलेटस ) व मॉंटेक्की ( इं. मॉंटेग्ज) या परस्परद्वेष्ट्या सरदारांचीं घरें तिऱ्हाइतांससुद्धां शेक्सपीयरनें ओळख करून दिल्यामुळें पहावींशीं वाटतात. ज्युलिएत्ताचें घर चिरेबंदी आहे व त्यावर 'कापुलेत्ती घराण्याचा वाडा—कीं ज्यांच्या घरांतील सुंदर मुलगी ज्यूलिएत्ता इचें अल्पायुष्य दुःखमय व ह्मणूनच उत्तम कवींनीं गाऊन चिरस्मरणीय केलेलें—असें झालें,' एवढ्याच दोन ओळी आहेत. आतां येथे कोणी तरी क्ष राहतो, व मागील चौक त्यानें भाड्याच्या गाड्यांनां तबेल्यासाठीं दिला आहे! वरील लहानसा शिलालेख व शेक्सपियरसारख्यांचें त्यावरील कवन हीं नसतीं तर 'पूर्वीं बांधियला कुणास्तव असो माझाच तो संप्रति' हें माधवानुजाचें विस्मृतीच्या तोंडीं घातलेलें वचन खरें झालें असतें! रोमिओचें घर विटेबंदी पण सुरेख आहे. तेंहि सध्यां असेंच कुणाकडे आहे. पण या दोघांची माती जेथें पडली तें स्थान, ज्यूलिएत्ता—रोमि-

ओचें कबरस्तान मात्र व्हेरोनानें वरती छोटीशी इमारत बांधून चिरस्मरणीय करून ठेविलें आहे. थडग्यावर जुनी दगडी पेटी आहे. ती मूळ प्रेताची पेटी असावी असा समज आहे. जो कोणी परकीय व्हेरोनाला येतो तो या कबरस्तानांचें दर्शन घेतल्याशिवाय व आपल्या नांवाचें कार्ड पेटींत टाकल्याशिवाय जात नाहीं. 'करुणस्य मूर्तिरथवा शरीरिणी' अशा त्या अल्लड कुमारींच्या निस्सीम प्रेमाला हें योग्यच आहे. तेथेच शेजारीं शेक्सपीयरचा संगमरवरी मुखवटा बसविलेला आहे; हा योगहि योग्यच होय.

नंतर कोर्सो काव्हूर्, कोर्सो व्हित्तोरिओ मानुएले, हे राजरस्ते वाखाणण्यासारखे आहेत. पहिला अधिक जुना दिसून, त्याच्या दोहीं बाजूला बरेचसे मोठमोठे सरदारी वाडे आहेत. हल्लीं त्यांत कोठें टेक्निकल् हायस्कूल, इरिगेशन् कचेऱ्या वगैरे आहेत. हा काव्हूर् रस्ता सध्यां व्यापारव्यवहाराचें मुख्य ठिकाण आहे. व्हित्तोरिओ मानुएले रस्ता, ज्या एमानुएल्च्या अमलाखालीं १८६६ त इताली देश संयुक्त झाला, त्याच्या स्मरणार्थ आहे. दोन्हीहि जुन्या शहराशीं जुन्या रोमनदरवाजांनीं (पोर्टा) जोडलेले आहेत; यांवरून जुनें शहर येथपावेतोंच होतें हें स्पष्ट आहे. काव्हूर् काण हें तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल. हा त्या वेळचा माझिनीच्या जोडीचाच मुत्सद्दी असे. याचा सेनापति गारिबाल्डी याचा व राजाचा असे पुतळे येथें स्मरणार्थ आहेत. पण माझिनीचा पुतळा येथें नाहीं हें आश्चर्य आहे. स्काला घराण्याच्या पूर्वींहि व्हेरोना भरभराटींत असे, याची साक्ष डुओमो, सें. अनास्टाशिया वगैरे भव्य व सुंदर देवळें पटवतात. हीं दोन्हीहि देवळें अतीशय सुंदर व तितकींच भव्य आहेत. सुंदर खांब व त्यांवरील मथळीं; त्यावर एकमेकींशीं टोंकांत मिळणाऱ्या उंचउंच कमानी व सर्वच गोष्टींचा थक्क करून सोडणारा मोठेपणा असें रोमन व गॉथिक दोन्ही प्रकारच्या शिल्पकलेचें मिश्रण यांत दृष्टीला पडतें.

याचें कारण पूर्व-गॉथिक लोकांचा अंमल उत्तरइतालीवर दोनतीन शतकें होता, हें होय. सहाव्या शतकांत व्हेरोना हें त्या लोकांच्या थेओडोरिक् राजाचें राजधानीचें ठिकाण होतें. यामुळें हें शिल्पकलांचें मिश्रण दिसून येतें. येथील मुख्य देऊळ जें दुओमो ( इं.डोम् ) त्याच्या दरवाजावरील कमानी ज्या तोरण-स्तम्भावर आहेत, त्यांवर नवव्या शतकांच्या आरंभींच्या फ्रांक् लोकांच्या बलाढ्य शार्लमॉं (इं. शार्लमेन्) राजाचे प्रसिद्ध वीर रोलंड व ऑलिव्हर यांचे कोरींव पुतळे आहेत. यांवरून नवव्या शतकानन्तरच्या फ्रांकांच्या अमलाचींहि कांहीं चिन्हें कशीं राहिलीं आहेत, हें दिसून येतें.

पण इतिहासांत याहिपलीकडे व्हेरोनाला नेऊन बसवणारें असें एक आरेना नांवाचें नाटकगृह येथें आहे. जुन्या इतालींतील प्रत्येक मोठ्या शहरांत हें आरेना नाटकगृह आपलें ठेवलेलेंच आहे. याचें कारण तुह्मी जाणलेंच असेल. रोमन व नंतर इतालियन लोक पशुयुद्ध ( ह्मणजे माजलेला बैल विरुद्ध सशस्त्र मनुष्य ) व द्वंद्वयुद्ध (ग्लाडियेटर् ) यांचे अत्यंत चहाते होते. त्यांनां पाहण्याला बसण्यासाठीं या लंबगोलाकृति आरेनाची योजना असे. ही इमारत दगडी असून बाहेरून शंसव्वाशें फूट उंच व आंतून पायऱ्यापायऱ्यांनीं उतरत जाऊन युद्धाच्या हौद्याभोंवतीं पांच फूट उंच अशी असे. या पायऱ्यांवर प्रेक्षक बसत व युद्ध पहात. हें आरेना वरून उघडें असे! येथील आरेना व्हित्तोरियो मानुएले चौकांत आहे. या लंबवर्तुळाकृति आरेनाचा एक व्यास पांचशें दहा फूट लांब व दुसरा चारशें दहा फूट लांब आहे. बाहेरील भिंतीची उंची एकशें दहा फूट आहे. येथून हौद्यापर्यंत उतरणाऱ्या पायऱ्या त्रेचाळीसचव्वेचाळीस आहेत. यावरून या इमारतीच्या भव्यपणाची कल्पना येईल. वीसपंचवीस हजार माणसांनां बसतां येण्याची सोय केली आहे. जुन्या भिंतींपैकीं फारच थोडा भाग कायम आहे. दगड कुरुंदवजा ढिसूळ असल्यानें असें झालें

असेल! सोळाव्या शतकापासून आरेना सतत डागडुजीनें कायम राखण्याची खटपट चालू आहे. सोबत कार्ड पाठविलें आहे त्यावरून कदाचित् कल्पना येईल. दोन्ही बाजूला दोन सज्जे दिसतात. येथें राजेरजवाडे–हुद्यांची माणसें बसत. एक अतिक्रूरांतला क्रूर खेळ पाहण्या-साठीं केवढा हा खटाटोप आणि व्यवस्था! एका काळीं सर्व यूरोपाला ज्यांनीं उच्च संस्कृति घालून दिली, त्या सुसंस्कृत रोमन-लोकांच्या नाजुक अभिरुचीला हें गालबोट होतेंच. हल्लीहि दक्षिण–फ्रान्स व स्पेनमध्ये असलीं पशुयुद्धें करवितात! आपलेकडेहि रेड्यांच्या झुंजा होतात, पण रेडा–माणसाची झुंज मीं तरी ऐकिली नाहीं. हें आरेना नाटकगृह इ० स० दोनशें नव्वदांत रोमन बादशहा दिओक्लेशन् याच्या अंमलाखालीं बांधलें गेलें.

शेवटीं व्हेरोनाविषयीं विशेष सांगायचें ह्मणजे शहराभोंवतीं असलेली भक्कम तटबंदी ही होय. भक्कम विटांची भिंत शहराभोंवतीं गेलेली असून तिला जागजागीं बुरूज आहेत भोंवतीं खंदक आहे. त्यांत आदिजे नदीचें पाणी सोडण्याची व्यवस्था केली आहे. नदी गांवांतून एकदोन वळणें घेऊन गेलेली असल्यामुळें दळणवळणासाठीं पांच चार पूल आहेत. पैकीं कांहींवर जातांयेतां दोन पै कर द्यावा लागतो. हे पूल कांहीं जुने नाहींत. हे त्यांची ' ग्यारिबाल्डी, उम्बरटो, नुओव्हा (नवा)' आदि नांवेंच सांगतात. भिंत मध्ययुगांतील स्कालाच्या अमदा-नींतली असावी.

याप्रमाणें पाहिलेलें तुह्मांला लिहिलें आहे. थोड्याशा तुटपुंज्या ल्याटिन्च्या व मार्गदर्शकाच्या (गाइड्बुक्) मदतीनें निभावतें. इता-लियन शब्दांचा व त्यांच्या ल्याटिन् मूळांचा संबंध कळला ह्मणजे ते तेव्हांच कळतात. शिवाय येथें जो तो दुभाषी ह्मणून प्रवाशांवर स्वतःला बळेंच लादण्याचा प्रयत्न करीत असतो, त्याला ' No thanks ' इतालियन ' बास्ता ' कसें ह्मणावें हें खूब घोकून ठेविलें आहे. स्टेशन,

गार्डा, रस्ता, खाणावळ, खोली, जेवणखाणादि नित्य व्यवहारांतले शब्द, व सांगणें, दाखविणें, देणें, करणें, येणें, जाणें, विनंति करणें, आभार मानणें इत्यादि नित्यक्रमांतलीं क्रियापदें हीं पाहून ठेविलीं आहेत. शिवाय आपली इच्छितवस्तु जी असेल तिचा वाचक शब्द व खुणा यांच्या सांगडीनें माणूस बरेंच रेटूं शकतें. अशा रीतीनें व्हेरोनास दोन दिवस गेले. येथून पुढें जरा जास्त समजूं लागून विशेष बरें चालेल, अशी आशा आहे. तसें झालें म्हणजे यांचें बोलणेंचालणें, स्वभावादींची कल्पना करतां येईल. सध्यां इतकें समजतें, कीं, संध्याकाळीं तो खुजा अष्टावक्र वर्तमानपत्र घेऊन रेस्टोरॉंमध्यें आला, कीं, सर्व चलबिचल होऊन जाते; ज्याला त्याला प्रथम तें आपल्या हातीं पडावेंसें वाटतें. आज एक वृद्ध गृहस्थ त्रिपोली युद्धाविषयीं खूब आवेशानें बोलत होते ! कीनोमध्येंहि युद्धांचीं व तुर्कांचें हास्य इतर करणारीं चित्रें दाखविलीं जातात, असें ऐकतों.

प्रकृति आतां चांगली आहे. पित्त बसलें; काळजी करूं नये. येथे दुपारीं आपल्याकडल्यासारखेंच चटचटीत ऊन पडतें; त्यांतल्यात्यांत हें पहा तें पहा असें फिरण्याचें याच वेळीं. कपडे नकोसे वाटतात. येथें एक बरें आहे, कीं, पाणी प्यायला मागितलें असतां, न सांगतां बर्फाचें पाणी मिळतें.

**व्हेनिस्**, १६ ऑगस्ट, १९१२

व्हेरोनाहून मंगळवारीं रवाना झालेलें पत्र व हें, दोन्हीं बरोबरच मिळतील. पत्रें काल पोस्टांत जाऊन घेऊन आलों; मजकूर कळला.

व्हेरोना ता. १३ ला सकाळीं सोडलें, व सव्वा तासांत पादुआला आलों. याचें नांव तुह्मांला ठाऊक असेल. मर्चंट् ऑफ् व्हेनिसमधला बनावट वकील, आपण पादुआहून आल्याचें सांगत होता असें मला वाटतें. हें शहर लहान आहे; व यूरोपियन प्रवाशांनां ( टूरिस्ट् ) आक-

षण करणारें कॉनसर्ट, मोठमोठ्या होटेलासारखें येथें फारसें दिसत नाहीं; ह्मणूनच कीं काय न कळे, मला साऱ्या शहरांत तीन प्रवासी भेटले; व तेहि इतालींतीलच एकाद्या कोपऱ्यांतले असावे असें वाटतें. त्यांपैकीं एकानें, काळा झगा घातलेल्या तरुण पाद्रानें ( Padre =पिता ! ) मला विचारलें, ‘ दोव्हेए इल्‌दुओमो ?–दोम नांवाचें देऊळ कोठें आहे ?’ मी देवळावरून आलों असल्यामुळें त्याला सिनिस्त्रा, दिरित्तो ( डावीकडे, व नाकासमोर ) वगैरे मोडक्या शब्दांत सांगितलें.

येथें महत्त्वाचें पहाण्यासारखें ह्मणजे तेराव्या शतकाच्या आरंभीं स्थापन झालेली व विद्वत्तेसाठीं लवकरच प्रसिद्धीला आलेली एक युनिव्हर्सिटी होय. इला येथें इल्‌ बो ( बैल ! ) असें नांव आहे ! कारण इच्या जुन्या इमारतीशेजारीं वृषभध्वज शौंडिकागृह ( बैलाची खूण असलेला दारूचा गुत्ता) होतें ! पंधराव्या व सोळाव्या शतकांत इची फार प्रसिद्धी होती. दूरदूरचे विद्यार्थी येथें शिकून जात. पैकीं ज्यांनीं येथें नांव मिळविलें त्यांचीं नामांकित चिन्हें (Coats of arms वगैरे) एका सुंदर चौकांत भिंतीवर लावलेलीं आहेत. यांपैकीं गालिलिओ हा तर इतालियनच होता. पण क्रॉमवेल व इतर कांहीं ओळखीचीं इंग्रजी नांवें पाहून मजा वाटली. याशिवाय बऱ्याचशा जुन्या इमारती, देवळें वगैरे येथें आहेत. पैकीं सान्तान्तोनिओचें मोठें, सुंदर व प्रसिद्ध आहे. आन्टोनिओ नांवाचा फिरस्ता पोर्तुगीज साधु येथें मरण पावला, त्याच्या स्मरणार्थ हें उभारलें आहे. डाव्या हाताच्या बाजूला एका सुंदर कमानींत वेदीमध्यें याच्या पायाचीं हाडें आहेत. हा नवसाला पावतो अशी ख्याती असून, त्याला वाहिलेल्या नानाप्रकारच्या जिनसा वेदीभोंवतीं ठेविल्या आहेत. खांबांचा सुबकपणा, वरील नक्षीचीं मथळीं, त्यांवर अर्धवर्तुळ कमानी अगर त्रिकोणाकृती हीं सर्व नव्या शिल्परीतीची ( रेनेसाँस ) साक्ष पटवतात. शिवाय दुसरीकडे एक मोठें न्यायमंदिर असून त्याला सालोने हें नांव आहे. यांत मोठमोठ्या सभा भरत असून निकाल सांगणाऱ्या न्याया-

धिशाला बसण्यासाठीं एक काळा दगड कोंपऱ्याच्या बाजूला आहे. 'शक्रस्य दिव्यासभा शतयोजनविस्तीर्णा' वगैरे पौराणिक वर्णनें आपण वाचतों, पण ही न्यायाधिशांची मानवी-सभासुद्धां ३००फूट लांब व १४० फूट रुंद, ८० फूट उंच अशा विस्तृत प्रमाणाची पाहून गोटे कवीसारखेंच कोणालाहि आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. या सभेंत एक लेख लिहिलेला आहे, त्यांत तेरिबीले ( इं. Terrible ) आतिला नांवाच्या हूण लोकांच्या राजानें इ. स. ४५२ सालीं हें त्या वेळीं भरभराटींत असलेलें शहर उध्वस्त करून टाकल्याचा उल्लेख आहे. याच हूण लोकांनीं चार पांच शतकांचे दरम्यान् आपल्या हिंदुस्तानांत विक्रमादित्याच्या हातून चोप खाल्ला आहे, हें तुह्मांला ठाऊक असेलच. इतर कांहीं नव्याजुन्या इमारती मीं पाहिल्या. १३०६ सालीं दान्ते ( Dante ) कवी येथेंहि कांहीं दिवस राहिला होता, तें घर दाखवतात; पण तें खाजगी मालकींत हल्लीं असल्यानें आंत प्रवेश होत नाहीं. मी दार उघडून आंत जाण्याच्या बेतांत होतों, तों देवडीवरील थिगळ्या-चाभारानें, 'कासा प्रिव्हाता, नियन्ते एन्त्राता ( हें खाजगी घर आहे, प्रवेश नाहीं! ) ह्मणून मला सांगितलें अशा तऱ्हेनें साडेपांच तास हिंडून हें शहर पाहिलें. येथें गालिलिओच्या स्मरणार्थ एक दगडी कमान, माझ्झिनींचें स्मारक, दान्तेच्या नांवाचा रस्ता, ग्यारिबाल्डीचें स्मारक वगैरे व्यवस्थित आहे. मला वाटतें कीं व्हित्तोरिओ मानुएले, माझ्झिनी, काव्हूर वगैरे देशोद्धारकांचीं स्मारकें व त्यांच्या नांवांचे रस्ते सर्व इतालीभर असावे. यांनीं भगीरथ प्रयत्नानें देशांत ऐक्य आणलें, तेव्हां लोकांनीं अशा रीतीनें त्यांचें स्मरण जागृत कां न ठेवावें ?

**व्हेनिस्.**

परत स्टेशनांत येतों तों पावसानें गांठलें—ही कृपाच ह्मणायची! थोडासा गार झालों, पण फारसा भिजलों नाहीं. साडेपांचांनंतर निघून

साडेसहांला व्हेनिस् गांठलें व्हेनिस् हें पाण्यांत वसलें आहे, हें तुह्मांला ठाऊक असेलच. पश्चिमेकडील द्वारकाच ही! फरक इतकाच, कीं, द्वारकेभोंवतीं पाणी असलें तरी गांवांत तरी तें नाहीं. येथें सर्व गांवभर पाणीच पाणी! मोठमोठे रस्ते ह्मणजे पाण्याचे कालवे. पैकीं मुख्य कालवा उलट्या एस्सारखा गांवांतून गेला आहे, त्याला ग्रांद्र कानाल् ह्मणतात. याचे शेंकडों फाटे गांवांतून वाहतात. त्यामुळें स्टेशनावरून गांवांत जायला छोट्या आगबोटी अगर व्हेनिसचे प्रसिद्ध वाहन गोन्दोला याशिवाय साधन नाहीं. या कानाल व कालव्यांशिवाय अर्थात् लहान-लहान रस्ते ठिकठिकाणीं आहेतच; ते लहानलहान पुलांनीं एकमेकांनां जोडले आहेत. असे पूल ३७८ आहेत! मुख्य कालव्यानें विभागलेल्या गांवाच्या दोन्ही भागांनां जोडणारा एकच मोठा पूल आहे, याला पोन्ते रिआल्तो ह्मणतात. याचेंहि नांव आपणांला शेक्सपीयरनें सांगितलेलें तुह्मांला आठवत असेलच. हा 'रिआल्तो' व त्या भोंवतींचा भाग हा मध्ययुगांत ह्मणजे १० पासून १५ व्या शतकापर्यंत व्हेनिसचें व्यापाराच्या नाक्याचें ठिकाण होतें.

माझ्यासारख्या नवख्या प्रवाशाला व्हेनिसच्या गोन्दोलांत एक प्रकारची मोहिनी आहे असें वाटतें व अर्थात् व्हेनिसला आल्याबरोबर आगबोटींतून स्वस्त दरानें गांवांत जाण्याचें टाकून तो गोन्दोलांतूनच जास्त पैसे देऊनहि जातो. असेंच मींहि केलें. या गोन्दोलांचा आकार मोठा मजेचा असतो. यांनां खालीं बुडाशीं पाणी कातरणारी धार नसून, त्याला फक्त बांक मात्र असतो. पुढली ½ बाजू व मागली थोडी मात्र धारेच्या असतात. पुढचें टोंक माशाच्या शेंपटीसारखें चकचकीत पोलादाचें असतें. बसायला मऊ काळ्या गाद्या असतात. वल्हवणारा कोळी मागच्या बाजूला मोकळा उभा असतो, व बाजूच्या खुंटीच्या अडाल्यानें एकाच वल्ह्यानें वल्हवितो. होडी छोट्या छोट्या कालव्यांतून वळव-



पोन्ते रिआल्तो ( इं. रिआल्टो ) व्हेनिस्.

ण्याचे कामांत यांची चतुराई वाखाणण्याजोगी असते. वळणाचे जागीं पलीकडे न दिसणारी दुसरी गोन्दोला असल्यास इशारा देण्यासाठीं यांच्या आरोळ्या मोठ्या विचित्र असतात! लहानलहान काल्व्यांतून गोन्दोला नेण्याला प्रयास पडत नाहींत; पण शहराच्या दुसऱ्या भागांत जाण्यासाठीं मोठ्या काल्व्यांत यावेंच लागतें. येथें पाण्याचा जोर फार आहे. माझ्या गोन्दोलावरील कोळी म्हातारा असल्यामुळें त्याला या काल्व्यांतून गोन्दोला पलीकडे नेण्यास बराच त्रास व वेळ लागला; त्या वेळीं त्याचें मला न समजणारें कातावणें मौज वाटण्यासारखें होतें! तो बिचारा त्रासून सगळें बळ खर्च करून गोन्दोला पुढें न्यायला पाही, इतक्यांत एकादी लाट थप्पड मारल्यासारखें तिला मागें सारी; या सगळ्यांत मला नवेपणाची मौज वाटत होती! काय मनुष्यस्वभाव हा! आपल्यासाठीं दुसरे श्रम करीत असतां त्यांना अडथळे आलेले पाहून आंत गादीला टेंकून बसणारांस मौज वाटावी! असो—असा विचार करूं लागलों तर सोशलिस्टाची दीक्षा घ्यावी लागेल!

अशा प्रकारें पाऊण तास गोन्दोलांत बसून साडेसात वाजतां या काव्हाल्लेत्तो हॉटेलांत बिऱ्हाड टेंकलें. हॉटेल चांगलें पहिल्या प्रतीचें व म्हणूनच महाग आहे, पण व्हेनिस येथील प्रसिद्ध सान्त मार्को चौक, मार्को देऊळ, व दोजेचे राजवाडे वगैरे पाहण्यासारख्या वस्तु एक छोटा पूल ओलांडला कीं पलीकडे आहेत, एवढेंच समाधान आहे. प्रथम गबाळें खुंटीला लावून उदरपूजा केली, व मग वहिवाटीप्रमाणें गांवाचें सिंहावलोकन करण्यासाठीं बाहेर पडलों.

मार्को चौकांत येतों, तों तेथील भव्यपणानें व थाटमाटानें डोळे दिपून गेले. हा पांचशें ऐशींवर फूट लांब असून पूर्व बाजूला दोनशें पंच्याहत्तर व पश्चिम बाजूला एकशें पंच्यायशी फूट रुंद आहे. पूर्व बाजूला कोंपऱ्यावर (पूर्वदक्षिण कोंपरा) काम्पानीले नांवाचा प्रचंड मनोरा

असल्यामुळें चौकाच्या रुंदींत विसंगतता न दिसून त्याला जास्तच शोभा आली आहे. तिन्ही बाजूंला सुंदर इमारती आहेत. या पूर्वी सरदारांच्या होत्या. आतां येथें प्रवाशाला लोभवणाऱ्या—दागिने, कांच, पुतळे, चित्रें आदि वस्तूंचीं दुकानें आहेत. पूर्व बाजूला एकटेंच सान्त मार्को नांवाचें प्रशस्त देऊळ आहे. हें व्हेनिस् व इतालींत अत्यंत नाणावलेल्या देवळांपैकीं एक आहे. याच्या बाजूलाच मार्को चौकाशीं काटकोन करणारा दुसरा एक लहानसा चौक दक्षिणोत्तर लांबीचा किनाऱ्यापावेतों गेला आहे. याच्या पूर्व ह्मणजे लांबीच्या एका बाजूला सान्त मार्कोला लागून पालाझ्झो दुगाले ह्मणजे डोजेचा राजवाडा आहे व लांबीच्या दुसऱ्या बाजूला पूर्वीच्या सुंदर सरकारी इमारती आहेत. ही दोन्ही चौकांची व त्यांवरील इमारतींची मांडणी मोठी अपूर्व साधली आहे. मी चौकांत आलों त्या वेळीं नऊ वाजून गेले असून प्रवासी पाहुणे मंडळी मोठ्या चौकांत खुर्च्या मांडून मद्य, कॉफी, अगर आइस् आवडीप्रमाणें घेत, दुकानांत चाललेलें गाणें अर्धेंमुर्धे ऐकत, गप्पा मारीत बसली होती. कांहींजण दुकानांपुढील पडव्यांतून हिंडत होते. पण बरीचशी गर्दी धाकट्या चौकांत व तेथून लागलेल्या किनाऱ्यावर होती. जगांतील बहुतेक भाषा येथें ऐकूं येत होत्या; त्यांत आश्चर्य व टीका वेळोवेळीं व्यक्त करून एका पौर्वात्य भाषेची मीं भर घातली! मधुनमधून दर्जाप्रमाणें निरनिराळा पोषाक केलेले इतालियन सैन्यांतील व आरमारांतील अधिकारी दृष्टीला पडत. पैकीं आरमारांतील वामनमूर्तींचा (सगळेच नव्हत; कोठें कोठें एकादा भीमदादाहि दिसे!) तो पांढरी टोपी—काळा गळ्यापर्यंत बटनांचा कोट, व पांढरी विजार असा पोषाक नीटनेटका व ऐटींत दिसे. पाहुणेमंडळींच्या—विशेषतः ईव्हाच्या मुलींच्या—पोषाकांत हवी तशी विचित्रता होती; पण त्यावरून त्यांचा देश ठरवणें शक्य नव्हतें. तो बांधा, हावभाव व भाषा यांवरून दिसे. कांठाशीं शेंकडों गोन्दोला

पाहुणेमंडळीच्या सेवेसाठीं दिवे लावून सज्ज केलेल्या, पाण्यांतील दोन उभ्या खांबांतून अडकविलेल्या दृष्टीला पडत. मधुनमधून मोटर बोटीचें तें एकाद्या शार्क माशासारखें उसळी मारणें व आपल्या कर्कश आरोळीनें कानटाळी बसविणें, मोठ्या आगबोटीचें संथ पण धडधड करीत पोहणें, व भोंकाड पसरल्यासारखें भोकणें यांनीं जशी किनाऱ्यावर तशीच पाण्यांत सारखी चळवळ चालली होती. पलीकडे लहान बेटांतून देवळांचे घुमट व मनोऱ्यांचीं शिखरें काळोखांतून अंधुक–उदास दिसत. असा विविध देखावा तास दोन तास पाहून परत आलों व जाळीच्या मच्छरदानींत गाढ झोंपीं गेलों. येथें घुंगुरटें डास फार आहेत; त्यासाठीं या मच्छरदाऱ्या असतात. तरी त्रास होतोच ह्मणतात. रात्रीं मला कांहीं भासलें नाहीं.

१४ आगस्ट, १९१२.

सकाळीं उठून प्रातर्विधि व फराळ उरकला. टिरोल प्रांताप्रमाणें येथेंहि लोणी–भाकरीबरोबर उत्तम पांढरा डोंगरी मध मिळतो. त्यावर ताव मारून कियाझा मार्को=मार्को देऊळ पाहण्यास निघालों. देवळाचा दर्शनी देखावा फारच सुबक आहे. मध्यें एक व दोहोंकडे दोनदोन असे पांच कमानी दरवाजे असून, त्या कमानी खालीं पांचपांच, सातसात शोभतील असे तांबड्या व पांढऱ्या दगडाचे खांब आहेत. मुख्य दरवाजावर लहानसा सज्जा आहे; त्यावर दोजे दोंदोलोनें १२०४ सालीं कॉन्स्टान्टिनोपलहून हिरावून आणलेले ब्रोन्झ धातूचे चार उत्तम घोडे आहेत. दरवाजावरील कमानींतून मोलवान् दगड, रंगीत सोनेरी कांचेचे खडे यांच्या जडावाच्या कामाचीं बायबलांतील चित्रें व वर्णनें मोठ्या कौशल्यानें बसविलीं आहेत. हें जडावाचें (Mosaic) काम सर्व देऊळभर छताला आहे. हें पूर्वेकडील कारागिरीच्या संसर्गाचें फळ होय. खांबांच्या आकृति व नक्षीहि पौर्वात्य आहेत. या दरवाजांतून आंत गेलें

ह्मणजे आधीं दोन ( समोरील व उत्तर बाजूचा ) सोपे लागतात. त्यांतून पुन: प्रत्यक्ष देवळांत जावयाला दारें आहेत. या दारांनीं आंत जाऊन, प्रचंड खांबांच्या आधारावर रचलेलें,एकामागें एक अशा तीन व बाजूच्या दोन घुमटांचें, जडावाच्या कामानें मढवलेलें, मोठमोठ्या पांच कमानींनीं जोडलेलें छत पाहिलें ह्मणजे विशालपणा, सौंदर्य व ऐश्वर्य या त्रिगुण-संपन्न कारागिरीनें प्रथम मन गोंधळून जातें; त्या गोंधळांतूनच आश्चर्य उत्पन्न होतें व शेवटीं अत्यंत आनंद होऊन मन शान्त होतें व तेथे रमतें !

दरवाजासमोरून मुख्य वेदीपर्यंत असलेला मधला भाग, त्याच्या शेजारीं पण खांबांच्या दोन रांगांनीं त्यापासून वेगळे केलेले दोन्ही-कडून दोन सोपे व या तिहींसहि काटकोन करणारा मुख्य वेदी व इतर लहान वेद्या वगैरेंचा भाग—असे ख्रिस्ती देवळाचे तीन भाग असतात.

या सर्व भागांचें एकमेकांशीं गोडपणें जुळणारें प्रमाण साधणें मोठें कठीण असतें. तें येथें उत्तम तऱ्हेनें साधलें आहे. सोप्यांचे व इतर देव-ळाच्या आंतबाहेर मिळून लहानमोठे पांचशेंच्यावर खांब या देवळांत आहेत. अर्थात् सर्व संगमरवरी. वेदीच्या समोर तिला मधल्या सोप्यापासून तोडणारा तांबडसर दगडाचा बराच उंच कठडा मोठा शोभिवंत दिसतो. यावर उत्तम मूर्तिकारांनीं ओतलेले ब्रोंझ धातूचे ख्रिस्त व संतमंड-ळींचे पुतळे उभे केलेले आहेत. दोनचार ब्रोन्झचे दिवेहि भव्य आहेत. वेदीवरील पवित्र सुळाच्या ( क्रॉस ) मागें शोभेसाठीं खांब असून त्यांवर कमान वगैरे रचना असते, व त्यापुढें उत्तम सोनेरी नक्षीचें तकट मांडलें आहे. यावरून नेहमीं पांघरूण असतें, व पाहणें असल्यास ५० चेन्तासिमि द्यावे लागतात. ( ५० चें०=½ शिलिंग—०।६ आणे सरासरी ) वेदीवरील घुमट मुख्य असून मोठा आहे. त्याचा डौल चांगला साधला आहे. तो आंतून क्रिस्ताच्या चरित्रांतील गोष्टीच्या—रंगाच्या

काचा-दगड-जडवून केलेल्या चित्रांनीं मढवला असल्यामुळें फार झगझगीत दिसतो. इतर घुमटहि प्रमाणशीर व चांगले आहेत. याप्रमाणें संगमरवर, ब्रोंझ, सोनें व जडाव यांच्या रेलचेलीनें देऊळ भव्य, सुंदर व संपन्न दिसतें. उजव्या सोप्यांत एका बाजूला एक लहानसें देवघर असून त्यांत प्रसिद्ध दोजे दोंदोलो-कीं ज्याच्या अमलांत व्हेनिसची भरभराट होऊन उत्तरइतालीपासून बायझान्टाइनपावेतोंचा मुलूख कांहीं अंशीं प्रत्यक्ष ताब्यांत व कांहीं अंशीं करभार देऊन स्वामित्व मान्य करणारा झाला होता-त्या दोंदोलोचें थडगें आहे व त्याच्या शेजारीं देवळांतील उपकरणें व इतर मौल्यवान् वस्तु ठेवण्याची जागा ( साग्रिस्टिया ) आहे.

हें देऊळ व्हेनिसच्या रक्षणकर्त्या साधूचें आहे, हें त्याचें नांवच सांगतें. त्याचीं हाडें नवव्या शतकांत अलेक्झांड्राहून या लोकांनीं आणून तें बांधण्यास सुरुवात केली. दहाव्या शतकांत तें एकदां जळालें असतां पुन: अकराव्या शतकांत बायझान्टाईन धर्तीवर बांधलें गेलें. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापावेतों हें देऊळ संस्थानच्या ताब्यांत असे. पुढे आर्चबिशप्च्या ताब्यांत आलें; असा याचा थोडक्यांत इतिहास आहे. याचें एवढें वर्णन केलें याचें कारण तें तसेंच अपूर्व आहे व शिवाय इतालियन देवळाची कल्पना तुह्मांला पुसटपुसट तरी यावी, हाहि हेतु आहेच.

सारा दिवसभर या देवळांत प्रवासी प्रेक्षकांची रीग लागलेली असते. ते जर मजसारखे जरा हेकेखोर असले, तर स्वत:ला प्रवासी-मार्गदर्शक ह्मणवणाऱ्या भटांच्या तडाक्यांतून सुटतात; नाहीं तर ही मंडळी कोडगेपणानें आपली मदत प्रवाशांवर लादतात, त्यांना बोलूनबोलून घाबरे करतात, व त्यांचे कळपचेकळप घाबऱ्याघाबऱ्या हिंडवून आणून पैसे उपटतात. हा एक येथें मोठा धंदाच झाला आहे. मी सज्जावर चढून फिरत असतांना असा दोनअडीचशें प्रवाशांचा

घोळकाच्याघोळकाच भोंवतीं घेऊन एक मार्गदर्शक देवळांत हिंडत होता. हा एवढा घोळका पण एका खांबाजवळ उभा राहिला असतां बिलकूल गर्दी वाटत नसे. यावरून देवळाच्या मोठेपणाची कल्पना सहज होईल.

नंतर दोजेचा राजवाडा पहावयाला गेलों. मध्यें मोठा चौक व भोंवतीं ही तिमजली इमारत आहे. भव्यपणा देवळाइतका नाहीं. सौंदर्य व ठाकठिकी अपूर्व आहे, याचें वर्णन तुह्मांवर लादूं इच्छित नाहीं. वरच्या मजल्यावर लोकनियुक्तांची सभा, सरदारांची सभा व एक खास दोजेची सभा अशा सभांना दिवाणखानेहि शोभेसे आहेत. या सर्वांत भिंतीवर तिझियान, तिन्तेरेतो वगैरे पंधराव्या शतकांतल्या प्रसिद्ध चितार्‍यांचीं चित्रें टांगलेलीं आहेत. यांवरून व पुतळे, खांब वगैरेच्या अप्रतिमपणावरून त्या वेळीं व्हेनिसमध्यें कलाकौशल्याची कशी समृद्धि असे, याची मूर्त कल्पना येते. दोजे याची न्यायकचेरी पाहिली, तेव्हां शेक्सपीयरच्या मर्चंट् ऑफ् व्हेनिसची आठवण झाली. तो कठोणहृदय मारवाड्याचाहि गुरु ज्यू, तो उदार व्यापारी अन्तोनियो, तो प्रेमपाशानें उल्लू झालेला बासानियो, व नवर्‍यासाठीं पुरुषवेषानें वकिली करणारी पोर्शिया, काल्पनिक असूनहि (शेक्सपीयरच्या गोष्टींत ऐतिहासिक कांहीं तरी अंश आहे कीं नाहीं याचें आपणांला कर्तव्य नाहीं) कोठेंकोठें उभीं असतील वगैरेची चांगली कल्पना मला आली. दोजेच्या राजवाड्याला तळघर आहे, यांत अंधार्‍या कोंदट खोल्या असून त्यांत राजकीय कैदी ठेवीत असत. नंतर पुढें ज्यांना हालहाल करून पुढें तेथेंच फांशीं द्यायचें ठरे, त्यांच्या खोल्या व फांसाचें ठिकाणहि शेजारींच आहे. अशा दुर्दैवी प्राण्यांचा दोजेच्या अवकृपेला बळी पडला ह्मणजे त्याच्या मृत्तिकेची गोंदोलमार्गें लपून समुद्राकडे रवानगी होत असे. वरच्या मजल्यावर भरपूर ऐश्वर्य—नाचरंग तमाशाची चैन उडत असतांच खालीं एकाद्या अभागी प्राण्यास कोंड-

मारा व जिवंत मरण मिळत असेल! कलाकौशल्याची भरभराट, शौर्य-वीर्यादि गुणांची सद्दी ज्या मध्ययुगांत होती, त्यांतच हे असले प्रकार होत असत! राजवाड्याच्या पलीकडेच एक मोठा तुरुंग आहे, व त्या दोहींनां जोडणारा प्रसिद्ध दुःखोच्छ्वासाचा पूल आहे. बायरन्, ब्रौनिंग्, आदि कवींनीं गाइलेल्याचें मीं काय वर्णन करावें! मीं तो अजून वर जाऊन पाहिला नाहीं. दोन सरकारी इमारतींमध्यें असल्यामुळें हा रह-दारीचा नाहीं, व ह्मणून यावर जाण्यास एक लिरा पडते.

यानंतर बरींचशीं इतर देवळें पाहिलीं. तींहि आपापल्या परीनें सुंदर आहेत व त्यांत सुद्धां प्रसिद्ध चितार्‍यांच्या तसबिरा आहेत. एकदां मार्को चौकापुढून बोटीनें मुख्य कालव्यांतून रिआल्टो पुलापर्यंत गेलों. यानेंहि गांवाची कल्पना चांगली आली. कानालच्या कांठीं दुतर्फा बरेचसे सुंदर वाडे आहेत. हे सरदारदरकार वगैरेचे नसून पांचचार शतकें ज्यांच्याकडे पूर्वेशीं व्यापाराचा मक्ताच जणूं होता अशा व्यापा-र्‍यांचे आहेत. कांहींकांहीं फारच सुरेख दिसतात. प्रत्येकाच्या पुढें गोंदोला उभी करण्यासाठीं रंगीत खांब रोवलेले असून त्यांपैकीं कांहींवर जुन्या घराण्यांचीं चिन्हें अगर अंक अजून दिसतात. यांपैकीं एकांत बरेच दिवसांपासून प्रसिद्ध चितार्‍यांच्या मुख्यमुख्य चित्रांचें म्यूझि-यम् आहे. बहुतेक चित्रांचा विषय अर्थात्च ख्रिस्त, मेरी, बायबलां-तल्या गोष्टी वगैरे आहे. सृष्टि-लेखन मुळींच नाहीं ह्मटलें असतां चालेल. पोर्ट्रेटपेंटिंगचेहि फारच थोडे मासले आहेत. या चित्रांपैकीं तिझियानोचें मेरीस्वर्गारोहण फार वाखाणलें जातें व तें खरोखर उत्तम आहे. तिन्तेरेटोचींहि चित्रें बरीं असतात. पण या गोष्टी तुह्मांला कंटाळवाण्या तर वाटत नाहींत ना? 'हे सगळे चांगले असतील, पण मला प्रत्यक्ष पहायला शक्य नाहीं तोंवर कोरडें वर्णन काय उपयोगी व त्यानें काय कल्पना यावी?' असें तुह्मांला वाटणें अगदीं साहजिक आहे, ह्मणून हें पुरे.

गांवाच्या पूर्वेला गलबतें–गोंदोला बांधण्याची जागा आहे. पूर्वी व्हेनिसची चलती असतांना येथून उत्तमउत्तम लढाऊ गलबतें बांधलीं जात. खुद्द व्हेनिसच्या पंचेचाळीस लढाऊ ग्यालीज व व्यापारासाठीं तीनशें मोठीं व तीन हजारांवर लहान जहाजें असत. यावरून त्या व्यापाराची कल्पना करावी. आतां व्हेनिसच्या आर्सेनालला पूर्वींइतकें महत्त्व राहिलें नाहीं. पंधराव्या शतकांत व्हेनिसच्या सत्तेचा व व्यापाराचा कळस झाला, त्या वेळचीं हीं जहाजें वगैरेची संख्या होय.

व्हेनिस तिसऱ्या शतकाच्या पूर्वीपासून इतिहासांत आढळतें. या शतकांत रोमन व व्हेनिशन लोकांचा सलोख्याचा तह झाला; व येथून पुढें विशेषत: उत्तरइतालीचा व तेथील रोमच्या सत्तेचा हूण लोकांनीं पांचव्या शतकांत सत्यानाश केला असतांहि, समुद्रांत बाजूला वसलें असल्यामुळें हूणांचीं विध्वंसक पावलें येथवर न पोचल्यामुळें–व्हेनिसची भरभराट होऊं लागली; व मुसलमानांशीं जीं धर्मयुद्धें ( क्रूसेडस् ) झालीं त्यामुळें पूर्वेशीं संघट्टन वाढून व्यापारहि वाढला. तेराव्या शतकाच्या आरंभीं दोदोला दोजेनें कान्स्तान्तिनोपल जिंकल्याचें वर आलेंच आहे. तेव्हांपासून ग्रीस व एशियामायनर हीं कांहीं दिवस व्हेनिसकडे होतीं. पुढें नव्या शोधांनीं व्यापार खालावूं लागला, व १४५३ त तुर्कांनीं कान्स्तान्तिनोपल घेतलें; येथून उतरते दिवस लागले. तरी व्हेनिस स्वतंत्र संस्थान होतेंच. पुढें सतराशें सत्याण्णवांत तें फ्रेंच लोकांना बळी पडलें, व नेपोलियननें ऑस्ट्रियाशीं केलेल्या तहांत तें तिकडे गेलें. अठराशें सहासष्टांत पुन: तें संयुक्त इतालींत सामिल केलें गेलें. असा व्हेनिसचा इतिहास आहे.

आतां व्हेनिसचें वैभव राहिलें नाहीं. पूर्ववैभवाचीं चिन्हें अजून सर्वभक्षक काळाशीं टक्कर देऊन कायम राहिलीं आहेत, व तीं आहेत तोंवर तरी व्हेनेशियनांना व माझ्यासारख्या प्रवाशाला त्या पूर्ववैभवाची मूर्त कल्पना येत राहील.

व्हेनिसला फ्यानसी काचेचे कारखाने आहेत; 'ते पहायला नेतों, चला' ह्मणून प्रवाशांना बळेंच ओढण्याचाहि प्रयत्न बरेच नीटनेटके पोषाक केलेले उडाणटप्पू लोक करतात. पण आतां व्हेनिस हें यात्रेच्या ठिकाणासारखें झालें असल्यामुळें येथें अक्षय गर्दी असते. समुद्रकांठावर हवा उन्हाळ्यांतहि सहन करतां येण्याजोगी असल्यामुळें व जवळील बेटांच्या किनाऱ्याला यथेच्छ स्नानसुख घेतां येत असल्यानें यूरोपिय पाहु-ण्यांची आगस्ट -आक्टोबरपर्यंत गर्दी अतोनात होते. याची मौज तीन प्रहरपासून रात्रीं आठपावेतों चांगली पहावयाला मिळते. या वेळीं पोंते डेला पालिया पुलावर उभें रहावें ह्मणजे माणसांच्या झुंडीच्या झुंड हातांत आंघोळीच्या कपड्याचे गांठोडें घेऊन माणसांची शीग लाग लेल्या जहाजांकडे धाव मारीत असतात. विजारीला सतरा ठिगळें गळ्याला नेकटाय कुठला मिळायला तिच्याऐवजीं काळें मळकट रंगीत फडकेंच गुंडाळलेलें अशा अवतारांपासून, तो करकरीत बूट—त्यां-वरून पायाचें मनगट किंचित् दिसून त्यावरचा रेशमी पायमोजा चम-कावा इतकीच लांब घडीची मधली रेघ बरोबर कायम असलेली विजार, गळ्याला स्वच्छ पांढरी कॉलर व वरती भपकेदार रंगाची खोट्या मोत्यांपोंवळ्याच्या पिनेनें बसवलेली टाय्, पोमेटम अगर कांहीं तरी वासाचें लावून भांग काढून केस तकतकीत केलेले, अशा सोकाजी-पर्यंत सर्व प्रकारचीं माणसें दिसतात.

स्त्रियांची मौज तर विचारूंच नये. यांतून शहांगीपणानें व रंग लावू-नहि तो न दिसूं देण्याच्या वस्तादगिरीनें फ्रेंच स्त्रिया, जरा ढोबळ व अतिशय फ्याशनेबल होण्याच्या व फ्रेंचांवर ताण करण्याच्या नादानें कांहींशा हास्यास्पद वाटणाऱ्या जर्मन बाया, ताठपणें चालत लोक ऐक-तील न ऐकतील याची फिकीरहि न करतां टीका करणाऱ्या इंग्रजी बाया, काळे डोळे, काळसर केस व रंगांत तांबूस छटा अशा इतालियन मुली, व अगदीं साधा पोषाक करून मोठी काळी पातळ लांब दशांची

शाल तिकोनी खांद्यावरून घेऊन तिचीं दोन टोंकें पुढें हातांत धरलेलीं व तिसरें पाठीवर टांचेपावेतों लोंबतें सोडलेलें अशा साध्या थाटाच्या खुद्द व्हेनिसच्या मुली, हे सगळे प्रकार जितके विविध तितके करमणूक करण्याजोगे दृष्टीला पडतात.

असो. आतां हात कंटाळला. उद्यां सकाळीं कदाचित् ब्रिज् ऑफ् साईज्वर जाऊन दुपारीं पुढें कूच करावें असा बेत आहे.

**व्हेनिस्**, १७ आगस्ट, १९१२.

काल पोस्टाची वेळ न चुकवण्यासाठीं घाईघाईनें पुरें करून रात्रीं दहा वाजतां टाकलेलें पत्र यापूर्वीं मिळेलच. तें पत्र टाकून मार्को चौकांत अतोनात गर्दी जमली होती, तींत मिसळलों. या चौकाला सबंध फरशी असून तीवर खुर्च्या टाकून मंडळी संध्याकाळपासून मध्यरात्र-पर्यंत खुशाल बसतात. जे जात्या थोडेसे चळवळे असतात, ते चौकांत इकडूनतिकडे फिरतात. कोणी भोंवतींच्या दागिने, काच, चित्रें वगैरे-दुकानांतून डोकावून तेथील सुंदर वस्तु विकत घेण्याचा इरादा नसला तरी निदान डोळ्यांखालीं घालतात. खुर्च्यांवर बसलेल्यांनां कांहीं तरी उद्योग पाहिजे असतो, तो भोंवतालचीं मद्य—थंडगार आइस्क्रीम वगैरेचीं दुकानें भरपूर पुरवितात. व्हेनिसच्या पाण्यांतल्या वस्तीमुळें येथें गाडीघोडे, मोटर सायकल्स् इत्यादिकांचें भय नसतें. मार्को चौकांत आठवड्यांतून तीनचार दिवस गाणें अगर गप्पा होत असतें, तसेंच कालहि होतें. हें ऐकून मोकळ्या हवेसाठीं मी धाकट्या चौकांतून किनाऱ्यावर गेलों. तों तेथें लांबून पाण्यांतून निरनिराळे स्वैरालाप ऐकूं येऊं लागले. सहजच कान व लक्ष्य तिकडे वेधलें व पाण्यावरील अंधुक प्रकाशांत नजर फेंकतों तों दोनचार ठिकाणीं तरते दिव्यांचे समुदाय दृष्टीला पडले, व त्यांतून गायन ऐकूं येऊं लागलें. हें चौकांतील गाण्याप्रमाणें कर्ण्यांचें वगैरे नमून या गाणारांपुढें नोटेशन्चीं पुस्तकेंहि नसावींसें

दिसलें. निसर्गानें दिलेल्या मधुर कंठांतले स्वैरालापच ते होते हें सहज कळे. पुरुष व बायका मिळून कांहीं वेळ, तर प्रत्येकजण वेगळें कांहीं वेळ, असा ललकाऱ्या मारण्याचा सपाटा चालला होता. किनाऱ्यावरील मनुष्यांची गर्दी व विजेचा लखलखाट आणि पाण्यावरील एकाददुसऱ्या बोटीच्या कंदिलामुळें ताऱ्यासारखा दुरून मिणमिण करणारा अंधुक प्रकाश, थोड्या बोटी व हे तरते दिवे खेरीजकरून साधारण निर्जनपणा, या विरोधाचा मनावर फार परिणाम होई. त्यांतच तें गाणें ऐकूं येऊं लागलें ह्मणजे गंभीरपणा व उदासीनतेची छटा यांनीं रंगलेला आनंद मनाला होई. असें लांकडी तक्ट (पेटें) पाण्यावर तरतें सोडून त्यावर दिव्यांची आरास करून पाण्यांत दूरवर अंधारांत गाण्याचा या लोकांचा प्रघात फार जुना दिसतो. अशा रात्रींच्या एकांतांतील व सृष्टीच्या निकट सान्निध्यांतील गाण्याला सेरेनाता (इं. सेरेनेड) ह्मणतात. हीं सेरेनाता पहात व ऐकत चांगला मध्यरात्रपर्यंत मी गार हवेंत उभा राहिलों, व त्यामुळें दिवसा भटकण्यानें आलेला थकवा जाऊन फारच नामी हुषारी आली. अशा सेरेनाता कधींकधीं मोठ्या प्रमाणावर करतात. त्यांनां आरंभ रिआल्तो पुलापासून होतो व त्या पाण्यावरून संथपणें तरत जागजागीं थांबून गायन करीतकरीत इकडे धाकट्या चौकापुढें किनाऱ्यावर रात्रीं १२-१ च्या सुमाराला येतात. या जेथें जेथें थबकतील तेथें तेथें लांब काठ्यांवर हवयांसारखे तोटे लावून उजेड करण्यांत येतो; तेव्हां मोठी मौज दिसते. अशी मोठी 'सेरेनाता' गेल्या बुधवारीं निघाली होती, तीहि मी पाहून आलों. इतालियन लोक गायनप्रिय आहेत, अशी प्रसिद्धि आहे. याचा अर्थ इतर ठिकाणीं गायन नाहीं असा नाहीं. पण ज्यांनां खरोखरी लोक ही संज्ञा देतां येईल, असा कोणत्याहि देशांतील मोठा वर्ग (इंग्रजींत ज्याला 'तिसरा वर्ग' ह्मणतात.) तो गायनप्रिय व पटु सर्वच देशांत असतो असें नाहीं. इतालींत तो तसा आहे, हा विशेष होय.

नंतर व्हेनिस् सोडण्याच्या दिवशीं शनिवारीं सकाळी पुराणवस्तु-संग्रहालय राजवाड्यांतच आहे, तें पहायला गेलों. ही जागा पूर्वी दोजेची खाजगी राहण्याची होती. त्यामुळें तींतील दिवाणखान्यांचें सोनेरी मुलाम्याच्या नक्षीचें छत पाहण्यासारखें आहे. एकांत भिंतीवर जगाचे नकाशे आहेत. पैकीं यूरोपचा साधारणतः हल्लींसारखाच आहे, आफ्रिकाहि उत्तरबाजूनें जशी पाहिजे तशीच आहे. पण दक्षिण-आफ्रिका, आशिया हे रंगवण्यांत मात्र कल्पनेवर सारा हवाला दिलेला दिसतो, व त्या वेळचीं दळणवळणाचीं साधनें, भूगोलाची माहिती आजच्या इतकी असणें शक्य नाहीं हें पाहतां,हे नकाशे अगदींच टाकाऊ वाटत नाहींत. दुसऱ्या खोल्यांतून जुने पुतळे वगैरे चित्रकाम ठेविलें आहे. त्यांत अलेक्झांडर दि ग्रेट, पांपेई, आन्तोनिओ ( इं. मार्क अंटनी ), औगुस्तुस् ( इं. ऑगस्टस ), नेरो, गाल्बा, काराकाला वगैरे माझ्या कानांवरून गेलेल्या क्रिस्तशकाच्या पूर्वी व आरंभीं होऊन गेलेल्या वीरांचे व बादशहांचे छातीपर्यंतचे पुतळे पाहून मौज वाटली. यांतच कांहीं प्रसिद्ध रोमन स्त्रिया व पौराणिक देवता आणि वीर यांचेहि पुतळे होते. येथेच बाजूला एका जिन्यांत प्रसिद्ध चितारी टिझ्झि-आन् याचें प्रसिद्ध चित्र असलेलें मला बेडकरावरून कळलें होतें. पण जिन्याचें दार लोटलेलें असल्यामुळें जरा संशयांत होतों. इतक्यांत म्यूझियम्मधील रक्षकानें चटकन् पुढें होऊन दार उघडलें व हें टिझ्झि-आन्चें चित्र, त्याचें शेवटचें, वगैरे चर्पटपंजरी सुरू केली. मीं त्याकडे लक्ष्य पुरविलें नाहीं. कारण आपली मदत बळेंच मजवर लादून दक्षिणा उपटण्याचा त्याचा विचार आहे, हें मीं प्रथमच ओळखलें. म्यूझियम्, राजवाडे, देवळांतील खजिना वगैरेंतील सेवकमाणसें अशा युक्त्या करून पैसे फार काढतात. प्रवासी जो व्हेनिसला येतो, तो आपल्या-साठींच खिसा भरून घेऊन येतो, अशी यांची पक्की खात्री असते !

याचप्रमाणें कोठूनहि कांहीं पाहून बाहेर पडलें, का, दुसऱ्या एका प्रकारची भिक्षुक मंडळी व्हेनिसला पदोपदीं नव्या प्रवशास हटकते. येथें कांचेचे व मण्यांच्या वगैरे जडावाचे कांहीं कारखाने आहेत. तेव्हां हे पाहण्याला प्रत्येक प्रवासी हापापलेला असणारच, असें समजून बरीच झकपक पोषाक केलेली तरुण उनाड मंडळी आडवी येऊन 'Do you want to see the mosaic factory, sir. Very nice, free of charge, I shall take you to it!' वगैरे इंग्रजी सूत्र गातात. त्यानें काम नाहीं झालें तर फ्रेंच, नाहीं तर जर्मन बडबडतात. दोनचार भाषांत 'नाहीं, नको' वगैरे ह्मणावें तरी हे पाठ सोडीतच नाहींत! स्वयंसेवक–मार्गदर्शकाशिवाय हा एक ताप व्हेनिसला जबर होतो. इतालियनशिवाय फ्रेंच, इंग्लिश, जर्मन यांपैकीं कोणत्या तरी दोन भाषा—व त्या दोन्हीपैकीं एक फ्रेंच नियमानें असते—या लोकांनां येतात हें त्या त्या देशांतल्या प्रवास करणारांचें दुर्भाग्यच ह्मणायचें!

असाच आणखी एक प्रकार ह्मणजे किनाऱ्यावर गोंदोलावाल्या कोळ्यांचा. एका जागीं उभें रहावें ह्मणजे शंभरजण विचरून जातात! मात्र यांनां द्याव्या लागलेल्या पैशाचा कांहीं तरी मोबदला मिळतो. नंतर मार्कोचौकांत दुपारीं दिवस कलल्यावर उभें राहिलें असतां क्यामेरा वगैरे फोटोग्राफीसामानाचें गवाळें बगलेंत मारलेले लोक दृष्टीस पडतात; व त्यांनां अर्थात् कोणी ना कोणी तरी गिऱ्हाइक मिळतेंच! या चौकांत पारवे फार आहेत; त्यांनां मक्याचे दाणे टाकून ते टिपतात कसे, हें पाहत बसण्याची एक करमणूक उत्तरेकडील पाहुणे लोकांनां नवी व ह्मणूनच अतिप्रिय असते. त्यांतल्या त्यांत तरुणींनां आपल्या हातांतून पारव्यांनीं दाणे खावे अशी फार हौस असते. ह्मणून तासचे तास हातांत दाणे घेऊन ताटकळत त्या उभ्या असतात, व त्यांच्या हातांवर पारवे बसले ह्मणजे त्यांचे चहाते तरुण मित्र त्यांचा तसा फोटो

काढवतात. फोटॉग्रफरला उद्योग व पाहुण्यांनां करमणूक अशा दोन्हीहि गोष्टी साधतात. शिवाय असें उभें राहिलें असतां सर्वांची नजर आपणाकडे वळते—या पोकळ गर्वाचा आनंद त्या तरुणींनां होतो तो निराळाच! या चौकांतील पारव्यांस पूर्वीं सरकारी खर्चानें दाणे घालीत असत ह्मणतात! याला भूतदया ह्मणावें कीं पोरकट हौस ह्मणावें! आपल्या पुण्यालाहि राजधानीच्या दिवसांत सरकारी खबूतरें असत, त्याची साक्ष खबूतरखाना हें नांव अजून पटवतें, हें तुह्मांला ठाऊक असेलच.

याप्रमाणें व्हेनिसला पुष्कळ पहायला सांपडलें. त्यांत विविधपणा असल्यानें फार करमणूक झाली. दोन वेळां मात्र वाईट वाटलें. एक राजकीय कैद्यांचा तुरुंग पहाते वेळीं, व एक म्यूझियममधून छोट्या कालव्यापलीकडच्या दुसऱ्या तुरुंगाला जोडणारा 'पोंते देइ सोस्पिरी-उसाश्यांचा पूल' (इं. ब्रिज ऑफ साइज) पाहतांना. एकीकडे सर्व विलासांनीं परिपूर्ण असा राजवाडा व दुसरीकडे मध्यें थोडें पाण्याचें अंतर असलेला हालअपेष्टांचें माहेरघरच असा बंदिखाना, यांनां सांधणारा हा पूल असल्यामुळें कष्टदायक विचार मनांत येतात. याचें नांव असें कां पडलें, सांगतां येत नाहीं. पण एकीकडे स्वर्गसुख व दुसरीकडे नरकयातना यांच्यामध्यें हा असल्यामुळेंहि असूं शकेल. सहृदय दोजे असेल तर या पुलावर (हा वरून झांकलेला असून, दोन्ही बाजूंकडे पाहण्यासाठीं जाळ्या आहेत. त्यांतून पुढील पाणी व मागील शहर हीं दिसतात. पण बाहेरच्यांस पुलावरील माणूस दिसत नाहीं) उभा असतांना पलीकडील कैद्यांचे दुःखाचे निःश्वास ऐकून त्यालाहि दुःखाचा सुस्कारा टाकणें अपरिहार्य होत असेल. ह्मणूनहि याला सुस्काऱ्याचा पूल हें नांव पडलें असावें. कसेंहि असो. यावर उभें राहिलें असतां आनंद मात्र खास वाटत नाहीं. सुखदुःखाच्या विचारांत कवींची प्रतिभाशक्ति सारखीच व्यक्त होते, या न्यायानें बायरन् कवीनें या पुलासंबंधीं कविता केल्या हें उचितच होय.

शेवटीं शनिवारीं दुपारीं एक वाजतां व्हेनिस् सोडलें. येथील चारपांच दिवसांच्या मुक्कामांत खोटें नाणें पदरीं बांधण्याचा दोन वेळ प्रयत्न झाला. पैकीं एका वेळीं त्यांत सांपडलों; पण दहा फ्रेंच सांतीमचीच (एक आणा) ती बाब होती. दुसऱ्या वेळीं सावध राहून बेल्ज्यन चांदीचें नाणें कोणी देऊं लागतांच नाकारलें. तें कांहीं खोटें नव्हतें; पण इटालींत–निदान मध्यइटालींत तरी तें घेत नाहींत. गेल्या शतकांत फ्रान्स्, बेल्ज्यम्, स्वित्सरलंड्, इटाली व ग्रीस् यांची नाण्याच्या बाबतींत जी 'ल्याटिन् यूनियन्' ह्मणून अस्तित्वांत आली, तीमुळें या देशांचें सोन्याचें व मोठें रुप्याचें नाणें एकमेकांत चालतें; पण चिल्हर कोणी घेत नाहींत. शिवाय १८६३ सालापूर्वीचें कोणतेंहि जुनें नाणें हल्लीं रद्द झालें आहे. हीं सर्व नवख्या प्रवाशांवर लादण्याचा प्रयत्न होतो, हें सांगणें नकोच. जरा जपावें लागतें एवढेंच. इतर देशांत–निदान जर्मनी–इंग्लंडांत तरी–असें होत नसल्यामुळें तिकडच्या प्रवाशांनां नाणें तपासून घेण्याची नवी सवय होईतों प्रयास पडतात!

व्हेनिसकडे पूर्वेकडील लोक–निदान् आपल्याकडील तरी फारसे येत नसावे, असें वाटतें; व कारणहि नाहीं. त्यामुळेंच मला एका कॉफीगृहांत मी अल्जेरीनो (अल्जेरियन्) का ह्मणून एका गृहस्थानें विचारिलें. मीं त्याला इन्दियानो ह्मणून उत्तर दिलें; दुसऱ्या एकाला मी जपानी असावा अशी शंका वाटत होती. बरें झालें, कीं तुर्क अशी कोणाला शंका आली नाहीं! नाहीं तर गोंधळच व्हायचा. पण आपण आपल्या शत्रूला जसें क्वचित जाणतों तसें मित्रालाहि कचित्‌च ओळखूं, या न्यायानें तशा शंकेचे कारणच नव्हतें.

स्टेशनावर जाण्याला हॉटेलाची गोन्दोला–आम्निबुस् होती. हिला खरें ह्मटलें असतां गोन्दोला नांवच शोभत नाहीं. इतकी ही बोजड व विचित्र असते. मजबरोबर आणखी दोन पाहुणे होते. छोट्या कालव्यांचा मार्ग अडला असल्यामुळें आह्मांला रिआल्टोपुलापासून मोठ्या

काळव्यांतून जावें लागलें; यामुळें हा वरचा भाग पुनः चांगला पहायला सांपडला. वाटेने दोन्हीं बाजूंनीं पूर्ववत् मोठमोठे सुंदर वाडे दृष्टीला पडले. एक वाडा नेहमी तुर्कांच्या वहिवाटींत असे, तो आतां अर्थात् बंद आहे. असे कांहीं कांहीं अजून सरदारी घराण्यांत आहेत. पण बहुतेकांत दुकानें वगैरे वसलीं आहेत. हा काळाचा महिमा!

हिंवाळ्यांत उत्तरेपेक्षां व्हेनिसला थंडी कमी ह्मणून–कारण हें ४४ उत्तरल्याटिटयूडवर आहे–व उन्हाळ्यांत समुद्रकांठामुळें फार प्रखर हवा नसून जलक्रीडेची अपूर्व सोय येथें आहे ह्मणून, सारें वर्षभर येथें पाहुण्यांची गर्दी असते. टिरोलांतील वगैरे इतर ठिकाणीं सध्यां सेझॉं नव्हता ह्मणून मी लिहिलें होतें; पण व्हेनिसचा सेझॉं सदासर्वकाळ! त्यामुळें होटेलें नेहमीं भरलेलीं व नेहमीं महाग! पण शाकाहार करणाराला व्हेनिस येथें–व सर्व इटालीभरहि उत्तरेकडे नसणारी सोय आहे. येथें आपल्या शेवया वगैरेसारखें 'माकेरॉनी' ह्मणून एक खाद्य फार प्रसिद्ध आहे. हें चवदार असून पौष्टिकंहि आहे. मांसाहारी लोक याचा जेवणाच्या आरंभीं पिण्याच्या पेजेसारखा (इं.सूप) उपयोग करतात. याचे वाटोळे, लांबोळे, चौकोनी वगैरे शंभर प्रकार असतात; सगळेच चांगले असून, केव्हांहि व कोठेहि तयार करून मिळतात. असो.

व्हेनिस सोडून फिरून पादुआला आलों. दुसऱ्या गाडीनें पुढें जायचें ह्मणून मधल्या दोनचार तासांत गांवांत 'दुओमो' देऊळ पहायचें राहिलें होतें, तिकडे गेलों, व उन्हाची वेळ त्या शांत निरामय ठिकाणीं काढिली.

फ्लॉरेन्स, २० ऑगस्ट, १९१२.

पादुआहून बोलोना (लोकभाषेंत बोलोन्या–इं. बोलोन) ला सरळ मार्ग होता. पण लाइपझिकहून समुच्चय–तिकिटें घेतांना व्हेरोना




'कनाल ग्रांदे' ( इं. ग्रँड कॅनाल ), व्हेनिस्.

बोलोन्या असें घेतलें गेलें ! त्यामुळें नाइलाजास्तव एक रात्र (ता. १७ची) व्हेरोनाला काढावी लागून दुसऱ्या दिवशीं सकाळीं बोलोन्याकडे निघालों. हा रस्ता मान्तुआ, मोडेनावरून आहे. मान्तुआला उतरून व्हर्जिल कवीचा कांहीं अवशेष असल्यास पहावा, असें मनांत होतें. पण पादुआ-व्हेरोनांत फाजील दिवस मोडल्या कारणानें व मला नियमित वेळेला रोम येथें माझे मित्र रा. × × × यांना त्यांच्या परतमार्गावर भेटण्याचें असल्यानें, व्हर्जिलच्या वांट्याला दिवस आला नाहीं. या चार तासांच्या प्रवासांत आपल्या महाराष्ट्राची बरेच वेळ आठवण झाली. मकेचीं शेतेंच्या शेतें, ओळखीचीं निंब-सुरू आदि झाडें, रस्त्याच्या कडेला दिसणारीं तरवडासारखीं झुडपें व देवनळ, आणि मधून कांहीं पाणी असलेल्या, तर कांहीं सीना नदीप्रमाणें ठणठणीत कोरड्या नद्या, ओढे वगैरे गोष्टींत बरेचसें सादृश्य होतें. मध्येंच एकादा कालवाहि लागे. मान्तुआ मागें टाकल्यावर आपल्या दक्षिणेकडील एकाद्या नदी सारख्या-विस्तीर्ण-वालुकामय पात्राची पो नदी ओलांडली; व दोहोंच्या सुमाराला बोलोन्याला दाखल झालों.

ता. १८ आगस्ट, १९१२.

स्टेशनपुढून निघणाऱ्या व्हिया देल इन्दिपेन्देंझा ( इटालीच्या स्वातंत्र्याचा रस्त्या ) ने कमानींनीं झांकलेल्या पायरस्त्यावरून सरळ गेलें ह्मणजे शहरांतील व्यवहारादीचें केन्द्रस्थान असे. नेत्तून आणि व्हित्तोरिओ एमानुएले हे चौक एकमेकांशीं काटकोन केलेले असे लागतात. येथेच या शहरच्या प्रसिद्ध इमारतींपैकीं कांहीं आहेत. पैकीं एक 'पालाझ्झो कोमुनाले' ह्मणून गॉथिक शिल्परीतीनें बांधलेली विटेबंदी इमारत आहे. यांतील दोन्ही दिवाणखाने प्रशस्त आहेत व त्यांत भिंतीवर तेरावा पोप ग्रेगरी याच्या आयुष्यांतील कांहीं प्रसंग रंगविले आहेत. एकांत मध्यभागीं दाराच्या दोन्ही बाजूंनां दोन

जाहीरनामे संगमरवरी शिळेवर खोदून बसवलेले दृष्टीला पडतांच मीं ते मुद्दाम वाचले. इतालियन भाषेंत आहेत, तरी ठोकळ अर्थ लावतां आला. एक फ्रान्सच्या तिसऱ्या नेपोलियननें 'मिलानो' ( इं. मिलन ) हून काढलेला आहे. इतालीला ऑस्ट्रियाच्या तडाख्यांतून सुटण्यास व संयुक्त होण्यास यानें मदत केली आहे. या जाहीरनाम्यांत त्यानें इतालियन लोकांचे व व्हित्तोरिओचे गुण गाऊन त्यांस प्रोत्साहन दिलें आहे. दुसरा व्हित्तोरिओच्या आज्ञेवरून काव्हूर् मंत्र्यानें तोरिनो-( इं. टयुरिन् ) हून२९ एप्रिल१८५९रोजीं काढलेला आहे. त्यांत ऑस्ट्रियाच्या आगळिकीचें थोडक्यांत वर्णन करून आपल्या शिपायांनां व सर्व लोकांनां देशासाठीं झटण्यास सांगितलें आहे. त्यांतील शेवटचें वाक्य मोठें बाणेदार आहे. 'इतालियन स्वातंत्र्याचा पहिला शिपाई (वीर) ह्मणवून घेण्यापेक्षां माझी दुसरी कोणतीहि महत्त्वाकांक्षा नाहीं !' ( 'यो नोन् ओ आल्तेरा आम्बिसिओने के केल्ला दि एसेरे इल् प्रीमो सोल्दातो देल् इन्दिपेन्देन्झा इतालियाना.' ) या वाड्याच्या दरवाजावर मोठ्या कमानींत पोप ग्रेगोरिओ तेरावा याचा पुतळा आहे. याची जन्मभूमि बोलोन्या. आपण १५८० त एवढ्या पदाला चढून त्यानें या शहराला भूषण दिलें !

याच चौकांत दक्षिणबाजूला एमानुएलच्या पुतळ्यासमोर सांत् पेत्रोनियो नांवाचें निव्वळ विटेबंदी देऊळ आहे. याला चौदाव्या शतकाअखेर बांधण्याला आरंभ होऊन, सोळाव्या शतकांतहि काम पुरें न झाल्याचें कारण, इर्षेस पेटून या इमारतीच्या प्रमाणांत धरलेला अवाढव्यपणा होय. इतर क्रिश्चनदेवळांप्रमाणें यांतहि दोन्ही सोप्यांत मुख्य वेदीपावेतों कमानींतून देव्हारे आहेत व त्यांत मेरी येशू इत्यादिकांचीं चित्रें अगर पुतळे आहेत. मुख्य गाभाऱ्यावर १५३० सालीं सातव्या क्लेमन्स् पोपनें स्पेनचा राजा कार्ल् याला राज्याभिषेक केला, त्या ठिकाणीं एक छत्रासारखें स्मारक आहे. मी आजवर पाहिलेल्या कॅथो-

लिक देवळांत मला असें दिसलें, कीं, मुख्य गाभाऱ्याशिवाय आणखी एक कोणत्यातरी बाजूचा मेरीचा गाभारा विशेष पूजला जाऊन, त्यापुढें गुडघे टेंकून जपत बसलेले लोक हमेशा दृष्टीला पडतात. तसेंच या देवळांतहि होतें. विशेषत: तो रविवार असल्यामुळें गाभाऱ्यांत व समोरील बाकांवर बरीच गर्दी जमली होती. पांच वाजतांची वेळ पूजेबिजेची होती मला वाटतें; ह्मणून एक बटु-बडवे-काळा झगा, पांढरी कमरेपर्यंत पडणारी झालर घालून घंटा व बायबल घेऊन या गाभाऱ्यांत गेला, व मंत्र-तंत्र मोठ्यानें पुटपुटूं लागला. या गुणगुणण्यानेंच माझें लक्ष्य तिकडे वेधलें. मुंबईला बाबुलनाथाच्या देवळांत श्रावणी सोमवारीं गेलें असतां एका दिडकीचा बेल दर्शन घेणारांस बळेंच पाजणारीं गुजराथी भटांचीं मुलें जशीं हेल काढून, गडबडत 'कैलासगौरं' वगैरे श्लोक बडबडत असतात, तसा मला प्रथम भास होऊन मी तिकडे वळलों. तो कांहीं ह्मणे, मागून भाविक मंडळी री ओढीत; नंतर तो एकादी ओळ हेल काढून ह्मटल्यासारखें करी; कांहीं वेळानें हातांतली घंटा वाजवून बायबलांतील मंत्र वाची; इत्यादि तालीम बराच वेळ चालली होती. मीं तितका भाविक नसल्यामुळें लवकर तेथून पाय काढला व बोलोन्यांतील आणखी जुनीं प्रसिद्ध देवळें व इमारती पहायला गेलों. कांहीं वाड्यांत आंत शिरतांच प्रथम सहाआठ खांबी दुमजली चौक फार सुबक आहेत. पैकीं एकांत मी बराच वेळ उभा राहिलों. खांबांचें काम फारच नाजूक व गोड होतें. नंतर डॉमिनिकन्स नांवाच्या भिक्षुक पंथाच्या स्थापकाच्या नांवाचें सान्तदोमेनिको देऊळ पाहिलें. इताली देश अजून सबंध क्याथोलिक आहे व तेथें चवदापंधराव्या शतकांत निरनिराळ्या साधूंनीं जे पंथ स्थापन केले ते अजून तसेच जय्यत आहेत. तसा हा एक दोमेनिकोचा पंथ होय. हेंही देऊळ आंतून सुरेख आहे. पाल्यांतील ( इं. आइल-मुख्य वेदीपासून दारापर्यंतचे दोन सोपे ) एका कमानींत दोमेनिकोची समाधि आहे. त्यावरील संगमरवरी

पुतळ्यांत एका देवदूताचा पुतळा मिकेल आञ्जेलोचा आहे (१४९४). याचें नांव तुमच्या ऐकिवांत असेल. पंधराव्या शतकांत इतालींत होऊन गेलेल्या प्रसिद्ध चित्रकार व मूर्तिकारांपैकीं पहिला हा होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. याचीं उत्तमउत्तम कामें फ्लॉरेन्स् येथें आहेत. तें पाहून मुख्य गाभाऱ्याच्या बाजूला साक्रिस्टीं (पवित्र खजिन्याची खोली) तून गुण गुण गुण गुण आवाज ऐकूं येऊं लागला ह्मणून डोकावलें; तों दोन ओळींत समोरासमोर बसलेले सहा भिक्षु बायबलाचा पाठ करीत असतांना दिसले. यांचा पोषाक सर्वांग पांढरा, डोई मुंडलेली, व तीवरून पदरासारखें वेष्टन—असा अवतार आपल्याकडील धावळी नेसलेल्या सोंवळ्यांतल्या बायकांसारखा दिसला, व थोडी मौज वाटली. परमेश्वराच्या या अनन्यभक्तांविषयीं थट्टेचे विचार आणखी येऊं नयेत, ह्मणून मीं तेथून पाय काढला व माझिनी, गारिबाल्डी, कावूर वगैरेंचे पुतळे, आणखी देवळें व इमारती पहात-पहात फिरलों. एका चौकांत येथील युनिव्हर्सिटींतील 'लुइजी गाल-व्हानी' नामक प्रोफेसराचा पुतळा पाहून इंटरमीजिएटमध्यें चांगल्या न समजलेल्या गाल्व्हानोमिटर्‌ची आठवण झाली. अठराव्या शतकांतील गाल्व्हनायझिंगचा संशोधक हा गृहस्थ होय. पूर्वीं ११, १२ व १३ या शतकांत रोमन कायद्याविषयीं येथील युनिव्हर्सिटीची फार प्रसिद्धि होती. नंतर गांवच्या एका जुन्या चौकांत विटांचे दोन उंचच उंच साधे मनोरे पाहिले. हे दोन्ही किंचित् कलले आहेत. मोठा ३२० वर फूट उंच असून तीनचार फूट कलला आहे. धाकटा १५० फूट उंचीचा तर आठ फूट कलता आहे! हीं दोन्हीं बाराव्या शतकाच्या आरंभीं उभारलेलीं बोलोन्याचीं चिन्हें होत. शहराभोंवतीं जुनी विटेबंदी भिंत तेराव्या शतकांतली आहे. इचा आकार विचित्र षट्कोनी आहे. विटेबंदी वाडे, विटांचे मनोरे व भिंत हीं बोलोन्यामध्यें आल्याबरोबर ठळकपणें नजरेला येतात.

नेत्तून चौकाला हें नांव पडण्याचें कारण नेत्तून व जलदेवता यांच्या ब्रॉंझ् पुतळ्यांनीं शोभविलेलें कारंजें यांत आहे. येथें रविवारीं संध्याकाळीं सगळा गांव दृष्टीला पडतो, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सुटीचा दिवस असल्यामुळें सकाळीं चांगले पोषाक करून आप्तमित्रांच्या भेटी घेणें, दुपारीं कोठें तरी बागेंत वगैरे करमणूक करणें व संध्याकाळीं अशा मोठ्या चौकांत मुलांबाळांसह कोठें तरी होटेल अगर रिस्टोरांत जेवणें असा सर्व यूरोपभर मधल्या दर्जाच्या लोकांचा रिवाज असतो. तें येथेंहि दृष्टीला पडलें. लहानमोठीं कुटुंबेंच्या कुटुंबें जातांयेतां दृष्टीला पडत. पुष्कळ तरुण, चैनी लोक बिरारिया, अमेरिकन्–इतालियन बार नांवाच्या बीयर व दारू आदींच्या छपरकीत गुऱ्यांत व गुऱ्याबाहेर भररस्त्यांत खुर्च्या टाकून गप्पा मारीत बसलेले दृष्टीला पडतात. दिवसाचे नित्य व्यवहार सर्व संपले ह्मणजे रात्रीचे दोनतीन तास बारा वाजेतों अशा रीतीनें रमवण्याचा इकडील लोकांचा प्रघात आहे. एकाद्या फशानेबल बिरारियामध्यें संगीत जलसा असतो. शिवाय चिनो ( इं. सिनेमा; जर्मन–कीनो अगर किन्तोप् ) ही एक स्वस्तांतली करमणूक गरीब व श्रीमंत सगळ्यांनां सारखीच आहे.

ता. १९.

याप्रमाणें गांव नजरेखालीं घालून दुसऱ्या दिवशीं चित्रशाळा पहायला गेलों. इतालियन चित्रकलेची जगभर ख्याति आहे, तेव्हां ती जेथें जेथें पहायला मिळेल, तेथें सोडायचें नाहीं, असा निश्चय केला आहे. येथील चित्रशाळेला 'आकादेमिया दि बेले आर्ति' ह्मणतात; हें नांव इतर ठिकाणींहि आहे. खालच्या मजल्यांत इतर शहरीं असलेल्या प्रसिद्ध पुतळ्यांच्या गिप्स्–मातींत केलेल्या प्रतिकृति आहेत, त्या शुष्क वाटल्या. वरच्या मजल्यावर पक्क्या तेली रंगाचीं चित्रें होतीं. प्रथम खुद्द बोलोन्यांतील चितार्‍यांचीं सतरा व अठरा शतकांतलीं चित्रें आहेत. बहु-

तेक बायबलांतील कथांविषयीं असून, कांहीं इतर सृष्टिसौंदर्य, व मेदींची घराण्यांतील कांहीं प्रसिद्ध स्त्रीपुरुषांचीं आहेत. त्यांत मनांत भरण्याजोगीं सिसिलींतील स्त्रीशिपाई, वनांत-नदीवर स्नानाला सिद्ध झालेली तरुण स्त्री, हीं आहेत. पण मुख्य पहाण्यालायक चित्रें पांच मोठ्या खोल्यांत लावलीं आहेत. ग्वीडो रेनी याच्या बऱ्याचशा नाणावलेल्या चित्रांपैकीं फिलिस्टर लोकांवर जय मिळवलेल्या सामसन्चें चित्र मला आवडलें. (ज्यू लोकांच्या पुराणांतील सामसन् हा बलभीम होय. आपल्या जटायूचें बळ जसें पंखांत होतें—पक्ष्याचें बळ पंखांत ही गोष्ट कांहीं निसर्गाला सोडून नाहीं—तसें याचें शेंडींत होतें! याची बायको डेलिला इनें तो निजला असतां ती कापून टाकली वगैरे कथा आहे.) दुसरें एक बेथलेहेम् येथील मुलांच्या कत्तलीच्या पौराणिक कथेचेंहि—तो क्रूर व करुणास्पद देखावा हुबेहुब डोळ्यांपुढें भासवणारें चित्र आहे. त्या नृशंस ज्यू-मांगांच्या तडाक्यांतून आपलीं लेंकरें वांचवूं पाहणाऱ्या आयांचे भयभीत व करुणा भाकणारे चेहरे कंसानें गांजलेल्या देवकीला साजण्यासारखे आहेत. हा रेनी हिंदु असता तर खचित् तो पौराणिक देखावा त्यानें जिवंत करून दाखविला असता! या पुढच्या दोन खोल्यांत जेसू, मेरी व संतमंडळ यांच्या तसबिरा साधारणच आहेत. पण या सर्व चित्रशाळेचें रत्न, व बोलोन्याला खचित शोभा आणणारें असें प्रसिद्ध राफाएल् याचें 'सांता चेचिलिया' (इं. सेंट सेसीलिया) चें चित्र होय. क्रिस्तधर्मांत सां. चेचीलिया ही गायन-वादन कलेची अधिष्ठात्री मानली गेलेली आहे. त्याला अनुलक्षून हें चित्र आहे. तिचें आरगेल वाजवणें ऐकण्यांत तल्लीन झालेले पेतर, योहान्, माग्‌डालेनादि चार साधू भोंवती उभे असून, ही स्वतःही त्या कलेच्या ब्रह्मानंदांत आकाशाकडे पहात आहे, असा देखावा आहे. वर मेघांत देवदूत तिच्या वादनाला गाण्याची साथ देत आहेत. अतिशय सुंदर, प्रेमळ, गोड, पाहिल्याबरोबर पूज्यभाव उत्पन्न करणारा चेहरा, त्यावर



'सान्ता चेचिलिया'-बोलोना, (इं. सेन्ट सेसिलिया).

मूर्तिमंत शांति, व स्वर्गीय सुख हीं झळकत आहेत; उभें राहण्यांत, एकंदर ठेवणींत ठेपराई व सौम्यपणा—या सर्वांमुळें हें चित्र वर्णनाच्या पलीकडे आहे! असें हें राफाएलनें १५१६ च्या सुमाराला रेखलेलें अपूर्व चित्र पाहतांना मनाला अप्रतिम आनंद होई; पण डोळ्यांचें समाधान होत नसे. एकादें अपूर्व प्रतिभाशक्ति व्यक्त करणारें काव्य जसें तीनतीनदां वाचावेंसें वाटतें, तसें हें चित्र तीनतीनदां पहावेंसें वाटे. इतर चित्रें पहावीं, पुढें जावें, पुनः ही शान्ता पहायला यावें असें माझें राहूनराहून होई. एकादी परिस्थिति व एकादा भाव काव्य-रूपी शब्दांत व्यक्त करणें जितकें बिकट आहे, तितकेंच रंगांनीं त्या गोष्टी चित्रपटावर दाखविणेंहि बिकट आहे, असें मला वाटतें, व दोहीं-सहि प्रतिभाशक्तीची सारखीच आवश्यकता आहे. प्रतिभेवांचून काव्य जसें पानचट, तसें प्रतिभेवांचून चित्र ह्मणजेहि व्यर्थच होय. असो. याच्यासमोर पीएत्रो पेरूजिनो यांचें माडोना (इं. मेरी) हें चित्र चांगल्यापैकीं आहे. पुढल्या खोलींत फ्रांचेस्को फ्रान्शिया नांवाच्या बोलोन्यांतील चिताऱ्याचें 'अनुन्तिसयात्स्योन्-आकाशवाणी' (मेरीला कांहीं दिवस गेले असतां देवदूतानें तुझ्या पोटीं धर्मसंस्थापक पुत्र होईल, असें सांगितलें होतें—तो समय) हें चित्र चांगलें आहे. कौशल्येला शोभेल अशी शांति व गांभीर्य माडोनाच्या चेहऱ्यावर एकवटलेलीं दिसतात. असो. ही चित्रशाळा पाहून १५।१६ शतकांतील इतालियन चित्रकलेची बरीशी कल्पना आली.

## राव्हेना.

नंतर दुपारीं बोलोन्या सोडून जरा बाजूला आग्नेयी दिशेला समुद्रा-जवळील राव्हेना शहरीं आलों. हें फारसें टूरिस्टांच्या टप्प्यांतलें नाहीं. तरी कांहीं वर्षें इतालीची राजधानी येथें होती. रोमन सत्तेचा राहू गॉथ राजा थेओडोरिक् यानें येथें राज्य केलें व शिवाय फ्लॉरेन्सहून

हद्दपार केलेल्या दान्तेचीं हाडें शेवटीं येथें पडलीं. या सर्व गोष्टींनीं मला तिकडे नेलें.

हें शहर लहान आहे, पण भोंवतीं जुनी भिंत, दरवाजे, कांहीं मोठीं विटेबंदी देवळें व पडकळीस आलेले वाडे याच्या पांचव्या शतकांतील ऐश्वर्याची साक्ष पटवतात. इ. स. ४०२साली साम्राज्याची राजधानी येथें आली, व त्या वेळीं राव्हेना व्हेनिससारखेंच नद्यांच्या खाड्यांच्या तोंडांत, पाण्याच्या मध्यभागीं असल्यामुळें, हूण, वाण्डाल वगैरे लोकांनीं उत्तर व मध्यइतालींत जो धुमाकूळ माजविला होता त्यापासून अलिप्त राहिलें. ४५० पूर्वींचीं कांहीं वर्षें गाला प्लाचिडिया नांवाच्या स्त्रीनें आपल्या मुलाच्या अज्ञानपणांत राज्य केलें; तिची समाधि अजून आहे. हींत छताला जडावाचें काम फारच सुरेख व जुनें आहे. पुढें या शतकाच्या शेवटीं पूर्व-गॉथ लोकांचा कान्स्तान्तिनोपल येथें वाढलेला राजा थेओडोरिक् यानें स्वारी करून पूर्वींच्या राजाला पदच्युत केलें व आपण राज्य केलें ( इ. स. ४९३-५२६ ). याचेंहि लक्ष्य शहराच्या भरभराटीकडे असल्यामुळें राव्हेनाची चलतीच रहात गेली. यानें समुद्रकांठीं स्वतःसाठीं राजवाडा बांधविण्यास आरंभ केला होता, तो हल्लीं मोडक्या स्थितींत आहे; व समुद्रहि राजा मेल्यामुळेंच जणूं ५।६ मैल लांब पळून गेला आहे. आतां राव्हेनाला समुद्राशीं जोडणारा एक कालवा मात्र आहे. या थेओडोरिक्‌नें स्वतःसाठीं बांधवलेली अगदीं साधी पण भक्कम दगडी दुमजली समाधि आहे. खालचा षट्कोनी मजला अर्धा जमिनींत आहे. आंत प्रतिध्वनि मजेचा होतो. लहानशा जुन्या महादेवाच्या देवळाप्रमाणें भास होतो. पुढें बादशहा युस्टिनियानुस ( इं. जस्टीनियन्—याचे कायदे माझ्या वेळीं पहिल्या एल्. एल्. बी. वाल्यांनां पाठ करावे लागत असत ! ) यानें गॉथ् लोकांनां पिटाळून लावल्यावर राव्हेना येथील राजधानी उठली. तेव्हांपासून हें एकाद्या मोठ्या तालुक्याच्या ठिकाणासारखें झालें आहे. व तसेंच

स्वरूप हल्लीं आहे. उदाहरणार्थ, तितकाच गचाळपणा, रस्त्याच्या मध्यभागांतून सांडपाण्याच्या मोऱ्या वाहणें, डासांची समृद्धि वगैरे आपल्या एकाद्या तालुक्याच्या ठिकाणाला शोभेलसें आहे. पीयाझा व्हित्तोरिओ, दान्तेच्या समाधीचें ठिकाण, व माझिनी रस्त्यावर बायरन् रहात असे तो वाडा (हल्लीं यांत होटेल आहे) हीं मात्र बरीं स्वच्छ व रमणीय आहेत. दान्ते या ठिकाणीं १३२१ त मरण पावला.

असो. एक रात्र तेथें डासांच्या खाईत—अस्वच्छतेंत काढून ता. २० ला सकाळींच राव्हेना सोडलें; व ६ तासांच्या उन्हाच्या त्रासांत प्रवास करून फ्लॉरेन्स येथें दाखल झालों.

फ्लॉरेन्स—(होटेल नोरडीनि).

फ्लॉरेन्स येथें दाखल झाल्यावर टाकलेलें पत्र मिळेलच. राव्हेनाहून इकडे येतांना आपेनाईन् पर्वत ओलांडावा लागला. बोलोन्याहून सरळ गेलों असतों तर त्याच्या बाजूबाजूनें जावें लागलें असतें. इकडल्या मार्गानें गाडी घाटांतून जायची असल्यामुळें बोगदे, पूल, नद्या व डोंगरांवरील वनश्री यांनीं बरीच करमणूक झाली. मात्र या मार्गी मेलसर्व्हिस् मुळींच नसल्यानें जरा रखडत यावें लागलें, इतकेंच काय तें! शिवाय माझ्या डब्यावर 'व्हियेतातो दि फमारे' म्हणून लिहिलें असतांहि विड्या, चिरूट ओढणें, डब्यांतच थुंकून बुटानें पुसून टाकणें वगैरे अमंगळपणानें डोकें उठे. इकडे हा अमंगळपणा फार. रस्त्यावर कोठेंहि थुंकण्याची तर कोणाला किळसच वाटत नाहीं. असो. अपेनाईन्सच्याच पायथ्याच्या टेंकड्यांत तळवटाशीं वसलेलें शहर गाडी पांचचार मैल दूर असतांच दिसूं लागलें होतें. आर्नो नदीहि दिसे. ही गांवामधून गेली आहे.

स्टेशनांतून उतरल्याबरोबर पंढरपुराला जसे उपाध्ये यात्रेकऱ्यांची ओढाताण करतात, तसाच कांहींसा प्रकार येथें झाला. कोणी इतालियन,

कोणी फ्रेंच, इंग्रजी, जर्मन—अशा निरनिराळ्या भाषांत ‘ अमकें होटेल चांगलें आहे, तेथें नेतों चला’ अशी भिक्षुकी करूं लागले. चांगले-पणाची खूण काय, तर तेथें उत्तम इतालियन दारू जेवतांना मिळते ! अर्थात्च या कोणालाहि भीक न घालतां मी रीतीप्रमाणें बेडेकरांत पाहून ठेवलेल्या होटेलाचा रस्ता धरला व येथें आलों. हें होटेल गांवाच्या मध्यभागीं दुओमो नांवाच्या मुख्य देवळाजवळ आहे. येथें पांचचार दिवस रहायचें असल्यामुळें आल्याबरोबर पान्स्योन् ( खाणें व रहाणें सर्व ) ची बोली करून टाकली; त्यामुळें फार स्वस्त ह्मणजे रोजीं सात लिरा पडतात. यांत मात्र दारू नाहीं हो ! यांत अगदीं टाकल्यावेळीं जेवायला यावें लागतें, ही गैरसोय आहे. ज्याला दिवस-भर भटकायचें त्याला असलें गुंतणें जुळत नाहीं, पण इतर सोयी पाहतां हेंच मला बरें वाटतें.

गबाळें खुंटीला लावून बाहेर पडलों. तेव्हां शहरच्या मोठेपणाची, दळणवळणाची, व्यवहाराची कल्पना आली. लाइप्झिक्, म्यूनिच वगैरे नंतर व्हेरोना, पादुआ हीं खेडीं वाटत. व्हेनिसला पाण्यावरली वस्ती अस-ल्यानें गाडी—घोडे, ट्राम—मोटर हीं मोठ्या यूरोपीय शहराला अवश्य अशीं दळणवळणाचीं साधनें तेथें नाहींत. शहर पाहिल्यावर एखाद्या बंदराचा भास मनाला होतो. पण फ्लॉरेन्स येथें दुओमो चौकांत जातांक्षणींच, इकडून ट्राम, तिकडून मोटर, मागून सायकल्स, पुढून घोड्यांच्या गाड्या अशी एकच गर्दी उडून राहिलेली पाहिली. ही पांच वाजण्याची वेळ होती. ‘कियाजा दुओमो’ उघडें पाहून आंत जाण्याचा विचार केला. याचा दर्शनी देखावा फार भव्य आहे. मुख्य दरवाजापासून लांब, जरा कोंपऱ्याला उभें रहावें ह्मणजे पुढील उंच दरवाज्याची बाजू, सोप्यांची लांबीची बाजू, व मध्यभागावरील मोठा थोरला घुमट हीं सर्व दिसून यांच्या मोठ्या प्रमाणाची कल्पना येते. व्हेरोना येथील मोठें देऊळ पाहून आश्चर्य वाटत होतें. त्यावर व्हेनिस् येथील मार्को देवळाच्या

भव्यपणानें विरजण घातलें. त्याहीपेक्षां मोठा दुओमो 'पेत्रोनिओ' नांवाचा बलोन्या येथें पाहिला; याची लांबी तनिशेंनव्वद फूट आहे. या सर्वांवर येथील दुओमोनें ताण केली आहे. याची लांबी ५६३-४ फूट, रुंदी ३४६ फूट व शिखराची उंची ३५६ फूट आहे! पुढील काम निरनिराळ्या रंगांच्या संगमरवराचें असून, तिन्ही दरवाजे ब्रॉंझच्या नक्षीचे आहेत. आंत गेलें ह्मणजे मात्र प्रथम अंधारामुळें कांहीं दिसत नाहीं, हा यांत दोष आहे. शिवाय यांतील सोपे अलंकारादि शोभेवांचून कामानी व त्यांतील देव्हारे यांविरहित बुचे दिसतात. मुख्य गाभाऱ्यावरहि मार्कोसारखें सुबक कामानें आलेलें सौंदर्य व ऐश्वर्यहि येथें शोधून देखील सांपडत नाहीं. मागल्या बाजूला मिकेल आंजेलो याचा क्रिस्त-मरणाचा अपुरा राहिलेला पुतळा आहे. एकंदरींत या देवळाचा गुण ह्मणजे अप्रतिम भव्यपणा होय. शेंसवाशें वर्षें याचें काम चालून अखेरीला १४३६ त वास्तुशांति झाली. यांत सोप्यांतील भिंतीवर अंधारांत दांते कवीचें मोठें चित्र आहे; शिवाय गांवाच्या पूर्वबाजूला सां. क्रोचे नांवाच्या देवळापुढील चौकांत याचा एक भव्य पुतळा अलीकडे उभारलेला आहे. त्याच्या नांवाचा रस्ता देखील आहे. पण व्हेरोना, पादुआ व राव्हेना शहरें जोंवर आहेत, तेथील दांतेच्या राहत्या घरामुळें व परंपरागत आलेल्या त्याच्या हद्दपारीच्या स्मरणामुळें, फ्लॉरेन्स शहरानें आपल्या प्रसिद्ध कवीला हांकून दिलें होतें, ही गोष्ट जोंवर कायम आहे, तोंवर कितीहि पुतळे उभारिले तरी काय उपयोग? त्यानें आपल्या 'दिव्हिना कोमेदिया-डिव्हाइन् कॉमेडी'मध्यें वर्णन केलेल्या पारादीजो स्वर्गांत जर कोठें तो असेल, तर त्याला बारिकसें हंसूं आल्यावांचून रहाणार नाहीं. तसेंच गालिलिओचें. येथील प्रसिद्ध चित्रशाळेंत (हिला 'गालेरिआ देइ उफिची' ह्मणतात) त्याचें चित्र आहे. सां. क्रोचे देवळांत त्याच्या स्मरणार्थ संगमरवरी समाधि सोप्यांत बांधली आहे. पण या सगळ्यानें त्याच्या झालेल्या छळावर पाणी पडणें शक्य नाहीं! 'लोक' या नांवानें प्रसिद्ध

असलेल्या सहस्त्रशीर्ष पुरुषाचें असेंच आहे; त्याला न पटणाऱ्या खऱ्याहि गोष्टी हट्टानें कोणी सांगूं लागल्यास तो त्याचा असाच छळ करितो. याचें आणखी एक उदाहरण जिरोलामो साव्होनारोला नांवाचा डॉमिनिकन पंथी पुरुष हा होय. रोमच्या सद्दीच्या दिवसांत फ्लॉरेन्स् फार ऐकिवांत नसले, तरी पुढें तेराव्या शतकाच्या सुमाराला व्यापार वगैरेनें तें चांगलें उदयास येऊन, येथें लोकसत्ताक राज्यपद्धति पडली होती. पण पुढें भांडणें होऊन सर्व सत्ता मेदिची नांवाच्या श्रीमंत घराण्याच्या ताब्यांत १४३४ त गेली. या कुलांतला लोरेन्झो दि मेदिची नांवाचा प्रसिद्ध मुत्सद्दी, कवि व गुणिजनांचा पुरस्कर्ता ह्मणून इतिहासांत इ० स० १४६९-९२ प्रसिद्ध असलेला पुरुष तुमच्या ऐकिवांत असेल. त्याच्या अमलात फ्लॉरेन्सची व्यापार, कलाकौशल्य वगैरेंत अतिशय भरभराट झाली होती. पण तो मारतांच मेदिची घराणें अवरंगजेबानंतरच्या मोंगल घराण्याप्रमाणें डळमळूं लागलें व लोकसत्ताक पद्धतीनें पुन: उठाव केला. या वेळीं साव्होनारोलानें लोकांचीं मनें तयार करून मेदिचीचे जूं झुगारून देण्याला मदत केली. पण राजकीय सुधारणे-बरोबरच नैतिक शुद्धता लोकांत यावी ह्मणून तो खटपट करूं लागताच लोकांनीं त्याला मुख्य चौकांत जिवंत जाळलें! हल्लीं त्या ठिकाणीं संगमरवरी शिलालेख आहे. त्यांचीं चित्रें व पुतळेहि अर्थात् आहेतच. हे सर्व पाहून तुकारामानें जनावर कोरडे उडविले आहेत त्यांची आठवण होते व त्याच्या वचनांची सत्यता पटते.

नंतर गांवाच्या पूर्वोत्तर भागांत फिरलों. येथें आनुन्सियाता व मार्को हे चौक पाहण्यासारखे आहेत. दोहींतहि त्या त्या नांवाचीं बरींचशीं देवळें आहेत. पैकीं आनुन्सियाता हें श्रीमंत असल्यामुळें आंतील छताची सोनेरी नक्षी पाहण्यासारखी आहे. पुढल्या चौसोपी चौकांत भिंतीवर कच्च्या रंगाचीं बायबलांतील प्रसंगाचीं चित्रें चांगलीं आहेत. नंतर किंचित् पश्चिमदक्षिणेकडे व्हिया काव्हूर रस्त्यानें वळलों. यावर




' कॅथीड्रल् 'चा दर्शनी देखावा, फ्लॉरेन्स्.

मेदिचींचा एक भक्कम दगडी राजवाडा आहे. मला फक्त दर्शनी चौक, यांतील मोठमोठ्या कमानी व खांब, व बाजूनें जागजागीं ठेवलेले पुतळे हेंच पहायला मिळालें; कारण पाहण्यासारख्या सर्व ठिकाणांचीं दारें चार वाचतांच बंद होतात. कांहीं देवळें मात्र संध्याकाळ पावेतों उघडीं असतात. तेथेंच जवळ माझ्या ठिकाणापासून दोन मिनिटांवर मेदिचींनीं आपल्या खर्चानें बांधविलेलें सां. लोरेन्झो नांवाचें देऊळ आहे. इतर देवळांच्या रीतीप्रमाणें हेंहि आहे. हें बांधण्यास मिकेल आंजेलो, दोनातेलो, ब्रुनेलेशीसारखे प्रसिद्ध कारागीर लाविलेले होते. पैकीं पहिल्याची ख्याति सर्व यूरोपभर आहे. हा मोठे वाडे व देवळें बांधणारा कारागीर पहिल्या प्रतीचा मूर्तिकार व तसाच चित्रकारहि होता. यानें या देवळाला जोडून मेदिचींच्या समाधीसाठीं एक सुंदर गाभारा बांधलेला प्रख्यात आहे; पण तोहि त्या वेळीं बंदच होता. नंतर मी दुओमोकडे परत येऊन किंचित् दक्षिणेला आर्नोच्या उजव्या तीराकडे वळलों. वाटेंत दिवसा व्यवहार व संध्याकाळीं शिळोप्याचें केंद्रस्थान जो एमानुएले चौक त्यांत आलों. पूर्वींहि हा चौक व्यापाराचें ठिकाण असे; पण अलीकडे, मध्यें व्हिक्तोरियोचा पुतळा, मागें फ्लॉरेन्स इतालींत ऐक्य पावल्याची कमान व भोंवतीं नव्या मोठ्या इमारती असें स्वरूप त्याला आलें आहे. तेथून सान्त मिकेले नांवाच्या लहानशा देवळा (ओरातोरिउम्)कडे वळलों. याच्या दरवाजांचें काम सुबक आहे व चारी बाजूला मार्को, ज्योवानी (इ. Marks, John) आदि साधूंचे पुतळे आहेत. तेथून फ्लॉरेन्सच्या प्रसिद्ध 'सिञोरी' चौकांत आलों. यांत पूर्वींच्या संस्थानिक, सरदारांचे वाडे, सभागृहें आहेत ह्मणून यास सिञोरी असें नांव आहे. याची आकृति गोमुखीसारखी असून, तिच्या आंतील कोंपऱ्यावर सुंदर नेप्तून कारंजें आहे. याच्या भोंवतीं संध्याकाळीं बरेचसे रिकामटेकडे लोक जमत असतात. कार्डें, मोझेक्, दान्ते, बियात्रीचे (इ. डान्टे, बियाट्रीस) यांचीं धातूचीं पदकें वगैरे विकणारे फेरीवाले नवख्या माण-

साला त्रास देण्याला सज्ज असतातच. यांतच आणखी 'इतक्या लीरेला सर्व शहर दाखवून आणतों,' ह्मणून प्रवाशाच्या थेट आंगावर गाडी हांकणाऱ्या तांगेवाल्यांची भर पडते ! इतक्यांनां नको ह्मणायचाहि कंटाळा येत असे, ह्मणून मग नकारार्थी छडी उजव्या बाजूनें डोक्यापर्यंत नेण्याचा क्रम सुरू केला. या चौकाच्या पश्चिम व उत्तरबाजूला इतर इमारती असून बाकी राजवाडे आहेत. पैकी व्हेक्कियो राजवाडा (वृद्धांचा वाडा) प्रसिद्ध आहे. याच्या दर्शनी-चौकांतील उंच खांबांवर नक्षीकाम फार सुबक आहे, व चौकांत सुंदरसें कारंजें—गोड लहान मूल माशाला चेंपून त्यांतून पाणी काढीत आहे असें दाखविणारें—फार नामांकित आहे. याच्या दाराशीं पूर्वी मिकेल आंजेलोचा प्रसिद्ध दाविद (इं. डेव्हिड्) चा अजस्रपुतळा होता. आतां तो म्यूझियममध्यें गेला असून त्याचे जागीं त्याचीच गिप्सची प्रतिकृति आहे. दाराच्या दुसऱ्या बाजूकडे आंजेलोच्या प्रतिस्पर्ध्याचा हर्क्युलिसचा पुतळा आहे. चौकाच्या गोमुखीच्या दक्षिणबाजूला 'लोज्जिया लान्झी' ह्मणून भला प्रशस्त उघडा दिवाणखाना आहे. लोकांनां पाहतां येण्यासारखे मोठमोठे दरबारी समारंभ यांत पूर्वी होत असत. आतां तेथें कांहीं अप्रतिम पुतळे आहेत. पैकीं एक कुस्तीचा, दुसरा रोमन वीर साबाइन स्त्रीला बळानें नवऱ्याच्या हातून ओढून नेतो आहे—हा ऐतिहासिक प्रसंग दाखविणारा, दोनचार रोमन व ज्यांला हे लोक बारबारी (अडाणी, रानटी; जो रोमन नाहीं तो 'बारबरां'त गणला जात असे!) ह्मणत त्या स्त्रियांचे डोळ्यांत उडून बसण्यासारखे पुतळे आहेत. या लोज्जियाच्या व नेप्तून कारंज्याच्या समोर मध्यभागीं वर सांगितलेल्या साव्हानोरोलाच्या अग्निकाष्ठभक्षणाची जागा आहे ! लोज्जिया व व्हेक्किओ राजवाडा यांच्यामधील नदीपात्रेतोंच्या रस्त्यावर दोन्ही बाजूंला वाडे आहेत, ते शेवटीं नदीजवळ एकमेकांनां एका पाखयानें जोडले आहेत. पैकीं एकांत वरच्या मजल्यावर येथील जगत्प्रसिद्ध

'उफिझी ग्यालरी' (चित्रशाळा) आहे. इत्यादि गोष्टी नजरेखालीं घालून पत्रांचा शोध करून, तीं न मिळाल्याच्या निराशेंत घरीं परत आलों. हीं गेल्या शनिवारीं लाइप्झिक्‌ला येऊन आजवर येथे दाखल व्हायला पाहिजे होतीं! जेवल्यावर पुनः एमानुएले चौकांत रात्रींचा देखावा पहायला गेलों. सर्व चौक निरनिराळ्या बिरारिया (इं. बार्) वगैरेंच्या खुर्च्यांनीं भरला होता, व एका ठिकाणीं गायन चाललें होतें. मी परतल्यावर थोड्या वेळानें जोराचा पाऊस आला, तेव्हां या चैनी लोकांची भली धांदल उडाली असेल!

बुधवारीं (तारीख २१) सकाळीं फराळ झाल्यावर प्रथम व्हेक्किओ वाडा पहाण्याला गेलों. याच्या दरवाज्यासमोरील चौकाविषयीं वर लिहिलेंच आहे. बाहेरून हा एकाद्या लहानशा दगडी किल्ल्यासारखा दिसतो, व त्याला बाहेरच्या तटावर संरक्षणासाठीं खिडी असलेली कठड्यासारखी भिंत आहे. एक उंचसा बुरूजहि आहे. फ्लॉरेन्स हें प्रजासत्ताक संस्थान असतांना हा वाडा सिञोरी नांवाच्या वरिष्ठ सभेच्या सरदारांसाठीं १३०० च्या सुमाराला बांधला गेला, व लॉरेन्झो माग्निफिकोच्या नंतर कांहीं वेळ स्थापित झालेली प्रजेची सत्ता स्पेनच्या पांचव्या चार्लस्‌च्या मदतीनें पुनः ढांसळून मेदीची घराणें परत पदावर आलें, तेव्हां १५३० च्या नंतर यांत दुरुस्ती व फेरफार होऊन हा वाडा या घराण्याचें रहातें ठिकाण होऊन बसला. त्यामुळें यांतील दिवाणखाने ऐश्वर्यानें भरलेले असे आहेत. आपल्याकडे जशीं फार जुन्या काळीं राजवाड्यांच्या व देवळांच्या भिंतीवर पौराणिक चित्रें काढीत, तशींच या दिवाणखान्याच्या भिंतीवर व छतावर नाना प्रकारचीं ऐतिहासिक चित्रें नामांकित चितार्‍यांनीं काढलीं आहेत. त्या वेळचे येथील ऐश्वर्याचे प्रकार व चिन्हें आणि आपल्या जुन्या ऐश्वर्याचीं लक्षणें साधारणपणें जुळतात, ही लक्ष्यांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. हा वाडा थोड्याच वेळांत पाहून होऊन शेजारच्या वाड्यांत चित्रशाळेंत गेलों.

ही 'गालेरिया डेली उफित्सी' फार जुनी, अतिशय संपन्न व सर्व यूरोपांतच नव्हे, तर सर्व जगांत पहिल्या प्रतीची आहे. पारिस येथील लुव्हर चित्रशाळेचा दुसरा नंबर लागतो. हिची स्थापना व आरंभ प्रसिद्ध लोरेन्झो दि मेदिची (माग्निफिको-ऐश्वर्यवान्) यानें केली; व तेव्हांपासून (१५ वें शतक) आजपावेतों देवळें, मठ इत्यादिकांतील चित्रकलेचीं व मूर्तिकलेचीं अमूल्य रत्नें संपादन केलीं गेलीं. खाजगी चित्रें व पुतळेहि विकत घेतले गेले. यामुळें प्रख्यात चितान्यांचीं व कारागिरांचीं चित्रें व पुतळे आज येथें एका ठिकाणीं पहायला सांपडतात; विशेषतः इतालियन व त्यांतल्या त्यांत फ्लॉरेन्टाइन् कलांची वाढ व भरभराट कशी होत गेली, याचें मूर्तिमंत चित्र डोळयांपुढें उभें राहतें. ही ग्यालरी एका रस्त्यानें विभागलेल्या दोन मोठ्या इमारतींत वरच्या मजल्यावर असून, टोंकांशीं एका सोप्यानें दोन्ही इमारती जोडल्या गेल्या असल्यामुळें सदट आहे. सभोंवार कॉरिडोर् अथवा सोपा व त्याच्या भोंवतीं खोल्यांची रचना आहे. देवळांत सोनेरी रंगांनीं गणपती, रामलक्ष्मण जसे काढलेले असावे, तशीं चित्रें मध्यें भिंतीला लाविलीं आहेत. हीं फार जुनीं व देवळें, मठ यांतील भटाभिक्षुकांनीं लिहिलेलीं, याखेरीज त्यांना महत्त्व नाहीं; पण कॉरिडोरमध्यें थेटपर्यंत निरनिराळया वेळचे व कारागिरांचे पुतळे ठेविले आहेत, ते मात्र पाहण्यालायक आहेत. खळीस आलेला रानडुकर, पाणीदार घोडा, मल्ल, टौरस पर्वतावर बळी देण्याला सज्ज केलेली इफिगेनिया, पायांतील कांटा काढणारा मुलगा, कांहीं स्त्रियांचे पुतळे—त्यांत एक रोमन गृहिणी खुर्चींत टेंकून बसलेली व जवळच एक उभी बारबारीण, बॅकस् अथवा रंगेल्यांचा रंगेल देव भगर सोम दोन मुलांसह अजगरानें वेढलेल्या लाओकूनचा पुतळा इत्यादि वाखाणण्याजोगे पुतळे आहेत. आग्रिपा, आरिआड्नसारखे ऐतिहासिक पुतळेहि एकदोन आहेत.

खोल्यांतील चित्रांची रचना त्यांच्या कर्त्यांच्या पंथावर अगर देशा-र केलेली आहे. प्रथम व्हेनेशन् चितारी, नंतर टोस्कानींतील फ्लॉरेन्स व भोंवतालचा प्रांत ), मग एकंदर इतालींतील व शेवटीं ानुक्रमें इतर देशांतील जुन्या कारागिरांचीं चित्रें लाविलीं आहेत. ाव्यांचीं दुसऱ्या पाल्यांत आहेत. व्हेनेशनांपैकीं तित्सियानो, तिन्तो-त्तो व पाओलो हे प्रमुख होत. यांच्या चित्रांचे विषय बहुतकरून ाशू-मेरी यांच्या चरित्रांतील आकाशवाणी, येशूजन्म, राजत्रयानें ेलेली स्तुति, सुळावर जाणें, विलाप, मेरीस्वर्गारोहण वगैरे आहेत. ाडोना हा विषय पुष्कळांचा आहे. ( माडोना-बाळ येशूसहित मेरी ) 'वित्रपणाची कल्पना देण्यासाठीं येशू व मेरीच्या डोक्यांवर एक सोन्याचें त्रक्र-कमीअधिक ठळक दिसणारें असें बहुतेक सर्वजण काढीत असतात. आपल्या प्रसिद्ध चित्रशाळेंतील देवादिकांच्या सुबक चित्रांच्या शेराभोंवतीं सोनेरी रंगाचें किरणाचें थेबाड ठेवून देत असतात, त्या-ाक्षां हा पुष्कळ सौम्य व चित्राच्या एकंदर ढबीचा बिघाड न करणारा ;कडील चित्रांचा प्रकार आहे. रंगाची मिळवणी, चेहऱ्यावरील ठसा ागैरे बहुतेकांचीं निर्दोष आहेत.

याशिवाय तित्सयानोनें (इं. Titian)माणूस पुढें बसवून काढलेल्या थोड्या 'तसबिरी ( Portraits ) चांगल्या आहेत. त्याचें फ्लोरा नांवाच्या सुंदर व्हेनेशन तरुणीचें मुग्धावस्थेचें तुरळक वस्त्रांचें चित्र जणूं बोलतें असें वाटतें.

यानंतर टोस्कानींतील चितारी लागतात. पैकीं प्रमुख मिकेल आन्जेलो (मायकेल), बोत्तिचेली, लेओनार्डो डा विंचि हे होत. शिवाय फ्रा बार्तोलोमेओ, कोसीमो, सोदोमो वगैरेहि बरे आहेत. पैकीं आन्जेलो तुम्हांला ऐकून ठाऊक असेलच. डाविंची याची 'मोना लीसा' लूव्हरमधून नुकतीच चोरीस गेल्यामुळें त्याचें नांव बरेच दिवस प्रत्येक पत्रांत झळकत होतें व मजसारख्या अपरिचिता-

लाहि ऐकूं येत होतें. बोत्तिचेलीनें राजत्रयस्तुतींत मेदिची घराण्यांतील कोसीमो आदि सरदार काढून आपल्या सुंदर पौराणिक चित्राला ऐतिहासिक महत्त्व आणिलें आहे. डाविंचीची आकाशवाणी (मारिया आनुन्तियाता) हें वाखाणलेलें चित्र मला आवडलें नाहीं. कोसीमोच्या निष्कलंक गर्भवती (इमॅक्युलेट कन्सेप्शन् अर्थात् मेरीची) या चित्रांतील गर्भिणी मेरीच्या चेहऱ्यावरील मार्दव उत्कृष्ट दाखविलें आहे. आपल्या पुराणेतिहासांतील कुमारी कुंतीच्या गर्भसंभवाची कल्पना चित्रकाराला कसा नामी विषय होईल, हें मला तेव्हां वाटलें. विषय आहेत, पण चित्रकार कोठले आणावेत? एखाद्या अर्ध्याकच्च्यानें तसा कल्पनेला कसून पाहणारा विषय घेतला असतां त्याची कशी त्रेधा उडते, हें आपल्याकडील क्रौंचवध या चित्रानें चांगलें प्रत्ययाला आणलें आहे.

पण या चित्रशाळेचें जणूं सार अशी एक त्रिबूना (Tribuna) नांवाची अष्टकोनी खोली आहे, व हींत इतालियन व इतर अगदीं निवडक पहिल्या प्रतीच्या चित्रकारांचीं चित्रें आहेत. यांत कांहीं पुतळेहि अप्रातिम आहेत. मिकेल आञ्जेलोचा हातांत चिपोळ्या व पायाखालीं कांहीं वाद्य दावणारा साटिर (satyr), कुस्ती खेळणारे मल्ल, र्व्हानस्, आपॉलो, व सुरीला धार लावणारा कसाई हे पुतळे इतके हुबेहुब आहेत, कीं, दुरून पाहणाराला भुरळ पडण्यास हरकत नाहीं! राफाएलची मडोना, व दहाएक वर्षांचा ज्योव्हानी (जॉन् दि बॅप्टिस्ट) आणि दुसरा पोप ज्यूलियस् याची तसबीर, तित्सियानोची स्नान करून वस्त्र न नेसतांच मंचकावर क्षणभर स्तब्ध पडलेली तारुण्यानें व लावण्यानें मुसमुसलेली तरुणी, रूबेन्स (रूबें! फ्लांडर्समधील) ची आपल्या बायकोची तसबीर, फान् डाइक (हॉलंड)ची स्पेनच्या पांचव्या चार्लेसची तसबीर वगैरे या त्रिबूनामध्यें एकएक रत्न आहे. जर्मन चितारी आलब्रेख्ट् ड्यूरर् याचें राजत्रयस्तवनहि तेथें आहे. यानें पूर्वेकडील

तीन राजे रंगाविण्यांत रंगांची रेलचेल करून सोडिली आहे. यांतील मेरी जर्मन लोकांना फार आवडते. ते ह्मणतात, कीं, मेरी ह्मणजे जर्मन आर्यांच्या साधेभोळेपणाची प्रत्यक्ष मूर्ति होय. या चित्रापुढें ते जसे सद्गदित झाल्यासारखे उभे राहतात ! मला तसें कांहीं वाटलें नाहीं. चित्र चांगलें आहे, पण याहिपेक्षां चांगलें मीं नंतर दुसऱ्या ग्यालरींत पाहिलें.

दुसऱ्या पाळ्यांतील नव्या चितान्यांच्या साऱ्या तसबिराच ( Portraits ) आहेत; त्याहि चांगल्या आहेत. त्या व्यक्ति पाहिल्या नाहींत, अगर इकडील लोकांनां जशी त्यासंबंधानें परंपरागत कल्पना करतां येते, तसें मला कांहींच साधन नसल्यामुळें त्याविषयीं चिकित्सा करणें मला शक्य नाहीं. यांत एका खोलींत पुन: रूबेन्सचीं दोन फारच मोठीं चित्रें आहेत; त्यांनीं दोन्हीकडच्या दोन बाजू व्यापून टाकल्या आहेत. पैकीं एक फ्रेंच राजा चौथा हेन्री याची इव्रीची लढाई, व दुसरें विजयी हेन्रीचा पारिसप्रवेश. लढाईची धांदल, हाणामारी याची कल्पना स्पष्ट येऊन मनावर फार परिणाम होतो. पडलेलीं घोडीं व माणसें, त्यांच्या पलीकडे लढणारे शिपाई, बाजूला दाट व ह्मणूनच अस्पष्ट होत गेलेली शिपायांची गर्दी यांचें पर्स्पेक्टिव्ह ( याला लघुदर्शन कीं दीर्घ-दूर-दर्शन (?) असा कोणींसा शब्द केलेला माझ्या ध्यानांत नाहीं !) पाहून माणूस आश्चर्यानें गुंग होऊन जातें. एवढ्या मोठ्या व इतक्या चिकित्सेच्या तसबिरींत सर्व ठसा यथास्थित उमटविणें सोपें काम नाहीं; पण तें रूबेन्सनें धीटपणानें व सफाईनें साधलें आहे.

पुढें एका खोलींत रोमन व ग्रीक शिलालेख, व ग्रीक तत्त्ववेत्ते, रोमन वक्ते व मुत्सद्दी यांचे अर्धपुतळे (छातीइतके) आहेत. उ० सोफोक्लिस्, साफ्फो, हिप्पोक्राटिस, डेमोस्थेनिस हे ग्रीक, व सिपिओ, आन्टोनिओ,

सिसेरो ( इतालियन–चिचेरो. सिसेरो हा फ्रेंच–इंग्लिश उच्चार होय. अगदीं जुना व खरा ल्याटिन उच्चार किकेरो आहे, असें अलीकडे नवें मत निघालें आहे !) नेरोचा गुरु तत्त्ववेत्ता सेनेका वगैरे रोमन आहेत. जुने ह्मणून यांचें महत्त्व फार आहे. बाकी यांत हुबेहुबपणा किती असेल याची शंकाच आहे;कारण डेमास्थेनिस् व चिचेरो यांचे दोनदोन पुतळे असून त्यांत साम्य थोडेंच आहे.

शेवटीं 'निओबेसाला' ह्मणून शाळा लागते.हींत १७ निरनिराळे सबंध पुतळे आहेत. निओबे नांवाच्या १४ मुलांच्या आईनें लेटो देवाची पूजा करणारांची निर्भत्सना केली ह्मणून आपोलोनें तिच्यावर व मुलांवर आपले बाण सोडले; त्यांपुढें तीं पळताहेत, विव्हळ झालीं आहेत, या पुराणप्रसंगाला अनुसरून प्रसिद्ध ग्रीक मूर्तिकार प्रॅक्सिटेलेस यानें १७ पुतळ्यांचा एक समुदाय मोठ्या कौशल्यानें तयार केला होता, त्यांपैकीं फक्त एक पुतळा हल्लीं रोम येथें उपलब्ध आहे. पण अगदीं जुन्या काळीं तो अस्तित्वांत असतांना रोमन कारागिरांनीं त्याच्यासारखा हुबेहूब केलेला समुदाय १६ व्या शतकांत रोम येथें सांपडला, तो येथें एका मोठ्या दिवाणखान्यांत ठेविला आहे. १७ निरनिराळ्या आकृतींत निरनिराळे चेहरे, शरिराची निरनिराळीं ढब वगैरे वाखाणण्याजोगीं आहेत. ग्रीक् कृतीची प्रतिकृति मनाला इतकी लोभविते, मग ती प्रत्यक्ष कृति किती मनोहर असेल !

या मोठ्या खोलीच्या बरगडींत एक लहान खोली आहे. तींत ज्योव्हानी ( शब्दार्थ=तरुण ) याचीं चित्रें आहेत. पैकीं एक बरेंचसें मोठें 'ला प्रीमा नोत्ते' अगर पहिली रात्र, ह्मणून आहे. नवऱ्याशीं तरुण स्त्रीचें प्रत्यक्ष संघट्टन होण्याचा तो प्रथम प्रसंग कांहींसा पौर्वात्य वाटतो. वधूला तिच्या सख्या बळेंच पुढें ढकलीत आहेत, ती लाजत आहे, ही मौज नवरोजी आतुरपणें पहात आहेत, असा कुमारसंभवी देखावा चित्रपटावर पाहून नवल वाटलें. जुन्या रोमन चालींचें हें स्मारक होय.

' औत्सुक्येन कृतत्वरा सहभुवा व्यावर्तमाना ह्रिया । पश्चाद्बन्धुवधूजनस्य वचनैर्नीताभिमुख्यं पुनः ' वगैरे माझ्या रसिक गुरूंनीं सांगितलेल्या श्लोकांचा तेथें साहजिकपणें आठवण झाली. याप्रमाणें चित्रें पाहून झाल्यावर परत रत्नांच्या छोट्याश्या खोलींत आलों. सहा उत्तम स्फटिकाचे खांब, रत्नजडित अलंकारादि चिजा ठेवण्याच्या पेट्या, सोन्यामाणकाचे अलंकार सहा कपाटांत व्यवस्थेनें मांडून ठेविलेलीं मेदिचींच्या संपत्तीची थोडीशी कल्पना देतात. नंतर पुनः एकदां त्रिबुनांत थोडा वेळ थांबून व तीं चित्रें डोळ्यांनीं यथेच्छ पिऊन परतलो. घरून निघालों त्या वेळीं इतालियन चित्रकलेची व्हेनिस्–बलोन्यांतील आकाडेमीजवरून झालेली थोडी कल्पना होती. परत आलों तों त्या कलेच्या सौष्ठवानें दिपून गेलेला असा आलों. चवदा-पंधरा–सोळा शतकांत फ्लॉरेन्स हें कलाकौशल्याचें केवळ आगर झालें होतें. अमूल्य रत्नें त्या वेळीं येथें होऊन गेलीं. त्या वेळचें येथील ऐश्वर्य कसें असेल, याची कल्पना देखील करवत नाहीं !

दुपारीं दुओमोपुढील बात्तिस्तेरिउम् ( मुलाचें नामकरण करण्याचीं लहान देवळें, हीं येथें बहुधा अष्टकोनी असतात ) पाहिलें. याच्या तिन्ही ब्रोन्झच्या दरवाजांवर जुन्या करारांतील आब्राहाम, नोआ व त्याचें जहाज, मोझेस वगैरेंचीं चरित्रें गोंविलीं आहेत. धातूवरील हें बारीक काम प्रेक्षणीय आहे. मुख्य दरवाजाचे तोरणाचे संगमरवरी खांब, त्यांवरील त्रिकोणाकृति व वरील येशूच्या बाप्तिस्म्याचे पुतळे हेंहि काम अपूर्व आहे. ' हा दरवाजा स्वर्गांत शोभेल, ' असे मिकेल आन्जेलो स्वतः म्हणाल्याची आख्यायिका आहे ! आंतील छताचें जडावाचें काम ( Mosaic ) सुबक आहे. हें नऊदहा शतकांतलें मेदिचींच्या पूर्वींचें काम आहे. मुख्य गाभाऱ्याच्या उजव्या हातच्या एका गाभाऱ्यापुढें नामकरणाचा झरा ( Baptimal font ) नांवाचें

मोठें थोरलें पवित्र पाण्याचें उथळें आहे. मी जातों तों पांच लहान लहान अर्भकांच्या नामकरणाचा विधि चालला होता. नवीनच ह्मणून त्यांत मौज वाटली. प्रथम उपाध्यायांनीं मोठी थोरली जळती मेणबत्ती घेऊन ती प्रत्येक मुलापुढें धरून मंत्र ह्मटले; व मग जवळील बटूनें हातांत धरलेल्या पवित्र अंजनाच्या करंड्यांतून अंजन घेऊन प्रत्येक मुलाच्या हनुवटीखालीं, कपाळावर व टाळूवर लाविलें. या वेळीं उपाध्ये-बोवा आयांनां मुलांच्या धार्मिक शिक्षणाबद्दल ठराविक प्रश्न विचारीत व आया 'होय, होय' ह्मणत. नंतर उपाध्येबोवांनीं झऱ्याचें झांकण काढून त्याला दिवा दाखविला, व गळ्यांतील उपरण्यासारख्या तांबड्या पट्ट्याचें अपसव्य करून (हा ते उलटा करून पांघरले) मुलाचें उघडें डोकें झऱ्यावर धरण्याला सांगितलें. मग त्यांतलें गारठणक पवित्र पाणी त्यांनीं मुलाच्या डोक्यावर तीन वेळ ओतीत 'इन नोमे पात्रीसि –(पित्याच्या नांवानें'–मी तुजवर पाणी ओततों) वगैरे मंत्र ह्मटले, व मग डोकें पुसून मूल गुरवाला घ्यायला सांगून त्याच्या आईला मंत्र ह्मणतह्मणत जळती मेणबत्ती त्यापुढें धरण्याला लाविलें. असेंच प्रत्येक मुलाला केल्यावर मुख्य विधि उरकला. तें गारगार पाणी डोक्या-वर पडतांच तीं पुरता आकारहि न आलेलीं तीसचाळीस दिवसांचीं अर्भकें केंकून देवळांतील शांततेचा भंग करूं पहात, आपणांला आज केवढी मोठी दीक्षा दिली गेली याची त्यांनां काय कल्पना! त्यांच्या-करतां धर्मसंबंधी जबाबदारी धरणारे धर्मपिता, धर्ममाता असतातच.

नंतर दुओमोशेजारील काम्पानीले मनोऱ्यावर चढलों. इतालियन देवळांच्या घंटांचे मनोरे बहुधा मुख्य इमारतीपासून जरा अलग अस-तात. सां. मार्कोचा घंटेचा मनोराहि त्याच्यासमोर एका कोंपऱ्याला आहे. जुना पडून त्याच्या जागीं १९१० सालीं नवा सरळ धोपट अनलङ्कृत असा बांधला आहे. पण येथील मनोरा चौदाव्या शतकांतील रंगीत संगमरवरांत बांधलेला व बऱ्याचशा पवित्र

पुतळ्यांनीं शोभविलेला असा आहे. अगदीं वर जाऊन भोंवतीं पाहण्या-साठीं सज्जा आहे. त्यावरून सर्व शहर, नदी, ती ज्या दरींतून वाहत गेली आहे ती, भोंवतीच्या आपेनाइन्सूच्या पायथ्याच्या टेंकड्या वगैरे सर्व गोड दिसतें; व अशा सृष्टिसान्निध्यांत काव्य, कलाकौशल्य यांची अभिवृद्धि झाली हा तुल्यसमागम योग्यच आहे, असें वाटतें.

याच दुपारीं मिकेल आन्जेलोनें स्वत: १५२० पासून २४ पर्यंत बांधलेल्या गाभाऱ्यांत (साग्रेस्टिया नुओव्हा) तिकिट काढून गेलों. याला वाट सां. लोरेन्झो देवळांतून बोळासारखी आहे. प्रथम लोरेन्झोची साक्रिस्टी, नंतर पुन: बोळ, त्यापलीकडे मेदिची घराण्याचें प्रार्थनामंदिर व नंतर हा छोटासा गाभारा लागतो. हा बरोबर चौकोनी आहे. दारा-समोर डौलदार कमान असून तेथें एक वेदी आहे. कमानीचे आधार-स्तंभ चौकोनी असून त्यांवरील मथळीं साधींच पण गोड आहेत. दोन्ही बाजूच्या भिंतींना दोन शोभिवंत कोनाडे असून डावीकडच्यांत लोरेन्झो दे मेदिची (दुसरा), व उजवीकडच्यांत ज्यूलियानो दे मेदिची यांचे मिकेल आन्जेलोनेंच स्वत: घडविलेले पुतळे बसविले आहेत. पैकीं ज्यूलियानोची बसण्याची ऐट वीराला साजेल अशी आहे. कोनाड्यावरतीं दोन साधीं घोसाचीं तोरणें काढलीं आहेत, व भोंवतीं भिंतींतच साजेसे कठडे दाखविले आहेत. कोनाड्यांखालीं सुंदर संगम-रवरी दगडाच्या साध्या नक्षीच्या दोन समाधि आहेत, व त्यांवर घोटींव संगमरवराच्या रात्र, दिवस, उषा व संध्याकाळ अशा दोहींकडे दोनदोन रमणीय मूर्ति आहेत. पैकीं एकदोन पुरत्या संपविलेल्या नाहींत. यांपैकीं रात्र व दिवस यांच्या मूर्ति प्रसिद्ध आहेत. विशेषत: समाधीला टेंकून व उभ्या पायावर हात आडवा करून त्यावर डोकें टेंकून अवघडल्यासारखें गाढ झोंपीं गेलेल्या त्या रात्रीची नग्न मूर्ति फार प्रेक्षणीय आहे. असें वाटतें, कीं, या श्रमलेल्या बाईला कितीहि हलविलें तरी ती लवकर जागी होणार नाहीं. रात्रीचें सोबती घुबड

तें उभ्या केलेल्या मांडीखालून डोकावतें आहे, व रात्रीचा भयाणपणा दाखविणारा एक प्रेतवत् भेसूर चेहरा तिच्या बगलेखालून पुढें बटबटीत दिसतो आहे. गाढ निद्रा, रात्रीची स्तब्धता व किंचित् भयाणपणा हीं सगळीं एकवटून त्यांनां मूर्त स्वरूप देण्याचें जें चातुर्य व विशाळ कल्पना आञ्जेलोनें दाखविलीं आहेत, तीं त्याचीं त्यासच शोभतात! मी इंग्लंदांत, फ्रान्सांत, जर्मनींत पुष्कळ पुतळे पाहिले; पण कल्पनेचा असा उदात्तपणा, व ती प्रेक्षकांच्या मनावर तात्काळ बिंबवण्याची हातोटी, किरकोळ गोष्टींतहि बारकाई, व एकंदर परिणामांत दिसून येणारा कारागिरीचा धीटपणा व प्रौढी हीं सगळीं जशीं आञ्जेलोच्या कृतींत एकवटलीं आहेत, तशीं दुसऱ्यानें करणें केवळ अशक्य आहे. या जगावर दोन मिकेल आञ्जेलो कधींहि दृष्टीला पडायचे नाहींत, तो स्वतःसारखा एकच!

आणि पुनः इमारतीचें अप्रतिम काम व मूर्तींची स्वर्गीय कारागिरी अशीं अभेद्य एकवटलीं आहेत, कीं, इमारतीवांचून मूर्ति व मूर्तिवांचून इमारती अशी कल्पनाच करतां येत नाहीं. दूध व साखरेचें एकजीव झालेलें मिश्रण जसें गोड, सुरस व वेगळें करण्याला अशक्य तसें मिश्रण येथें शिल्पकला व मूर्तिकृति यांचें झालें आहे. त्यामुळें मनाला अपूर्व शान्ति, समाधान व सौख्य होतें, व तेथून हलूं नये असें वाटतें. मी येथें एक तास बसलें होतें. एकदोन वेळ रक्षक मला इषारा देण्यासाठीं खडखड करून गेला तरी मी तिकडे लक्ष्यच दिलें नाहीं. मिकेल आञ्जेलोचा आत्मा तेथें सदैव वास करीत आहे, असें मला भासे, व आपल्या हृदयांतील त्याच्यासंबंधानें उद्भवणारे आदर व पूज्यभावाचे विचार त्याला कळून तो स्मित करीत असेल काय, असें मला वाटे. त्या वेळच्या माझ्या मनाच्या स्थितीचें बरोबर वर्णन करतां येणें अशक्य आहे. तें एक स्वप्न होतें, ती स्थिति पूर्ण काव्यमय होती.

नन्तर या दिवशीं काव्हूर रस्त्यावरील पालाइझो रिकार्डी हा पाहिला. हा पहिल्या मेदिचीनीं १४३५ त बांधविला व येथेंच प्रसिद्ध लोरेन्झो माग्निफिको ऐश्वर्यानें राहत असे. नन्तर हा १७ व्या शतकाच्या मध्यांत विकला गेल्यामुळें त्यांत नव्या रिकार्डी मालकानें फेरफार केले, तरी मेदिचीच्या वेळच्या जुन्या कांहीं गोष्टी जशाच्या तशाच आहेत. भव्य दरवाजांतून आंत गेलें ह्मणजे जुन्या इतालियन सरदारी रीतीप्रमाणें एक मोठा चौक लागतो. यांतील साधे पण भव्य खांब आणि कमानी जशा मालकाला तशाच 'मिकेलेइझो' कारागिराला भूषणास्पद आहेत. नन्तर प्रशस्त जिन्यांतून वर गेलें ह्मणजे तीन मोठे दिवाणखाने लागतात. यांचें छताचें काम चांगलें आहे. पैकीं एकांत नक्षी सर्व सोनेरी आहे. एक आगतस्वागत करण्याचा, एक कारभाराचा व एक जेवणाचा असे हे तीन दिवाणखाने आहेत. पण या वाड्यांत विशेष पाहण्याजोगें ह्मणजे दुसरीकडून मोठ्या जिन्याचा मार्ग असलेलें मेदिचीचें खाजगी देवघर होय. रोजची प्रार्थना वगैरे देवकृत्य येथें होत असे. यांतहि भिंतीवर गोझ्झोली नांवाच्या चितान्यानें चित्रें काढिलीं आहेत. पैकीं एक–तीन पौर्वात्य राजे येशूच्या दर्शनाला चालले आहेत, अशा बायबली आशयाचें पण त्यांत कोसिमो, पीयेरो व लारेन्झो माग्निफिको मेदिची व त्यांच्या स्वारीशिकारीचा लवाजमा गोंविलेलें सुबक चित्र आहे. त्यांपैकीं लारेन्झोचें चित्र असलेलें पोस्ट-कार्ड मी पाठवीत आहें तें पहावें; त्यानें कांहीं कल्पना येईल.

ता. २२.

येथील दुसरी प्रसिद्ध पित्ती–ग्यालरी पहाण्यास गेलों. जातांना 'उफिची' वाड्यावरून वळलों. यांतच पहिली ग्यालरी असल्याचें वर आहेच. या दोन्ही वाड्यांच्या पुढें गोल खांबांचे सोपे आहेत. दोन खांब टाकून मध्यें असलेल्या चौकोनी खांबांत कमानी काढून त्यांत

फ्लॉरेन्स येथील प्रसिद्ध माणसांचे पुतळे उभे केले आहेत. पैकीं दान्ते, आञ्जेलो तुह्मांला ठाऊक झालेच आहेत. याशिवाय सांगण्यासारखे ह्मणजे बोक्काचियो, माक्याव्हेलि, गिच्चार्डीनी हे ग्रंथकार, दोनातेलो नांवाचा कारागीर, व कास्टेल्लो, गोझ्झोलो, लिप्पी वगैरे चित्रकार व ग्यालिलेओ इत्यादि होत बोक्काचियोचें नांव कदाचित् बी. ए. च्या वेळीं शेक्सपीयर वाचतांना तुमच्या कानावरून गेलें असेल. यानें गद्यांत लिहिलेलें 'देकामरोने' फार प्रसिद्ध आहे. शेक्सपीयरनें आपल्या इतालियन नाटकांचीं (Merchant of Venice सारखीं) संविधानकें यावरून घेतलीं होतीं, असें ह्मणतात. शिवाय दान्तेचे प्रसिद्ध काव्य दिव्हिना कोमेदिया हें प्रथम टीकारूपानें समजावून देणारा हा बोक्काचियो होय. माक्याव्हेलीचेंहि नांव तुह्मांला ठाऊक असावें. याचें राजनीतिवरील पुस्तक त्यांतील चाणक्यनीतीमुळें फार प्रसिद्ध आहे. पुतळा पाहतांच याचें मूळ धूर्त, हुपार, कावेबाज असावें, असें मला वाटलें, व वेषादि योग्य फेरफार केला तर ही विचित्र मूर्ति कौटिल्याचीच आहे, असें खुशाल ह्मणतां येईल. याच्या पुस्तकावर सारखीं दोनतीन शतकें टीकांचा भडिमार होतहोता. शेवटीं एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं लॉर्ड मेकॉले यांनीं त्याचा कैवार घेतला. तो त्यांच्या माक्याव्हेलीवरील निबंधांत प्रसिद्धच आहे. ग्यालिलिओविषयीं तुह्मांला माहिती आहेच. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते, या त्याच्या मतासाठीं विशेषत: धर्माधिकाऱ्यांकडून याचा कसा छळ झाला, हें तुह्मांला विदित आहेच. असो. या वरील नांवांवरून फ्लॉरेन्स् येथें पंधरा व सोळा शतकांत कसकशीं रत्नें होऊन गेलीं, हें लक्ष्यांत येईलच. त्या वेळीं अयोध्या, उज्जयिनी व दिल्लीप्रमाणें फ्लॉरेन्सहि दोनतीन शतकें काव्यकलाकुशलतेचें आगर होऊन बसलें होतें, व त्या सर्वांचीं स्मारकें वाडे, देवळें, पुतळे, ग्यालऱ्या या रूपानें आज हयात असल्यामुळें फ्लॉरेन्सचें महत्त्व या

नव्या विजेच्या–तारायन्त्राच्या काळांतहि बिलकूल कमी न होतां एकाद्या यात्रेच्या ठिकाणासारखें तें होऊन बसलें आहे.

पित्ती ग्यालरी ही या नांवाच्या राजवाड्यांत नदीपलीकडे टेकडीच्या उतारावर आहे. उफिचीइतकी ही मोठी नसून, हींत फक्त चित्रेंच आहेत व तींहि–अगदीं निवडक–राफाएल, तितियान, पेरूजिनो, फ्रा बार्तोलोमेओ, रूबेन्स, रेम्ब्रान्द्, फान् डाइक् अशा अलौकिक कलाविशारदांचीं आहेत. एकंदर चित्रें पांचशेंच्यावर नसतील. हिलाहि मेदीचीनींच आरंभ करून बरीच नांवाला आणली होती. आतां ती उफिचीबरोबरीची जगांत पहिली आहे. उफिचीमध्यें मोठ्यांबरोबर छोट्याछोट्यांची, व अगदीं जुन्या–मधल्या–नव्यांची चित्रें असल्यामुळें फ्लॉरेन्स येथें त्या कलेची वाढ व इतिहास कसकसा बनत गेला, हें कळण्याचें अत्युत्कृष्ट साधन आहे; पित्तीचें महत्त्व या गोष्टींत नाहीं. तींत प्रख्यातांचीं प्रख्यात चित्रें तेवढीं आहेत. हिच्या खोल्या अत्युत्कृष्ट शृंगारलेल्या आहेत; त्यांच्या छतांवर इलियास, साटर्न, ज्युपिटर्, मार्स्, आपालो, व्हीनस् वगैरेंच्या लीलांचीं चित्रें असल्यामुळें त्यांना साला द ज्योव्हे, साला द सातोर्नो वगैरे नांवें दिलीं आहेत.

हींत राफाएलचीं एकंदर सहा चित्रें आहेत. पैकीं चार बायबलविषयक–विशेषत: माडोनाचीं व दोन त्याच्या वेळच्या बायांच्या तसबिरा आहेत. याच्या सर्व माडोनांच्या चेहऱ्यावर शांतता व सौम्यपणा वास करीत असल्यामुळें त्या तसबिरांकडे पाहून साहजिक पूज्यभाव उत्पन्न होतो. एकंदर अंगसौष्ठव अप्रतिम आहे. याच्या माडोनांच्या डोळ्यांत, चेहऱ्यावरील तेजांत व एकंदर ढबींत मला पौर्वात्य विनय व मार्दव ओतप्रोत भरलेलीं दिसलीं. मेरी ही पौर्वात्यच असल्यामुळें या प्रतिभेनें वरलेल्या चित्रकाराचा प्रयोजकपणा दिसून येतो, असें आपलें माझें मत झालें. मला वाटतें, पोषाकांत किंचित् फरक केला, तर हींच चित्रें कृष्णयशोदा, अगर रामकौशल्या यांचींशीं वाटण्यास कांहीं हरकत नाहीं.

त्याच्या माडोनांपैकीं मला विशेष आवडलेलें मी आजच तुह्माला निराळें पाठवित आहें तें पहावें व सत्यता पटवून घ्यावी; मात्र एवढें विसरूं नये, कीं, ही प्रतिकृति असून, मूळ रंगांच्या अभावामुळें ही मूळ इतकी चांगली खचित नाहीं, तरी साम्य कायम आहे. आपल्या कल्पनेप्रमाणे व स्थितीप्रमाणें मुलास बाळसें जरा ज्यास्त दिसतें, पण तें हिंदुस्तानातील ' पोरींचे पोर ' नव्हे, हेंहि लक्ष्यांत घेतलें पाहिजे.

याच्या इतर दोहींपैकीं एक ज्या स्त्रीचें आहे, तिजवर त्याचें अपूर्व प्रेम होतें असें ह्मणतात. हिचे ते काळे पाणीदार हरणीसारखे डोळे, सरळ नाक, बारीक ओंठ, छोटीशी गोड हनुवटी, व वरचे भांग काढलेले काळेभोर केश व किंचित् बाकदार बारीक भुंवया हीं एकवटल्यानें इतकीं मोहक झालीं आहेत, कीं, राफाएलच काय, पण शुक्राचार्यहि तिच्या प्रेमपाशांत सांपडले असते ! नूरजहान अप्रतिम लावण्यवती होती ह्मणतात; मला ही हुबेहुब नूरजहानच वाटते. येथें तर पोषाकांत सुद्धां फरक करायला नको ! राफाएलनें तसबिरीला हा विषय निवडून आपली अत्यंत रसिकता दाखविली आहे. माडोनाच्या व या तसबिरीकडे मी फार वेळ आलों, व हिजकडे पाहतांच मला आपल्या महाराष्ट्र-जगन्नाथ पंडितांच्या 'तुझे डोळे काळे बघुनि मृगबाळेंहि झुरती' या वचनाची आठवण झाली.

तित्सियानच्या पांचांपैकीं तीन बायबली सोडलीं तर बाकीच्यांपैकीं प्रमदेचें चित्र वाखाणण्यासारखें आहे. इचेहि काळे डोळे मृगबाळें झुरण्याजोगे आहेत; पण भुंवया थोड्या ज्यास्त लांब, व चेहऱ्यांत एकंदर मोहक गोडसपणा कमी यामुळें राफाएलच्या लाडकी पेक्षांहि मला किंचित् कमी दिसली. हिच्या चेहऱ्यावर मानीपणाची छटा आहे.

पेरूजिनोची एकदोनच धार्मिक चित्रें आहेत. याच्या स्त्रियांच्या चेहऱ्यांत सारखाच मृदुपणा व डोळ्यांत जडपणा दिसतो. पण त्यां-

मुळें तीं कमी गोड दिसतात असें नाहीं. त्याचें क्रिस्ताचें दफन मला फारसें आवडलें नाहीं.

फ्रा बार्तोलोमिओचें पुनरुत्थान ( Resurrection ) चांगलें आहे. भोंवतींच्या शिष्यांच्या चेहऱ्यावरील आनंद व आश्चर्य चतुराईनें दाखविलीं आहेत.

रूबेन्सच्या चार चित्रांपैकीं दोन तसबिरा ( Portraits ) आहेत. पैकीं एकींत तो स्वतः, आपला भाऊ व दोन मित्र यांसह आहे. पण कल्पनेची भरारी, ती पटावर उमटविण्याचें चातुर्य, रंगाच्या विरोधाचा परिणाम, यांमुळें अगदीं थक्क करून सोडणारें असें त्याचें 'लढाईचे परिणाम' ह्मणून मोठें थोरलें चित्र आहे. जर्मनींत तीस वर्षांचें युद्ध चाललें असतांना १६३८ या वर्षी काढलेलें हें चित्र आहे. प्रख्यात वीर व युद्धप्रिय मार्स डाव्या हातात ढाल, उजव्यांत नंगी समशेर घेऊन शिरस्त्राण घालून निघाला आहे; त्याची स्त्री त्याच्या अंगावर पडून त्याला मागें ओढीत आहे, मागें मुलें व दासी कल्होळ करीत आहेत; पुढल्या बाजूनें रुधिरप्रिय राक्षसी ( fury ) विक्राळमुखी एका हातांत मशाल घेऊन दुसऱ्यानें मार्सला पुढें ओढीत आहे; तिच्या पलीकडे धुरांत पुमटपुसट अशीं रोगराई, दुष्काळादि युद्धाचीं गिधाडें पुढें पळत आहेत; मार्सच्या पायाखालीं पुस्तक तुडवलें गेलें असून पुढें गायन, शिल्प, चित्रलेखनादि कला स्त्रीपुरुषवेषांत कोसळून पडल्या आहेत; असा एकच गोंधळ या चित्रांत दाखविला आहे. युद्धाच्या भयंकर परिणामाचें अशा तऱ्हेनें रूपक करून रूबेन्सनें आपली कल्पकता सुरेख दाखविली आहे. या विक्राळ चित्राचा आकारहि त्याला साजेल असा मोठा आहे. उफिस्सीग्यालरींतील त्याच्या दोन मोठ्या चित्रांविषयीं वर लिहिलेंच आहे.

रेंब्रान्टचें स्वतःचें चित्र हुबेहुबपणाबद्दल प्रसिद्ध आहे. फान डाइक याची तसबिरी ( Portraits ) रंगविण्याविषयीं प्रसिद्धि होती. फांशी

गेलेल्या इंग्रजी राजाच्या मुलाची त्यानें रंगवलेली प्रसिद्ध तसबीर इतर ठिकाणीं आहे. येथें त्याच्याच एका कार्डिनलची व चार्ल्स ( पहिला ) व हेनारिएटा मेरिया यांच्या तसबिरी प्रसिद्ध आहेत.

सृष्टिसौंदर्य रंगवलेल्या फक्त पांचचारच तसबिरी आहेत. पैकीं नांव घेण्यासारख्या दोन्हीहि रूबेन्सच्या आहेत. जुन्या प्रसिद्धांनां मनुष्यें—विशेषतः साधुसंत, देव हा विषय आवडत असे. सृष्टिवर्णनाकडे ते कधींहि वळले नाहींत, मग सृष्टींतील हलक्या दर्जाच्या कुत्र्यामांजरादींची गोष्ट कशाला! हल्लींच्या उत्तम सृष्टिसौंदर्याच्या चित्रांतहि कुत्र्यामांजराचीच भर फार आहे. हें बदललेल्या परिस्थितीचें व अभिरुचीचें लक्षण!

रोम, २५ ऑगस्ट, १९१२.

फ्लारेन्सचें ( पांचवें ) पत्र यापूर्वीं मिळेलच. त्यांत पित्ती चित्रशाळेविषयीं सविस्तर लिहिलें आहे. तेथें असतांना चित्रें पाहण्याची नवी रीत मला दिसून आली. दाराशीं जातांच स्वतःला मार्गदर्शक ह्मणवणारे भिक्षुक जिकडेतिकडे असल्याचें तुह्मांला ठाऊक झालें आहेच; तसेंच येथेहि. कांहीं मंडळी असा मार्गदर्शक बरोबर घेतात व तो हिंडवील तसें ग्यालरींतून नाचत हिंडतात. चित्रें पाहण्यास स्वतःचे डोळे व स्वतःची अभिरुचि खर्च करण्याची त्यांनां जरूरच पडत नाहीं. गाईड सांगेल तें चित्र अर्थात् चांगलें! व तें तरी पुरतेपणीं पहातात ह्मणावें तर तसेंहि नाहीं. लगेच तो दुसऱ्या चित्राकडे धूम ठोकतो; तेथें एक ठराविक व्याख्यान झोडतो, कीं, चालला दुसऱ्या खोलींत. पदराची गांठ मारून वडील मंडळीला नमस्कार करण्याच्या वेळीं जसा डौलांत आलेला नवरा आपल्या नववधूला खेंचीत नेतो, व त्या दुष्ट नव्या जड सांखळ्यांच्या अडचणीला न जुमानतां तिला बिचारीला तसेंच त्याच्यामागें धांवावें लागतें, तसाच प्रकार हा दिसला. जसा कांहीं




‘ युद्धाचे परिणाम ’-फ्लॉरेन्स्.

तो मार्गदर्शक घोड्यावरच आला आहे; व तोंडानें सारखी बडबड ! नगराला लहानपणीं आळोआळीं दौडतदौडत मौतीसाठीं अगर शादीसाठीं चलो, अशा आरोळया मारीत शहरभर घोड्यावर फिरणारा तो आमंत्रणया मुसलमान शाळेंत जाण्याच्या वाटेंत तोनदां दिसून जसें कौतुक वाटे व हंसूं येई, तसेंच या वेळीं झालें. अशा तऱ्हेनें गाइडच्या डोळयानें ग्यालरी लगबगाईत पाहून ही मंडळी फुशारकी मारणार, कीं आह्मी फ्लॉरेन्सची पित्ति ग्यालरी पाहिली ! हा प्रकार पग्रामनेबल असल्यास न कळे ! निदान आह्मांजवळ असे मातींत टाकण्यास पैसे आहेत, असें दर्शविण्याचा हेतु असला तर कुणास ठाऊक !

असो. त्या सकाळीं मध्यान्हपावेतों ग्यालरी पाहिली, व दुपारीं त्याच वाड्यांतील मेदिचींच्या अलंकारादि अमूल्य वस्तूंचा दिवाणखाना पहावा ह्मणून गेलों. याला कांहीं पडत नाहीं; पण परवानगी आठवड्यांतून दोन दिवस सकाळींच घेऊन ठेवावी लागते. मला हें माहीत नव्हतें. तेथें गेल्यावर रक्षकानें परवान्याबद्दल विचारतां, मी आतां मिळवून आणतों असें ह्मणतांच 'मिळविण्याची वेळ सकाळीं असते,' असें त्यानें सांगितलें. नाइलाजास्तव परत फिरणार तों त्याच्या मनांत कांहीं येऊन त्यानें मला खुणाविलें. खजिना पहाण्याची आपली उत्कट इच्छा असल्याचें मी त्याला पुनः कळवितां त्यानें मला तिकडे नेऊन आंत सोडिलें. तो बरोबर असल्यामुळें तेथें कोणी परवाना वगैरे पहायला मागितला नाहीं ! व अशा रीतीनें मला त्या अमूल्य वस्तूंचा खजिना बघायला मिळाला. सोनें, चांदी, माणकें यांच्या जडावाच्या पेट्या, देवळांच्या लहान प्रतिकृति, हस्तिदंती क्रिस्तमूर्ति व सोन्याचा सूळ, पूजेचीं उपकरणें, दारू पिण्याचे नक्षीचे सोन्याचे पेले, तबकें, तरवारींच्या मुठी वगैरे अगणित सामान पाहून चकित झालों. येथें हे ग्यालिलिओ व दान्ते यांचे पुतळे मेदिचीनंतरच्या फ्लॉरेन्सच्या लोथ्रिंगर संस्थानिकानें ठेवलेले दृष्टीला पडले. सुंदर जडावाच्या कामाचीं

संगमरवरादि दगडी मेजेंहि बरींचशीं दिसलीं. आणखी बरेंचसें पाहून बाहेर पडलों व त्या रक्षकाचा हात बऱ्याचशा तांब्याच्या नाण्यांनीं गरम केला. याचें मात्र मला कांहीं वाटलें नाहीं. कारण त्यानें आंत सोडलें नसतें तर तो खजिना पहायला मिळला नसता. नंतर वाड्यामागील टेंकडीवर 'बोबोली बाग' नांवाचें उपवन एका आम्फिथियेटरच्या भोंवतीं आहे, त्याची वाट त्याला विचारली. त्यानें वाड्यांतील वाटेनें बरोबर माणूस देऊन मला पोंचतें केलें; इतका वेळ तो हात गरम राहिला हें आश्चर्यच ह्मणायचें! ही बाग इतालियन बागिच्यांची उत्तम कल्पना देते. जागजागीं पुतळे तर विचारूच नये! मध्यें मोठें थोरलें कारंजें व भोंवती बरेच आडवे रस्ते लतांनीं आच्छादलेले असल्यामुळें सदा छायेचे व गार वाटतात. वरच्या बाजूला अन्नपूर्णेचा एक जंगी पुतळा आहे. तेथें दोघेतिघे अमेरिकन कोणी कार्डें लिहीत, कोणी समोरचा देखावा चित्रफळकावर रंगवीत असे बसले होते. मी जवळ जातांच त्यांनीं नेहमींचा ताठ शिष्टाचार बाजूला ठेऊन नमस्कारचमत्कार रीतीप्रमाणें केलें. नंतर एकाशीं माझें पुष्कळ बोलणें झालें. हा हिंदुस्तानांतून एक घाईची सफर करून आलेला असल्यामुळे व इतर प्रवास त्यानें पुष्कळ केला असल्यामुळें असल्या माणसाचें चातुर्य त्याच्या बोलण्यांत दिसून येई. मीहि पुष्कळ बोललों, विचारिलें वगैरे. क्रिश्चन सायन्स ह्मणून नवा धर्मपंथ सध्यां अमेरिकेंत जोरांत आहे, त्याविषयी मीं त्याला विचारिलें.

मनुष्यानें सात्त्विक व श्रद्धाशील राहून पूर्णत्व प्राप्त करून घेणें हें त्याचें ध्येय आहे, व तें साध्य करण्याला ज्याचा तो समर्थ आहे, असा या पंथाचा भरंवसा आहे. मनाची व हृदयाची उन्नति करण्याकडे सारें लक्ष्य असावें ह्मणजे शरीराची उन्नति आपोआप होते. त्याचे रोगहि हा श्रद्धापंथ श्रद्धेनेच दूर करण्याचा बाणा बाळगतो. याला औषधें लागत नाहींत. अर्थात्च हल्लीं प्रचलित असलेल्या क्रिस्ती धर्मांनां व डॉक्टर




‘ दाविद ’ ( इं. डेव्हिड् ), फ़्लॉरेन्स्.

लोकांनां हा पंथ पसंत नाहीं! यूरोपांत इग्लंड, हालंड, स्वित्झरलंड वगैरे ठिकाणीं याच्या अनुयायांची संख्या वाढत असल्याचें हा गृहस्थ सांगे. रोग दूर होण्याच्या कामीं श्रद्धेने कांहीं काम होतें. पण उपचारांवांचून नुसती श्रद्धा किती काम करील, याची कल्पना मला येत नाहीं. नंतर आह्मीं इतर बऱ्याच गप्पा मारल्या. माझी मोठी करमणूक झाली. इतक्यांत कपाळावर हिंदी असा जणूं ठसाच मारलेले एक गृहस्थ आले. थोडा वेळ इकडेतिकडे करून त्यांनीं विचारलें, 'तुह्मी हिंदी का?' 'मलाहि तेंच विचारायचें आहे' असे मीं सांकेतिक उत्तर दिल्यावर ओळख झाली व दोघेहि दुसऱ्या एका टेकडीच्या बाजूनें फिरायला गेलों. नंतर दुसऱ्या दिवशीं दुपारी येथें १८८०च्या सुमाराला मृत्यु पावलेल्या कोल्हापूरच्या महाराजांच्या समाधीचें दर्शन घेण्याचें ठरवून एकमेकांची रजा घेतली.

(ता. २३)

पहिल्या दिवशीं ह्मणजे २१ तारखेला व्हेक्किओ राजवाड्यासमोर दाविदची गिप्सप्रतिकृति व नंतर २२ तारखेला टेंकडीवर मिकेल अंजेलो चौकांत त्याचीच ब्रोन्झ प्रतिकृति पाहून, यांचें मूळ जी संगमरवरी दगडाची अंजेलोची प्रत्यक्ष कृति ती पाहण्याची उत्कण्ठा लागली, व प्रथम ती पाहण्यासाठीं आकादेमिया दि बलेआर्तीकडे गेलों. आंत गेल्यावर समोरच मोठ्या लांबलचक दिवाणखान्यांत मिकेल आञ्जेलोचीं इतर अपूर्ण राहिलेलीं कामें मांडलेलीं असून वर मध्यभागीं कांचेच्या घुमटाखालीं चौथऱ्यावर प्रसिद्ध दाविद (इं. डेव्हिड) ची स्थापना केली आहे. हा प्रचंड पुतळा एकाच मोठ्या शिलेंतून मोठ्या कौशल्यानें छिनून काढला आहे.

आपल्या तारुण्याच्या, शक्तीच्या, वीर्याच्या पूर्ण विश्वासांत अगदीं साधा पण ऐटींत असा हा दाविद उभा आहे. त्यांचें तें अगदीं स्वाभ-

विक उभें राहणें, अवयवांत दाखविलेली रग व चेहऱ्यावर आणलेलें तेज यांची योग्य कल्पना येतांच गोलियाथसारख्या प्रचंड राक्षसाला या वीरानें लोळविलें, याचें बिलकूल आश्चर्य वाटत नाहीं. या मूर्तीकडे पहात उभें रहावें, भोंवतीं फिरून पहावें, समोर बसावें ह्मणजे त्याच्या कर्त्याच्या विशाल कल्पनेची, दगडांतून बरोबर रेखलेले अवयव कोरून काढण्याच्या कसबाची, व याचें प्रमाण एवढें प्रचंड धरून आणिलेल्या भव्यपणाची हवी अशी कल्पना येते, व या अजब मूर्तिकाराची करावी तेवढी स्तुति थोडीच वाटते! भीमाची आपण जशी कल्पना करूं तसाच हा दाविद हुबेहुब आहे, व मुंबईच्या ह्मात्र्यांच्या हातून जर असा कदाचित् निर्माण झाला असता तर त्याला भीम हेंच नांव योग्य होतें; असो. याच्याजवळ सुमारें तासभर होतों. चित्रावरून कांहीं कल्पना येणें शक्य नाहीं, तरी मीं लिहिलेलें वाचून जर चित्र पहाल, तर साधारण अनुमान करतां येईल.

याशिवाय ग्यालरींत फ्लारेन्सच्या चितार्‍यांचीं–पीएत्रो, पेरूजिनो वगैरेंचीं–कांहीं चांगलीं व कांहीं साधारणच अशीं चित्रें आहेत. पैकीं एवांत कांहीं विशेष नसतांहि, त्या वेळच्या (१९ वें शतक) चालीरीतींची थोडी कल्पना देणारें एका लग्नाचें चित्र पहाण्यासारखें आहे. वधूवरांचीं घरें जवळजवळ असून दोन्हीं एका मांडवानें जोडलीं आहेत, व एकाच्या ओव्यावर वाजंत्री वाजवीत बसले आहेत. मांडवाखालून नवें जोडपें मिरवत जात आहे व मागून जुनीं जोडपीं चाललीं आहेत, असें हें कांहींसें आहे. बाळस्तुतीचीं एकदोन चित्रें बरीं आहेत. पर्वतावरील क्रिस्ताच्या व्याख्यानाचें सर्व फ्लॉरेन्सांत एकच चित्र आहे तें या ग्यालरींत. विषय जितका उदात्त व प्रतिभेच्या स्वैर खेळाला उचित, तितकें चांगलें हें साधलें नाहीं. याशिवाय बोत्तिचेलीचें वसंताचें चित्र फार गोड आहे. अत्युत्कृष्ट सृष्टिसौंदर्यांत नाजूक, मनोहर व सुंदर दिव्याकृति (मनुष्याकृति ह्मणतां येत नाहींत; कारण चित्रें सारीं वनश्री,




'वसंत'—फ़्लॉरेन्स.

दक्षिण वायु, व्हीनस, काम अशीं यक्षाप्सरांचीं आहेत ) यांजून चित्रकारानें बहार उडवून दिलेली आहे. अलीकडे झाडाच्या खांदीला धरून कुमार मर्क्युरी उभा आहे, त्याच्या शेजारीं चार लावण्यवती अप्सरा फेरांत नाचत आहेत, यांचे पोषाक अति झिरझिरीत आहेत, ( कर्ता इतालियन, तेव्हां उत्तरयूरोपांतील थंड वसंत तो चित्रांत कसा काढील? ) मध्यें व्हीनस उभी असून, तिच्या वरच्या बाजूस पंख असलेला काम एका अप्सरेला रोखून तीर सोडीत आहे, त्या अप्सरेचें व कुमाराचें परस्पराकर्षण जुळवून आणण्याचा त्याचा बेत दिसतो! मागे वासंती ( वसंत देवता ) आपल्या भरांत व डौलांत उभी असून, बाजूला पुष्पवती ( इं० फ्लोरा ) तोंडांत पल्लव धरून बागडत आहे, मागून झाडांतून चोरून येणारा दक्षिण वायू ( इं. झेफिर ) तिचें तुरळक वस्त्र उडवूं पाहत आहे, असे हें चित्र वसंताच्या सर्व गुणांचे मनुष्याकृतींत रूपांतर करून त्याला पौराणिक कथेसारखें भासविणारें आहे; त्यामुळें तें फारच गोड वाटतें. कुमार-संभवांतील तिसऱ्या सर्गांतील वसंतवर्णनाला व कामलीलेला हें चित्र फारच शोभेल. फक्त मर्क्युरीच्या ऐवजीं शंकर असायला पाहिजे!

या ग्यालरींत वरच्या मजल्यावर नव्या चितार्‍याचीं चित्रें आहेत, तीं आपलीं साधारणच आहेत. पंधरासोळाव्या शतकांतील प्रसिद्धांचीं अप्रतिम चित्रें पाहिल्यावर हीं नवीनांचीं फार नीरस वाटतात. कांहीं बरीं आहेत. उदाहरणार्थ, मिकेल आञ्जेलोचा मरणसमय, हें हृदयद्रावक व वस्तुस्थिति हुबेहूब दाखविणारें आहे. पण मथुरेचा उत्तम कंदीपेढा चाखल्यावर ही यात्रेंतील रेवडी कशी गोड वाटणार!

नंतर ठरल्याप्रमाणें दुपारीं नुक्तीच ओळख झालेल्या हिंदी गृहस्था-बरोबर नदीकांठानें फिरायला गेलों. येथें दोन नद्यांच्या संगमावर (आर्नो व दुसरी एक ) आरामासाठीं प्रशस्त बाग लाविला आहे. हींत कांहीं रस्ते झाडांनीं दोन्हींकडून झांकलेले फार गार व शांत आहेत.

पी बागेस कार्शीने (Cascine) ह्मणतात. चैनी व श्रीमंत लोकांचें हवा खाण्याचें हें ठिकाण आहे. या बागेंत अगदीं संगमावर कोल्हापूरच्या महाराजांची समाधि आहे. तीवर त्यांचा मराठशाई पगडी—तुरा असलेला अर्धपुतळा (Bust) असून त्यावर चार डौलदार हिंदी महिरापींची छत्री कळसाची आहे. कारागीर येथलेच असतील, पण खालील चौथरा व कमानींची छत्री यांचा डौल हुबेहूब हिंदी आहे. कांहीं दागदुजीचें काम चालू असल्यामुळें आह्मांला जवळ जाऊन तेथील लेख वाचतां आला नाहीं. परंतु दोन हिंदी गृहस्थ समाधीचें दर्शन घेऊन गेले ह्मणून महाराजांच्या हिंदी आत्म्यास आनंद झाला असेल यांत शंका नाहीं. या 'प्रिन्चींपे इन्दियानो'ला पहायला गोरकायाहि येतात. आह्मी तेथें होतों तोंवर दोनचार गाड्या थडकून मंडळी समाधि पहात होती. जवळच एक लिक्वोरारिया—शौंडिकागृह आहे, त्याच्या नांवाच्या पाटीवर खात्रीलायक इन्डियन मद्य येथें मिळतात! असें डोळ्यांत भरण्यासारख्या ठळक अक्षरांनीं लिहिलेलें वाचून मात्र हंसूं कोसळलें. यूरोपीय अर्थाची दारू हिंदुस्तानांत होत नाहीं ह्मणून आह्मी समाधान मानतों, तर इकडे हे लोक नसतेच तिचे देव्हारे माजवून फसवेगिरीनें पोट भरायला तयारच!

होता होईल तों पोलिसला रस्ता विचारायचा ही माझी वहिवाट आहे. पण सर्वच वेळीं तसें जुळत नाहीं. उदाहरणार्थ, इल् प्रिन्चीपे कुठें आहे, ह्मणून मीं एका गरीबशा मजुराला विचारलें, तों 'तो पहा नाकासमोर' असे दोन शब्द सांगून बिदागीसाठीं त्यानें आपली टोपी पुढें केली, व तींत एक तांब्याचें नाणें टाकणें भाग पडलें! वाटसरांस, प्रशाशांस वगैरे रस्ता सांगण्यासारखी क्षुल्लक मदत कोणीहि हौसेनें करतो. इग्लंद, फ्रान्स वगैरे कुठेंहि याचे कोणाला कांहीं वाटत नाहीं. जर्मनींत तर मला नीट रस्त्यावर लावण्यासाठीं कितीकदां तरी माणसें आपला रस्ता सोडून मजबरोबर आलेलीं आहेत. स्वित्सरलंदांतहि

अशा कामागिरीबद्दल बक्षिस मिळविण्याची एकाद्या सुद्धां भिकाऱ्यानें इच्छा दर्शविली नाही. टिरोल प्रांतांतहि तेंच. पण येथें पहावें तों निराळाच प्रकार! आपण लोकांची सेवा करण्यासाठींच आहोंत असें दाखवून उत्सुकतेनें पुढें पुढें करणारांना येथें तोटा नाहीं—पण एक बोट उचलण्याचें काम असले तरी निर्लज्जासारखी आपली टोपी पुढें करतात! कुठेंहि जा, तेंच. देवळांत गेलें तरी दाराशीं खुर्ची टाकून एकादा वृद्ध अगर एकादी जरठा बसलेली असते; दार बंद नसलें तरी हे जातांना व येतांना बळेंच न सांगतां उघडल्यासारखें करतात, व आपण त्यांतून निघावें तों आपली टोपी अगर हाताचा पसा आहेच पुढें! याच्याहि पलीकडला प्रकार ह्मणजे आपण एकाद्या पडवीच्या रस्त्यांतून अगर बोळांडींतून जावें ह्मणजे जागजागीं खुर्ची टाकून टोपी अगर हात पसरणारीं माणसें अडवतात! भिक्षा मागण्याचा प्रकार हिंदुस्तानासारखाच इकडेहि आहे; पण हिंदुस्तानांत एकादा भिकारी सुद्धां रस्ता दाखवण्यासाठीं झोळी पुढें करील, असें मला वाटत नाहीं. आणखी एक प्रकार व्हेनिसला पाहिला. रात्रीं दहा वाजायच्या वेळेला तुमचें पत्र लिहीत बसलों होतों, तों होटेलमागच्या बोळींत एकदम आरडा झाल्यासारखें वाटलें; जरा कान दिला तों मुलें जमून गाणीं ह्मणताहेत व ओरडताहेत असें कळलें. होटेलमधील माणसाला विचारलें, तेव्हां त्यानें सांगितलें, कीं, हीं मजुरांचीं, भिकाऱ्यांचीं वगैरे मुलें अशींच रात्रीं गल्लोगल्लीं, दारोदारीं भिक्षा मागत फिरतात, व नाहीं दिलें कीं त्रास देऊन सोडतात!

तारीख २४.

कांहीं पहायाचें राहिलें नाहीं ह्मणतां राष्ट्रीय अजबखाना व एक जुनें गॉथिक पद्धतीचें 'मारिया नोव्हेला' नांवाचें देऊळ राहिलेंच होतें. हीं दोन्ही शनिवारीं सकाळीं भरकाटलीं. पैकीं म्यूझियममध्यें

फक्त दोनातेलो नांवाच्या फ्लॉरेन्टाईन कारागिराचे सान्तजोर्ज्यो, दाव्हिद् वगैरे नामांकित पुतळे व आञ्जेलोचे ब्रूटस्, मादोना वगैरे अर्धेच राहिलेले पुतळे व नामांकित वस्तु पहाण्यांत आल्या.

कांहीं इतर कारागिरांचीं ब्रोन्झची कामेंहि वाखाणण्यासारखीं होतीं. या म्यूझियम्चा वाडाच पहाण्यासारखा आहे. तेराव्या शतकांतलें मध्ययुगी भक्कम काम आहे; वाड्याचे वाडा, काटचे कोट असें दुवाजवी आहे. आंत गेल्यावर इकडील जुन्या पद्धतीप्रमाणें चोहींकडून भव्य खांबांच्या सोप्याचा चौक लागतो, व त्यांत डाव्वीच्या बाजूच्या एका भिंतीला प्रशस्त उघडा दगडी जिना आहे. भिंतीवर शस्त्रास्त्रें, राजांचीं चिन्हें वगैरे विपुल आहेत. याप्रमाणें हा वाडा व देऊळ पाहून फ्लॉरेन्सचें काम संपविलें. येथील सर्व जुन्या देवळांत भिंतींवर–गाभाऱ्यामागें वगैरे नाणावलेल्या कारागिरांनीं बायबलवृत्तांताचीं चित्रें रंगविलीं आहेत. यांना फ्रेस्केन् म्हणतात. हीं फार पहाण्याजोगीं असतात, व तेवढ्यासाठीं या देवळात सकाळीं जावें लागतें. दिवस कलल्यावर आंत अंधुक प्रकाश असल्यामुळें नीट दिसत नाहीं. एकूण एक देवळांत असेंच ! हा मला मोठा दोष वाटतो. फक्त मिकेल आञ्जेलोच्या मेदिची गाभाऱ्यांत चार वाजतांहि उत्तम प्रकाश होता; पण हें एक लहानसें देऊळ सोडून, बाकींत दोष सारखाच आहे. दुओमोमध्यें तर पांच वाजतांच दिवे वगैरे लागून पार होतें ! बाकी क्याथोलिक देवळांत सतत नंदादीप, मेणबत्त्या वगैरे असतात, ही गोष्ट निराळी.

एकंदरींत फ्लॉरेन्सचे चारपांच दिवस मोठ्या गडबडींत पण सुखांत गेले. फ्लॉरेन्सला आल्याबद्दल आनंद वाटला. जुन्या कलांच्या बाबतींत यूरोपांत फ्लॉरेन्सचा पहिला नंबर आहे. रोमहि प्रसिद्ध आहे, पण त्याची प्रसिद्धी जरा वेगळी. पानश्योनची व्यवस्था प्रथमपासूनच झाल्यामुळें खाण्यापिण्याचेहि हाल झाले नाहींत व दारू न पिण्याबद्दल हंसूं वगैरे हेंहि कांहीं झालें नाहीं. येथेंच प्रथम बरामा भात, व मसाला घालून

केलेली बटाट्यांची, वांग्यांची वगैरे भाजी चाखायला मिळाली. याचा मसाला आपल्याकडीलप्रमाणें काळा, तिखट व उग्र नसतो. तांबूस, स्वादिष्ट असा असतो. वांग्यांच्या भाजीवर तर त्या दिवशीं मीं खूब ताव मारला. तीन मोठे चमचे भरून घेतले! शिवाय माक्करोनी वगैरे असेच.

याप्रमाणें फ्लॉरेन्सचें पहाण्याचें साधारणपणें उरकून-कारण खरें ह्मटलें असतां प्रत्येक ग्यालरी नीट थोडथोडी अशी पाहूं गेलें पाहिजे पण वेळ कुणाला होता?—१३-२५ वाजतां निघालों, व दीरित्ति सिमो (एक्सप्रेस्) गाडीनें ३१६ किलोमेटर ओलांडून १९ वाजतां (येथें सरकारदरबारांतसुद्धां तास मोजण्याची हीच जुनी रीत कायम आहे) रोम येथें येऊन पोंचलों. प्रदेश डोंगराळ-अपेनाईन्सच्या कडे-कडेचा, व निम्यावर मार्ग तीबर (इं. टायबर) च्या कांठानें असल्या-मुळें प्रवास बरा झाला. एकदां एका बाईनें विचारतां मी इन्दियानो ह्मणून कळल्याबरोबर, सर्व कॉरिडोरभर 'इन्दियानो, इन्दियानो' ह्मणून ऐकूं येण्यासारखी कुजबूज सुरू झाली.

१८ व्हिया देल बाबुईनो, रोम २९ ऑगष्ट, १९१२.

रोमला ज्या संध्याकाळीं आलों त्याच रात्रीं वरच्या ठिकाणीं बिऱ्हाड टाकून पोस्टांत धूम ठोकली. वाट मोठ्या कोर्सो उम्बर्टो नांवाच्या राज-रस्त्यानें होती, येथें बरीच गर्दी दिसली. तेथून पोस्टांत जाऊन पत्रें घेतलीं व एका 'रिस्तोरान्ते' मध्यें जेवतांजेवतां वाचलीं.

नंतर फिरतफिरत व्हिक्तोरियो एमानुएलेच्या प्रचंड स्मारकाकडे गेलों. या बाजूला फ्याशनेबल कॉफीगृहें, दारूगृहें असल्यामुळें दुका-नांतून, रस्त्यावरून व चौकांत बरीच गर्दी जमून चकाट्या पिटण्याचा उद्योग चालला होता. नंतर तशाच मोठ्या व दळणवळणाच्या व्हिया-नात्स्योनालेंत वळलों. यांत चिनेमा नाटकगृहापुढें बरीच गर्दी दिसे. यावर 'बांका दि इतालिया' वगैरे सारख्या मोठमोठ्या नव्या

इमारती आहेत. मग एका लखलखीत बोगद्यांतून क्विरिनालेकडे आलों. तेथें मोठमोठे राजवाडे दिसले. त्यांतून पियाझा स्पान्याच्या गदात मिसळून व एका चिनेमांत थोडा वेळ बघून बारांच्या सुमाराला बिऱ्हाडीं परतलों. येथील 'चिनेंत' व्यवस्था जर्मनीपेक्षां बरी दिसली एक खेळ सुरू असतांना मध्येंच जे प्रेक्षक येतील त्यांस बसण्यास एक किंवा दोन हॉल असतात. प्रत्यक्ष नाटकगृहांतहि व्यवस्था चांगली असते; कोंदट कुजटपणा असत नाहीं; पडदा मोठा असतो वगैरे. या रात्रीं रोमची किंचित् कल्पना आली. पण ती नव्या रोमची. या दोनतीन तासांत मीं जें पाहिलें तेंच व्हियेनाला, बर्लिनला, पारिसला, ब्रसल्सलाहि आहे पण रोमला जे माणूस येतें तें यास ठीं नव्हे. रोमला कांहीं निराळेंच पहायला मिळावें अशी डोळ्याची इच्छा असते.

रविवारीं अर्थात् मोठ्या उत्सुकतेनें अगदीं जुनें रोम पहाण्याच्या उत्कण्ठेनें बाहेर पडलों. वाटेंत एकदोन देवळें लागलीं तीं पाहून घेतलीं. पैकीं पहिलें सान्ता मारिया माज्जिओरेचें. याची अशी आख्यायिका सांगतात, कीं, एके रात्रीं पवित्र कुमारिका पापा लिबेरिउस् (३५२–३६६) च्या स्वप्नांत आली, व उद्यां सकाळीं तुला ज्या ठिकाणीं बर्फ दिसेल, तेथें माझें देऊळ उभार, असा दृष्टांत देऊन गेली. रोमला बर्फ आणि तेंहि आगस्टाच्या पांचव्या तारखेला! तें कसेंही असो. यावरून हें बरेंच जुनें देऊळ आहे यांत शंका नाहीं. रोमला मारियाचीं जा अनंत देवळें आहेत, त्या सर्वांत हें मोठें, भव्य व श्रीमंत आहे. निरनिराळे भाग निरनिराळ्या वेळीं बांधले जाऊन पंधराव्या शतकांत याला हल्लींचा आकार मिळाला. याच वेळीं अमेरिकेंतून यूरोपांत पहिल्याप्रथम जें सोनें आलें, त्यानें देवळांतील छत सजविलें आहे, असें ह्मणतात! मुख्य गाभाऱ्यांत पारफिर नांवाच्या काळसर तांबड्या (गहन गुलाली) दगडाच्या पेटींत क्राइस्तच्या शिष्यांपैकीं एक मथ्थू याचीं हाडें आहेत. या गाभाऱ्याखालीं छोट्याशा तळघरांत कनफेशन् अगर पापा (इं० पोप) च्या


Ed. A. VASARI - ROMA - 1376 - Chiesa di S. Pietro in Vincoli - MOSE' di MICHELANGELO con LEA e RACHELE

‘ लेआ ’ ‘ मोझेस् ’ ‘ राहेल् ’

किंवा त्यांच्या उपाध्यायाच्या कानात आपल्या पापांचा उच्चार करून त्यांतून मोकळें होण्याची जागा आहे. डावीकडे पोप पांचवा सेक्स्टुस याचा गाभारा अगर देव्हारा मोठा शोभिवंत आहे. त्यावेळची क्याथोलिकांची संपत्ति, श्रद्धा व देवळात सगळा डौल आणण्याची हौस यांचें हें देऊळ उत्तम उदाहरण होय.

नन्तर दुसऱ्या 'सान्त् पिएत्रो इन् विंकोली' देवळामध्यें गेलों. माज्जिओरे पाहिल्यावर हें डोळ्यांत भरत नाहीं. यांतही कनफेशन् वगैरेची जागा यथास्थित आहे. पण माज्जिओरेंत जें नाहीं तें तेथें पहायाला मिळून, इतक्या पायऱ्या उन्हांत चढल्याचें सार्थक झालेंसें वाटतें. तें ह्मणजे मिकेल अांजेलोचा प्रसिद्ध मोझेसचा पुतळा होय. पापा ज्युलिउस् दुसरा (१५१२) याच्या हयातींतच त्याच्या कबरस्तानासाठीं हें दुमजली स्मारक आंजेलोनें घडलें. पैकीं वरचा भाग त्याच्या शिष्यांनीं केला असून, दोहींत अंतर तेव्हांच दिसतें. खालचा भाग—ह्मणजे ओट्यावर सचिंत व त्रासलेला मोझेस् व दोन्हीं बाजूंच्या कमानींत डावीकडे सुंदर व आरामात असलेली राहेल (राचेल्, राखेल!) व उजवीकडे उद्योगीपणाची केवळ मूर्तिच अशी लेआ, अशा दोन ज्यू पुराणांतील प्रसिद्ध स्त्रिया आहेत. दोहींच्या चेहऱ्यावरील त्यांच्या आयुष्यक्रमाच्या निराळ्या रीति दाखविणारा वेगळेपणा चटकन् लक्षांत येतो. दोहींतहि डौलदारपणा, किरकोळ अवयवादींत कसोशी, व एकंदर पुतळ्यांचा चटकदारपणा हीं सारखींच आहेत; पण या स्मारकांतील केन्द्रस्थान ह्मणजे मोझेस् होय. ज्यूलोकांनां न्यायशास्त्र देते वेळीं त्यांच्या नाना देवतें पूजणें, मूर्तिपूजा वगैरेंनीं त्रासलेला, चिन्तामग्न असा त्या ऋषीचा भव्य, दिव्य, वृद्ध पण भरदार चेहरा एकदम आदरास पात्र होतो. विस्तृत कपाळ, पाणीदार डोळे, दृढनिश्चय दाखविणारे ओंठ व लांब छातीवर रुळणारी शुभ्र दाढी हीं सर्व पहाणाराचे मनांत पूज्यभाव उत्पन्न करितात. त्याच्या हृदयांत काय चाललें असेल हें ते त्रस्त डोळे व एकंदर चेहरा

आरशाप्रमाणें स्पष्ट दाखवितात. अशा या मोझेसला पाहून मला कौतुक व आनंद वाटला. जों जों त्याकडे पहावें तों तों हीच भव्यमूर्ति मनूलाहि शोभेल असें वाटतें. तासाभरानें तेथून उठतांना तर हा मिथेल् आञ्जेलोचा मनु असें ह्मणून मी गुंग झालेलाच बाहेर पडलों.

याशिवाय या देवळांत कनफेशन्‌मध्यें सान्त पीतरला ज्यांयोगानें जखडलें होतें त्या सांखळ्या जपून ठेवल्या आहेत. त्या दर्षांतून एकदां लोकांनां दाखविण्याचा प्रघात आहे; त्यामुळेंच या देवळाला पीएत्रो इन् व्हिंकोलि (सांखळ्यांनीं जखडलेला पीटर) असें नांव पडलें आहे. नंतर पावलोपावलीं दोन हजार वर्षांच्या जुन्या स्मृतींनीं गजबजलेला फोरो रोमानो (इं. फोरम) पाहण्यास गेलों. रोम मुख्यतः टेकड्यांवर वसलें होतें, हें तुह्मांला कदाचित् ठाऊक असेल. यापैकीं कापिटोल् (हल्लीं काम्पिदोलिउम्) चें नांव तरी तुमच्या कानांवरून गेलें असेल. शिवाय किरिनालिस, व्हिमिनालिस् , वेलुस् , एस्क्विलीनुस्, पालाटीनुस , पिंचिउस् अशा एकंदर सात आहेत. पैकीं कापिटोलिउमवर कचेऱ्या व दरबारी इमारती, पालाटीनुस्‌वर (पुढील) बादशहाचे राजवाडे व बाकीच्यांवर इतर वस्ती असून, शहरच्या व्यापाराचें व बाहेरील देवघेवीचें केन्द्रस्थान जो फोरो अगर बाजारचौक तो उत्तर-पश्चिमेला कापिटोलिउमच्या व दक्षिणेकडून पालाटीनुस्‌च्या पायथ्यांशीं आहे. रोम येथें लोकसत्ता असतांना व पुढें एकसत्तेच्या बादशाही काळांतहि या फोरोवर काय देखावा असेल याची कल्पनाच करवत नाहीं. कारण मुख्य देवळें येथें असून, देवघेव व वक्त्यांनीं लोकजागृति करणें हें सर्व येथें होत असे. बादशाहा तितुस् यानें इ. स. ७० त या फोरोच्या पूर्वतोंडीं उभारलेल्या विजयतोरणांतून मी आतां गेलों, तों मला काय दिसलें? विटांचे दगडांचे ढीग, फुटलेले खांब, तुटलेलीं उथळीं, उखळलेल्या फरशा, जमीनदोस्त झालेल्या कमानी, होतीं कीं नव्हतींशीं झालेलीं देवळें व इतर इमारती—यांचा उदास पसारा मला

चोहींकडे दिसला. दोन टेंकड्यांमधील हा कांबरंद खळगा जणूं मोडक्या भडगळीनें भरावा असा भयाण दिसला! व प्रथम मी गोंधळून गेलों. पुस्तकांमध्यें अमुक ठिकाण अमक्याचें अशा खुणासुद्धां मला लौकर सांपडेनात; व शेवटीं या फोरममध्यें ज्या ठिकाणावरून सिसेरोसारख्यांनीं व्याख्यानें दिलीं, आन्टनीसारख्यांनीं आपल्या भाषणानें लोकांनां क्षणांत प्रक्षुब्ध केलें, जेथें लोकांनीं जागचे जागीं लांकडें जमा करून सीझरचें प्रेत भरबाजारांत जाळून त्याच्या मारेकऱ्यांला दहशत बसविली, ज्या ठिकाणीं अशा भयंकर मृत्यूपूर्वीं सीझरनें एक मोठें थोरलें देऊळ बांधिलें, त्या सर्वांचा कोठेंहि पत्ता लागूं नये काय! असे उद्विग्न विचार मनांत येऊं लागले. रोमच्या पूर्ववैभवाच्या त्या स्मशानभूमींत पिशाच्चवत् इकडूनतिकडे सैरावैरा हिंडलों, पण समाधान झालें नाहीं. शेवटीं एकदोन अजून शाबूत असलेल्या खांबांच्या खुणेनें व कांहीं तेथील माहितगारांनां विचारून हळुहळू उलगडा होऊं लागला. मजसारखेच आणखी पुष्कळ लोक हुडकीत होते. जसें एकाद्या भयंकर अपघातांत सांपडलेलीं आप्तेष्ट माणसें डोळ्यांत तेल घालून धुंडाळून काढावीं, तसाच तो प्रकार दिसे. इतालियन माणसांनां तर तीं स्थळें व त्यांशीं संबंध असलेलीं जुनीं माणसें खरोखर आप्तच. इतर यूरोपीयांनांहि ल्याटिनच्या द्वारें विद्या व कला या स्मरणावशेष झालेल्यांनीं व त्यांच्या वंशजांनीं शिकविल्यामुळें गुरुपणाच्या नात्यानें आप्तपणा साहजिक येतो; पण मजसारख्या परस्थासहि या लोकांविषयीं अप्रत्यक्ष ज्ञान असल्यामुळें व त्यांच्या शौर्यवीर्यादि गुणांमुळें—कलाकौशल्यामुळें आदर वाटल्यास नवल नाहीं. या आदरानें व उत्कण्ठेनें प्रेरित होऊन मीहि तीं पुसट झालेलीं ऐतिहासिक स्थळें शोधूं लागलों.

आरंभीं एक खुणेचें ठिकाण दाखवून एका डॉमिनिकन् भिक्षूनें (यांचा झगा पांढरा असतो) मदत केली. मीहि या बाबतींत इतकें लक्ष घालतों हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें व त्यानें पहिला बादशहा

ऑगस्टस् सीझर ( इ. स. पूर्वी ३० ) यानें स्थापिलेलें पुस्तकालय दाखविलें; याचें पुढे क्रिश्चन पापांनीं (इं. पोप् )देऊळ केलें, तेंहि बहुतेक पडून गेलें आहे. विटांच्या थोड्या भिंती व एकदोन ठिकाणीं मादोनाची चित्रें मात्र कायम आहेत. या गोष्टींमुळें मला एकएक पत्ता लागत चालला व मग मी नीट आरंभापासून पाहूं लागलों. कापिटोलिउम् टेंकडीचे पायथ्य शी दोनतीन देवळांच्या पडकळी आहेत. पैकीं एकाचे तीन व एकाचे सुबक कॉरिन्थियन पद्धतांचे आठ खांब मात्र अवशिष्ट राहिले आहेत. हे आठ ज्याचे आहेत तें देऊळ बारा देवांसाठीं (जसे आपले द्वादशादित्यच ! ) इ. स पू. चवथ्या शतकांत बांधलें गेलें होतें. तीन अवशिष्ट खांबाचें देऊळ व्हेस्पाशन् (इ.स.६९–७९) देऊळ म्हणून प्रसिद्ध असे. हें बादशहा दोमितिआनुम ( इ. डोमीशन् ८१–९६) च्या अमलांत बांधलें गेलें होतें. या मोडकळींच्या व फोरुमच्यामध्यें सध्यां नवा रस्ता आहे. त्यावरून खालीं फोरूम्‌मध्यें उतरलें, कीं, त्याच्या उजव्या बाजूला जुन्या खांबांच्या दोन रांगांचे अवशेष असलेली ३३० ×१६०फूटी एक मोठी थोरली बखळ लागते. येथें पूर्वीं पाम्पेयीवर मिळवलेल्या विजयाच्या स्मरणार्थ ज्यूलियस सीझरनें 'बासिलिका ज्यूलिया' नांवाचें टोलेजंग देऊळ उभारलें होतें ( सुमारें इ स. पू. ४७). यांतच पुढे केन्टुमव्हिरल न्यायसभा भरत असे. आतां खांबांच्या विटांचे गाभे व त्यांस मढविणाऱ्या संगमरवराचे तुकडेताकडे त्याभोंवतीं जुळवून ठेवलेले याखेरीज या प्रसिद्ध बासिलिका ज्यूलिया देवळाचा बिलकूल अवशेष राहिला नाहीं. त्याच्या पश्चिम बाजूंन नवें क्रिश्चनपंथी देऊळ घुसविलें होतें, तें मात्र मध्ययुगापावेतों कायम असावें. याचे खांब आडवे पडलेलेच, पण बरेच शाबूत आहेत.

या देवळाच्या उशाशीं साटुर्नुस (इं. सॅटर्न्) शनिमहाराजांचें देऊळ होतें; इ. स. पू. ४९७ त याची स्थापना होऊन सीझरच्या वेळेला एक दुरुस्ती झाली होती. यांत पूर्वीं लोकसत्ताक राजपद्धतीच्या

सदींत सरकारी खजिना असे. आतां याचे आठ खांब, व त्यांच्या दगडी तुळईवर कोणीं पुनः एकदां दुरुस्ती केल्याचा लेख आहे; बाकीचा भाग मातींत मिळाला असून त्यावर आतां झाडेंझुडपें वाढलीं आहेत. याच्या पलीकडे सातव्या सेव्हेरसनें ( १९३–२११ ) पार्थियन लोकांवर आपल्या मुलांनीं संपादिलेल्या विजयस्मरणार्थ जयतोरण ( इ. स. २०३ ) उभारलेलें मात्र अजून कायम असून, त्या वेळच्या रोमन शिल्पकौशल्याची साक्ष देतें. मी जींतून उलटा आंत आलों, ती टीटसची कमान हिच्या अगदीं विरुद्ध दिशेला आहे. फोरमच्या उत्तरटोंकाला ही व दक्षिणटोंकाला टीटस कमान ( इ. स. ७० ) आहे, असें ठोकळ मानानें ह्मटल्यास हरकत नाहीं. या कमानीच्या व सटुर्न देवळाच्या मध्यें विटांची पडकळ असून त्यांत पाणी आहे. ही जुन्या रोमची नाभि होय, असें ह्मणतात ( उम्ब्रिलिकुम उर्बिस रोमे ). शनीच्या व बासिलिका ज्यूलिया कोंपऱ्यावर बादशहा तिबेरस ( Tiberus ) यानें जर्मन लोकांवर आपल्या मुलानें मिळविलेल्या विजयाच्या स्मरणार्थ कमान बांधिली होती ( इ. स. १६ ). तिचा फक्त पाया हल्लीं दिसतो. तिच्या उजवीकडे नाभीच्या खालीं रोस्ट्रा नांवाची वेदी अगर व्यासपीठ आहे. रिपब्लिकच्या वेळीं यावर चढून फोरम्मध्यें जमलेल्या लोकांनां प्रसिद्ध वक्ते व्याख्यानें देत असत. ब्रूटसचें प्रसिद्ध व्याख्यान येथूनच झालें असावें. जरा वांकडें–पुढें काळा धोंडा जेथें आहे तेथें–रोमसंस्थापक रोमुलुस याचें कबरस्तान होतें असें मानतात, व त्या स्मरणासाठींच काळा धोंडा तेथें दोन हजार वर्षांपासून आहे. त्याच्यापुढें कोमिटिउम् ही त्रिकोणी जागा न्यायसभा वगैरे भरण्याची असे व फरसबंदी फोरमवर पूर्वीं बाजार भरे; पण इ. स. पू. दोनतीन शतकें लोकसत्ताक राज्य जसें जोरावर चाललें, तसें कोमिटिउम् पुरेनासें होऊन असल्या गोष्टींसाठीं सीझर वगैरेंनीं फोरम् वसविलें. ते शूर, बलवान्, गुणज्ञ, कलाकौशल्यप्रिय लोक फोरम्वर सभेसाठीं जमत

असलीक त्या वेळीं तेथें काय प्रेक्षणीय देखावा असेल, याची कल्पनाहि करवत नाहीं! बरींचशीं शतकें रोमच्या व तदनुरोधानें सर्व यूरोपीय जगाच्या राजकीय—सामाजिक उलाढालीचें केंद्रस्थान असें तें फोरम् पाहिल्यावर मजसारख्या परस्थाच्याहि मनांत त्या गत-कालाविषयीं, या लोकांच्या अपूर्व गुणांच्या लौकिकाविषयीं पूज्य विचार आल्यास काय नवल आहे? नंतर याच फोरम्वरून सीझरचें प्रेत दहनासाठीं नेत असतां कोठें तरी विसाव्याच्या ठिकाणीं मार्क आन्तो-निओ यानें इ. स. पू. ४४ घ्या मार्च महिन्यांत एका खळबळून सोड-णाऱ्या प्रसिद्ध व्याख्यानानें लोकांचीं मनें वळवून सर्व पारडें एकदम फिरविलें तें स्थल कोठें आहे हें पाहण्याची उत्कंठा लागली, व धुंडतां-धुंडतां अखेर तें सांपडलेंहि.

व्हिया सांता (पवित्र रस्ता)नें प्रेत जात असतां या विसाव्याच्या ठिकाणीं आन्टनीनें कळवळ्याचें व धूर्तपणाचें भाषण केलें; प्रचंड सहस्त्रशीर्ष जनसमूह एकच तासापूर्वीं जसा सीझरच्या विरुद्ध वळला जाऊन त्याला मारल्याबद्दल पसंती दर्शवून चुकला होता, तसाच आतां तितक्याच आवेशानें त्या मारेकऱ्यांविरुद्ध क्षुब्ध होऊन, त्यानें जागच्याजागीं चिता जमवून भर शहरांत फोरम्समोर सीझरला अग्नि दिला, व इतक्यानेंहि न शमलेल्या रागाच्या सपाट्यांत मारे-कऱ्यांच्या घरांवर हल्ला करण्याला एकाद्या प्रचंड पूरासारखा उसळला! त्या वेळचा तो जुन्या रोममधील देखावा काय असेल! सर्व रोम त्या फोरम्वर जमलें असेल; स्वभावभित्र्या स्त्रिया खिडक्यांतून जमल्या असतील; व प्रत्येक क्षणीं काय नवा चमत्कार घडून येतो या अनि-श्चयांत चकितपणें टकमकां पाहत असतील! एका क्षणापूर्वीं सीझरच्या अनेक मित्रांच्या तोंडचें पळालेलें पाणी आन्टनीच्या भयंकर भाषणानें (भयंकरच म्हणायचें तर काय?) परत आलें असेल. सीझरला

ज्या वेळीं भर फोरम्‌वर लोकांनीं अग्नि दिला, त्याच वेळीं इतक्या जुन्या व नाणावलेल्या रोमन लोकसत्तात्मक पद्धतीची राखरांगोळी झाली! त्या राखेंत चौदा शतकांनन्तरहि थोडीशी जीव धरून राहिलेली रिप-ब्लिकन् अग्नीची फुणगी इ. स. १३४७ सालीं कोला दि रिएन्झो यानें फुलवण्याचा प्रयत्न केला; पण राखेंत जी जीव धरून होती, तिला मोकळी हवा न सोसून ती एकदाम वर्षांत कायमची विझली!

या ठिकाणीं शेवटचा कॉनसुल व पहिला रोमन बादशहा ऑक्टे-व्हियस् ऑगस्टस् यानें देऊळ बांधिलें व इ. स. पूर्वी १९ व्या वर्षी आक्टिउम् येथें विजय मिळून सर्वसत्ताधारी बनल्यानंतर त्याची वास्तुशांति केली. याच्या पश्चिमेस औगुस्तुस्‌चें तोरण नामशेष झालेलें आहे व पलीकडे कॅस्टॉर व पोलक्स या देवतांचें देऊळ असे; त्याचे तीन खांब राहिले आहेत. याच्यापलीकडे मोठा कान्स्टॅन्टाइन (३०६–३७) यानें बांधलेल्या देवळाच्या मोठमोठ्या विटांच्या कमानी अजून आहेत. पुढें खाजगी लोकांचीं घरें, व्हेस्टल् व्हर्जिनस् म्हणून कुमारिकांचा मठ व देऊळ वगैरे गोष्टी होत्या. त्याविषयीं लिहून तुम्हांला कंटाळा आणीत नाहीं.

अशा तऱ्हेनें या फोरम्‌वर काळाचा विध्वंसक हात सपशेल फिर-लेला पाहून भर्तृहरीप्रमाणें 'सर्वं यस्य वशादगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः' असें म्हणावें लागतें. काळाला अर्थात् पांचव्या–सहाव्या शतकांत गॉथ् व व्हान्डाल लोकांनीं मदत केली, अथवा काळाचे ते मर्त्यलोकचे अवतारच होत. त्यांनीं रोमचा वाटेल तसा सत्यानाश केला व या शहराच्या जुन्या वैभवाचें केन्द्रस्थान व सद्दीची खूण जें फोरम् तेथें आपल्या प्रम्य म्हणीप्रमाणें दिवसा राक्षसिणीला पीठ कांडायला लावलें. जुन्या देवळांना बुचीं करण्याला धर्माची प्रत्यक्ष मूर्तिच जे पापा (पोप) तेहि कांहीं अंशीं कारणीभूत झाले, असें म्हणावें लागतें. पैकीं एकदोन देवळें सध्यां ख्रिश्चन देवळांखालीं गाड-लेलीं असावीं. बाकीच्यांचे खांब वगैरे केव्हां केव्हां उसतरून पवित्र

वळास लाविले गेले. चारपांच शतकांपूर्वींपासून यूरोपांत पुराणवस्तुसंरक्षणाची जी प्रवृत्ति पडली आहे, तिनें आज जें पहायला सांपडतें तें तरी राखून ठेविलें आहे !

फोरम्च्या साधारण दक्षिणेकडे पालाटिनुस टेंकडी असल्याचें वर सांगितलेंच आहे. येथें पूर्वीं बादशहांचे वाडे असत. असत ह्मणण्याचें कारण कांहींचा तर मागमूस सुद्धां राहिला नाहीं. बादशहा टिबेरुस (इ. स. १४ ते ३७) याच्या वाड्यावर अक्षरशः गाढवांचा नांगर फेरून तेथें आतां एक हवा खाण्यासाठीं सज्जा व भोंवतीं बाग आहे! याचा वेडा मुलगा (?) कालिगुला (Caligula) यानें येथून कापिटोल्वरील ज्योव्हच्या मंदिरापर्यंत पूल बांधविला होता. कारण काय तर ज्योव्हचा अवतार जो आपण—त्याचें ज्योव्हशीं प्रत्यक्ष बोलणें सुलभ व्हावें ! याच्या वेडेपणाच्या साक्षीचा मात्र कोठें पत्ता राहिला नाहीं. जरा पलीकडे वरील टिबेरुस्ची आई लिव्हिया रहात असे; तिच्या त्या १६ पावलें लांब व ६ पावलें रुंदीच्या राहण्याच्या तीन खोल्या व आडवी जेवणाची ओसरी व पुढील चौक हीं चांगलीं कायम आहेत. भिंतीवरील कांहीं चित्रेंहि पुसटपुसट असून इ. स च्या आरंभीच्या रोमन चित्रकलेची थोडी कल्पना देतात. हिचें गरीब घर राहिलें; पण बादशहातीवर चढलेला मुलाचा वाडा जमीनदोस्त झाला ! 'महापुरें झाडें जाती । तेथें लोहाळे वांचती !' याच्या पूर्वेस औगुस्तुसचें घर आहे (इ. स. पू. ३० ते नंतर १४). हें फार विस्तीर्ण असावें असें याच्या पायाची खणणी चालली आहे त्यावरून दिसतें. मागच्या दरवाजाचे सहा खांब अजून जागींच अर्धे उभे आहेत. बाकी चोहोंकडे संगमरवराचे तुकडेताकडे, तांबड्या व पांढऱ्या दगडांची जमीन वगैरे कांहींकांहीं आहे. यावरून फक्त विस्ताराची खरी कल्पना येते; वैभवाची खरोखर कल्पनाच करावी लागते ! शेवटीं सेप्टीमुस सेव्हेरुस (१९१–२११) याच्याहि वाड्याची तीच स्थिति आहे. येथें

एका काळीं वाडा होता व त्यांत प्रसिद्ध बादशहा राहत असे, असें सांगितलेलें अगर वाचलेलें कल्पित कादंबरीसारखें वाटतें ! या नामशेष वाड्यांतून एक भुयारासारखा रस्ता वरून खंदकासारखा दिसतो; वरच्या बाजूला टेंकडींत मोठा थोरला खळगा खणून त्यांत केलेल्या हिपो-ड्रोम् ( रपेटीचें मैदान-घोड्यांच्या खेळाची जागा ) कडे तो वळतो; येथेहि ओळीनेंच दुतर्फा खांबांच्या खुर्च्या मात्र कायम राहिल्या आहेत; नंतर पर्लाकडे सेप्तीमुस सेव्हेरुस् ( १९३-२११ ) याचें मंदिर असे, असें ह्मणतात. त्याचा तर यत्किंचित् मागमूसहि नाहीं. जेथें कांहीं तुरळक खांब, फरशा व दोन सबंध कमानी अजून कायम आहेत त्याला मी स्मशानभूमि ह्मटलें; तेव्हां जेथें बिलकूल कांहींच नाहीं त्यास काय ह्मणावें !

कापिटोलवर आतां टोलेजंग नव्या इमारती मिकेल् आञ्जेलो-सारख्यांनीं बांधिलेल्या आहेत. नाहीं ह्मणायला सध्यांच्या सेनाटोरे सभेपुढें जें कारंजें पायऱ्यांत काढलें आहे, त्याच्या अग्रभागीं जुनाट रोमची मूर्ति मात्र आहे. शिवाय सेनाटोर मंदिर अंशतः ज्यावर रचलें गेलें आहे व ज्याची मागली बाजू फोरम्मधून चांगली दिसते असें टाबुलारिउम्हि जुनेंच आहे. विटांची भक्कम पांचघई इमारत आहे, व छत सपाट नसून कमानीकमानींचें आहे. कांहीं खांब, पुतळे वगैरे अद्याप अवशिष्ट आहेत. ही इमारत इ. स. पूर्वी ७८ सालीं रिपब्लिकचीं दप्तरें ठेवण्यासाठीं बांधली गेली. हिला एक मनोरा आहे त्यावरून सर्व रोम व भोंवतींची 'कान्यान्या ( -gna ) दिसते. मध्ययुगांत या सरस्वतीमंदिराचा मिठागारासारखा उपयोग करण्यांत येई ! ते मिठाचे दगडी रांजण अजून आहेत. मिठानें भिंती, खांब खाल्ली आहेत, हें सांगणें नकोच.

याप्रमाणें पालाटिन्, कापिटोल् व फोरमचे अवशेष पाहून आश्चर्य तर वाटलेंच; कारण त्यांचे जे तुरळक अवशेष आहेत, तेच चकित करून

सोडण्याला पुरे आहेत; पण खेदच विशेष झाला. कापिटोलिउम्‌वरील ज्यूनोचें व युद्धाचा दुतोंडी देव जानुस यांचीं देवळेंहि कोठें नाहींत. पुराणी ज्यूनो नव्या काळांत सान्ता मारियानें तुडविली. सीझरच्या पूर्वीपासूनचा एक जुना भयंकर तुरुंग मात्र कायम आहे! अशा गोष्टींचा कोण नाश करणार! कारण त्या वेळीं त्या अत्यंत उपयोगाच्या होत्या! रोमच्या—ह्मणण्यापेक्षां पदारूढ अधिकाऱ्यांच्या शत्रूंचा येथें अंत होत असे. प्रसिद्ध काटिलीन, सिसेरो (–'चिचेरो')चा शत्रू यातच हाल होऊन मेला. क्रिस्तधर्म रोमला पहिल्यानें आणणारे सेंट पीटर व पॉल हेहि येथेंच कांहीं दिवस जखडलेले पडले होते.

सीझर, ऑगस्टस्, नर्व्हा, ट्राजन् वगैरेंनीं नव्या वसवलेल्या फोरम्‌पैकीं मार्सचे देवळाचे दोनतीन खांब आहेत. ट्राजनच्या फोरम्‌मध्यें त्याचा जयस्तम्भ तेवढा कायम आहे त्यावर याचें चरित्र चित्रांनीं दाखविलें आहे.

याप्रमाणें रिपब्लिकचा अवशेष जरी बिलकूल राहिला नाहीं असें ह्मटल्यास चालेल, तरी बादशहांच्या कृतींचे कांहीं अवशेष अजून आहेत. फोरम्‌च्या दक्षिणेस बादशहा कॉनस्टन्टाइन् ( ३०६–३३७ ) याची वेस अगर दरवाजा जसाचे तसाच आहे. त्याच्या वरच्या बाजूला टिटुस्‌नें ( ७९–८१ ) बांधविलेलें प्रचंड कोलोसेउम् ( आम्फिथिएटर) अजून टिकलें आहे. रचना व्हेराना येथील आरेनासारखीच; पण प्रमाणें फार मोठीं आहेत. यांत पन्नास हजारांवर माणसें बसण्याची व्यवस्था होती; व हौद्याच्या खालीं तळघरांत हिंस्रपशु व खेळाच्या वेळचें इतर सामान ठेवण्याची जागा आहे. येथेंच क्रूर बादशहा नेरो याचा स्तंभ आहे. येथून बऱ्याच दक्षिणेस व्हिया आप्पिया ह्मणून अतिजुना रस्ता व विटेबंदी भिंतींतून आणलेला पाण्याचा नळ हीं इ. स. च्या पूर्वीं तीनचार शतकांतलीं आहेत; पण मी अजून तिकडे गेलों नाहीं. शिवाय ऑगस्टस्‌नें आपल्या बहिणीच्या—ऑक्टेव्हियाच्या स्मरणार्थ बांधलेली कमान अजून बरी टिकली आहे.

याशिवाय जुनें सांगण्यासारखें ह्मणजे नदीपलीकडे सेंटपीटर देवळाच्या फारसें दूर नसलेलें कास्टेल आञ्जेलो नांवाचें ठिकाण होय. याची आकृति किल्ल्यासारखी आहे. ही इमारत बादशहा हाद्रियान् (इ. स. ११७-१३८) यानें स्वतःसाठीं व आपल्या संततीसाठीं कबरस्तान ह्मणून बांधविली. काराकाला (२११-१७ शिपाई बादशहा)-पर्यंत ह्मणजे पुढचीं शंभर वर्षें बादशहाला मूठमाती येथेंच मिळे. पण ठिकाणाच्या मजबुतीमुळें याचा किल्ल्यासारखा पुढें उपयोग होऊं लागला. उदाहरणार्थ, सहाव्या शतकारंभीं गॉथ लोकांनीं रोम वेढलें असतां रोमन लोकांनीं याचा तसा उपयोग केला; असें अनेक प्रसंगीं होऊन, पुढें पापांच्या सद्दीचे वेळीं हें १३७९ त त्यांच्या ताब्यांत गेलें. त्यांनीं गुप्त मार्गानीं तें व्हाटिकाम् नांवाच्या आपल्या वाड्याशीं जोडून संकटसमयीं पळून जाण्याचें ठिकाण तें करून ठेवलें. पोप क्लेमन्स् सातवा येथें किती तरी दिवस दडून राहिला होता; त्याची चोरवाट, खोल्या वगैरे सर्व दाखवतात. आपले कट्टे शत्रू नाहींसे करण्याकडे याचा पोपांस उपयोग होई. यांत खोल ठिकाणीं दोनतीन अंधारी खोल्या, फांशीचें सामान, गिलोटीन् वगैरे सर्व कांहीं धर्मगुरूंच्या अप्रतिम भूतदयेची साक्ष उत्तम प्रकारें पटवतात! अशा कामीं पटाइत पापाचें नांव कदाचित् तुह्मी ऐकलें असेल; इंग्रजी कवी पोपच्या कवितांत ज्याचा उल्लेख येतो, तो सीझर बॉर्जिया तो गृहस्थ होय. आपल्या सौंदर्याला लोभून, आपला अमानुष बाप वाईट इच्छेनें चालून आला असतांनां स्वसंरक्षणार्थ दोघांसही पापापासून दूर राखण्यास्तव जिनें त्याचा खून केला, त्या सुंदर तरुण हतभागी 'बियात्रीचे चेञ्ची'चाहि पापा महाराजांच्या न्यायसभेनें येथेंच करुणास्पद अंत करविला!

१ याप्रमाणें या गोष्टी जुन्या रोमची—अजूनपर्यंत क्रिस्ती न बनलेल्या रोमची, कांहींशी कल्पना देतात. त्या वेळचीं देवळें कायम नाहींत यामुळें त्यांत काय देखावा असेल हें कळणें कठीण आहे. पण

येथील दोनतीन प्रसिद्ध म्यूझियममध्यें ( व्हाटिकान् , कापिटोल व टर्मे म्यूझियम् ) आपॉलो, व्हेनुस, मिनर्व्हा, मार्स वगैरेंच्या मूर्ति, व दगडांच्या कांहीं वेदी, उपकरणें आहेत. यावरून अगदीं थोडी पुसट-पुसट माहिती होते.

२ नाहीं ह्मणायला एक जुनें वर्तुळाकृति विश्वदेवमंदिर—पान्थेओन् मात्र जसेंच्या तसें आज राहिलें आहे. हें बादशहा औगुस्तुस याचा जावा आग्रिप्पा यानें बांधिलें; ह्मणजे आज याला एक हजार नऊशें वर वर्षें झालीं ! हें बाहेर तसेंच आंतून वर्तुळाकृति असून, यावरील घुमटांत विस्तीर्ण चक्राकृति गवाक्ष आहे; त्यांतून सर्व मंदीरभर प्रकाश फारच उत्तम पडतो. या गवाक्षाचाच व्यास तीस फूट आहे, यावरून याच्या भव्यपणाची कल्पना करावी. या वरच्या चक्राकृति गवाक्षाची कल्पना इतकी हृदयंगम झाली आहे—त्यांतून निळें आकाश स्वच्छ दिसतें—कीं त्या वेळींहि त्यास देवमंदिराच्या ऐवजीं दिव्यमंदिर हें नांव जास्त शोभेल, असें ह्मणत. ( पान्थेओन्—सर्व—देवांचें—च्या ऐवजीं पान्थेउम् सर्वपवित्र अगर दिव्य. ) याच्या दरवाजापुढें सोळा खांबी मोकळा सोपा आहे. दरवाजे भले-मक्कम ब्रोन्झचे आहेत. आंतून व वरून ब्रोन्झचें छत होतें, पण पापा उर्बानुस ( Urban) यानें तें काढून नेऊन सेंटपीटर्स वेदीसाठीं खांब व तोफा ओतविल्या. दुसऱ्या कोणीं केलें असतें तर रानट्यांत त्याची गणना झाली असती; धर्माचा मूर्तिमंत जो बापच, त्या पापानें हें केलें, म्हणून त्याला रानटी कोण ह्मणणार ! वर्तुळाकृति भिंतींत सात कमानी असून त्यांच्यामध्यें दोनदोन ( एकूण चौदा ) भलेभक्कम ग्रानाइटचे खांब आहेत; या कमानींतून पूर्वीं निरनिराळ्या देवता असत; आतां अर्थात् शूल व येशूमेरीच्या चित्रांची तेथें स्थापना झाली आहे ! त्यांपैकीं एका कमानीखालीं इतालीचा स्वातन्त्र्य-देता व ऐक्यकर्ता राजा व्हित्तोरियो एमानुएले दुसरा याला समाधि दिली आहे; तेथें

व्हिजिटर्स बुक असून जो तो आपलें नांव लिहितो. मीहि आपलें लिहिलें. ऐक्य व स्वातन्त्र्याच्या पुरस्कर्त्यांच्याच पाहुणे-पुस्तकांत नांव पडल्यानेंच मीं आपणाला धन्य मानिलें! समोर एका कमानीजवळ प्रसिद्ध चित्रकार 'राफाएल' याचें शव साध्या संगमरवरी पेटींत आहे. या देवळांत मात्र जुन्यानव्याची जोड झाल्यामुळें तें कायम राहिलें आहे. जुनें देऊळ व नवा धर्म. हें सबंध देऊळ व इतर दोनतीन कमानी खेरीजकरून बाकी जुन्या रोमची साक्ष देणारी दगड, विटा, माती तेवढी आहे! ही सर्वभक्षक काळाची काळी लीला!

३ जुन्या रोमांत ऐषआरामाकडे किती लक्ष्य असे याचें, कारंज्यांचे अवशेष, बागेंतील पुतळ्यांचे अवशेष वगैरेंवरून, तसेंच येथील बऱ्याचशा पडझड झालेल्या थर्मेवरूनहि उत्तम चित्र डोळ्यांसमोर उभें राहतें. रोमन लोक व बादशाहा अभ्यंगस्नानाचे मोठे भोक्ते असत; व तेवढ्यासाठीं आग्रिपा, त्राजन्, डिओक्लोटिआन्, आन्टोनिअस्, काराकाला यांनीं मोठमोठीं स्नानगृहें बांधविलीं होतीं यांस 'थर्मे' ह्मणत. मीं पाहिलेलीं सर्व पडझडीचीं असल्यामुळें मला अजून कांहीं कल्पना आली नाहीं. काराकाला थर्मे मात्र बरेच शाबूत आहेत. पण अतिलांब दक्षिणेकडे असल्यामुळें अजून माझें जाणें झालें नाहीं.

याप्रमाणें जुनें मूर्तिपूजक रोम-निदान त्याचें जें काय उरलें आहे तें पाहून झालें. नंतर क्रिश्चन् रोमकडे वळलों. क्रिश्चन् रोमचें वर्णन ह्मणजे देवळाचें वर्णन. तीं येथें पावलोंपावलीं सांपडतात; काशीला जसें पदोपदीं शिवलिंग तुडविलें जाण्याची भीति असते असें ह्मणतात, तसेंच येथें क्षणक्षणीं देवळाच्या दरवाजावर डोकें फुटण्याची भीति असते ह्मणावें! क्रिस्त धर्माचा मूर्तिपूजेशीं दोन अडीचशें वर्षे चांगलाच झगडा झाला. जीझसच्या दोनतीन शिष्यांचे येथें हाल होऊन त्यांचा शिरच्छेद झाला. पैकीं कारकर मामर्टीनुस् मध्यें पीटर-पॉल बंदींत असल्याचा उल्लेख आलाच आहे. कॉन्स्टन्टाइन्नें मात्र या धर्माला

आश्रय दिला. ह्मणजे चवथ्या शतकाचे आरंभीं या धर्माला राजाश्रय मिळून त्याचें चांगलें बनलें.

या कॉन्स्टन्टाइन्चे वेळेला हल्लीं प्रसिद्ध असलेल्या दोनचार देवळांची स्थापना झाली. पैकीं सेंट पीटर्स् व सेन्ट ज्योन्हानी हीं प्रमुख होत.

आख्यायिकेप्रमाणें मामर्टिनुस् तुरुंगांत बंदींत असलेल्या, मोन्ता-रियो टेंकडीवर फांशीं दिलेल्या, व्हाटिकान्जवळ पुरलेल्या ( कशी बिचाऱ्याची त्रिस्थळी यात्रा झाली पहा ! ) सान्त् पीएत्रोच्या कबरस्तानावर पापा सिल्व्हेस्टरच्या विनंतीवरून कॉन्स्टन्टाइन्नें हें देऊळ बांधविलें. पुढल्या हजार वर्षांच्या काळांत याची बरीच पडझड होऊन १४५२ त हें नव्यानें बांधण्याला सुरुवात झाली; व १५।१६ शतकांचे दरम्यान ब्रामान्ते, राफाएल, मिकेल आञ्जेलो या प्रसिद्ध कारागिरांनीं याचें काम चालविलें. यावरील घुमट ह्मणजे भव्यपणाचें, डौलाचें, सौंदर्याचें व ऐश्वर्याचें सारच आहे; पण जवळ गेलें ह्मणजे तो इतका खुलून दिसत नाहीं. कारण आञ्जेलोनन्तरच्या कारागिरानें पुढील तीन-पाखी सभामंडप लांबविल्यामुळें, पूर्वीचें प्रमाण राहिलें नाहीं. शिवाय आञ्जेलोनें या घुमटांत प्रकाश फारच उत्तम साधला आहे; त्याचा झोंत वरून सर्व देऊळभर पडतो. तेव्हां त्या घुमटाची व खालील भागांची समतोल शोभा पाहून आश्चर्य वाटतें. हा या देवळांत विशेष होय, कीं, येथें मुख्य ठिकाणीं इतर देवळांप्रमाणें लवकर अंधार पडूं लागत नाहीं. एकंदर नवें जुनें काम ( मधील अंतरें लक्षांत न घेतां ) तेराशें वर्षे चालून १६१६ त पापा उर्बानुसनें याची वास्तुशांति केली.

जवळ गेलें ह्मणजे दर्शनीं ते बाहेरचे दरवाजे, भोंवतीचे खांब, त्यावरील दगडी तिकोण व सज्जा—कीं ज्यावरून पूर्वी वर्षोवर्षीं पापा रोम शहराला व सर्व पृथ्वीला 'शान्तिरस्तु पुष्टिरस्तु' असा आशीर्वाद देत असे—वरील मोठमोठे साधुसंतांचे पुतळे, हींच खूब मोठीं व भव्य आहेत. त्यांतून मुख्य दरवाजाच्या पुढल्या सोप्यांत माणूस येतें. मुख्या-

सह एकंदर पांच दरवाजे ब्रॉन्झचे याला आहेत; मुख्य दरवाजा सणाराला पापाच्या प्रवेशाचे वेळीं उघडा असतो. आंत गेलें ह्मणजे मुख्य दरवाजापुढेंच पारफिर दगडाची भलीभक्कम वर्तुळाकृति शीळ देवळाच्या जमिनींत गाडलेली दिसते. ही पूर्वी जुन्या देवळाच्या वेदीसमोर असून हिजवरच इ. स. आठशेंत पापा लेओनें फ्रान्सचा राजा मोठा शार्ल याला रोमन बादशहा ह्मणून अभिषेक केला होता! यावरून रोम इताली ची राजकीय स्थिति काय होती हें सहजच दिसतें. फ्रान्कांचा राजा रोमचा बादशहा होतो! पण पोपच्या हातून हें कृत्य झाल्यामुळें या वेळींच पोपाचें महत्त्व कसें वाढत चाललें होतें हें दिसून येईलच. याला पूर्वी ग्रेगोर [ग्रेगरी दि ग्रेट] पासूनच आरंभ झाला होता. यानन्तर पुढें बऱ्याच बादशहांनां पोपांकडून अभिषेक होत असे व दर वेळीं त्याच्या झोळींत मुलूख पडत असे. अशा रीतीनें पापांनां राजकीय महत्त्व येत चाललें होतें व त्याचा त्यांनीं पूर्ण उपभोग घेतला. १५-१६ शतकाचे वेळीं या सत्तेचा कळस झाला होता. तें असो ह्मणा! या शिलेपुढें तसेंच मधल्या पडसाळींतून पुढें मुख्य वेदीपर्यंत जावें ह्मणजे जे आकाशाला सुद्धां तोलून धरण्याला योग्य असे विशाल आधारस्तम्भ जवळ दृष्टीला पडून छाती दडपल्यासारखें होतें. यांच्या बाजूंनीं कमानी काढून त्यांवर संतमंडळाचे पुतळे ठेविले आहेत. उजव्या हाताच्या शेवटच्या स्तम्भाशीं सोन्याच्या छताखालीं सान्त पीएत्रोची जुनी धातुमूर्ति बसविली आहे. भाविक लोकांच्या प्रेमाच्या चुंबनांनीं त्याचा उजवा पाय [पाऊल] गुळगुळीत होऊन रोडला आहे! जों जों लोकांचा भाव वाढतो तों तों पीएत्रो रोड होऊं पहातो. अखेर भावाच्या राशी वाढत जाऊन मूर्ति नाहींशी होणारसें दिसतें! पण असले विचार उपयोगाचे नाहींत. येथें घुमटाखालीं चार खांबांवर [पान्थेओनच्या चोरलेल्या छतापैकीं!] सुंदर छत्र आहे. यावरील देवदूत, माळा, नक्षीकाम सर्व सोन्याचें आहे. पापांनीं द्रव्य मिळविलें तरी तें सर्वच

स्वार्थीकडे खर्चीं घातलें नाहीं! या छत्राखालीं मुख्य वेदी आहे. येथें खालीं एका पाराफिर दगडाच्या पेटींत सान्त पीएत्रोचा भौतिक अवशेष आहे. पुढच्या बाजूच्या खोल कन्फेशनांत मी उतरलों होतों. येथें भोंवतीं कठड्यावर ८९ दिव्यांचा नन्दादीप अक्षय जळतो. येथें खालींहि सोन्याचें नक्षीकाम अप्रतिम आहे.

पुढील घुमटाच्या आश्रयखांबांच्या वरील तुळपटावर बायबलमधील वाक्य सोनेरी जडावांत लिहिलें आहे. 'तू एप पेत्रुस, एत् सुपर हांक प्रेत्र म् एदिफिकाबो एक्लेझियाम् मेआम् एत् तीबी दाबो क्लव्हेस रेङ्ग कोलोरूम्'—तूं फत्तर (ल्याटिन पेट्रस=दगड) आहेस; व या खडकावर (तुजवर) मी आपलें देऊळ उभारीन, व तुला स्वर्गाच्या किल्ल्या देईन. तेव्हां सान्त् पीएत्रो स्वर्गाचा गुरव अगर द्वारपाल होय. घुमटाच्या मागें शेवटची कमान फार मोठी असून तींत खिडकीवजा खबुतररूपी पवित्र आत्म्याचें सुवर्ण कांचेचें चित्र असल्यामुळें कलत्या उन्हाचे वेळीं फारच रम्य प्रकाश वेदीमागें पडतो. बाजूचे दोन्ही पाखांत प्रसिद्ध पापा व कांहीं धर्माभिमानी राजांच्या कबरा आहेत. पैकीं कांहीं विशेष सुंदर आहेत. शिवाय इतर साधूंचे पुतळे, क्रॉस, मेरी, येशू वगैरेंचीं देवघरें दोन्हीं बाजूंनीं आहेत. आंत जातांना बाजूच्या उजव्या पाखांत पहिल्या देव्हाऱ्यावर आञ्जेलोचें प्रसिद्ध 'पीएता' अगर श्रद्धा—भक्तिमात्र ही मूर्ति आहे.कॉसवरून खालीं काढलेला येशू मांडीवर घेऊन मेरी बसली आहे—असा देखावा आहे.

मेरीच्या चेहऱ्यावर दाबलेला पुत्रशोक, परमेश्वरसेवेंत तो मेला आहे हा दृढविश्वास, व भोळा भाव यांचें मिश्रण फार कौशल्यानें दाखविलें आहे. शिवाय मूर्तीची एकंदर ढब, बसण्याचा डौल, अवयवांचा बांधेसूदपणा, वगैरे आञ्जेलोच्या कृतीचे सर्व विशेष गुण या मूर्तींत उतरले आहेत. येथें मी तासभर उभा राहून या मूर्तीचें व आंजेलोच्या निर्गुणिच्या कारागिरीचें आश्चर्य करीत होतों. इतक्यांत गुरवबुवा तेथें आले

व कठडा लावलेला उघडून पाहिजे का? असें दर्शविणारे हावभाव करूं लागले; मीं तिकडे लक्ष्यच दिलें नाहीं. मी होतों तेथून उत्कृष्ट दिसत होतें; मग उगीच दक्षणा देऊनहि यांचे उपकार कशाला? नंतर पुन: देऊळभर फिरून मधला घुमट, त्याचे बाजूचे चार शेषासारखे विशाळ आधारस्तंभ–जणूं पृथ्वीचा गोलच त्यांच्या डोक्यावर आहे! व प्रत्यक्ष घुमट व स्तंभ यांच्यामधील तुळवटासारखा भाग यांची एकमेकांत व एकमेकांशीं जुळणी, सर्व प्रमाणाचा रेखला विशाळपणा, प्रत्येकाचें वेगळें सौंदर्य, व याच्या मिळणीचा दिव्य परिणाम हीं सर्व नीट पाहिलीं. तों त्यांच्या अगाधपणाची कल्पना दुणावतच चालली. मयाला सुद्धां लाज आणवणारें हें काम आहे. अथवा ब्रमान्ते व आंजेलो हे मयाचेच अवतार तर नाहींत ना?

याप्रमाणें तीन तास फिरून सान्त् पीएत्रो पाहिलें; व आश्चर्य, आनंद यांचे उद्गार सहजपणें तोंडांतून बाहेर पडताहेत अशा स्थितींतच बाहेर पडलों. जगांतील सर्वांत मोठें, सर्वांत अधिक ऐश्वर्यसंपन्न, सर्वांत शिल्पकला–चातुर्य अधिक खर्ची पडलेलें असें हें देऊळ आहे, हें सांगावयाला नकोच. याची आंतली लांबी ६२३ फूट व एकंदर लांबी ६४६ फूट आहे! क्षेत्रफळ १५१६० चौरस मेटर (मेटर=$\frac{१०}{३}$ फूट) आहे; याच्या खालोखाल मिलन् येथील देवळाचे ११७०० चौ. मे. सेंटपॉल् (लंडन) याचें ७८७५ चौ. मे. आहे. यावरूनहि मोठेपणाची कल्पना येईल.

जन्माला यावें व एकदां सान्त पीएत्रो पाहून जावें असें इकडील लोक ह्मणतात ते उगीच नव्हे. या देवळाचे नांवाचे सेवक व खरोखरीचे मालक जे पापा त्यांचें ऐश्वर्य काय वर्णावें, व पीएत्रोबद्दल त्यांनां अभिमान वाटतो तो कां न वाटावा?

**रोम, ता. १ सप्टेंबर, १९१२.**

परवां लिहून पाठविलेलें पत्र मिळेलच. आधींच्या चारपांच दिवसांच्या वणवणीनें त्या दिवशीं बराच त्रास होऊन पित्तें वगैरे झालीं

होती, कसरहि वाटे. त्याच धांदलींत पत्र लिहिलें. आतां प्रकृति ठीक आहे. त्या दिवशीं दुपारीं घरींच राहून विसांवा घेतला. त्यानें पुनः ठीक जुळलें. यथील प्रखर उन्हानेंहि त्या अस्वास्थ्याला मदत केली असावी. रोमचें दक्षिणेकडचें डोंगरी ऊन्ह तें! उत्तरयूरोपपेक्षां कितीतरी कडक! सध्यां येथें आपल्या पुण्याला मे–जूनमध्यें उन्हाळा असतो तितका अगदीं आहे. १००–१०१° असावा.पण तो विशेष भासण्याचें कारण उत्तरयूरोपीय थंडी अनुभविल्यामुळें वाटणारा विरोध मुख्यत्वें होय.

काल सकाळीं पुनः सान्त् पिएत्रो व व्हाटिकान्कडे गेलों. जुन्या साबाथचा हा दिवस असल्यामुळें (याचें नांवहि इतालियनमध्यें साबात्तो असें आहे.) व्हाटिकान् म्यूझियम् व इतर देवळांनां जोडलेलीं संग्रहालयें तिकिटांवाचून पहायला मिळतात; पण यामुळेंच जी गर्दी होते तिनें पैसा खर्चून इतर दिवशीं आलेलेंच शतपटीनें बरें वाटूं लागतें. कारण अशा गर्दींत एकादी प्रेक्षणीय वस्तु निरामयपणें पहायला जागा व सवडच सांपडत नाहीं. व्हाटिकान् म्यूझियम् दोनदां पाहिला; त्याविषयीं मागून लिहूं.

सान्त् पीएत्रोला जितके वेळ जावें तितकें थोडेंच! प्रत्येक वेळेला त्यांतील शिल्पचातुर्याची नवी एकादी खुबी लक्ष्यांत येऊन आनंद वाटतो. मला वाटतें, कीं, अगदीं पद्धतशीर हें देऊळ पहायचें असल्यास एक आठवडा देखील पुरणार नाहीं. वेदीसमोरील मधल्या मुख्य पाख्यांत खांबाच्या उथळ्याची खुर्ची करून बसावें. (सान्त पीएत्रोंत पुढच्या बाजूला खुर्च्याटेबलांची सर्पणवत् दिसणारी अडचण ठेवलेली नाहीं! इतर देवळांत तो प्रकार फार असून शोभेच्या कल्पनेंत थोडा बिघाड करतो.) व पुढें वेदीची ती छत्री अगर देव्हारा, वरील घुमट व त्यांमागील कमान इकडे नजर टाकावी, म्हणजे या भागांची एकंदर मांडणी, प्रमाणांचा अप्रतिम जुळतेपण, विस्ताराची कल्पना हीं लक्ष्यांत भरून आश्चर्य वाटतें. वेदीच्या मागल्या बाजूच्या

उपाध्येबोवांच्या बांकावर बसावें, व पुन: घुमट व पुढील उंचचउंच व रुंदचरुंद सभामंडपाकडे बघावें म्हणजे जणूं दडपण पडल्यासारखें वाटून 'काय हा अचाट विस्तार!' वगैरे उद्गार साहजिकपणें तोंडांतून निघून जातात. याप्रमाणें जों जों पाहण्याचें केंद्रस्थान बदलावें, तों तों तो अपूर्व घुमट व एकादा नवा भाग यांची जोड अपूर्व दिसून थक्क होऊन जाण्याची पाळी येते. याप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणांहून मीं तो घुमट व त्याला बेमालूम सांधलेले भाग पाहिले व आज आपण पुन: आल्याचें सार्थक झालें असें वाटूं लागलें. निरनिराळ्या कारागिरांनीं आपलें स्वतंत्र कल्पनाचातुर्य खर्चूनहि, मूळ कल्पनेला बाध न येऊं देतां उलट तिला जास्त पुष्टीच दिली, याचेंहि कौतुक वाटतें. याप्रमाणें फिरतफिरत घुमटाच्या आधारस्तम्भापैकीं ज्याला खेंटून सान्त पीएत्रोच्या जुन्या धातुमूर्तीची स्थापना केली आहे, तेथें येऊन थबकलों; व नुस्ता घुमटच आंतून पाहूं लागलों; त्याची ती अर्धांडाप्रमाणें डौलदार आकृति पाहून 'आपल्या ब्रह्मांडाच्या आकृतीची इतकी हुबेहूब नक्कल केल्याबद्दल ब्रह्मदेवालाहि हेवा वाटत असला पाहिजे,' असे विचार आले. प्रकाशासाठीं जे झरोके काढले आहेत त्यांच्या बाजूला खांब व वर कमानी काढून त्यांवरील बारीक नक्षीनें त्या प्रचंड घुमटाला शोभाच आणली आहे. आंतून छतावर सोनेरी व इतर रंगांचें जडावाचें काम (मोझेक्) फारच सुबक आहे. यांत जुनी साधुसंत मंडळी व पौराणिक कथा चित्रिल्या आहेत. आपल्याकडे दैत्यकुमारी उषेच्या चित्रलेखा नांवाच्या मैत्रिणीची पुराणांतरीं याविषयीं फार ख्याति होती. तिचे शिष्यमंडळ यूरोपांत तयार होऊन आर्यभूमध्यें नामशेष झालें, हे दैवाचे खेळ! घुमटांतील खिडक्यांतून जो प्रकशाचा झोंतचे झोंत येतो त्यानें या देवळांत उत्कृष्ट प्रकाश होऊन आजपावेतों पाहिलेल्या ठिकाणांतील देऊळ व अंधार या अभेद्य जोडीची फोड झालेली पाहून आनंद होतो. त्यामुळेंच छताची सोनेरी नक्षी व तिचें कुसरीचें काम नीट ध्यानांत

यतें. स्वर्गांतील द्वारपालाचें चिन्हच अशा दोन मोठ्या किल्ल्या हातांत धरलेल्या पीएत्रोजवळ उभा होतों, तेव्हां येथील कॅथोलिक भोळीं भाबडीं येऊन त्याच्या उजव्या पावलाचें चुंबन घेतांना दृष्टीला पडत! याच वेळीं तेथें एक गृहस्थ येउन 'हा मूर्खपणाचा प्रकार हंसू येण्यासरखा आहे, नव्हे?' असें मला इंग्रजींत ह्मणाला. त्याच्या उच्चारावरून हा जर्मन बोलणारा असला पाहिजे असें वाटलें व मी त्याला विचारतां आपण स्विस् असल्याचें त्यानें सांगितलें. नंतर पर्वतासारख्या उघड्या ठिकाणीं, गांवांतून चौकाचौकांनीं वगैरे उपदेश करीत फिरणाऱ्या क्रिस्ताला धर्माच्या नांवावर असलें ऐश्वर्य व अवडंबर माजविलेलें कसें खपलें, अशा धर्तीचें बोलणें निघालें. आज त्याचें तिसऱ्यानें पुनरुत्थान होणें शक्य होऊन जर तो पृथ्वीवर आला, तर या सगळ्या अवडंबराला झुगारून देऊन, सृष्टिक्रीडेचा बागच असें जें स्वित्सरलंद येथें तो प्रथम जाईल—अशासारखें मी बोलतांच 'पुनरुत्थान वगैरे सर्व थोतांड आहे. क्रिस्त ह्मणून कोणी ऐतिहासिक-व्यक्ति होती कीं नव्हती, यांचीच मुळीं शंका आहे.' असें त्यानें उत्तर केलें! याचें मला फार आश्चर्य वाटलें. मुंबईंत ब्याकबेवर कहानूचन्द्रवर्मा सारख्या माणसांनीं इतर उपयुक्त गोष्टी टाकून देऊन क्रिस्त ही ऐतिहासिक व्यक्तीच नव्हती, ह्मणून आवेशाचें व्याख्यान तरुण अल्लड विद्यार्थ्यांपुढें देणें निराळें; व आजचें हे सान्त पीएत्रोमधील भाषण निराळें! असो. याचें आश्चर्य करीत, मी जिन्यानें घुमटावर व तेथून वरच्या कळसापर्यंत (याला लाटर्न=कंदील ह्मणतात.) जाऊं लागलों. घुमटाच्या आंतून-खांब संपून त्यांच्यावरील आढ्यास सुरुवात होते. त्याच्यावर वर्तुलाकृति सज्जा केलेला आहे. या ठिकाणीं माणूस खांबांच्यावर व घुमटाच्या आरंभाशीं असतें. येथून घुमटाच्या विस्ताराची व उंचीची स्पष्ट कल्पना येते. ग्यालरींत आपल्यासमोर उभें राहिलेलें माणूस निम्मा उंचीचें दिसतें, व खालीं वेदीभोंवतीं व सभामंडपांत हिंडणारीं माणसें

मोठ्या बाहुल्यांसारखीं इकडेतिकडे हिंडतांना दिसतात! या घुमटाचा व्यास १४० फूट आहे. नंतर घुमटावर चढून त्यावरील वर्तुळाकृति खांबांच्या झरोक्यांतून पुनः खालीं पाहतां येतें. या वेळीं तर खालची वेदी अगदींच लहान वाटून भोंवतालची भाविक मंडळी मुंग्यांसारखी भासते! घुमटांतील व वरील वर्तुळाकृति खांबांच्या आंतली जडावाची नक्षी स्पष्ट दिसून तिच्या रचनाचातुर्याचें आश्चर्य वाटतें. याही वरील धातूच्या कळसांत जाण्याला एक अगदीं उभा लोखंडी जिना एका माणसाला फक्त उभें जातां येईल, एवढ्या भोंसक्यांतून नेला आहे. घुमटाच्या डोक्यावर आल्यावर कळसांत जाण्याची साहाजिक इच्छा होते; ह्मणून मी जपून कष्टानें चढून गेलों. सान्त पीएत्रोच्या गोल कळसांत जाऊन आलों एवढें सांगतां येण्यापलीकडे त्यांत कांहीं तथ्यांश नव्हता. उलट, एक वाजतांच्या उन्हानें तापलेल्या, खिडक्यांरहीत त्या गोळ्यांत जाऊन बंगाळ वांग्याप्रमाणें उकडून मात्र निघालों! व लवकर परतलों. एका तरुण जोडप्याचीहि मजप्रमाणें वर जाण्याची इच्छा दिसली. मी त्यांनां 'नियन्ते व्हिदूता' 'मोल्तो काल्दो' वगैरे शब्दांनीं 'वर पाहण्यास कांहीं नाहीं, उलट उकाडा मात्र होतो,' वगैरे सांगितलें. तरी गृहस्थ अर्धा चढून परतला. मागून बायकोच्या धीराचा उपयोग झाला नाहीं! ती तरुण बाईहि पांचसात पायऱ्या चढून धापा टाकीत मागें फिरली व दासीजवळून दोनतीन हातरुमाल एकदम घेऊन घाम पुसूं लागली. कळसांतून पुनः मी वर्तुळाकृति खांबांभोंवतींच्या उघड्या सज्जांत येऊन भोंवतील टेंकड्या, त्यांत वसलेलें रोम, नदी, देवळांचे कळस वगैरे आतां ओळखीच्या झालेल्या गोष्टींकडे पाहूं लागलों; तों तेथें एक मार्गदर्शक 'ही इकडे व्हाटिकान्, ती पहा तिकडे आगगाडी चालली आहे' ह्मणून निरुपयोगी मदत करण्याला तयारच! मी त्याला 'व्हिदूना' ह्मणून सांगतांच 'ह्यः ह्यः' करून

बसिशी दाखवीत बिचारा बाजूला झाला! व मी शेजारची व्हाटिकान् ह्मणजे पोपचा राहण्याचा वाडा, त्यांतील विस्तीर्ण चौक व कारंजीं व पाठीमागची बाग यांवर नजर टाकली. अरेबियन् नाइट्स्मधील एकाद्या काल्पनिक राजवाड्याचें व बागेचें वर्णन येथें हुबेहूब जुळेल असें मला वाटतें. या बागेंत फावल्या वेळीं पापा महाराज फिरत असतात; तेवढेंच काय तें ह्मणे त्यांचें मोकळ्या हवेंत येणें! शिवाय वर्षांतून कांहीं वेळ पूजा-प्रार्थनेसाठीं व एकदां दरवाजावरील सज्ज्यांतून (लोजिया) आशीर्वाद देण्यासाठीं ते बाहेर येत असतात. सध्यां त्यांनां पूर्वींप्रमाणें राजकीय महत्त्व नाहीं, तरी त्यांचें जाडें उत्पन्न व धार्मिक बाबतींत संपूर्ण अधिकार हीं राजासारखींच आहेत. पहिला लेओ व मोठा ग्रेगरी (ज्यानें इंग्लंदांत आपले मिशनरी पाठवून तेथें ख्रिश्चानिटी आणिली तो; सहाव्या शतकाचा शेवट) यांनीं ज्या सत्तेचा पाया घातला, व फ्रांकांचा राजा मोठा कार्ल (Charle Magne) याला अभिषेक करून व त्याजवळून प्रांत उपटून जी तिसऱ्या लेओनें वाढीला लाविली, तिचा पंधरावें शतक व सोळाव्याचा आरंभ या काळांत कळस झाला. निकोलस, सिक्स्टस, ज्यूलियस व लीओ दहावा यांच्या अमदानींत धार्मिक, सामाजिक व राजकीय बाबतींतहि पापांनीं हवा तसा धुमाकूळ घातला. त्याचेंच फळ पापामहाराजांनीं काढलेल्या पापमोक्षपत्रिका व त्यांनीं घडवून आणलेली धर्मक्रान्ति होय. तें असो; पण या पापांच्या वेळांत सान्त् पीएत्रोला हल्लींचा आकार येत गेला. चित्रकार, मूर्तिकार व शिल्पकलाभिज्ञ दूरदूरचे लोक रोमला येऊन राहिले. त्याची साक्ष निरनिराळीं देवळें, पापा व त्यांच्या खालच्या धर्माधिकाऱ्यांचे वाडे, इतर इमारती व नामांकित पुतळे हीं सर्व अद्याप देत आहेत. जगामध्यें सर्वांत मोठा राजवाडा आपला व्हावा या निकोलसच्या इच्छेचें फळ व्हाटिकान् होय; व तो तसाच विस्तीर्ण, सुंदर व सर्व सुखांच्या साधनांनीं पार-

पूर्ण भरलेला आहे. यापैकीं थोड्या भागांत पापा आपल्या लवाजम्यां- सह राहतो; बाकीच्यांत निरनिराळ्या रसिक धर्मगुरूंनीं अत्यंत श्रमानें व काळजीनें जमवलेल्या जुन्या ग्रीकपासून तों नव्या रोमन- पर्यंत मूर्तींचें, उत्तमउत्तम धार्मिक चित्रांचें व अमूल्य ग्रन्थांचें, अशीं संग्रहालयें आहेत. मूर्ति-संग्रहाच्या बाबतींत तरी जगांत दुसऱ्या कोठें असें उत्तम व जंगी संग्रहालय नाहीं! संग्रहालयांत नौकर पोपचेच आहेत; पण त्यांचा पोशाक साधा असतो.

पापाच्या वाड्यावरील पहारेकऱ्यांचा पोषाक मात्र फार विचित्र असतो. प्रथम मी त्या वाड्यांत जाऊं लागलों तों तांबड्या, पिवळ्या व काळ्या पट्ट्यांचा पोषाक घातलेले दोन विदूषक मजवर धांवले; व मज्जाव करूं लागले! या विदूषकांचें-अगदीं हुबेहूब सर्कशींतील विदूषकच ते-येथें काय काम! असें आश्चर्य करतों तों हे पापा महा- राजांचे पहारेकरी होत, असा शोध लागला व किंचित् हंसूं आलें. नन्तर मी दुसऱ्या बाजूनें वाड्यांत गेलों. पहिली वाट पवित्र होती!

हा सर्व थाट, सर्व ऐश्वर्य पाहून पूर्वींच्या 'कर्तुमकर्तुम्' समर्थ अशा चबढबी पापांचे दिवस आठवूं लागले. इंग्लंदांतील जॉन् राजाला बहिष्कार घाल, स्पेनच्या फिलिपला दुसऱ्यावर चालून जाण्याचें खोड- साळ 'पवित्र-आज्ञापत्र' दे, सर्व यूरोपांतील शूर तरुणांना छू ह्मणून जेरुसलेमच्या लढाईवर पाठव, अशा उलाढाली करणारे ते पापा कोणीकडे व हल्लीं फक्त धार्मिक अधिकार असलेले व तेहि फक्त इताली व स्पेन अशा मागसलेल्या देशांवर, असे 'पिओ पापा*' (सध्यांचा दहावा पायस.) कोणीकडे! हा एकंदर प्रकार आठवून व हें ऐश्वर्य, थाटमाट पाहून 'येथेंच धर्मगुरूंनीं केले बहु कारभार, ज्यां धर्मीं। पळहि नसो स्थळ, परि त्यां नव्हता कोणी निवारिता कर्मीं॥' असे उद्गार निघाल्यावांचून राहिले नाहींत.

---

* दोन बलाढ्य ख्रिश्चन राष्ट्रांत असें घनघोर युद्ध सुरू झालें, याचा धक्का कोंवळ्या मनाला धक्का बसून हे परवांच खिस्तलोकवासी झाले.

या व्हाटिकानच्या पीटर्स-देवळाला लागलेल्या बाजूला पापा सिक्स्टुस ( पंधराव्या शतकाचा शेवट ) यानें स्वतःकरितां एक खासगी देवघर बांधविलें आहे. याच्या छतावरील सबंध चित्रें मिकेल आञ्जेलो यानें काढिलीं आहेत. पुतळे व इमारती यांविषयीं त्याची जशी प्रसिद्धी आहे तशीच या छतावरील चित्रांविषयींहि आहे. याचे नऊ भाग केले असून जुन्या करारांतील 'सृष्टि मनुष्य यांची उत्पत्ति, जलप्रलय व नोआचें संरक्षण' वगैरे पौराणिक कथा त्यांत रंगविल्या आहेत. हा विषयच अतिउदात्त असून त्याला रंगांनीं दृश्य रूप देण्यांत आञ्जेलोनें आपली सारी कर्तबगारी खर्चिली आहे. असें सांगतात, कीं, या कामासाठीं पोपानें त्याला मुद्दाम बोलावून, खाणेंपिणें व इतर रंगेलपणा याविषयींची त्याला परिपूर्ण मुभा दिली होती. भिंतींवर ख्रिस्ताच्या चरित्रांतील कथा पेरुजिनो, बोत्तिचेल्ली वगैरे नाणावलेल्या चित्रकारांनीं रंगविल्या आहेत.

या देवघराच्या वरच्या मजल्यांत पूर्वींचे कांहीं पापा राहत असत. त्यांच्या खोल्यांतील छतावर पापा ज्यूलियस् यानें राफाएलकडून पौराणिक चित्रें काढविलीं आहेत. तीं राफाएलच्या इतर प्रसिद्ध चित्रकलेला अगदीं शोभेशीं व तितकींच प्रसिद्ध आहेत हें सांगणेंच नको. हें वरील देवघर व या खोल्या पापांच्या रसिकपणाची व ऐषआरामाची साक्ष पटवतात. ज्याला ऐहिक डामडौलाचा तिटकारा असे त्याच येशूचे स्वतःला परंपरागत शिष्य व त्याच्या धर्माचे पुरस्कर्ते म्हणवणारे हे पोप डामडौलांत जणूं लोळत असलेले पाहून त्या साध्या येशूला काय वाटत असेल! कोणत्याहि धर्माचें असेच आहे. संस्थापकाचे शुद्ध, सरळ व उदात्त विचार बाजूला राहून, त्याचे पुढील अनुयायी त्याच्या नांवानें असेच डामडौली, ऐहिकांत रंगणारे असे होतात. बुद्धाच्या मागें भिक्षूंनीं तेंच केलें; शंकराचार्यांचा अनुयायीवर्गहि संस्थानादि डौलांत रंगला. महमदी धर्महि तीच कहाणी सांगतो!

पीएत्रो देवळाच्या वरच्या बाजूला जानिकुलुम् ह्मणून टेकडी आहे. तिला जाण्याच्या मोठ्या रस्त्यावर एक शुष्क झालेलें ओक झाडाचें खोड आहे. प्रसिद्ध जुना इतालियन् कवि तार्किनुस तास्सो हा येथें बसून आपल्या दुःख व दारिद्य यांनीं पीडिलेल्या जीवितावर अश्रु ढाळीत असे. हें झाड आतां वाळलें आहे, ह्मणून त्याला भिंती रचून आधार केला आहे व तेथें एक लेख लिहून ठेविलेला आहे. यावरून पुढें जावें ह्मणजे माणूस बरेंच वर येऊन खालील व समोरील रोम शहर स्पष्ट दिसतें. येथेंच जुनी रोमन भिंत आहे; व समोर चौकांत लांबून ठळक दिसणारा वीर गॅरिबाल्डी याचा घोडेस्वारी पुतळा आहे; जणूं मेल्यावरहि या पुतळ्याच्या रूपानें खालील रोम शहराचें तो डोळ्यांत तेल घालून संरक्षण करीत आहे! जरा पुढें गेलें ह्मणजे सान्त् पीएत्रो इन् मोन्तारियोचे देऊळ लागतें. महत्त्वाचें नाहीं; पण या ठिकाणीं सान्त पीएत्रोला उफराटें सुळीं दिलें तें स्थळ दाखवितात. या पुढील चौकांतूनहि शहर चांगलें दिसतें.

४ सप्टेंबर.

जानिकुलुम् टेंकडीच्या व नदीच्या मध्यें वसलेल्या रोमच्या भागास त्रास्तेव्हेरे ह्मणतात. येथें बहुतेक गरीब लोकांची वस्ती असून गचाळपणा फार आहे. मजल्यामजल्यांनीं खिडक्यांतून वाळत घातलेल्या गोदड्यारकट्यांच्या झिरमिळ्या जिकडेतिकडे दिसतात; रस्त्यांवरील अमंगळपणा तर पुसूंच नये. पण रोम पहायचें ह्मणजे येथेंहि यावें लागतें. शिवाय येथे दोन देवळें पहायला जाण्यालायक आहेत. पैकीं एक सान्तामारिया इन त्रास्तेव्हेरेचें. रोमच्या प्रसिद्ध देवळांस जशा दंतकथा आधारभूत आहेत, तशी एक यासही आहे, कीं, ख्रिस्ताच्या जन्माच्या वेळेला या ठिकाणीं एकदम तेलाचा झरा जमिनींतून निघाला! तेथें मग दोन शतकांनीं देऊळ बांधलें गेलें! हल्लींचें अर्थात् जीर्णोद्धार

झालेलें आहे. यांत दारावर जडावाचें काम चांगलें आहे. दुसरें देऊळ खिस्तधर्माला ऐतिहासिक महत्त्वाचें आहे. या ठिकाणीं इ. स. २।३ शतकांच्या मध्यें एक मोठी धार्मिक, गरीबांची कनवाळू अशी चेचिलिया नांवाची बाई रहात असे. खिस्तधर्म या वेळीं नवाच असून, त्याला राजाश्रयहि अजून मिळालेला नसल्यामुळें, त्याच्या इतर अनुयायांप्रमाणें इच्या घराण्यासहि फार त्रास झाला. व ही स्वतः आपल्या अपूर्व धर्मश्रद्धेमुळें त्या वेळेच्या नानादैवतपूजकांच्या क्रोधाला बळी पडली. तिजबद्दल चौकशी होऊन तिची मान कापविली गेली! शवास कांहीं धडगत मिळावी ह्मणून तिच्या नातलगांनीं त्या वेळच्या थोड्या खिस्तांचें पुरण्याचें गुहेसारखें ठिकाण जें 'कालिस्टुस काताकोम्ब' त्या ठिकाणीं कुजटकोंदट ओलसर दरींत तिला नेऊन टाकलें. त्यानंतर सारखे तीन दिवस तिचा प्राण जात होता! बिचारी हालचाल होऊन मेली. पण नंतर तिला सन्तपद मिळालें, व गायनाच्या अधिष्ठात्रीचा मान मिळून नंतर ती 'सान्ता चेचिलिया' नांवानें प्रसिद्ध झाली. तिच्या घराच्या ठिकाणीं नंतर देऊळ बांधलें गेलें. प्रेतही आतां या देवळांतील गाभाऱ्यांत आहे. याच चेचिलियाचें चित्र राफाएलच्या प्रसिद्धांपैकीं एक बोलोन्यास असलेलें लिहिलेंच आहे. पीएत्रो, पाओलो वगैरे खिस्तशिष्य व नंतर दोनतीन शतकें चेचिलियासारखीं माणसें यांनीं नाना छळ सोसले, पण श्रद्धा ढळूं दिली नाहीं! यामुळेंच आज त्यांना मान मिळत आहे व खिस्तधर्म अर्ध्या जगभर नांदत आहे. धर्मसंबंधीं इतर गोष्टी सोडून दिल्या तरी, एकादी गोष्ट चांगली आहे अशी मनाची खात्री झाल्यावर प्राण गेला तरी तिजपासून निवृत्त व्हायचें नाहीं हा दृढनिश्चय, अंगीकृत कार्याशीं एकनिष्ठपणा हीं हिंदुधर्मीयांनीं व सर्व हिंदी लोकांनीं आजच्या काळीं पूर्णपणें आपलींशीं केलीं पाहिजेत.

* याशिवाय 'पाओलो फुओरी, सान्त ज्योव्हानी इन लातरानो' वगैरे प्रसिद्धांपैकीं देवळें आहेत. आपल्याकडील 'सप्तपुरी' प्रमाणें हीं सात

पूर्वी नाणावलेलीं असून यात्रेकरूंना रोमला आल्यावर यांत प्रथमतः दर्शनाला जावें लागे. त्यांचें उपाध्यायपण खुद्द पोपकडे असे. या सातां-पैकीं फक्त एकच काय तें लहान आहे; बाकीचीं मोठीं व श्रीमंत आहेत. हें गांवाबाहेर बरेंचसें दूर व्हिया आपिया नांवाच्या बावीसशें वर्षे जुन्या दगडी रस्त्यावर आहे. सांत पीएत्रो छळाला भिऊन रोम सोडून चालला असतां येथें विसांवला, तों त्यास स्वतः ख्रिस्त रोमकडे जातांना दिसला. त्यानें 'दोमिने को व्हाडिस' (महाराज कुठें निघालांत?) असें विचारतांच 'पुनः सुळावर चढण्यासाठीं' असें क्रिस्तानें उत्तर दिलें. यामुळें लज्जित होऊन पीएत्रो परत रोमला गेला; अशी दंतकथा आहे. त्या जागीं देऊळ उभारलें जाऊन त्यास 'दोमिने को व्हाडिस्' हेंच नांव दिलें आहे. वारकऱ्यांच्या सात देवळांपैकीं हें एक होय. आपल्या-कडे सात चिरंजीव, सप्तपुरी, वगैरे जसें विषम संख्येचें महत्त्व आहे, तसें पूर्वी इकडेहि असे. याप्रमाणें रोमला देवळें पहावीं तितकीं थोडींच. त्याबद्दल लिहूं गेलें तर एखादी एनसायक्लोपेडियाच होईल.

वर काताकोम्बांसंबंधानें उल्लेख आला आहे. हीं पहिल्या १।२।३ शतकांतील ख्रिस्तांचीं गुप्त कबरस्तानें, व धर्मसंबंधीं सभांचीं स्थानें होत. यांत एकदां गेलों होतो. जमिनीखालीं पांच मजले निरनिराळ्या वाटा करून त्यांच्या बाजूंनीं भिंतीत मनुष्याच्या लांबीएवढे कोनाडे केले आहेत. यांत प्रेतें उघडीच टाकीत व पुढून दगडांनीं बंद करीत. कांहींत हाडें वगैरे अजून दिसतात. आंत सर्व अंधार आहे. मेणबत्त्या हातांत देऊन एक भिक्षु-मशालजी बरोबर येतो, व दाखवितो. पहिलीं चार शतकें जे पोप झाले तेहि येथेंच प्रथम पुरले गेले. त्या वेळीं त्यांनीं पोप ही पदवी धारण केली नव्हती; तेव्हां ते फक्त बिशप संज्ञित असत. आंतील गारठा, अंधार व कोंदटपणा यांत एकदोन तास भुतांसारखे मशाली घेऊन फिरलों तेव्हां कसेसेंच वाटलें! पहिल्या तीनचार ख्रिस्ती शतकांत त्या धर्माचा प्रसार होत होता, पण त्याला राजाश्रय

गृहाच्या मधील छताविरहित कमानी, व बाहेरील मोठमोठ्या विटे बंदीं भिंती अजून आहेत. आंतून भोंवतालीं कमानीतून सुंदर पुतळे वगैरे असत. पैकीं कांहीं निरनिराळ्या म्यूझियम्मध्यें गेले असू बार्काचे मंदिराबरोबरच रानटी लोकांच्या विध्वंसाला बळी पडले. अं तीनचार स्नानगृहांचे अवशेष निरनिराळ्या ठिकाणीं आहेत; यावरू पूर्वीं लोकसत्तेच्या व नंतर एकसत्तेच्याहि वेळीं स्नानादि उपभोगाच्य साधनांची येथे फार चहा असे, हें उघड आहे.

याप्रमाणें जुन्या बादशाही व नंतरच्या ख्रिस्ती रोमची कांहीं कल्प तुह्मांला आतांपावेतों दिली. ख्रिस्ती रोमच्या वेळीं फक्त देवळें बांधांत असत, असें मात्र नाहीं. चवदा, पंधरा, सोळा शतकांत व त्य चशा पुढ पापापदारूढ झालेल्या कार्डिनेलांनीं व इतर श्रीमंत गृ स्थांनीं वेळोवेळीं बांधवलेले वाडे अगदीं पहाण्यालायक आहेत. यांपै एकदोहोचेंच नांव घेतले तरी पुरे होईल; पालाझो फारनेसे, कांचे लेरिया, माझिमा वगैरे. यांची पुढील दरवाजांची भिंत, भव्य दरवाज नंतर सोप्यांतून गेल्यावर सुंदर व गोड प्रमाणाचा दोन अगर ती मजली चौक, त्याच्या कमानी व खांब, आंतील खिडक्या वगैरें मांडणी व जिने ही प्रत्येक वाखाणण्यासारखीं आहेत. आंत जाऊ चौकांत उभें रहावें ह्मणजे या वाड्यांतील पूर्वींच्या वैभवाची कां कल्पना येते. मला ही चौकाची वगैरे ठेवण फार आवडली; व मर वाटतें कोणीहि हिंदी माणूस ती पाहून संतुष्टच होईल. कांहींकांहीं आतां कम्पन्या, दुकानें, छापखाने वगैरे झाले आहेत. तरी त्यांच शोभा गेलेली नाहीं. एवढें खरें, कीं, अशा दुकानांच्या चौकांत उभें राहि ह्मणजे जणूं स्वतःच्या सध्यांच्या हीनस्थितीची कहाणीच हे पहाणाराच कानांत कुजबुजतात! जेथें जेथें शक्य दिसलें तेथें तेथें आंत शिरू असले वाडे चौकांत उभे राहून यथेच्छपणें पाहिले. कोणीं येऊ मज्जाव केल्याशिवाय थबकलों नाहीं. लोचटपणाच नव्हे हा?

यानंतर रोमविषयीं सांगायची मुख्य गोष्ट म्हणजे येथील पुतळे-आदि जुन्या (व नव्याही) प्रेक्षणीय वस्तूंचे अपूर्व संग्रह होत. पैकीं जगप्रसिद्ध व्हाटिकन् म्यूझियम्, कापिटोलिउम् म्यूझियम्-व रोमन म्यूझियम् होत. या बहुतेकांतील संग्रह पोपांनीं स्वतः अगर त्यांच्या प्रेरणेवरून केले गेले आहेत.

वाटिकानोमधील चित्रसंग्रहांविषयीं लिहिलेंच आहे. यांत राफाएलचें येशूचें डोंगरावरील व्याख्यान हें चित्र अप्रतिम आहे. व्याख्यान संपतांनाचा देखावा-येशू शांतपणें आपल्या उदात्त विचाराची जाणीव असलेला टेंकडीवर उभा आहे, शिष्यवर्ग त्याच्या वाणीच्या माधुर्यानें व उदात्त विचारसरणीनें मोहून गेल्यासारखे तटस्थ बसले आहेत वगैरे व्यक्तिशः भाग चांगले साधले असून ते एकमेकांत अत्यंत कौशल्यानें मिळविले आहेत. दुसरीं पुष्कळ चित्रें बऱ्याच लोकांस आवडणारीं व कांहीं नाणावलेलीं, पण मला बरीं वाटलीं नाहींत.

पोपमहाराजांचा ग्रंथसंग्रह पाहण्याची तात्यापंतोजींचा व्यवसाय उचलला असल्यामुळें साहजिकच फार उत्सुकता होती. मी गेलेल्या दोन्हीहि वेळीं ती बंद होती. तें पवित्र ज्ञानभाण्डार नाना दैवतपूजकाच्या (हीदन-ख्रिश्चनलोक आपणां हिंदूस हें नांव देतात, तें तुम्हांला विदित असेलच.) डोळ्यांनां पाहण्याचें कोणाच्या तरी नशिबांत नव्हतें खरें! पण सर्वांत उत्कृष्ट व भरपूर म्हणून नाणावलेल्या पोपांचा जुन्या व नव्या पुतळ्यांचा संग्रह होय. यांत कांहीं थोड्या-अगदीं बोटावर मोजण्यासारख्या-जुन्या ग्रीक कारागिरांच्या (इ. स. पूर्वी व थोडें नंतरहि) कांहीं मूर्ति आहेत. निओबे समूहापैकीं अवशिष्ट राहिलेली एक अर्धी भंगलेली मूर्ति येथेंच आहे; या समूहाची जुनी रोमन प्रतिकृति फ्लॉरेन्सला असल्याचें लिहिलेंच आहे. कांहीं ग्रीक बायांचे पुतळे आहेत, त्यावरून पोषाकाची कल्पना येते. शिवाय आपोलो, मिनर्व्हा, व्हीनस आदि देवतांचे चांगले चांगले पुतळे



'डायाना' व्हॅटिकन्-रोम.

आहेत. पैकीं व्हेनुसचें स्नान, केश वाळवणें, त्यांनां धूप देणें वगैरे तीन निरनिराळे मोठे मारू आहेत. व्हेनुसच्या पुतळ्यावरून, केश वाळवून त्यांस सुगंधहि यावा ह्मणून धूपविण्याची या लोकांत आपल्यासारखीच चाल असावी असें वाटलें व कविकुलगुरूच्या गौरीप्रसाधनाची आठवण झाली. ( कु. सं. ७ वा सर्ग पहा–' धूपोष्मणा त्याजितमार्द्रभावं केशान्तमन्तःकुसुमं तदीयम्–वगैरे. मेघ. ३२ वनिताकेशसंस्कारधूपैः इत्यादि. रसिक कालिदासाला वनितांच्या केसांला तेलकट घाण न येतां, धूपाचा सुगंध आवडावा यापरतें रसिकपणाचें चिन्ह कोणतें ? ) एका खोलींत नऊ म्यूझेसचे पुतळे चांगले आहेत; यांतच त्यांनीं आपापल्या कला देऊन ज्यांना उदयाला आणलें असे डेमोस्थेनेस , पेरीक्लिस आदि वक्ते, सोफोक्लीस, एपिक्यूर, प्लेटो वगैरे ग्रीक प्रसिद्धांचे पुतळे आहेत. शर्यतींत पळणाऱ्या ग्रीक स्त्रीचें चित्र दोनतीन गोष्टींनीं महत्त्वाचें आहे; याचें मूळ इ. स. पूर्वी पांचव्या शतकांतलें आहे. प्रसिद्ध ऑलिम्पिक खेळांत स्त्रियाहि पडत असत, हें यावरून कळून, त्यांचा खेळाचा आटपसर गुडघ्यापर्यंतचाच पोषाक कसा असे, याची कल्पना येते. शिवाय नर्व्हा, क्लौडियस, त्राजान आदि रोमन बादशाहांचे सबंध पुतळे आहेत; त्यांस ऐतिहासिक महत्त्व असल्यामुळें ते पहावेसे वाटतात, व अशा रीतीनें काळजीनें आजवर हा पापांनीं बाळगल्याबद्दल त्यांस धन्यवाद देणें अपरिहार्य होतें. यांत ग्रीक कलेचें उत्कृष्टत्व दाखविणारें आणखी एक लाओकून नांवाचें चित्र आहे. आपोलोचा अपमान केल्यामुळें दोन मुलांसह या गृहस्थावर दोन भुजंग चालून येऊन त्यांनीं त्यास वेढिलें; ते सोडवण्याचा प्रयत्न करीत आहेत, तों तो भुजंग त्यांस अधिकअधिक आवळून टाकीत आहेत असें दिसतें. तिघांचे भयानें गांगरून गेलेले चेहरे अगदीं हुबेहुब आहेत. हेंहि इ. स. पूर्वीचे काम पाहून आश्चर्यानें थक्क होण्याशिवाय मार्गच राहत नाहीं. शिवाय ' आपोलो

बेल्व्हेडे अर' हा पुतळाहि वाखाणण्या जोगा आहे. शिवाय आमेझानहि उत्तम आहे; एकांत ती युद्धाला तयार झालेली आहे. प्रमिलाच कीं नाहीं? व दुसऱ्यांत तिला कमरेवर जखम झालेली आहे. हल्लींच्या स्त्रियांना बिचाऱ्यांना मताचा पोकळ हक्क मिळवायला किती खिडक्या फोडाव्या लागत आहेत! पण पूर्वी ह्मणे स्त्रीराज्यें हातीं, स्त्रिया योद्धया होत्या! आज एखादी अमेझॉन जिवंत पहायला मिळाली असती तर काय बहार होती!

याप्रमाणें नानावस्तु अप्रतिम आहेत; त्यांचें वर्णन कोठवर करावें! मला आवडलेल्या अगदीं प्रमुख तेवढ्या येथें नमूद केल्या आहेत. हें रत्नभाण्डार नाहीं असें कोण रसिक ह्मणेल! चांगल्या वस्तूवर कावळ्यासारखा डोळा असण्याबद्दल नेपोलियनची प्रसिद्धि होती. त्यानें इताली जिंकल्यावर पापामहाराजांकडून खंडणीदाखल कितीतरी चांगले पुतळे त्यांच्याच खर्चानें पारिस पावेतों नेऊन पोंचविले. पुतळेच्या पुतळे गेले; आणखी त्याला बोळवणी पाठविण्याचा प्रचंड खर्च! इतकें असूनहि हा संग्रह अप्रतिम आहे; व त्याचें जगांतील पहिलें स्थान कायम आहे. दुसरा असाच प्रसिद्ध पुतळ्यांचा म्यूझियम् 'कापिटोल' वरील; यांत एक स्नानाला सिद्ध झालेल्या व्हेनुसचा पुतळा अप्रतिम आहे.

व्यक्तिशः अवयवांपेक्षां तिचा उभें राहण्याचा डौल अप्रतिम आहे. केवढी कल्पनाशक्ति व किती सूक्ष्म नजर कर्त्याची असली पाहिजे! इतर दैवतांचे वगैरे चांगले पुतळे यांत आहेत; पण या म्यूझियमचें महत्त्व वेगळ्याच गोष्टीसाठीं आहे. ती ही कीं येथें सीझरपासून पुढील सर्व योद्धे व बादशहा आणि सिसेरोसारखे राजकारणी वक्ते पुरुष यांचे संगमरवरी मुखवटे, कांहीं अर्ध पुतळे असे आहेत. यांचें मुळाशीं सादृश्य जुनीं नाणीं वगैरेवरून सिद्ध झालेलें आहे. त्यांवर नंबर असून कोणत्याहि मार्गदर्शकांत कोणता नंबर कोणत्या पुरुषाचा हें दिलें असल्यामुळें सर्वांचीं नात्रें कळून आश्चर्य वाटतें. पैकीं आपल्या-

सारख्यास सीझर, पहिला बादशहा औगुस्तुस, आन्तोनिओ, आद्रियान्, नेरो, कॉन्स्टन्टाइन् वगैरे कांहीं थोडेच ठाऊक असल्यामुळें तेवढेच आकर्षक दाटतात. असें मात्र कधींकधीं होतें, कीं, अमुक पुरुष असा असावा असें जें आपलें कल्पनाचित्र ठरलेलें असतें—त्याचें अस्सलाशीं न पटून निराशा होण्याची पाळी येते. असा कांहीं प्रकार सीझर पाहिल्यावर माझा झाला.

तिमरा जुन्या पुतळयांचा संग्रह, स्टेशनजवळ जुनीं स्नानगृहें (थर्मे) होतीं तेथें आहे, म्हणून यास थर्मे म्यूझियम् म्हणतात. यांत न्हाणारी जलदेवता, हर्मे, ज्यूनो, मिनर्व्हा वगैरे मोठमोठे जुने पुतळे आहेत. ज्यूनोचा एक भला थोरला मुखवटा आहे, तो पाहून भय व आश्चर्य वाटतें. आणखी एक विश्रान्ति घेतांना विचारांत गुंतलेल्या कुमारस्वामी ( मार्स्--युद्धाचा देव )चें बैठें चित्र अपूर्व आहे. त्याचे कमलेले पिळदार दंड, भरदार छाती, वळलेल्या मांड्या व नीटस रगदार पोटऱ्या वगैरे पाहून हें शरीर—हें ठाण कार्तिकेयाला, अगर मनुष्यसृष्टींत यायचें असल्यास संभाजी, बाजी देशपांडे अगर पहिले बाजीराव यांस उत्तम साजेल, असें वाटतें. कुमारापेक्षां बाजीरावालाच ज्यास्त शोभावें. कारण या मार्सच्या पायाजवळ तें खोडकर कारटें 'मदन' बसलें असून, त्याची पोटरी हळूच पिसानें डवचित आहे, व त्याचा किंचित् परिणाम त्या योद्ध्यावर होतोसें त्याच्या विचारी चेहऱ्यावरून दिसतें; हें आपल्या मदनद्वेष्टया कुमारजींस कसें जुळावें? इतिहास आपणाला जें सांगतो त्यावरून पाहतां संभाजीला अगर बाजीरावालाच तें योग्य होईल. त्या हंसऱ्या मदनाला मार्सच्या मनांत एकादी तुळसी अगर मस्तानी भरवून द्यायची आहे असें वाटायला लागतें. हा पुतळा मला फार पटला; याचें चित्र घेतलें आहे.

याशिवाय नांव घेण्यासारखे आणखी दोन म्यूझियम रोमला आहेत. पण यांत जुने पुतळे नाहींत, नवे आहेत; व पुनः राफाएलादींचीं

चित्रें व त्यांच्या प्रतिकृति आहेत. दोहींतहि पुढें पापापदास चढलेल्या कार्डिनालांनींच आरंभ केला, ही लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. पैकीं बोर्गेस ह्मणून म्यूझियम् एका टेंकडीवर आहे. याची वाट एका तरुण सभ्य दिसणाऱ्या चांगल्या पोषाक केलेल्या तरुणाला विचारतां 'जरा वळणाची वाट आहे, मी बरोबर येऊन दाखवितों' असें ह्मणून गृहस्थ मजबरोबर येऊं लागला. तेथें पोंचे तों दोघांचें संभाषण झालें. या वेळीं अगदीं एकवचनीच झालों होतों ह्मणायचें! कारण एक शब्द फार तर दोन बोलून वेळ बचाऊन नेण्याचा मी प्रयत्न करीत होतों, आणि तें जुळलेंहि. त्याचें मला समजे, व माझाही आशय त्यास कळे. नवाशिक्या माणसास उत्तेजन देण्याची सभ्यपणाची रीत इकडे आहे, त्याप्रमाणें तो 'पार्ला बुओनो इतालियानो' ( तुह्मीं बरें बोलतां ) वगैरे ह्मणे, हा त्याचा चांगुलपणा; बाकी अन्तरींचें आमचा मनोराम जाणत होताच. तेथें पोंचल्यावर त्यानें पुतळयांचें व तसबिरींचें एक मार्गदर्शक पुस्तक विकत घेतलें, व दीड तास मला सर्व दाखवीत वर्णन करीत बरोबर हिंडला.

या म्यूझियममध्यें बर्नीनि नांवाच्या मूर्तिकाराचीं चांगलीं चित्रें आहेत; पैकीं डेव्हिडचें बरें आहे. पौलीना नांवाच्या नेपोलियनच्या बहिणीचा व्हेनुसच्या वेषांत एक अत्यंत प्रसिद्ध पुतळा आहे. अशीच जर ती खरोखर असेल तर ती लावण्यवती असली पाहिजे. वरच्या मजल्यावर चित्रसंग्रहहि बरा आहे. पण राफाएल वगैरेच्या चित्रांच्या प्रतिकृतीच पुष्कळ आहेत. अमक्या चित्राचें मूळ फ्लॉरेन्सला आहे, असें मी चटकन् सांगतांच त्या गृहस्थाला मौज वाटे व आनंदहि होई. कारण तो स्वतः फ्लॉरेन्टाईन होता. या रीतीनें टीका करीत दोघांनीहि बरेंचसें पाहिल्यावर त्याला काम होतें ह्मणून तो गेला. जातांना माझें 'ग्रात्सिए ( आभार झाले )' त्याचें 'नियन्ते, नियन्ते ( छे: छे:—कसचें कसचें )' वगैरे सभ्यपणाचे प्रकार झाले.

शेवटीं बारबेरीनी नांवाच्या राजवाड्यांत ( पोप होणाऱ्या एका कार्डिनलचें हें घर होतें; त्याचें नांव यास पडलें आहे ) लहानसाच पण चांगल्या चित्रांचा चांगला संग्रह आहे. यांतच राफाएलचें 'फोरनारीना' नांवाच्या बाईचें चित्र आहे. पित्ती ग्यालरींतील राफाएलच्या प्रियेचें अप्रतिम चित्र व ही लावण्यवती फोरनारीना यांच्या सौंदर्याचे प्रकार जरा वेगळे; पण दोहींतहि अप्रतिम सौंदर्य ओतलें आहे. त्या प्रियेचा चेहरा वाटोळा तर फोरनारीनाचा उभट, असा फरक कांहीं काढतां येईल. निवडच करायची असली तर मी फोरनारीनाचे तसबिरीची करीन. दुसरें एक चित्र ग्वीडो रेनी याचें 'बीयात्रींचे चेन्चि' या हतभागी तरुणीचें आहे. तिचा तो कष्टी करुण चेहरा कापडावर उठविण्यांत रेनीनें अप्रतिम चातुर्य दाखविलें आहे, यांत शंका नाहीं. ही चेन्ची तुमच्या ओळखीची असेल. कास्टेल अ.जे-लोमध्यें जिचा पापाच्या न्यायसभेनें छळ करून वध केला ती ही होय.

याप्रमाणें हे चार प्रसिद्ध म्यूझियम् मी चांगले तृप्ति होईतों पाहिले; त्यामुळें त्यांचा विसर पडणें अगर याचें त्याला आणि त्याचें याला अशी यांविषयींच्या कल्पनांची सळमिसळ होणार नाहीं, असें वाटतें.

याप्रमाणें जुन्या लोकसत्तेंतील हल्लीं स्मशानवत् झालेलें रोम, बाद-शहांचें त्याहीपेक्षां नामशेष झालेलें पालाटीनवरील रोम व नन्तर आरंभींच्या ख्रिस्तांचे पदोपदीं छळ–फांशी आदि क्रौर्याच्या प्रकारांनीं गजबजून गेलेलें रोम, हीं पाहून मनावर एक प्रकारचें उदासीनतेचें पटल येत असे. पुढील पापांच्या सद्दींतील रोम, त्यांचें ऐश्वर्य, जल-जलाट, व त्याबरोबरच हेकेखोरपणा, जुलूम वगैरे आठवणींनीं व देव-ळांनीं भरलेलें रोम पाहून "राजांचें ऐहिक ऐश्वर्य लयाला गेलें, पण धर्मगुरूंचें धार्मिक ऐश्वर्य आज हयात आहे; त्याबरोबरच बाहेरील भपका, विधिविधानें, अंधश्रद्धा आदि ऐहिक प्रकार अस्तित्वांत आहेत. तेव्हां या धार्मिक रोमच्या हृदयांतील हा विनाशक किडा बळावत

जाऊन त्यालाहि सीझर–आगस्टसच्या रोमच्या स्थितीला पोंचवणार नाहीं कशावरून ! " असेहि विचार उद्भवले ! जुन्या रोमला वाण्डाल हूणादींनीं धुळीस मिळविलें. नव्या धार्मिक रोमला एकोणिसाव्या शतकांतील आधुनिक शास्त्रांच्या रूपाचे वाण्डाल–हूण हलवून सोडीत आहेत. तें त्याला जेर करून सर्वभक्षक काळाच्या स्वाधीन करणार नाहींत कशावरून ? अशीहि विचारसरणी वाहते. पण ती सर्व तुह्मां-वर न लादतां रोम प्रकरणाची समाप्ति करणें आहे.

**जेनुआ ( इं. जिनोआ ), ६ सप्टेंबर.**

अकरा दिवस सर्व यथेच्छ पाहून बुधवारीं सकाळीं रोम सोडलें. शेवटले तीन दिवस माझे मित्र लंडनहून असेच यूरोपांत प्रवास करीत रोमला आले, यांच्या सहवासांत फार सुखानें गेले. ते दिवस दोघे अगदीं जसे पायाला पाय बांधून होतों. दोघांसहि एकमेकांच्या भेटीनें अति आनंद झाला हें सांगणें नकोच.

गाडी निवडण्यांत थोडीशी नजरचूक झाल्यामुळें एका खटार–गाडींत दहातास रखडावें लागलें. प्रथम प्रथम भोंवतील मुलूखहि शुष्क, रुक्ष असल्यामुळें ज्यास्तच त्रास झाला. दरस्टेशनवर गाडी थांबे व चढणाऱ्याउतरणाऱ्या मजूर–शेतकरी वगैरे लोकांच्या आरडा-ओरड्यानें कान फुटण्याची पाळी येई ! त्यांतले त्यांत एकाद्यानें 'व्हीनो तोस्कानो' ( टस्कनींतील दारू ) वर ताव मारला असला ह्मणजे तर विचारायलाच नको ! आपलेकडेहि पंढरपूरच्या यात्रेच्या वेळेला अत्यंत गर्दी होते; व दरस्टेशनवर 'पुंडलीक वरदा हारिविठ्ठल'चा एकच कल्लोळ होतो; पण तें तेवढ्यापुरतेंच. नन्तर साधारणपणें शान्त असतें ह्मणायला हरकत नाहीं. पण इतडे सर्वच प्रकार निराळा ! शिवाय लोक अस्वच्छ व अमंगळ किती ! स्टेशनांत स्वच्छ हवेसाठीं खालीं उतरावें कीं वसकन् घाण येऊन वांती होण्याची पाळी येई. पाणी




' काम्पानीले, ' पिसा येथील झुकलेला मनोरा.

लागण्याचें स्वप्नच ! पण कपड्यालाहि वर्षानुवर्षें पाणी मिळत असेल कीं नाहीं, याची शंका वाटते !

दुपार कळून गेल्यावर मात्र भोंवतीं सृष्टिशोभा बदलली. दूर क्षितिजाशीं त्या ओळखीच्या मेडिटरेनियन्ची निळी कोर दिसूं लागली. वारंवार टेंकड्या, डोंगर येऊनहि प्रदेशाचा कंटाळवाणेपणा मोडीत; व जिकडेतिकडे हिरवेगार व्हायला आरंभ होऊन पाहणाराचें मन रमे. जोंजों संध्याकाळ होऊं लागली, तोंतों मंद व अरुण रंगाचा सूर्यप्रकाश क्षणक्षण वाढत्या दिसणाऱ्या त्या मेडिटरेनियन् समुद्रावर पडून त्याच्या निळेपणावर किंचित् गुलाबी छटा दाखवूं लागला; व भोंवतीं डोंगरावरील हिरवेपणा विशेष गर्द भासूं लागला; आन्तोन्यायो नांवाच्या एका लहानशा स्टेशनावर गाडी बरीच थांबून सृष्टिसौंदर्याच्या अनेक प्रकारांचें हें एकवटलेले रसायन डोळ्याची तृप्ति होईतों प्यायला सांपडलें. तें छोटें स्थळ एकदां पाहिल्यावर विसरणें शक्य नाहीं. नंतर पुढे लेग्हार्नो येथे अशीच बरीचशी शोभा आहे. यानंतर गाडी थोडी आंत वळून समुद्र व सूर्य बरोबरच दिसेनासे झाले व मी पिसा शहरीं संध्याकाळीं ७। वाजतां उतरलों.

शहर लहानसेंच आर्नो नदीच्या कांठीं आहे. त्या रात्रीं तरी झुमदार वाटलें नाहीं. प्रकाशाची कमतरता हें कारण असूं शकेल. कारण येथील म्युनिसिपालिटीचे ग्यासचे दिवे आमच्या पुण्यानगरच्या राकेलच्या दिव्यास बरे ह्मणवतात. मोठ्या चौकांत तर मला वाटतें हे दिवे दाखविण्यास दुसऱ्या दिव्यांची जरूर भासत होती ! जागजागीं तोट्यांवर बायकामुलें तांब्याच्या चंबूंत व बकेटांत पाणी भरून नेत असतांना दृष्टीस पडून लहानपणीं नगरच्या तोट्यांवरील देखाव्याची आठवण झाली ! तितका कलहा व भांडणें मात्र येथें नव्हतीं. घरोघर तोट्यांची सोय येथें नसावीसें दिसतें.

दुसऱ्या दिवशीं येथील देवालय, बाप्तिस्म्याचें अष्टपैलू देऊळ (बाप्तिस्तेरिउम् फ्लॉरेन्सप्रमाणेंच) व प्रसिद्ध झुकता मनोरा हीं पाहिलीं. देवळाचा सभामंडप पांचपदरी–ह्मणजे मध्यें मुख्य पाखा व बाजूला खांबांनीं विभागलेले दोन दोन–असा आहे. यांतील खांब व दगडहि –अर्थात् सर्व संगमरवरी–पिसाच्या लोकांनीं इतर ठिकाणहून लुटून आणले! हे लोक पूर्वीं चांचेपणाचा धंदा करीत तेव्हा त्यांस हें योग्यच होतें.

'झुकता मनोरा' १९०–९५ फूट उंच असून एकंदर तेरावर फूट झुकला आहे, याचें आश्चर्य वाटतें. एकदोन मजले बांधल्यावर पाया खचल्यामुळें बाजूला कलले व मग वरचें काम तसेंच मुद्दाम कलतें बांधलें गेलें, असें तज्ज्ञ लोकांचें मत आहे! याला एक मुख्य मजला व वर सज्जांचे सहा मजले असून त्यांवर देवळाच्या घंटा आहेत. इथून-तिथून सबंध संगमरवरी काम आहे. अगदीं वरपर्यंत दोनशें चौऱ्याण्णव पायऱ्यांचा सोपा जिना आहे; वरून लांबचा देखावा दिसतो. येथूनच प्रसिद्ध ग्यालिलेओनें सर्व वस्तूंच्या पतनांच्या नियमांचे प्रयोग करून पाहिले; मजसारखे सामान्यजन फक्त आश्चर्य व्यक्त करून चालते होतात!

नंतर 'काम्पो सान्तो' ह्मणून इमारतींत प्रसिद्ध लोकांचीं थडगीं आहेत. इच्या भिंतीवर पौराणिक चित्रें रंगविलीं आहेत. पैकीं एकांत ऐश्वर्यांत व आनंदांत असलेल्या लोकांस मृत्यू ओढीत नेत असून, मरणासाठीं हपापलेल्या गरीब दुबळ्यांस तसेंच पडूं देत आहे असा देखावा पाहून, "चित्रकारानें वस्तुस्थिती दाखविली, परंतु कवीनें मात्र 'किति सदय शांत अससी मरणा, हीन दीन दुःखी दुबळी ऐशियांसि घेतोसि बळी' वगैरे अतिकरुण पण वस्तुस्थितीला अगदीं सोडून वर्णन केलें आहे" असें वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

मिलानो, (इं. मिलन) ८ सप्टेंबर, १९१२.

जेनुआहून लिहिलेलें पिसा येथील हकीकतीचें पत्र यापूर्वी मिळेलच. पीसा येथील काम्पो सान्तोमध्यें एका गोष्टीकडे माझें लक्ष्य विशेष वेधलें. ती ह्मणजे गंजलेले लोखंडाचे भले जंगी साखळदंड होत. हे येथें कशाला? ह्मणून आश्चर्य करीत शोध केला. तेव्हां कळलें कीं तो लंगर पीसा येथील बंदराचा अतिशय जुना साखळदंड होय. पीसाच्या लोकांचें आरमार मध्ययुगांत प्रसिद्ध असे. पण तेराचौवदाव्या शतकांत जेनुआच्या आरमाराची व त्याची चढाओढ आणि द्वेष सुरू होऊन, १३६२ त जेनुआवाल्यांचा मोठा विजय झाला, तेव्हां त्यांनीं जयाची खूण ह्मणून हा साखळदंड बंदरांतून लांबविला. एका काळीं एकछत्री असूनहि नंतर त्याचे तुकडे झाले, व प्रत्येक मोठें शहर ह्मणजे स्वतंत्र राज्य बनलें, ही जी इतालीच्या इतिहासाची परंपरा ती तुमच्या आतांपावेतों लक्ष्यांत आलीच असेल. पण अगदीं परवां माझिनि, गारिबाल्डि, काव्हूर, व राजा व्हित्तोरियो यांच्या भगीरथ प्रयत्नांनीं सर्व इताली देशांत ऐक्य झालें व ऑस्ट्रियाची सत्ता झुगारून दिली गेली; तेव्हां १८६० त पीसाला ते साखळदंड परत मिळाले. ही अबोलकी, जड लोखंडाची, मोडकळीला आलेली वस्तू, पण ती केवढ्या इतिहासाची साक्ष देते!

पीसाहून दुपारीं निघून जेनुआला त्याच दिवशीं ७ वाजतां गेलों. वाटेनें शेंकडों बोगदे लागले. पण मध्यंतरीं जो थोडा वेळ देखावा दिसे तो मात्र रमणीय असे. बोगद्यांतील धूर–कोंडमारा– व विशेष भासणारा धडधडाट संपला कीं डब्या बाजूला दोन खडकांच्या मधून मेडिटरेनियनचें जेनुआच्या आखातांतले तें निळें पाणी दृष्टीला पडे. ज्या ठिकाणीं त्याला थोडातरी वाळूचा किनारा असे तेथें किती तरी माणसें पोहतांना, आंघोळ करतांना दृष्टीला पडत. कडक उन्हाळ्याचे दिवसांत समुद्रकिनाऱ्याचे गांवीं जाऊन स्नानसुखाचा यथेच्छ उप-

भोग घेणें हें इकडे सुखवस्तु लोकांचें मोठें करमणुकीचें साधन आहे. मध्येंच दूर एकाद्या गलबताची मोठ्या पक्ष्यासारखी आकृति दिसूं लागे. उजव्या बाजूला हिरवेगार डोंगर दि त. यांचा हिरवेपणा फक्त कोठें खेड्यांतील घरांच्या तांबड्या कौलांनीं, तर कोठें मोठ्या इमारतींच्या संगमरवरी पांढरेपणानें मोडला जाई. याप्रमाणें पाहून इकडे वळूं कीं तिकडे पाहूं अशा गर्दींत एकाद्या लहान मुलाप्रमाणें अस्वस्थपणाच्या गोंधळांत पडावें, तों एकदम किंकाळी ठोकून गाडी बोगद्यांत शिरे व या सर्व स्वप्नवत् देखाव्यावर विरजण पडे!

जेनुआला दिवे लागल्यावर येऊन थोडा टेंकलों व मग शहर पहायला निघालों. डोंगराचे उतरणीवर टेंकड्यांत हें वसलें असून पायथ्याशीं भलें मोठें बंदर आहे. यामुळें बरेंचसें उंच जावें तेव्हां समुद्र दृष्टीला पडूं लागतो. गांवांतील मोठे रस्ते वळणाचे असून ते एकावर एक असल्यासारखे आहेत; ह्मणजे वळणानें वर जावें कीं मागला रस्ता आपल्याखालीं मोठ्या थोरल्या राक्षसी पायरीसारखा दिसतो. शिवाय लहानलहान रस्ते अगर गल्ल्यांनींहि असे मोठे रस्ते जागजागीं जाळ्यांप्रमाणें गुंफले आहेत. हे लहान रस्ते तीनपासून चार ठेवणांच्या पायऱ्याचे असतात. त्यामुळें घरांच्या मजल्यांचीहि रचना अशी मजेची आहे, कीं, तळमजला व त्यांचें दार खालच्या रस्त्यावर व वरचा मजला व दार दुसऱ्या रस्त्यावर असतें! त्या रात्रीं बराच दूरवर गेलों पण मला समुद्र दिसला नाहीं; एवढा बंदरांतील गोदीचा विस्तार आहे. हल्लीं जेनुआ हें इतालीचें प्रमुख बंदर आहे, हें तुह्मांला ठाऊक असेल.

दुसरे दिवशीं रीतीप्रमाणें देवळें बरीचशीं पाहिलीं. पैकीं एकदोन जेसुईट लोकांचीं आहेत, तीं फार संपन्न व भपकेदार आहेत. पैकीं एकाच्या पायऱ्यांवर दोन जुने व दोन नवे सिंह आहेत. जुन्यांच्या आकारांत असा विशेष आहे,कीं, त्यांच्या कर्त्यानें कधीं तरी चित्रांतहि

चांगलासा सिंह पाहिला होता कीं नाहीं, याची शंका येते. या देवळाच्या पलीकडे जेनुआ येथील अतिशय दळणवळणाचा चौक आहे; त्यावर सध्यां नवी 'बोर्सा' नांवाची जंगी व्यापारी इमारत होत आहे; मला ती अगदीं कुरूप वाटली; व ब्रामान्ते, आञ्जेलो आदिकांचे वंशज इतक्यांतच ही कला विसरले काय? असें भासूं लागलें. या पलीकडच्या चौकांत व्हित्तोरियोचा पुतळा आहे, व वरच्या बाजूला उंचवट्यावर प्रसिद्ध देशभक्त माझिनी यांचा उंचचउंच पुतळा आहे. कपाळ उंच, खोल डोळे, व विचारांत निमग्न असलेला असा हा प्रसिद्ध पुरुष दिसून त्याच्या वेळची आठवण होते व 'माझा देश एक व स्वतंत्र कधीं होईल' अशी विवंचना तो करीत आहे, असा भास होतो. जेनुआचा रहिवासी असल्यामुळें या लोकांनां त्याचा विशेष अभिमान वाटावा यांत आश्चर्य नाहीं. याचप्रमाणें स्टेशनांत उतरल्याबरोबर समोरील चौकांत क्रिस्तोफोरो कोलोम्बो (कोलम्बस)चा पुतळा पाहूनहि या लोकांचा धाडशीपणा, अचाट कल्पना, व त्या सिद्धीला नेण्यास लागणारा दृढनिश्चय व चिकाटी यांची उत्तम ओळख पटते. कोलम्बसनें नव्या जगाचा शोध लावला हें तुह्मांस ठाऊक आहेच; असल्या धाडशी माणसाला स्वदेशीं मदत मिळूं नये, व दारोदार भीक मागतां मागतां स्पेनच्या राणीनें त्याला आश्रय द्यावा हें फक्त जेनुआच्या लोकांच्याच नव्हे, तर सर्व मनुष्यजातीच्या पुराणप्रियतेची, नव्या गोष्टींविषयीं साशंकपणाची साक्ष देतें. याच्या मृत्यूनंतर तीनशें वर्षांनीं, ह्मणजे १८०८ सालीं माझिनी जन्मास आला, त्या वेळीं जुन्या लोकसत्तेची साक्ष देणारे उत्तम वाडे तेवढे असून जेनुआप्रांत फ्रेंचांच्या व मग सार्डिनियाचे राजाच्या ताब्यांत असे! जेनुआस बरेचसे पाहण्यासारखे वाडे आहेत! हे १५ व १६ शतकांतील लोकसत्तेच्या वेळचे आहेत. या सर्वांत पाहण्यासारखी पहिली गोष्ट ह्मणजे संगमरवरी खांब व कमानींचा दर्शनी चौक व त्यांतून वरच्या मजल्यांत जाणारा रुंद

प्रशस्त संगमरवरी पायऱ्यांचा खुला जिना हीं होय. या सर्वांचें सार ह्मणजे येथील युनिव्हर्सिटींतील चौक व जिना होत. हीं एकमेकांस हिऱ्याकोंदणाप्रणें शोभवतात! आणखी रोस्सो, ब्यांको, पालाव्हिचीनी वगैरे वाडे पाहण्यासारखे आहेत. एकांत व्हानडाईक, रूबेन्स् वगैरेच्या चित्रांची चांगली ग्यालरी आहे, पण मी पहायला गेलों त्या दिवशीं बंद असल्यामुळें मला पहायला मिळाली नाहीं. जागजागीं टेंकड्यावर सज्जे आहेत त्यांवरून खालील पसरलेल्या शहराचा व समुद्राचा देखावा फार नामी दिसतो; कांहींवरून शिवाय शेजारचीं दऱ्याखोरींहि दिसतात.

पण सर्वांत मौज गोदीच्या बाजूनें शहरापासून दूर रात्रीच्या वेळीं जावें ह्मणजे दिसते. ही रात्र काळोखी व ढग आलेले असल्यामुळें वर फक्त काळेंकुट्ट दिसे. पण ढगांस त्रासूनच जणूं काय आकाशाचा एक खंड नक्षत्रें व नक्षत्रमालांसह गांवावर पसरला आहे, असें वाटे. इतकी अपूर्व शोभा त्या काळया टेंकड्यांतून लखाखणाऱ्या हजारों दिव्यांची दिसे. हा स्वित्झरलंदी देख वा जेनुआला पाहून फार समाधान झालें. व अगदीं समुद्रकांठावर लाटांचें संभाषण ऐकत बसायला सांपडलें नाहीं हा खेद कांहीं अंशानें दूर झाला. तास दीड तास तेथें शांतपणें बसून मग परतलों.

जिगेन (जर्मनी) ९ सप्टेंबर, १९१२.

जेनुआविषयीं घाईत लिहिलेलें पत्र पोंचेलच. खरें ह्मटलें असतां रोम सोडल्यापासून निवांत वेळ असा मिळालाच नाहीं. रात्र थोडी व सोंगें फार, असा प्रकार होऊन, निवांत वेळ सांपडेनासा झाला; यामुळें पत्रें त्रोटक येत गेलीं, त्याला इलाज नाहीं.

कोलम्बस, माझिनीचें जेनुआ शहर रविवारीं सोडलें. येथें गांवाची नवीच रचना दृष्टीस पडून मौज वाटली; तसेंच डौलदार चौक, त्यांत

विस्तीर्ण जिने हीं अक्षय ध्यानांत राहतील अशीं पाहिलीं. एकदोन वाड्यांत चित्रसंग्रह होते; पण रिपेअर वगैरेसाठीं बंद असल्यामुळें ते पाहतां आले नाहींत. एकदां गांवांत जाण्यासाठीं ट्राममध्यें शिरलों, तों आणखी तासभर ट्राम् अगर बस वगैरे कांहीं चालणार नाहीं वगैरे ट्रामवाल्यानें घाईनें सांगितलें. कारण न लक्ष्यांत येऊन दुसऱ्या ट्रामकडे दूरवर गेलों. तेथील ट्रामवाल्यानें सावकाशपणें टिकिट देऊन दहा चेन्तेसिमी (एक आणा) खिशांत टाकल्या व नंतर सांगितलें, कीं, येथील एका प्रसिद्ध माणसाचें आज 'फुनेराले (फ्यूनरल्—अंत्यविधि)' आहे, ह्मणून ट्राम येथेंच थांबेल; तर आतां तुह्मी उतरून पायीं जा! त्याच्या या चमत्कारिक वर्तनाची मजसारखीच इतरांसही मौज वाटली.

जेनुआ सोडल्यानंतरचा प्रवास लोम्बार्डी प्रांतांतून झाला. टोस्कानाची जशी दारूविषयीं प्रसिद्धि, तशी याची भात–भाज्या वगैरेविषयीं ख्याति आहे. कोणी जास्त दारू पिऊन बेहोष झाल्यास 'व्हीनो टोस्कानो' स्वस्त झाली वाटतें? असें तिकडे ह्मणतात! तसें भाताविषयीं कांहीं नसावें. भाताचीं शेतेंच्या शेतें, बरीचशीं मका, वांगीं, टोमाटो भोपळा (पोमोदोरे), कोबी आदि भाज्या व द्राक्षादि फळेंहि वाटेनें खूब दिसलीं. भाताच्या शेतांत पिकाच्या लांब चिंचोळ्या पट्यापट्या असून त्यामधून पाण्यानें भरलेले पाट वाहतांना दिसतात. आपल्यासारखेंच प्रथम गाऱ्यांत लावणी करतात कीं काय, हें कळलें नाहीं. तसेंच आपलेकडील तांबडा कण्हेर फार दिसला; याला कास्तानियेतो ह्मणतात. हा सर्व शेतीचा देखावा बरा वाटला; बरेच दिवस अश्वीस नेहमीं जाणेंयेणें पडून शेतीशीं थोडा संबंध आल्याकारणानें या गोष्टींत लक्ष्य घालावेंसें वाटतें. कांहीं वेळानें पो नदी परत ओलांडून पाव्हिया मागें टाकलें व तेथून सातआठ मैलांवर 'चरटोसा' नांवाच्या ठिकाणीं ख्रिस्तभिक्षूंनीं पंधराव्या शतकांत स्थापलेला मठ पहायला गेलों. स्टेशनापासून मैल

वर हा मठ आहे. जातांना ऑम्निबसमधून तेथवर गेलों. भोंवतीं उत्तम रीतीनें राखलेली बाग असून तींत अप्रतिम कारागिरीचें देऊळ आहे. यांत पेरूजिनो, बर्गोन्यानो वगैरे चितार्‍यांचीं प्रसिद्ध चित्रें आहेत. नक्षीकाम सुबक आहे. एका पवित्र-उपकरणादीच्या खोलींत ( साक्रिस्टिया ) हस्तिदंताच्या अप्रतिम नक्षी कामाचें तक्ट आहे, त्यावरील काम अति चतुराईचें आहे. अशा तर्‍हेचें उत्तम देऊळ पाहून त्याला खेटून असलेल्या मठांत गेलों. हा दोनचौकी असून, चौकाचे कमानी-खांबाचें भाजलेल्या मातीचें (तेरा कोत्ता ) गॉथिक नक्षीकाम स्वत: भिक्षूंनीं केलें आहे. दुसर्‍या चौकांभोंवतीं २४ भिक्षूंच्या राहण्याच्या २४ खोल्या आहेत; तेथें अजूनही भिक्षू अगर तापसी राहत असल्यामुळें थेटपर्यंत जातां आलें नाहीं. त्यांची काम करण्याची, रोजच्या जेवणाची एक खोली मासल्यासाठीं दाखवितात. तेथील टापटीप व्यवस्था पाहून आश्चर्य वाटतें; अन्न ठेवण्याचें कपाट असतें, त्याचें दारच टेबलासारखें आडवें मांडतां येतें; त्यावर दोन भिक्षु रोजचें जेवण उरकतात; पण आठवड्यांतून एक दिवस सर्वजण पहिल्या चौकांतील एका मोठ्या दालनांत आठ टेबलांभोंवतीं जेवतात. मुख्य भिक्षु मधल्या टेबलाशीं बसून गोविंद म्हणतो. या भिक्षूंनां रात्रंदिवस जपमाळ धरून बायबल जपत बसावें लागत असेल असें प्रथम वाटतें, पण तसें नाहीं; नित्यनेम ठराविक वेळांत सारून कोणी चित्रें रंगवणें, कोणी इमारतीचें काम करणें, कोणी नक्षीकाम, कोणी बागेची मशागत वगैरे कामें रात्रंदिवस चाललीं असतात. असल्यापैकीं कांहीं तसबिरी मोठ्या दालनांत जेवणाच्या ठिकाणीं टांगलेल्या वाईट नाहींत. शिवाय पूर्वी द्राक्षांचे बाग लावून दारू करणें हें एक भिक्षूंनां जबरदस्त मेहनतीचें पण तितक्याच भरपूर पैदाशीचें काम असे. अशा मठांतील ( क्योस्त्रो ) दारूची प्रसिद्धि चोंहीकडे असे. शिवाय धार्मिक गायनाच्या नोटेशनचीं पुस्तकें हे भिक्षु स्वतः

नक्षी वगैरे भरून लिहीत. छापण्याची कला त्या वेळीं ठाऊक नसल्यामुळें व पुढें बरेच दिवस धार्मिक ग्रंथांनां तिचा विटाळ न होऊं दिल्यामुळें ग्रंथलेखनाचें काम या भिक्षूंनां जबर असे. यावरून भिक्षूंच्या उद्योगाची कल्पना येईल. इकडील तापसलोकहि देह वाळवीत न बसतां मेहनतीचीं उपयुक्त कामें करीत असत. अति उपयुक्त ह्मणजे दारूचें! त्यांच्या धर्मप्रणेत्यानेंच दारू पिण्याचा कित्ता घालून दिल्यावर मग हे कां कमी करतात? क्लॉइस्टरमधील अबकारी खात्याच्या भिक्षू इन्स्पेक्टराच्या उदरविस्ताराचीं वगैरे जुनीं वर्णनें हंसवून सोडण्यासारखीं आहेत. असो. पण खुद्द मधील इमारतीपेक्षां आश्रमाभोंवतीचा भाग फार मनोहर आहे. पुढून एक स्वच्छ पाण्याची नदी बडबड करीत वाहते. तिचेच अनेक पाट भातांच्या शेतांतून व इतरत्र नेलेले झुळझुळ वाहतात. एकीकडे पक्क होत आलेलीं भातें, दुसरीकडे भाज्या, त्यांतल्यात्यांत काठीवर चढलेल्या वेलाला लागलेलीं लाल टोमाटो फळें, तिसरीकडे मकादि धान्य, भोंवतीं व सगळीकडे शीतल छायेचीं झाडें—वगैरे आश्रमाच्या व त्याच्या आश्रितांच्या शान्त उद्योगाची मनोहर साक्ष पटवतात.

आश्रमांतील इमारती पाहून झाल्यावर थोडा वेळ नदीकांठीं फिरलों. दोन्ही तीरांवर शेतांतून शेतकरी बायकामुलांसह काम करीत होते; बायका व मुली उघड्या पायांनींच काम करीत होत्या. गंवत पुरुषांनीं कापावें व बायकांनी जमवावें असें चाललें होतें. जशी इतर पिकांची तशीच मेहनत इकडील लोक जनावरांच्या चाऱ्याची घेतात; त्यांच्या गंवतासाठीं जमीन राखून ठेवून, तें वाळवण्याची विशेष काळजी घेतात व नंतर व्यवस्थित कापून वायां न जाऊ देतां उपयोगांत आणतात. यामुळें वैरणीच्या अभावानें त्यांचीं गुरें मरण्याचा हिंदुस्तानी प्रसंग त्यांवर सहसा येत नाहीं. एकंदरींत हें आश्रमपद पाहून मालिनी तीरावरील कण्वाच्या आश्रमाच्या सुरस कालिदासी वर्णनाची आठवण

झाली; व आपण कालिदास असतों तर तसेंच वर्णन केलें असतें असें वाटलें! तटस्थ पहात असतांना 'पवनचपल पाटाचें पाणी–झुळझुळ वाहे तरुमूलांतुनि' हें पद गुंगत होतों. शेवटीं एक वाजल्यावर परत स्टेशनकडे येऊन, दुपारीं मिलानोला उतरलों.

मिलानो येथें उतरण्यांत मुख्य हेतु, तेथील पिनाकोथेका (चित्र-संग्रालय=शाळा–पाहिजे तें ह्मणा!) मध्यें पुन: राफाएलादि उत्तमांचीं उत्तम चित्रें पहायला मिळावीं, हा होता. शनिवारीं उशिरां मिलानोला गेल्यामुळें चित्रशाळा बंद,ह्मणून देवळें,वाडे व शहर पहाण्यास निघालों येथील दुओमो जगांतील मोठ्या देवळांपैकीं एक आहे. शिवाय आश्चर्याची गोष्ट अशी, कीं, तें जुन्या अगर नव्या रोमन पद्धतीवर बांधलें नसून, त्याची रचना गॉथिक आहे! ५ व्या व ६ व्या शतकांत गॉथिक लोकांचें उत्तरइतालीवर राज्य होतें, व पुढें १२ व्यांत पुन: उत्तरेकडून जर्मन बादशहांनीं इतालियन मुलूख बरेच दिवस आपल्या ताब्यांत ठेविला होता. पैकीं 'फ्रेडरिक बार्बरोजा' यानें एकदां मिलानो लुटवून तेथील इतर अमूल्य वस्तूंबरोबरच संगमरवरी खांब जर्मनीकडे पळवले. यांपैकींच कांहीं 'नाउम्बुर्गच्या डोम'ला लावले असल्याचें येथील गुरव प्रौढीनें सांगत होता. असो. यामुळें उंच कमानी दरवाजे, तीन अर्धवर्तुलाकृति भागांचे खांब, त्यांवरील उंच कमानीकमानींचें छत, त्याला बाहेरून लहानमोठे अनंत कळसवजा मनोरे, व नक्षीच्या दिपमाळीसारखा एक उंचच उंच मध्यमनोरा असें हें मोठें मजेदार दिसतें. सबंध संगमरवरांत बांधलें आहे. आंत प्रकाश सान्त् पीएत्रो-इतका नाहीं. गॉथिक देवळांत बाजूचे लहान देव्हारे (Chapels) वगैरे अलंकार फारसे नसतात; तसे यांतहि नाहींत. आंतून सर्व पाहून वर गेलों. याची वरची बाजूहि कौला–पत्र्यांच्या ऐवजीं संगमरवरानेंच सबंध आच्छादलेली असून तीवर हवें तिकडे फिरतां येतें. त्यानंतर वर मनोरा चढून गेलें ह्मणजे त्याच्या उंचीची कल्पना

चांगली येते; सभोंवार लांब पल्ल्यावर पाहतां येतें. मी देवळांत गेलों तेव्हां गायन वगैरे ऐकूं येऊं लागलें. मोठ्या थोरल्या मंदिरांत ऑरगेलचा तो आवाज मोठा शान्त व गोड वाटतो. जरा पुढें जातों तों मुख्य देव्हाऱ्यापुढें वेदीवर झालरी, मखमल वगैरे लावून आरास केली होती, व काळ्या झग्यावर पांढरी, हिरवी, तांबडी व निळी छाटी पांघरलेले उपाध्याय भोंवतीं बसले असून मंत्रोच्चार करीत होते. आपल्याकडल्याप्रमाणें परधर्मीयांस पवित्र स्थळीं मज्जाव येथें नसल्यामुळें मी वर चढून अगदीं गाभ्याऱ्याच्या कठड्यापर्यंत गेलों. तों मिलानोच्या आर्चबिशपमहाराजांची स्वारी संस्थानी पोषाक करून देव्हाऱ्याच्या डाव्या बाजूला मऊ आसनावर विराजमान झालेली दिसली. यांची वरील छाटी पुढून व मागून पायांपर्यंत लोंबत होती; ती रेशमी असून तीवर जरीची वेलबुटी होती. डोक्यावरील अर्ध्याबदामाच्या आकृतीची टोपी (इं. मायटर) ही त्याच कापडाची, रंगाची व नक्षीची असून, तिला मागें रुंद पट्टा लावलेला पाठीवर लोंबत होता. त्यांचें अधिकारचिन्ह जें धर्मदंड, तें एका सेवकानें हातीं धरलें होतें. देव्हाऱ्यापुढें जाऊन गुडघे टेकण्याची वेळ आली, कीं, सेवक तो दंड त्यांच्या हातांत देई; दुसरा एक येऊन बदामी टोपी काढून घेई, व गुडघे टेंकून झाले ह्मणजे तिसरा एक बायबल-पोथीचें पान व ओंवी बरोबर काढून वाचण्यासाठीं त्यांच्या पुढें धरी; अशी कवाईत बराच वेळ चालली होती. इतर उपाध्याय कोणीहि या बाजूकडून त्या बाजूकडे जाऊं लागला, कीं, शूळापुढें गुडघा व आर्चबिशप महाराजापुढें मान वांकवून बाजूला जाई; मध्येंच एकदां वेदीच्या कोंपऱ्यावरील उंच व्यासपीठावरून एका उपाध्यायानें ल्याटिन बायबल वाचलें. तेथें उजेड होता तरी पूर्वापार वहिवाटीमुळें गुरवबोवा त्यांच्या पोथीपुढें मेणबत्ती धरून हजर होते. वाचणें, मंत्र ह्मणणें—प्रार्थना करणें सर्व एक प्रकारच्या गळ्यावर होत असे; बरेच उपाध्याय मिळून मंत्र ह्मणूं लागले ह्मणजे आपण मंत्र-

जागर करतो तसा भास होई. हें बराच वेळ पाहून व ऐकून बराच वेळ कठड्याशीं मालदारांच्या मागें उभा असलेलों परंतु खालीं आलों व हळूच एका गृहस्थाला आजच्या समारंभाचें कारण विचारलें. 'उद्यां एका सन्ताचा जन्मोत्सव आहे त्यासाठीं,' असें उत्तर मिळतांच हा 'पूर्वरंग' अगर तालीम आहे हें लक्षांत आलें व इतर गोष्टी पाहण्यास चालता झालों. आणखी दोनचार देवळें पाहिलीं. त्यांत ऐन चौथ्या-पांचव्या शतकांतलें जुनें विटाचें सान्त् आम्ब्रोजिआचें निवडून पडण्या-सारखें होतें. यांतील विशेष ह्मणजे मुख्य दरवाजापुढे, एका वाड्या-प्रमाणें चौसोपी चौक होता, हा होय. शिवाय याचा दरवाजा जाडा लांकडी आहे, त्यावरील नक्षीकाम सुबक आहे. यांतील वेदीच्या मागील कमानीला सोन्याचें अप्रतिम छत आहे, पण तें पहायला गुरवाच्या हातावर ५ फ्रांक (तीन रुपये दोन आणे) ठेवावे लागतात. तें मला नको होतें. दोन फ्रान्सिस्कन भिक्षूंनां मात्र मोफत पहायला मिळालें, ह्मणून जरा हेवा वाटला. अशा भिक्षूंनां प्रथम पाहिलें तेव्हां मौज वाटली, पण मग प्रत्यहीं ते भेटत ह्मणून त्यांच्या तपकिरी पायघोळ झग्याचें, पारशाप्रमाणें कमरेला बांधलेल्या व गुडघ्यापर्यंत लोंबणाऱ्या जाड तिपेडी पांढऱ्या सुती दोरीचें, उघड्या पावलांवरील वहाणांचें (अगदीं हुबेहूब वहाणा !) व कंबटी झांकावी ह्मणून मुंबईला घरीं व दुकानांत पारशी लोक टकल-टोपी घालतात, तसल्या टोपीचें मुळींच आश्चर्य वाटेनासें झालें. शिवाय एकदोन वेळां विशेष संघट्ट-नाचा प्रसंग आला होता त्या वेळीं यांच्या सभ्य, मनमिळाऊ वर्तनानें मनावर चांगला परिणाम झालेला होता.

संध्याकाळीं जेवल्यावर पुनः दुओमो चौकांत फिरलों व बसलों, त्या वेळीं बरीच करमणूक झाली. सर्व व्यवहाराचें, ट्रामचे वगैरे गर्दीचें हें ठिकाण असल्यामुळें, नानाप्रकारचीं माणसें जातायेतांना दिसलीं; त्यांचें बरेंच निरीक्षण करायला सांपडलें.

जेनुआप्रमाणेंच येथेंहि दोन मोठ्या रस्त्यांच्यामध्यें एक गालेरियो आहे, व तिजवर दोन्ही बाजूंनीं चहाकॉफीचीं, चित्रांचीं व अलंकारादि चैनींच्या वस्तूंचीं मोठमोठीं दुकानें आहेत. अशी ग्यालरी ह्मणजे एक रस्ताच, पण तो वरून तावदानी कमानींनीं आच्छादिलेला, फक्त पादचारी लोकांसाठीं असलेला रस्ता होय. यावर संध्याकाळीं उपाहारगृहांत गायनवादनादि चालतें व चैनी मंडळी सर्व ग्यालरीभर खुर्च्या टाकून एकाद्या फटाकड्या मैत्रिणीबरोबर कॉफी–आइसक्रीम वगैरे घेत, गप्पा मारीत, हंसत,थट्टा करीत बसलेली असते.जेनुआच्या ग्यालेरिआला माझ्झीनीचें नांव दिलें आहे व मिलानोचीला व्हित्तोरिओ मानुएलेचें नांव ठेवलें आहे. अशा या स्वच्छ, चैनीच्या ग्यालेरिआ फक्त या दोन शहरीं दिसल्या.

रविवारीं सकाळीं उठून पिनाकोथेकाकडे निघालों. एका गृहस्थाला वाट विचारतां तो दाखविण्यासाठीं बरोबर आला. वाटेंत त्याचेंमाझें कांहीं कांहीं बोलणें झालें. मजकडून उत्तर जायला अर्थात् वेळ लागे! शेवटीं पिनाकोथेकांत शिरलों. पुढील भला मोठा चौक, त्यांत बरोबर मध्यभागीं नेपोलियनचा रोमन बादशहासारखा उभा धातूचा पुतळा, इतर दगडी पुतळे, जिने वगैरे पाहून उल्हासानें वर चढतों, तों, चित्रशाळा ज्या दालनांतून आहे त्यांच्या दाराशीं 'ओज्जी क्यूसो (आज बंद) हे शब्द पाहून एकदम दचल्यासारखें झालें व अत्यंत निराशा झाली! चौकशी करितां कांहीं डागडुजासाठीं बंद असल्याचें समजलें. मजप्रमाणेंच कितीतरी प्रवाशांची निराशा झाली हें तर राहोच! पण खुद्द मिलानोच्या लोकांनांहि आमच्यासारखेंच नवल वाटलें! लांबलांबून उत्सुकतेनें देवदर्शनाला जावें व दुष्ट पुजाऱ्यांनीं अगर बडव्यांनीं मज्जाव करावा ह्मणजे यात्रेकरूंची जशी स्थिति होते, तशीच आमची सर्वांची झाली. लोकांचे समुदाय आशेनें जमून येत व आकाशवाणीसारखे हे दोन शब्द कानांवर आदळले ह्मणजे अर्धे निराशेंत, अर्धे रागांत परत

आत ! मारिया देला ग्राित्सए नांवाच्या देवळांत प्रसिद्ध चितारी लेओनार्दो दा विंची यानें 'येशूचें आपल्या शिष्याबरोबरचें शेवटचें जेवण,' हें चित्र काढिलें आहे, तेथेंहि असेंच झालें. मिलानला जायचें तें दुओमो, राफएलचा मेरीविवाह व विंचीचें शेवटचें जेवण हीं मुख्य पाहण्यासाठीं; पण दोन्ही ठिकाणीं नकार मिळाल्यामुळें त्रासून मिलानोहून रविवारीं दोन वाजतां पाय काढला !

वाटेंत इटली व स्वित्सरलंद यांच्या सरहद्दीवर कोमो, लुगानो, माज्योरे अशीं तीन सरोवरें आहेत.त्यांपैकीं एकदोन तरी पाहून गेल्या वर्षींची लेमन्–टुन्–बीएन्झ–चारजिल्हे सरोवरादींची आठवण नवी करावी असें वाटून वाटेंत कोमो सरोवरावर त्याच नांवाच्या गांवीं दीड तास थांबलों. आल्पसमधील सरोवर तें! त्याची शोभा तुह्मांला ऐकून ठाऊक झाली असेलच. स्वच्छ निळें पाणी, भोंवतींच्या वृक्षांनीं आच्छादिलेल्या हिरव्यागार डोंगरांचें त्यांत स्वरूप बिंबलेलें, थंड व टवटवी आणणारी हवा वगैरे काय काय वर्णावीं ? बराच वेळ फिरून व्होल्टा चौकांत एका उपाहारगृहांत कॉफी घेत बसलों. अजून स्विझरलंद लागलें नव्हतें; पण त्याची छाया येथवर पडली होती खास; कारण कॉफीला मिळणाऱ्या दुधाविषयीं इतालियन कंजुषपणा जाऊन भलें थोरलें खापरीपात्र भरून दूध पुढें आलें. दुपारची कॉफी घेण्यासाठींच उतरलों होतों ह्मणायचा ! प्रसिद्ध शास्त्रज्ञ–विशेषतः विजेविषयीं शोध लावणारा व्होल्टा ( Volta ) कोमोचा रहिवासी ह्मणून ह्या नांवाचा चौक येथें आहे. व्होल्टामेटर ह्मणून कांहीं यंत्राचें नांव इंटरमीजिएटमध्यें असतांना कानांवरून गेलें होतें, पण तें बालवत् कर्मी झाल्यामुळें आतां त्याचा गंधहि मनावर नाहीं, हें प्रांजलपणें कबूल करतों.

कोमोहून पांच वाजल्यावर निघून इतालीची सरहद्द क्यासोला ओलांडली, व एक तासांत लुगानो नांवाच्या सरोवराचे कांठीं त्याच नांवाचे




'कोमो' सरोवर.

गांवीं रात्रीं मुक्काम केला. या सरोवराचेंहि तसेंच—नीलमण्याचा जणूं रस ओतावा, तसें झळकणारें त्याचें पाणी; भोंवताली डोंगरावर पायथ्याशीं दाट झाडी; तिजवरील गर्दपणानें काळसर भासणारा हिरवेपणा, आजूबाजूंनीं दऱ्यांतून व खोचाडांतून लहानमोठीं गांवें—जणूं काय मानवी कृतीच्या कृत्रिमपणाला सृष्टि दडवून ठेवूं पहात आहे!—डोंगरावरून धांवत उड्या मारतांना श्रमानें फेसाळलेले लहानमोठे निर्झर सरोवराला प्रेमानें भेटून त्याशीं ऐक्य पावत आहेत, जसें कोणीं अत्यंत सुखांत आपल्याशींच प्रेमानें गुणगुणावें तसा त्या दरींतून उत्पन्न होऊन कानांत भरणारा प्रवाहांचा मंजुळ ध्वनि, वगैरेंनीं मनांत एक तऱ्हेचा सात्विक भाव उत्पन्न होई. वृक्षलतादींनीं वेलबुट्टी काढलेल्या पर्वतचौकटींत बसवलेला हा पाणीदार भव्य बिलोरी आरसा सृष्टीनें आपलें रमणीय स्वरूप त्यांत पहावें ह्मणून तर येथें अक्षय ठेवला नसेलना? त्या वेळीं मनाला कल्पनांच्या भराऱ्या माराव्याशा वाटत. आच्छोद सरोवराचें रसभरित वर्णन करतांना आल्पसमधील सरोवरें बाणाच्या मनांत घोळत नव्हतींना? असेंहि क्षणैक वाटे. किंवा मीं न पाहिलेल्या मानस सरोवराचे तर हे भासले नसावेत! असे एक ना दोन—हजारों तरंग मनांत येत. सृष्टिशोभेच्या या नंदनवनांत मनाला वेडावून सोडणारे देखावे पावलोपावलीं दिसून धन्य वाटतें. या सरोवरांवर वाफेच्या बोटींचा इतका सुळसुळाट व गोंगाट नसता, तर त्यांचा शांतपणा अतिशयितच भासला असता. पण ऐहिक सुखाला हपापलेले यूरोपीय लोक येथें चैन करण्यासाठीं येऊन सृष्टीच्या या शांततेचा भंग करतात, ही नाइलाजाची गोष्ट आहे! यामुळें चन्द्रापीडाचा घोडा वाट चुकून आडरानांतून फिरतां फिरतां एकदम सृष्टीचें जणूं जीवन अशा सरोवराच्या कांठीं आश्चर्यानें थबकण्याचे आतां कादंबऱ्यांतहि दिवस राहिले नाहींत लुगानोला सेझों असल्यामुळें चार घरीं हिंडून सुद्धां जागा मिळण्याची मुष्कील पडली. टूरिस्ट होटेल गच्च भरलेलें.

वहिवाट सोडून एका ग्रांड् होटेलांत उतरलों. तेथें काय, सर्वच ग्रांड् —पाहुण्याच्या पिशवीला चट्टाहि ग्रांड पडतो! दर क्षुल्लक कामासाठीं दक्षिणेची लालसा धरणाऱ्या सेवकांची (Waiters) येथें फालतू गर्दी असते; संध्याकाळीं पुढून कापलेले दोन शेपटाचे कोट घालून, डोक्याचे केंस भांगपावडरीनें तकतकीत करून सलोनमध्यें रिकाम-टेकडा सुळसुळाट करायला हे स्वतः तयार असतात, व पाहुण्याच्या जायच्या वेळीं दुष्टासारखे पिशवीकडे टवकारीत दुतर्फा उभे असतात. जितक्या डिग्रींनीं हात गरम होईल तितकें वांकून सुखकर प्रवासादि मंत्रोच्चर जसे यांचे घटलेले असतात. बरेंसें सेकंडक्लास होटेल गांठलें तर ग्रांड् होटेलसारख्या सर्व सोयी मिळून वरील गृध्रांचा त्रास कमी होतो, व तेथील लोक ज्यास्त सभ्य, मनमिळाऊ असे असतात. त्यांच्यांत औपचारिकपणा—ताठपणा किंचित् कमी असतो.

सकाळीं फराळ करून होटेलास रामराम ठोकला व हातपाकीट स्टेशनांत ठेवायला देऊन सरोवरावर टेंकड्याटेंकड्यांनीं भटकलों. हें सकाळच्या प्रहरचें शुद्ध व हुशारी आणणाऱ्या हवेंतील भटकणें फार मानवलें. कोणीकडेहि वळलों तरी पुनः तळ्यावर रोंख ठेवण्याचा निश्चय केला. एकदां भटकतांना नीट लक्ष न राहून सरोवर दिसेनासें झालें, ह्मणून कोणाला तरी विचारण्याचें ठरविलें. इतक्यांत एक तरुण अल्लड टवटवीत गालांची छोकरी (आपल्या समजुतीप्रमाणें हिला बाईच ह्मणावें लागेल; कारण ही वीस वर्षांची असावी) पाठीशीं धुतलेल्या कपड्यांची टोपली घेऊन वर येतांना दृष्टी पडली. तिचें शरीर व एकंदर ढब मोकळ्या हवेंत—शहर व त्यांतील चोंचले यांहून अलिप्त राहण्याची साक्ष पटवीत होती. मी तिजकडे वळून 'ज्योर्नो सिञोरीना (कुमारिके नमस्कार, अथवा शब्दशः शुभ दिवस) ह्मणतांच ती नखशिखांत तांबडी झाली. अशी लाज वाटण्याचें कारण काय असावें? असें कोणी प्रवाशानें नमस्कार करण्याची संवय नसेल.

अँगर हा प्रवासी अदृष्टपूर्व ह्मणून ? कसेंही असो पण तिनें फक्त मइया प्रश्नाला 'सि, सिञोरे' (होय महाराज) असें त्रोटक उत्तर दिलें व गेली. तिचा तो गरिबीचा पण स्वच्छ पोषाख व काबाडकष्टाचें जीवन सुचविणारी पाठीवरील करंडी, एकंदर शरीर-बोलणें चालणें वगैरेंत नीटसपणा, व प्रश्न विचारल्याबरोबर आलेला गुलाबीपणा हीं एखाद्या कवीला वर्णन करण्याजोगीं किंवा चितान्यास रंगविण्यासारखीं होतीं. सृष्टीच्या निकट व अक्षय सहवासाचें मूर्तिमंत स्वरूप मला त्यावेळीं दिसलें.

मग लुगानोहून स्वित्झरलंदांत आतां मध्यें कोठें थांबावयाचें नाहीं या निश्चयानें निघालों. तासाभरानें बेलिंझोनाला आलों. येथून पुढें गोटा नांवाच्या आल्प्सच्या खिंडींतून नेलेला आगगाडीचा घाट लागतो. या स्थळाचा गोडपणा पाहून येथेंहि एक दीड तास उतरून भटकलों. 'न निश्चय कधीं ढळो' अशी प्रार्थना रोज करायची, पण ती अशा एखाद्या वेळेस बाजूला राहते! या ठिकाणीं गवतावरून भटकत आपल्या विचारांत गुंगलों असतां, 'इल बोम्म' असे शब्द बालपणच्या गोड आवाजांत व वृद्धपणच्या घोगऱ्या स्वरांत एकदम उच्चारलेले कानावर पडून थबकलों. त्याच रस्त्यानें एक म्हातारीबाई आपल्या नातवाला कडेवर (ह्मणण्यापेक्षां 'हातांवर' ह्मणणें जास्त शोभेल) घेऊन चालली होती; तें मूल प्रथमच बोलायला शिकत असावें व म्हातारी त्याचें कौतुक करीत असावी! त्यानें मजकडे पाहून 'तो बुवा (माणूस)-इल बोम्म्' ह्मटलें; त्यामुळें मलाहि बरें वाटलें व हंसलों. मला वाटतें या हंसण्यानें त्या वृद्धेचें संतोष शतपट दुणावलें असावें! नंतर दुसऱ्या गाडींत बसून त्या खिंडीची रमणीय शोभा पाहूं लागलों. दोन्ही बाजूंनीं उंच डोंगर, व घटकेंत या बाजूला तर घटकेंत दुसरीकडे दिसणाऱ्या तेसार व ब्रेनो नद्यांच्या तीरातीरानें हा प्रवास झाला. वाटेनें शंभर तरी छोटेछोटे धबधबे लागले असतील! गिरिकंदरांतून झंकार करीत जाणाऱ्या गोदावरीचें, निळसर काळ्या पर्वतांचें, सापासारख्या सूं सूं करीत

ाळणें घेत गेलेल्या शुभ्र निर्झरांचें भवभूतीनें केलेलें अप्रतिम वर्णन ेथें कसें तंतोतंत जुळतें, असें वाटे. त्या देखाव्याच्या सौंदर्याचें, त्या र्णसमृद्धीचें, कानाला आनंद देणाऱ्या त्या दुमदुमणाऱ्या नादाचें, डोळ्यांना रमवणाऱ्या व बद्ध करून टाकणाऱ्या त्या गिरिकंदराचें यथार्थ र्णन करण्यास त्यांचा चहाता व भोक्ता भवभूतीच पाहिजे! माझी अल्प-मति येथें कुण्ठित होते!

हा गोटा खिंडीचा रस्ता संपतांसंपतां पाऊस सुरू होऊन हवेंत एकदम थंडपणा आला; मजजवळ कपडे इतालींतील उष्म्याच्या धोर-ानें बेतापुरतेच असल्यामुळें थंडी वाजे. पण मग चारजिल्हेसरोवर, झूगर-सरोवर, झ्यूरिचचें सरोवर वगैरे गेल्या वर्षींचे ओळखीचे देखावे दिसूं लागून तिकडे मन वेधलें, व थंडी भासेनाशी झाली. संध्याकाळीं पांचला पावसामुळें हिंवाळ्यासारख्या गार झालेल्या झ्यूरिचला उतरलों; पण लगेच तासानें दुसऱ्या गाडींत बसून 'शाफहौसेन करून जर्मनीचें अगदीं दक्षिणेकडील छोटें शहर अगर मोठे खेडें जिंगेन येथ रात्रीं ८ नंतर आलों.

लाइप्झिक्, १३ सप्टेंबर, १९१२.

* स्टुटगार्टहून लिहिलेलें व हें पत्र बरोबरच मिळतील. स्टुटगार्ट येथें उतरलों तों पावसाळी हवा, गारठा यांनीं त्रासून सोडलें. इतालींतील अगदीं आपल्यासारखी हवा व इकडील मिळमिळीत सूर्यप्रकाश, पाऊस व थंडी यांच्या विरोधानें, अगदीं प्रथम यूरोपांत पायठेवतांना जसें वाटलें तसेंच थोडेसें आतांहि वाटलें. त्यामुळें स्टुटगार्टला फक्त एकदोन राजवाडे पाहून तेथून पळ काढला व वाटेत पहिल्या बेताप्रमाणें कुठेंहि न उतरतां सारखा अकरा तास प्रवास करून परवां रात्रीं घरीं आलों.

*हें पत्र उपलब्ध झालें नाहीं. त्यांत जिंगेन् येथील होअेन्ट्वील नांवाच्या पुराणप्रसिद्ध किल्ल्याची हकीकत होती.

येथेंहि तेंच! सणवणीत मेघांशीं एकाद्या जनानखान्यावरील कंचुकी-प्रमाणें झगडूं पाहणारा सूर्यप्रकाश, व थंडी ठरलेलीच. लंडन्‌इंग्लिशच्या म्हणजे ही हवा अश्रुतपूर्व अगर मला नवी अशांतला प्रकार नव्हता. पण इतालीचें तें बारा तास सूर्यप्रकाशाचे ढळढळीत सौभाग्य व दिवसांतून दोन वेळ सूर्य डोकावला तर भाग्याचा! असें येथील मिळमिळीत साभाग्य यांचा विरोध ताजेपणामुळें मनावर फार ठसला, इतकेंच काय तें!

स्टुट्‌गार्ट्‌ला राजवाडे, बाग, त्यांतील पुतळे पाहून सुंदर मुळाच्या वाईट तर्जुम्यानें वाटावें तसें वाटलें. मेदांची गाभाऱ्यांतील रात्रंदिवसांच्या पुतळ्यांची कल्पना चोरायचा प्रयत्न मला तरी निदान आवडला नाहीं. व्हाटिकान्‌मधील व्हीनस, अपालो, मिनर्व्हा वगैरेंच्या प्रतिकृतींचें असेंच. अस्सल सोनेरी घडावाचा दागिना व गिलटाचा नग यांतील अंतर पाहून पारख्याला जसें वाटत असेल तसें वाटायला लागतें. एका राजवाड्यांत मात्र शंभर वर्षांपूर्वीच्या इतिहासाची आठवण करून देणाऱ्या गोष्टी पाहिल्या. त्यांतील एका पलंगावर नेपोलियन आपल्या जर्मनयुद्धाच्या वेळीं बरेच वेळा राहिलेला आहे. प्रशिया संस्थान आपलें स्वातन्त्र्य व अस्तित्व यांसाठीं झगडत होतें; पण त्याचेच दक्षिण जर्मनींतील जातभाई नेपोलियनशीं मस्लत करून त्याला पाहुणचार देत होते! या व्युर्टेम्बुर्ग संस्थानांतील राजाची मुलगी नेपोलियननें आपल्या भावाला बायको करून देऊन त्याला वेस्टफालिया (पश्चिमप्रशिया, ऱ्हाइन कांठ) चा राजा बनविलें होतें. तो निजत असे त्या खोलीत त्यांच्या तसबिरी, अर्धपुतळे वगैरे टांगून ठेविलेले आहेत. नेपोलियनच्या भावजयीचीहि मोठी तसबीर दाखवितात. मोठ्याशा संबंध झाल्यामुळें त्या वेळीं संस्थानाला धन्यता वाटली; आतांहि वाटत असल्यास न कळे!

× × ×

सन. १८१२ सप्तेंबर १२ या दिवशीं मॉस्को शहर जाळलें जाऊन त्यांतून पळ काढणाऱ्या नेपोलियनला रशियन लोकांनीं हवा असा चोप दिला. त्याचा शतवार्षिक उत्सव सध्यां तेथें चालू आहे. त्याविषयीं लिहितांना येथील दैनिकपत्र त्याचें श्रेय जर्मनीला देतें, तेव्हां मात्र हंसूं आल्यावांचून राहवत नाहीं. नेपोलियनला अखेरीला खालीं आणल्याचें बहुतेक श्रेय प्रशियाला आहे हें अगदीं खरें; पण त्याला आरंभ मास्को येथेंच झाला होता; व तो रक्तीं पांघ णाऱ्या, अर्धपोटीं काम करणाऱ्या मजूर-शेतकरी-मेंढके आदि लोकांनीं केला! छळ, अन्याय यांसहि कांहीं मर्यादा आहे; व ती भरली ह्मणजे गवतालाहि बळ येऊन, तें त्याविरुद्ध उठतें. याचें उदाहरण आपल्या यादवी घराण्यांतील पौराणिक कथेंत आहेच. तसेंच नेपोलियनचें झालें!

याच गोष्टीचें दुसरें ध्यानांत ठेवण्याजोगें तात्पर्य काढतां येतें. प्रशियन लोक नेपोलियनविरुद्ध लढतात, पण त्यांचेच सगेसोयरे दक्षिण जर्मनीचे लोक त्याला मदत करतात! एकच रक्त, एकच भाषा, एकच धर्म (प्रॉटेस्टंट, क्याथोलिक हा भेद पंथाचा आहे, धर्मतत्त्वांचा नाहीं.) असें असूनहि हे लोक एकमेकांचे गळे कापूं पाहत होते! त्यांनां एकराष्ट्रीय कसें ह्मणावें! एकच ध्येय, त्याच आकांक्षा, तेच हितसंबंध हीं असल्याशिवाय, नुसत्या धर्म-भाषा-रक्तादि ऐक्यानें एकराष्ट्रीयत्व येत नाहीं. एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेविषयीं आपल्या देशांत ( व त्यासंबंधानें इतरांत ) जो वाद कधीं कधीं माजतो, त्यांत बरेच वेळेला अशा गोष्टी विसरल्या जातात. उत्तर व मध्य हीं जर्मन रक्ताचीं व जर्मन भाषा बोलणारीं, पश्चिमेस फ्रेंच, दक्षिणेस इतालियन—अशा तऱ्हेची स्वित्झरलंडाची स्थिति आहे; पण तें आज एकराष्ट्रीय ह्मणवणारांत योग्य रीतीनें गणलें जात आहे. पण हें प्रासंगिक पुरे!

याप्रमाणें यंदांच्या माझ्या प्रवासांत सृष्टिसौंदर्याचें अवलोकन करणें व अत्युत्कृष्ट मनुष्य कृतींचें यथेच्छ सेवन करणें—असें दोन्हीहि साधलें.

टिरोलचे व इतालियन लोक पहायला सांपडले. टिरोलियनांविषयीं त्या त्या वेळीं लिहिलेलेंच आहे. डोंगरांत राहणाऱ्या लोकांचा साधेपणा व राकटपणा यांच्यांत आहे. मोठ्या शहरीं, व श्रीमंत यूरोपियन, अमेरिकन पाहुणे जेथें जेथें हवा खाण्यास प्रतिवर्षी चारपांच महिने जाऊन राहतात तेथेंतेथें मात्र लुच्चेगिरी, प्रवाशाला धुवून खाण्याची शिताफी, पैशांनीं मापतां येण्यासारखा सभ्यपणा वगैरे शिरलीं आहेत. या टिरोल प्रांताचेंहि असेंच आहे. उत्तर व मध्यभाग जर्मनभाषा बोलणारा, जर्मन रीतिरिवाज बाळगणारा असा असून, दक्षिणभाग इतालियन भाषा बोलतो; आचारही इतालियनच आहेत. हा प्रांत हल्लीं ऑस्त्रियाच्या ताब्यांत आहे. ऑस्त्रियन व जर्मन लोकांचा चुलतसंबंध असल्यामुळें भाषा, आचारविचार साधारणतः सारखे आहेत.

इताली देश सुपीक असल्यामुळें तेथें शेतकी फार चालते. उ० टोस्कानोप्रांतांत उत्तम फळें व द्राक्षांची वगैरे दारू होते; लोम्बार्डी-प्रांतांत भात—भाज्या वगैरे ब्राह्मणाचें भक्ष्य यथेच्छ होतें. येथील शेतींत यंत्रांचा शिरकाव उत्तरयूरोपइतका झाला नाहीं; तरी इतर रीतीच्या सुधारणा फार झाल्या आहेत. या शेतकऱ्यांचा व प्रवाशांचा संबंध केव्हां येणार? पण प्रवासी थोडा पायाचा खंबीर, चौकस, व केवळ शरीरस्वास्थ्याकडेच न पाहणारा असा असला ह्मणजे त्याला या शेतकरी लोकांच्या अगदीं साध्या, कष्टाळू जीवनाचा थोडा मासला पहायला मिळतो. बायकामुलांसुद्धां हे शेतावर सारखे खपत असतात. अनवाणी, उघड्या पायांनीं शेतें तुडवणाऱ्या बायका मीं येथेंच प्रथम पाहिल्या. ह्मातारीकातारीं सुद्धां कष्ट करीत असतात. स्टुट्गार्टपासून माझ्या डब्यांत बसलेल्या, सकुटुंब, अमेरिकन गृहस्थाला याचें मोठें आश्चर्य वाटे! त्याच्या सांगण्यावरून अमेरिकेंत असा ह्मणजे अगदीं वांकलेल्यांनीं श्रम करण्याचा प्रकार कायद्यानें बंद केला आहे; अशांच्या मुलांस त्यांचें पोषण करणें कायद्यानें भाग पाडिलें आहे.

पण इटालीमध्यें होटेलादि सोडलीं तरी केवळ प्रवाशांवर उपजीविका करणारा असा मोठा गुंड वर्ग आहे; व तो सिसेरो-सीझर (इटालियन 'चिचेरो, केझार) माझिनी-गारिबाल्डी यांच्या देशाला काळिमा आणण्यासारखा आहे. याची चपटंजरी, लफंगेगिरी, फसवेगिरी, लुच्चेपणा, लूटकरणें वगैरे गुण अगर दोष इतके ठळक आहेत कीं ते एअरोप्लेनमधून घाईनें सफर करणाऱ्याच्या सुद्धां सहजपणें लक्ष्यांत येतील. याविषयींहि वरंवार लिहिलेंच आहे. जुनें, न चालतें, परकी, खोटें नाणें भाळ्या प्रवाशांच पाजणयांत तर हे लोक-चसे काय, पण चागलीं नाणावलेलीं हॉटेलेंसुद्धां पटाईत आहेत, असा सार्वत्रिक समज आहे. अगदीं डोळ्यांत तेल घालून जपावें तरी एकादे वेळेला लहानमोठा चटका बसतोच. एकदां एका ग्रांड हाटेलांत व एकदां पोस्टांचीं तिकिटें विकणाऱ्या तंबखूवाल्याच्या दुकानांत (इटालींत पोस्ट तिकिटें बहुतेक अशा, चित्राच्या कार्डांच्या-वगैरे दुकानीं मिळतात, पोस्टांत मिळत नाहींत!) मला तांब्याचें थोडेंसें खोट नाणें दिलेलें इतर ठिकाणीं चालेना म्हणून मागाहून लक्ष्यांत आलें! शिवाय जागजागीं घेतलेल्या चित्राच्या कार्डांत अलबम् घेण्यामध्यें वगैरे किती फसलों असेन, हें सांगतां येत नाहीं! तरी मी फेरीवाल्यांजवळ सहसा कांहीं घेतलें नाहीं. मिलानोला दान्ते कवीची 'दिव्हिना कोमेदिया (Divine Comedy)' विकत घेतली, तिची तरी खरी किंमत काय असेल, राम जाणे!

तरी या लोकांवरून सरसहा इटाली देशालाच लबाड, अर्थसाधू, दारिद्री व पैशाला हापापलेला-असा ठरवणारांपैकीं मी नाहीं. उच्च प्रतीचें बौद्धिक व नैतिक शिक्षण मिळालेला, सुखी स्थितींतला, सभ्य व माणुसकी अंगांत असणारा एक वर्ग जसा इतर ठिकाणीं तसाच येथेंहि आहे. यांवच निरनिराळ्या पंथाचे उपाध्यायहि मोडतात. रोमस् पहात असतांना एका दोमिनिकन् भिक्षूनें मला मदत केल्याचें

लिहिलेंच आहे. तसेंच तेथें अगदीं संध्याकाळीं बासिलिका ज्यूलियापुढील तिबेरोची कमान कोणती? असे मी एका फ्रान्सिस्कन् भिक्षूला विचारतां शेजारची सबंध उभी असलेली सेव्हेरसची कमान दाखवून हीच तिबेरोची, असें त्यानें सांगितलें. मला तें पटलें नाहीं, पण दोघेहि निरनिराळ्या दिशेनें पुढें गेलों. नंतर सात वाजतां पाहण्याची वेळ संपून, तेथील रक्षकांनीं 'उशांता उशांता' (बाहेर निघा) ची सारखी घाई लावतांच चोहोंकडून दाराशीं गर्दी जमली, त्यांतच तो भिक्षु होता. त्यानें मुद्दाम मजजवळ येऊन क्षमा मागितली, व मी चुकलों होतों, मीं दाखविलेली कमान तिबेरोची नव्हे वगैरे सांगूं लागला! मला याचें आश्चर्य व धन्यता वाटली! पुनः एकदां व्हाटिकानमधील जुन्या पोपांच्या राहण्याच्या खोल्यांतील राफएलनें काढलेलीं छतावरील व भिंतीवरील चित्रें (इटा० 'स्तान्झ,' इंग्र० फ्रेस्को) पहात असतांना, कांहीं समजलें नाहीं ह्मणून कोणाला विचारण्यासाठीं वळतों तों, तोच भिक्षु दृष्टीला पडला; व विश्वासानें मी त्याजकडे वळलों. त्यानेंहि शोध करून मला सर्व नीट सांगितलें. अशीं माणसें मला अनेक वेळां भेटलीं. पादुआ स्टेशनवर तिकीट काढतांना एका गृहस्थानें मदत केली. बोलोन्या म्यूझियम्ची वाट विचारीत असतांना एक गृहस्थ थेट बरोबर आला व त्यानें मजबरोबर दोन तासभर फिरून चित्रें दाखविल्याचें इतर ठिकाणीं लिहिलें आहेच. मिलानो येथेंहि 'ब्रेरा' म्यूझियम्ची वाट एका गृहस्थानें मुद्दाम बरोबर येऊन दाखविली, व दुसरा एक चांगला म्यूझियम पाहिल्याखेरीज जाऊं नका, अशी शिफारस केली. हें सर्व मुद्दाम लिहिण्याचें कारण कीं, इटालींत लबाडी फार आहे, ह्मणजे तेथें प्रामाणिक सभ्य माणसें अगर त्यांचा वर्ग नाहीं अशी कल्पना होऊं नये. एवढेंच, कीं, तो एक विशिष्ट पाजी वर्ग मात्र इतर यूरोपीय देशांत न आढळण्यासारखा इटालींत आहे. मुद्दाम शोधून काढलेल्या डांगरी लोकांचा फोटो वर्तमानपत्रांत

देऊन हे आमचे हिंदी साम्राज्यबंधु ह्मणून लिहिणारांचा, तसेंच काळी मल्याळी एक हिजडेवजा बाई तुळशीसमोर बसला वर करून काढून पूजा करणारी नमुनेदार हिंदी स्त्री असें वर्णन करणारांचा मला अत्यंत तिटकारा येतो, व ह्मणूनच या लोकांविषयीं असा तुमचा चुकूनहि गैरसमज केला जाऊं नये, या हेतूनें हें इतकें लिहिणें भाग पडलें. यूरोपीय पद्धतीप्रमाणें याची कांहीं जरूरी नव्हती.

याच विषयांत आणखी एक गंमतीचें उदाहरण सांगून हें लांबलेलें प्रवासाचें चऱ्हाट बंद करणें आहे. एका संध्याकाळीं पिंचिओ टेंकडी-वर मित्रासह गप्पा मारीत बसलों असतां रक्षकानें 'उशीरा' ह्मणून लमटाळी वाजविली. आह्मी तेथून उठून खालच्या रस्त्यावर सडकेंत गप्पांचें सत्र मांडलें. बागेचें दार याच्याहि खालीं असून त्याला केव्हांच टाळें पडलें असेल, याची कल्पना कोणाला! शेवटीं साडेसातचे सुमारास किल्ल्यांच्या जुडग्यांच्या गडबडीनें व रक्षकांच्या अर्धे बाईत अर्धे त्रासांत बोलण्यानें गप्पांच्या ब्रह्मानंदांतून एकदम दचकून उठलों. 'तें तिकडे दार आहे, तिकडे चला,' असें बडबडून तो पुढें आणखी कोणी गप्पांचे आंबट शोकी बसले असल्यास हांकून काढण्यासाठीं गेला; व आह्मी दाराशीं गेलों. तों फाटकाला कुलूप! जरा गोंधळल्या-सारखेंच झालें! थोड्या वेळानें रक्षक येऊन त्यानें दिंडी उघडी केली. या वेळीं त्याच्या हातावर चवली ठेवण्याचें मला कांहीं वाटलें नाहीं. उलट 'नको नको, कशाला कशाला?' असें ह्मणतह्मणत त्यानें हात पुढें केल्याची मौजच वाटली. असो. याप्रमाणें प्रवासाविषयीं वेळोवेळीं लिहिलें आहे. आतां मात्र महिना दीड महिना विश्रांति घेणें आहे.

लाइपझिक्, १ आक्टोबर, १९१२.

प्रवासांत असतांना झालें नाहीं ह्मणून व येथें आल्यावर दर शुक्र-वारीं पत्रांचा डोंगर उठवायचा असें ह्मणून मागें पडलेलें काम वेळींच

आरंभावें, यासाठीं आजच मंगळवारीं हें लिहिण्यास आरंभ केला आहे. सवडीप्रमाणें शुक्रवारीं खास पुरें होईल. परीक्षेची वगैरे कांहीं गडबड एव्हांच नाहीं; पण अभ्यासाची मात्र सदांच आहे. सुटी असतांहि होमर वाचण्यांत बराच वेळ जातो; पण तें महाभारती वर्णन वाचून मौज वाटते. आखिलेसचा अपमान करण्याबद्दल आखायाच्या लोकांस काय शासन करावें, याविषयीं खलबत करून शेवटीं झेउसनें आगा-मेम्नन याकडे भ्रांति उत्पन्न करणाऱ्या स्वप्नाची योजना केली. तें आख्यान वाचतांवाचतां गम्मत वाटते.

तिरोल, इताली वगैरेंत फिरत असतां रा. × × × यांस पाठवि-लेलीं पत्रें तुम्हांला पहाण्याला मिळालींच असतील. हा प्रवास घडला, विशेषतः व्हेनिस-रोम पहायला मिळालीं, याबद्दल खरोखरीच धन्य वाटते. इकडील सर्व देशांतील प्रसिद्ध कवींची जन्माला येऊन एकदां तरी व्हेनिस पाहण्याविषयीं अत्यंत उत्कंठा असे. बायरनचें Childe Herold तुमच्या वाचण्यांत आलेंच असेल. त्याच्या ४ थ्या भागांत आरंभींच व्हेनिसविषयीं पद्यें आहेत. बायरन्सारखा कवि व व्हेनिस्सारखा विषय! मग काय विचारायचें आहे!

I loved her from my boyhood-she to me
Was as a fairy city of the heart,
Rising like water columns of the sea
Of joy the sojourn and of wealth the mart

वगैरे. काल गोटेचीं इतालींतील प्रवासाचीं पत्रं उघडून वाचूं लागलों, त्यांतहि तेंच व्हेनिसच्या पहिल्या पत्रांत तो म्हणतो, 'बरें झालें, कीं, शेवटीं ज्या व्हेनिसचें मी वारंवार चिन्तन करीत असें, तें व्हेनिस आतां नुसता पोकळ शब्द-रिकामें नांव असें मला राहिलें नाहीं.' आपलें मानसिक वाढीचें सुसंस्कारांचें श्रेय तो नेहमीं इतालींतील प्रवासाला देत असे व तें बऱ्याच अंशीं खरें आहे. पावलोपावलीं शेंकडों

वर्षांपूर्वींच्या जुन्या स्मृतींनीं भरलेला तो देश, त्याच्या जुन्या वैभवाचीं जीर्ण झालेलीं स्मारकें, सबंध यूरोपाला नवी संस्कृति लावून देणारी त्याची भाषा, त्यांतील मोठमोठे राजवाडे–देवळें–तट–बुरूज आदि शिल्पाचीं भव्य, सुंदर व अननुकरणीय कामे, व विशेषत: पंधरासोळा शतकांत भरभराटीला येऊन शिखरीं गेलेली चित्रकला व मूर्तिकला या सर्वांनीं एकवटून ज्याच्या मनाला नवा संस्कार दिला नाहीं, तो मनुष्यच नव्हे ! व या सर्वांत इतालीच्या सृष्टिशोभेची, धान्यें, फुलें, फळें आदींच्या समृद्धीची व त्यांनां सदा प्रफुल्लित ठेवणाऱ्या अखंड सूर्यप्रभेची भर पडते. इतालींतून परत जर्मनींत आल्यावर गॉटे ह्मणत असे, कीं "येथील सृष्टींत तेज नाहीं–वर्णवैचित्र्य नाहीं." मी येथें परत आलों तेव्हां तर थंडीमिश्रित पावसाळ्याचा आव आला असल्यामुळें मला तो विरोध फार जाणवला; व आपण त्या अखंड प्रकाशित दक्षिणेतच कां नाहीं राहिलों, असें वारंवार वाटूं लागलें !

या प्रवासाचा कार्यक्रम अर्थात्च मला असलेली सवड व जवळची पुंजी यांच्या समप्रमाणांत ठरवावा लागला; त्यामुळे व्हेनिसच्या वाट्याला ५, फ्लॉरेन्सला ५, रोमला १० असे दिवस आले. या प्रत्येक ठिकाणीं खरें खर ह्मटलें असतां महिनामहिना राहिलें पाहिजे. पण मजसारख्या प्रवाशाला 'आंबट आहेत ह्मणून राहूं द्या' असाच प्रकार करणें प्राप्त आहे. रोम हे जग आहे असें गॉटे ह्मणतो, ते अक्षरश: खरें आहे. नव्हे, हल्लींच्या जगांत जें दुर्मिळ तें रोम येथें आहे. रोमच्या रस्त्यांतील मातीचा प्रत्येक कण जुना इतिहास बडबडतो ह्मटलें तर अतिशयोक्ति मानायला नको. इ. स. च्या मागें कांहीं व पुढें पांचसहा शतकें सर्व पाश्चिमात्य जगाची राजधानी रोम असे, व इतर रानटी (रोमन-बार्बारी जो रोमन नसे तो बार्बरी गणला जाई !) लोकांनीं रोमन बादशाहीची धूळधाण उडविली–रोमन शहराची स्मशानभूमि बनविली, तरीहि त्यास स्वत:ला रोमन बादशाहा ह्मणवून घेण्याचा व खुद्द रोम

शहरीं राज्याभिषेक करवून घेण्याची हौस असे! पुढें लौकरच राजकीय सत्तेच्या वैभवाच्या राखेंतून धर्मिक सत्तेची व ऐश्वर्याची जींव धरून राहिलेली फुणगी कांहीं पापाच्या ( पापा ह्मणजे पोप ) कर्तबगारीच्या व वरील बार्बाराच्या रोमला अभिषेक करून घेण्याविषयीं अभिमानाच्या वाऱ्यानें फुलूं लागली व दहा यापसून सोळाव्याशतका पर्यंत तिनें आपलें उज्वल तेज सर्व यूरोपभर फांकलें! तिच्यापुढें निरनिराळ्या राजकीय सत्ता फिक्या मशालीसारख्या वाटत. त्या वेळच्या पापांनी जी राशद उडविली तिचें वर्णन कसें करावें? पण पुढें कमी धूर्त, व तृष्णाहनि, हेकेखोर पापांनी धुमाकूळ माजवून आपल्या सत्तानाशाचीं ( व सत्यानाशाचीं ! ) बीजे पेरिलीं. रेफरमेशन् हें त्यांचेंच गोड व कडू फल होय.

'धर्माच्या बाह्य कुणा घालिति, बहु मोक्षपत्रिका विकिती।
लढवीती राजांते अन्योन्यांशीं, कळा वदावि किती ! ॥
अशा अनेकविध त्यांच्या कळा !

'पूर्वींच्या ग्रेगोरिओ, लेओ, वगैरेंची सत्ता कोणीकडे, व आज आपला फक्त देवळापुरता गुरवी अधिकार कोणीकडे!' असे विचार येऊन सध्यांच्या पिओ पापाला ( Pope Pius )* काय वाटत असेल!

'रोम हें जग आहे, व त्यांत स्वतःच्या अस्तित्वाचें भान येण्यालाच माणसाला किती तरी वेळ लागतो! जे नुस्तें पाहतात व चालते होतात तें प्रवासी किती सुखी, असें मला वाटतें.' या येथील कविराजाच्या दोन शब्दांनीं माझ्या ग्रन्थापेक्षांहि, मी काय ह्मणतों याची उत्तम कल्पना तुह्मांला सहज यईल.

या प्रवासानें, चित्र-मूर्ति-व शिल्पकला यांचें रमणीय, व उदात्त स्वरूप पहायला सांपडून, मनुष्यप्राण्यानें यांत किती पूर्णता संपादिली आहे, त्याची कर्तबगारी आत्मविश्वासाच्या जोरानें किती वाढूं

* हे महायुद्ध सुरू झाल्यावर थोड्याच दिवसांनीं वारले हें वाचकास ठाऊक आहेच.

शकेल, याची चांगली कल्पना आली. यांच्या नुसत्या काळजीपूर्वक निरीक्षणानें केवढा श्रेष्ठ संस्कार मनावर घडतो, हें सांगणें कठीण आहे. चित्रकाराचे—तसेच मूर्तिकाराचे सर्व विचार व मनोविकार त्याच्याच कृतीच्या ठिकाणीं एकवटून, तिच्याच द्वारा जेव्हां सूक्ष्म पहाणाराला दिसून येतात तेव्हांच त्याला आनंद होतो. त्या कृतीचें हृद्गत म्हणजे तिच्या कर्त्याचें हृद्गत जाणतां येणें म्हणजेच ती खरोखर पहातां येणें होय. नाहीं तर ऑटोच्या ( मोटर ) धुरांत व गोंगाटांत वाऱ्याची फेरी घेऊन इमारती पाहणारे, व मार्गदर्शकाच्या मुक्ताफळां-कडे कान व त्याच्या बोटाकडे डोळे लावून त्याच्या मागें धांवपळ करीत ग्यालरींतून ( चित्रसंग्रह ) फिरणारे शोकी लोक काय थोडे आहेत ?

बुधवार, ता. २.

यूरोपांतील पर्वतराजाचीं नवीं दोनतीन सरोवरें या खेपेला पहा-यला सांपडलीं. तीं गार्डा, कोमो आणि लुगानो हीं होत. आल्पसच्या सर्व सरोवरांचें पाणी निळसर दिसतें व त्यांच्या शांत गंभीरपणाचा ठसा मनावर उमटतो. भोंवतालीं कांठाशीं व दूरहि असलेल्या गिरि-शिखरांचें त्यांत प्रतिबिंब पडून दोहोंचीहि स्वाभाविक शोभा दुणावते. गगनाचें अक्षरशः चुम्बन घेण्याची जणूं त्या शिखरांची एकमेकांशीं स्पर्धाच चालली असते व जीं अति उंच उंच गेलेलीं दिसतात तीं जणूं जवळपणामुळें सूर्यप्रकाशाचा ताप अधिक होऊं नये म्हणून स्फटिकासारख्या दैदीप्यमान बर्फाचा मुकुट धारण करतात ! विशाळ-पणांत मागें पडलेलीं शिखरें लज्जेनें झिरझिरीत निळसर मेघांचें आव-रण आपल्या तोंडावर घेतात व त्याहून कमी उंचीचीं बिचारीं देवदारु-वनाचें दाट जाळें शिरावर वाढूं देऊन आपलें तोंड अक्षय लपवतात. या सर्व रमणीय व वेडावून सोडणाऱ्या देखाव्याचें सृष्टीच्या त्या अख-

लखांत आरशांमध्यें प्रतिबिम्ब पडून, सृष्टिसुंदरीच्या श्यामवर्ण चमक-णाऱ्या गालांवर स्मिताचे तरंग उठतात, तेव्हां तर सृष्टिशोभेच्या या नन्दनवनांत मन व हृदय हीं गुंग होऊन जातात!

या अप्रतिम स्वर्गसुखाचा लाभ निरामय घेतां यावा अशी उत्कट इच्छा होते; पण या नन्दनवनाच्या गुणांच्याच दोषामुळें ही गोष्ट आज कष्टशक्य होऊन बसली आहे. कारण 'कूअरसेझोंसाठीं आलेल्या पाहु-ण्यांची व मजसारख्या प्रवाशांची सर्व ऋतूंत या ठिकाणीं यात्रेसारखी गर्दी जमत असते. त्यामुळें सर्व इन्द्रियांचें ध्यान सृष्टिसुंदरीकडे लावून तिचें एकांतांत निरामय चिंतन क्षणभर तरी करीत बसणें जरा दूरा-पास्त होतें! बायरननें म्हटल्याप्रमाणें 'There is too much of man here' असें पदोपदीं भासूं लागतें; तरी पण अगदीं अपरि-चित, नाना भाषा बोलणारा, सहस्त्रशीर्ष जनसमूह भोंवतीं असूनहि मजसारख्या वेषभाषारुचिमनांनीं त्यापासून अगदीं भिन्न माणसाला गर्दीतहि एकान्तवासाचा लाभ क्षणभर होऊं शकतो.

हीं पाहून झाल्यावर मात्र उभे वारे सुटले व परत घरीं जाऊन या प्रवासांत आलेले अनुभव नीट पचवावे, अशी उत्कंठा झाली. वाटेंत स्वित्सरलंद ओलांडायचें होतें; तेथील घाटांतील अपूर्व देखावा वर्णन करणें शक्य नाही. जर दुपारीं पाऊस सुरू होऊन हवा खराब झाली नसती, तर कोठें तरी उतरून पडण्याचा मोह झाला असता! वाटेंत चार जिल्हेसरोवर, झ्यूरिचर सरोवर वगैरे गेल्या वर्षींची ओळखीची मंडळी पावसाचे तुषार, धुकें व ढग यांच्या काहुरांत धुरकटल्या-सारखीं उदास दिसत होतीं; कांहीं कांहीं वेळ तर त्यांचें रम्य स्वरूप पार झांकून जाऊन तुषार व धुकें यांच्या जाळ्यानें त्यांचा आकाशाशीं एकजीव करून टाकल्याचा भास होई! आपला एक चहाता दुर्दि-नाला भिऊन असा घाईनें आपणाला न भेटतां चालला, यामुळें तर तीं दुर्मुखलेलीं नसतील ना!

९ व्या सप्टेंबरला इटली सोडून ११ वीला रात्रीं घरीं येऊन दाखल झालें; यावरून परत येतांनाच्या लगबगाईची कल्पना येईल. स्टुट्गार्टला एकदां उतरलों; पण तिथें पहायचें काय? राजवाडे? इटालींतील राजवाडे पाहिल्यावर यांच्याकडे डोळ्याच्या एका कोंपऱ्यानें सुद्धां पाहवत नाहीं! बरें, सृष्टिशोभा म्हणाल, तर उत्तरइटाली–स्वित्झर्लंद नुकतेंच पाहून आलेल्याला, अमृत प्याल्यावर ताक पिण्याची पाळी यावी तद्वत् प्रकार! शिवाय हवा कोण थंड झालेली! आणि पावसाच्या झिमझिमीमुळें दिवसहि किती खराब उदासवाणा! हीं सगळीं आधीं होतीच; त्यांत पडशाची फोडणी बसून, येथवर येतां-येतां वाटून गेलें.

गुरुवार, ता. ३.

येथें थोडी विश्रांति घेतली व मग एका आयरिश् प्रोफेसरांबरोबर होमरचें ईलियड मूळ ग्रीक भाषेंतून वाचायला आरंभ केला. यापलीकडे सध्यां कांहीं होत नाहीं व करण्याचा विचारहि नाहीं. युनिव्हर्सिटी–व्याख्यानें येत्या २९ वी नंतर सुरू होतील.

× ×

सध्यां येथें शरदृतूचा उत्तरार्ध आहे. झाडांचीं पानें तांबूस, पिंवळट अशीं होऊं लागल्यामुळें वनांत जिकडेतिकडे तिरंगीपणा दिसून पक्वपणाचा भास होतो, व सुरलेला गोड वास येतो. मधुनमधून पाऊसहि पडतो. शरदृतूच्या शेवटीं शेवटीं इकडे पश्चिमेकडील वारे जोरानें वाहूं लागतात. त्यांनां हळूहळू सुरुवात झाली आहे, यामुळें झाडांच्या पक्व पानांचा वनांत जणूं सडा पडतो. गांवांत व जवळील उपवनांत (Park) तीं लगेच काढलीं जातात. पण वनांत त्यांचा खच तसाच कायम असतो. वनांत फिरायला जातांना त्यांतून तुडवीत जाण्याची मोठी मौज वाटते. बुटाखालीं तीं चळचळ वाजतात तेव्हां कानांला बरें वाटतें! आपलें वय,

दर्जा सर्व विसरून माणसाच्या आंगीं जणूं बाळपणा येतो; व बाळपणांतील या निरुपद्रवी खेळाची पुनरावृत्ति होऊन मनुष्य क्षणभर लहानपणच्या गोड आठवणींत रंगून जातें. अशांत पश्चिमेकडील सोसाट्याचा वारा सुटला ह्मणजे निराळीच गम्मत वाटते. तीं अर्धीं हिरवीं, तांबडीं, पिवळीं, पांढुरकीं—अशीं नाना रंगांचीं पानें वाऱ्यापुढें जणूं भीतीनें धांवत सुटतात. इकडील शरदृवायूचें रसभरित वर्णन शेले कवीनें केलेलें तुह्मीं पाहिलें असेल; त्याचें नांव 'Ode to the West-Wind' असें आहे. त्यांत अशा वाऱ्यापुढें पळणाऱ्या पानांस त्यानें मान्त्रिकाच्या भीतीनें सैरावैरा धांवत सुटलेल्या भुतांखेतांची उपमा दिली आहे. या वाऱ्याच्या दिवसांत इकडे समुद्र खवळतात व होड्यांचे व लहानसहान नावांचे बळी घेतात. हें भय इंग्लिश चॅनेलमध्यें फार असतें; कारण तेथें व ग्रेटब्रिटनच्या सर्व किनाऱ्याभोंवतीं खवळलेल्या समुद्राला काळेंकुट्ट धुकें मदत करतें. त्यामुळें कितीहि हुषार अनुभवलेला नावाडी असला तरी त्याची मति खुंटते.

शुक्रवार, ता. ४.

आज दिवस उत्तम सूर्यप्रकाशाचा आहे; पण थंडी बरीच आहे. या महिन्याच्या तोंडींच एवढी थंडी नेहमीं नसते. पण अलीकडे सर्व चमत्कारिक होत असतें ह्मणतात, त्यांत हवेनें कां भर घालूं नये!

नऊच्या सुमाराला फराळासाठीं गेलों व वर्तमानपत्र हातीं घेतलें, तों राजकीय वातावरणांतहि अशीच चलबिचल. सर्विया, मॅंटेनीग्रो, बलगेरिया यांनीं आज महिनाभर तुर्कस्थानाच्या मागें 'टुरटुरू टरोंटरों' लावली होती, कीं, मासिडोनियाला स्वातंत्र्य द्या, नाहीं तर युद्धाला तयार व्हा! सगळीं मिळून आपल्याकडील एका तालुक्याचीहि भरती होणार नाहीं एवढीं हीं छोटेखानी संस्थानें व यांना स्वातंत्र्य तरी नुक्तें गेल्या शतकाच्या शेवटीं मोठ्या राष्ट्रांनीं तुर्कांस धाकदपटशा दाखवून

मिळवून दिलेलें! पण त्यांना वाटतें, कीं, आपण सर्व मिळून मासे डोनिया तुर्कांच्या घशांतून काढूं. त्यांनीं तुर्कीला एक खलिता पाठ विला आहे व त्याचें उत्तर काल अखेर समाधानकारक गेलें नसलें, तर आज ह्मणे लढाई सुरू होणार! गुळाच्या ढेपीचा लचका तोडण्यासाठी मुंगळ्यांनीं कमरा बांधल्या आहेत, तुटून अर्धीं धडें ढेपीला चिकटून बसण्याची पाळी न येवो ह्मणजे झालें! 'चहादाणींतलें वादळ' अशी इकडे ह्मण आहे. पैकींच हा प्रकार होणार कीं काय, असें वाटतें

लाइप्झिक, १५।११।१२.

बरेच दिवसांत तुह्मांला लिहिलें नाहीं; पण तशी 'नोटीस' आधींच दिली होती, तेव्हां तक्रारीला फारशी जागा नसेल. मुदत जराशी लांब वावी लागली, इतकेंच काय तें!

थोडीशी विश्रांति घेतों, न घेतों तों एका आयरिश प्रोफेसराबरोबर होमरचें ईलियड् वाचण्याची संधि मिळाली; त्यामुळे विश्रांतील थोडासा फांटा द्यावा लागला. याविषयीं पूर्वींच्या पत्रांत उल्लेख केला आहे; नंतर एक पंजाबी हिंदी गृहस्थ येथें शिकण्यासाठीं आले त्यांची सोय लावण्यांत वेळ गेला, व पुढें युनिव्हर्सिटीचें काम सुरू झालें.

तितक्यांतच पुढें जमणार नाहीं ह्मणून येथील एक प्रसिद्ध मुलींचं शाळा पांचसात दिवस जाऊन पाहून घेतली. त्या शाळेचा डिरेक्टर नांवाजलेला शिक्षणपटु 'पेडागॉग' असल्यामुळें नेहमीं जर्मनींतील व इतर देशचे मास्तरमास्तरिणी ही नमुनेदार शाळा पाहण्याला येत असतात. तसा मीहि गेलों. पद्धति उत्तम आहे. मुलांमुलींना स्वतः सिद्धपणें शिक्षण घेतां यावें, हा विशेष कटाक्ष असल्यामुळें कोणत्याहि विषयांत त्यांना स्वतंत्रपणें ज्ञान मिळवण्याची प्रवृत्ति उत्पन्न करणें एवढें शिक्षकाचें काम रहातें. तें कसें काय चालतें हें या शाळेंत पहा

वयाला मिळालें. मला त्यामुळें आश्चर्य वाटलें; पण ती रीत लिहीत बसलें असतां तुह्मांला कंटाळा येण्याचा संभव असल्यामुळें लिहीत नाहीं. मला एकदोन दोष वाटले ते मी डिरेक्टराला विचारितां त्यानें माहिती दिली. त्याच्या व क्लासमास्तरच्या विनंतीवरून वरील मास्तरिणी तयार करण्याच्या क्लासांत हिंदुस्तानविषयीं चार शब्द सांगावे लागले; त्यांतच पाऊण तास गेला. असो.

माझे मित्र डॉ. मॅकग्ल्युकर्ट यांचें नांव तुह्मांला आतां पत्रांवरून ठाऊक झालें आहेच. ज्यांच्या येथें गेल्या उन्हाळयांत एकदां जाऊन अवचित मंगळवार केला तेच हे गृहस्थ. हे या सहामाहींपासून येथील युनिव्हर्सिटींत शिक्षक झाले आहेत. तेवढ्यासाठीं त्यांनीं लिहिलेला ग्रन्थ युनिव्हर्सिटीला पसंत पडून त्यांनां लेक्चरें देण्याची परवानगी मिळाली. ह्मणजे हे आतां प्रिव्हाटडोसेंट् झाले. याच्यावरील पायरी एक्स्ट्राऑर्डिनरी प्रोफेसर व नंतर ऑर्डिनरी प्रोफेसर अशी इकडे पद्धत आहे. इकडे प्रोफेसर होणें आपल्याकडील प्रमाणें सोपें नाहीं. त्याचें पहिलें लेक्चर कांहीं प्रोफेसर व विद्यार्थी यांच्यासमोर झालें, त्याला मी गेलों होतों; चांगलें झालें. त्याबद्दल रीतीप्रमाणें मी त्यांचें अभिनंदन केलें, व त्यांनीं उलट एका संध्याकाळीं जेवायला बोलाविलें. त्यांचे आणखी एक मित्र जेवणाला होते. साडेसातला गेलों तों साडेबाराला घरीं परत आलों. त्यांनीं पाहुणचार चांगला केला. भातानें भरलेलीं टोमाटो व त्यावर कांद्याची फोडणी हा पदार्थ मजसाठीं होता. जेवून खूब गप्पा मारल्या. त्यांत युनिव्हर्सिटी, प्रोफेसर, लेक्चरें वगैरेविषयीं किती तरी गोष्टी कळल्या. मौजेंत व थट्टामस्करींत वेळ घालविला. असो.

याशिवाय फारसें आज लिहिण्यासारखें नाहीं. प्रकृति बरी आहे. आतां मला काम फार आहे; सर्व उरकून पुढील सत्रांत येथून पाय काढणें आहे. तरी पत्रांनां उशीर—पुढेंमागें होण्याचा संभव फार.

१७ जानेवारी, १९१३.

× × × × ×

क्रिस्तमसचे दिवस व नव्या वर्षाचा एकदीड आठवडा मला बरा गेला नाहीं. इन्फ्लुएन्झा वगैरे झाला होता; पण आतां प्रकृति साफ आहे. सुटीनंतर आजच पुनः युनिव्हर्सिटींत तासभर गेलों होतों. हवेचा हा सगळा खेळ. आतां मात्र बर्फ पडून हवा स्वच्छ व निरोगी झाली आहे. ज्या ऋतूमध्ये वातावरणांत जे बदल व्हायला पाहिजेत ते न झाले, म्हणजे असेंच व्हायचें. जसा पावसावांचून आपल्याकडे पावसाळा—तसाच इकडे बर्फावांचून हिंवाळा होय.

मेरान ( टिरोल-ऑस्ट्रिया ), २१ फेब्रुवारी, १९१३.

मी या कामाच्या दिवसांत येथें आलों याचें तुम्हांला आश्चर्य वाटेल. पण कारणहि तसेंच झालें. क्रिस्तमसमध्यें जबर पडसें आलें, तें चांगलें निघालें नाहीं. पुढें जानेवारीच्या आरंभीं इन्फ्लुएन्झा होऊन अंथरूण धरावें लागलें डाक्टरचें औषध चालू होतेंच. पण तो सर्व महिना अती खराब हवा पडल्यानें औषधांचें चालेना; व घशांत ( Catarrh ) कफ झाला, त्यानें त्रास दिला. पुढें जानेवारीअखेर जेव्हां कफानें उजवें फुफ्फुस काबीज केलें, तेव्हां डॉक्टरनें सल्ला दिला, कीं, येथें आतां राहून उपयोग नाहीं, दक्षिणेकडे डोंगरांत उत्तम हवेंत सूर्य-प्रकाशांत जाऊन चांगले उपचार करावे. त्या गोष्टीला एकदम कबूल होण्यापलीकडे दुसरा मार्गच नव्हता; फुफ्फुसापर्यंत भिडल्यावर हयगय करून सोय नव्हती. डॉक्टरनें लगेच मेरानला प्रसिद्ध डॉ. श्मिट् यांना माझी स्थिति कळवून 'हातीं घेऊन, राहण्याची वगैरे सोय कराल काय?' म्हणून विचारलें. त्यांचें ता. २ रविवारीं 'होय' म्हणून उत्तर आलें, व मी लगेच तयारी करून रात्रीच्या गाडीनें निघालों व सोमवारीं दुपारीं पांचनंतर येथें पोंचलों.

दुसरे दिवशीं डॉक्टरांना भेटून प्रकृति दाखविली. त्यांनीं उत्तम रीतीनें तपासलें व सकाळीं २०'' थंड पाण्यांत ओल्या केलेल्या वस्त्रानें आंग गुंडाळून चांगलें चोळवणें व नंतर थंड पाण्याचीं दोन बकेटें आंगावर ओतविणें; आणि दुपारीं सोडा हुंगणें (एका लहानशा खोलींत खुर्चीवर बसून, शेजारीं सोडामिश्रित पाण्याचे फवारे उडतात ते हुंगणें—सर्व खोलीच सोड्यानें भरून जाते!) असे उपचार सांगितले. आणखी तीन दिवसांनीं रात्रीं निजायच्या वेळेला पाणीमिश्रित स्पिरिट आंगाला चोळवण हा उपाय सुरू झाला. त्यांनीं बरें वाटतें. कफ सुटतो. प्रथम फार थोडा सुटे, आतां चांगला पडतो. लाइपझिक् येथें असतांना छातींत दुखे तें आतां बिलकूल नाहीं. सकाळच्या थंड उपचारानंतर प्रतिक्रियेनें आंग गरम होतें; व तें तसें राखण्यासाठीं अर्धापाऊण तास फिरायला जावें लागतें. आतां त्या फिरण्यानें उल्हास वाटतो.

गेल्या आठवड्यांत या तिन्ही उपचारांत आणखी एक भर पडली. रात्रीं स्पिरिट चोळणें झाल्यावर जाड्या भरड्या रेशमाचें लांबसें फडकें गार पाण्यांत भिजवून छातीभोंवतीं गुंडाळावें व त्यावर जाडी फ्लानेल गुंडाळून व गरम कपडे घालून निजावें. थोड्या वेळानें उत्तम ऊब येते. यामुळेंहि छातीला हलकें वाटतें व बेडके लवकर सुटतात.

× × × × ×

मी येथें नदीकांठीं लोकांच्या सहल करण्याच्या रस्त्या (Promenade) वर राहतों. माझ्या खोलीला दक्षिणेकडे सज्जा असल्यामुळें त्यावर व खोलींतहि उत्तम ऊन पडतें. सकाळीं दहापासून दुपारीं चार पर्यंत सज्जावर आराम खुर्ची टाकून उन्हांत पडण्यांत अती आनंद वाटतो, प्रकृतीला आराम होतो व विकाराची पीछेहाट होते. हें ठिकाण चोहींकडून डोंगरांनीं सुरक्षित असल्यामुळें येथील हवा फारच उत्तम आहे. मात्र त्यामुळेंच ऊन्ह फक्त नऊनंतर व चारपर्यंतच असतें.

माझी प्रकृति आतां पुष्कळ सुधारत आहे. बिलकूल काळजी करण्यासारखें नाहीं. इकडे येण्यांत हयगय केली असती, तर मात्र जरा कठीण झालें असतें. लाइपझिक्ला दर आठवडा वजन कमी होत होतें तें आतां वाढत आहे. ही सुधारणेची पहिली खूण होय. आणखी तीनएक आठवडे येथें राहून परत जायला होईल असें वाटतें. तोंवर लाइपझिक्ची हवाहि बरी होईल.

× × × ×

उत्तम हवेंत, उत्तम वैद्याच्या शुश्रूषेखालीं मी आहें. त्याचा सुपरिणाम मला प्रत्यहीं भासतो व प्रत्यक्ष दिसतो. दोनतीन आठवड्यांचा प्रश्न आहे. तोंवर प्रकृति साफ बरी होईल, असा रंग व आशा आहे.

पासर नदीची दरी,
( मेरानच्या उत्तरेस तीन मैल ), १३ मार्च १९१३.

तुमचीं सर्व पत्रें पावलीं. माझींहि येथील दोन्ही पोंचलींच असतील. मी आतां बहुतेक बरा होऊन नदीकांठीं, डोंगरावर वगैरे चांगला फिरूं लागलों आहें. याचें निदर्शन मथळ्यावरील पत्र लिहिण्याची जागाच देईल.

माझ्या आजाराविषयीं तुम्हांला माहिती दिलीच आहे. पुनः तेंच लिहीत बसणें दोघांनाहि कंटाळवाणें होईल. एवढें लिहिलें असतां पुरे, कीं, तो फुप्फुसाचा आजार आतां बहुतेक नाहींसा झाला. आतां आठदहा दिवसांत परत जर्मनीकडे जाण्याचा विचार आहे. प्रथम ऱ्हाइन कांठांनीं बॉनला जाऊन मित्रांनां भेटून मग पुढें जाईन.

येथें सबंध फेब्रुवारी महिना तर इस्पितळ व घर यांतच गेला. या महिन्याच्या आरंभीं गांव व नदी यामधील पाहुण्यासाठीं केलेल्या राजरस्त्यावर उन्हांत बसूं लागलों. तेथें प्रथम बरेंच मन रमलें. कांहीं आजारी म्हणून व कांहीं सहज हवा खाण्यासाठीं लागून आलेल्या ६३-

६४ हजार पाहुण्यांपैकीं बहुतेक या राजरस्त्यावर उन्हाच्या वेळीं इकडून-तिकडे फिरत असतात. अकरा ते साडेबारा व दुपारीं तीन ते साडेचार रस्त्यावर बांधलेल्या पडशाळांत रोज वादनाचे जलसे होतात; तें म्हातारेकोतारे व कांहीं तरी आजारांनीं आपंगलेल्यास चांगलें करमणुकीचें साधन असतें. बाकी तरुण–तरुणी पाहुणे स्वतःचा पोषाक, शोक व दिमाख दाखविण्यासाठीं व दुसऱ्याचा पाहून त्यावर टीका करण्यासाठीं संगीत ऐकण्याच्या मिषानें इकडूनतिकडे हातांत हात घालून, एकामेकांची थट्टामस्करी करीत, गुलगुल गोष्टी बोलत फिरत असतात. वयस्क पुरुष व बाया यांच्या गप्पा नेहमीं 'तुम्हांला काय होतें? काय औषध घेतां? डॉक्टर कोण?' वगैरे असायच्या, तर तरुणांच्या गप्पा नेहमीं कोणी कसा पोषाक केला आहे, कोण कसा अगर कशी चालते, औटोमोबील (मोटरकार) मधून सुखाच्या सहली, वनभोजन (पिक्निक), नाच (बॉल) वगैरेंच्या. कूअर प्रोमेनाड (पाहुण्यांच्या सहलीसाठीं राजरस्ता)-वर बाक अगर खुर्चीवर बसावें; म्हणजे शेजारीं ज्या वयाची माणसें बसलेलीं असतात, तशा गप्पा ऐकूं येतात. वृद्ध बायांच्या तोंडचीं 'माझें हें दुखतें, त्याला मी अमकें टॉनिक घेतें' वगैरेंसारखीं गाणीं, व 'होटेलांत सैंपाक करतांना मीठच जास्त घालतात,' अगर 'आमटीला वासच कसासाच येतो' अशा तऱ्हेचे माहितीपूर्ण चुटके असायचे. एकदां मी अशाच दोन बायांशेजारीं बसलों असतां त्याच्या या गप्पांनीं डोकें उठून गेलें व मीहि उठलों! आणखी एकदां एक खोकणारी बाई 'मला कफ आहे, त्याला काय करावें,' म्हणून विचारूं लागली. 'मजपेक्षां डॉक्टरला विचारलें असतां जास्त श्रेयस्कर होईल' असें प्रथम त्रोटक उत्तर दिलेलें तिला बरें वाटलें नाहीं, असें पाहून मग 'सोड्याचें इन्हेलेशन घ्यावें; तें कूअरमिटेलहौस् मध्यें स्वस्तांत मिळतें;' वगैरे सांगून तिचें समाधान केलें!

मेरान, ता. १२ ... , १९१३.

हें कूअर-ओर्ट (रोग्यांसाठीं उत्तम हवेचें ठिकाण) असल्यामुळें नानातऱ्हेचे व्याधिग्रस्त लोक येथें यतात. त्यामुळें एवढ्याशा खेड्यांत पन्नासांवर डॉक्टर आहेत. त्यांचो फी सातसात आठआठ रुपये असल्यामुळें फुकट औषध वगैरेची माहिती मिळवूं पहाणारे लोक असतातच. पैकींच वरील बाई होय. रात्रीं माझ्या आंगाला रिगरिट् चोळण्यास येणारा माणूस येथील बड्या दवाखान्यांत नोकर असतो; तोही अशीच मौज सांगत होता.. एकदा हंगारींतून दहा ज्यूलोक औषधासाठीं आले; व एकाला डाक्तरकडून उत्तम तपासवून घेऊन, डॉक्टरनें त्याला सांगितलेले उपचार इतर सर्वांनीं केले! आठ रुपयांत नऊ जणांचें काम करून घेणाऱ्या या ज्यू मारवाड्यांची गोष्ट ऐकून मला हंसूं आलें. ज्याला डाक्टरनें तपासलें तो दुर्दैवानें मेला, तेव्हां इतरांची पांचावर धारण बसली, हें सांगणें नकोच! मला हंसूं तर खूब आलेंच; पण फारसें आश्चर्य वाटलें नाहीं. ज्यू लोक पैशाच्या कामांत किती कंजुष आहेत व त्यासाठीं ते वाटेल तें करण्यास कसे तयार होतात, हें प्रसिद्ध आहे.

ज्यू लोकांचा इकडील चांगले चांगले क्रिश्चन लोक तिटकारा करतात, याचें मला प्रथम प्रथम आश्चर्य वाटे. पण बरेंच पाहिलें-ऐकिलें-अनुभवलें, यामुळें मला त्यांतहि आतां कांहीं गैरवाजवी वाटत नाहीं.

उदाहरणार्थ, मोठ्या इस्पितळांत (मी जेथें जातों त्या कूअर मिटेल हौसमध्यें) एक गॅलिशियन ज्यू (ग्यालिशिया हा आस्त्रिया-हंगारीचा एक प्रांत आहे.) सकाळीं स्नानाला येत असतो. स्नान करून कपडे घातल्यावर त्यानें खोलीच्या पांढऱ्या पडद्याला आपले मळके बूट पुसण्यास आरंभ केला! हॉटेलमध्यें बूट पुसण्यासाठीं चाकर असतात,

पण त्यांना चिरीमिरी द्यावी लागते. ती कोणी द्यावी ? कंजूषपणाला अमंगळपणाची जोडी !

एकदां मी ओलें वस्त्र व 'इजिप्शियन ममी 'प्रमाणें सर्वांगाला फ्लानेल गुंडाळून खाटेवर पडलों असतां बर्लिनचे तिघे श्रीमंत ज्यू एक प्रकारचें स्नान ( बाथ ) करण्यासाठीं आले. कपडे खोलींत काढून, तेथें ठेवलेलें लांबरुंद बटुवस्त्रासारखें वस्त्र आंगावर घेऊन स्नानाच्या सोप्यांत यायचें असतं. तेथें येतांना व आल्यावर त्या तिघांचें निलाजरेपणाचें वर्तन अगदीं किळसवाणें होतें ! तरी तिघेहि शिकून D. Ph. वगैरे झालेले ! असो. कूअरविषयीं लिहितांना सहज घसरलों.

या ठिकाणाची गेल्या वर्षी ऑगस्टमध्यें दिलेली माहिती तुमच्या वाचनांत असेल. तेव्हां त्याच्या नैसर्गिक शोभेविषयीं पुनः लिहिणें नकोच. मात्र यंदां जास्त मुक्काम झाला व या आठ दिवसांत कांहीं फारच रमणीय ठिकाणें पाहून झाल्यामुळें 'टिरोलचें मोतीं' हें नांव या गांवाला अगदीं योग्य आहे असें वाटतें.

काल जेथून पेन्सिलीनें पत्र लिहिलें, ती 'पासर' नदीची दरी रम्य आहे. त्र्यंबकेश्वराच्या वरती गोदावरीच्या दरींत होणारे व भवभूतीनें आपल्या गंभीर वाणीनें वर्णिलेले झांकार जरी हुबेहुब येथें ऐकूं न आले, तरी खडकां–दगडांतून वळणें घेत जाणाऱ्या छोट्या नदीच्या पाण्याच्या घो घो आवाजानें भोंवतालचे लहानमोठे डोंगर व पर्वत गंभीर वाणीनें बोलतात, असा भास झाल्याखेरीज राहत नाहीं. पांढरे, काळे, निळे–नव्या उगवूं लागलेल्या गवतानें हिरवे डोंगर, त्यांतच विखुरल्याप्रमाणें जागजागीं पसरलेलीं तांबड्या कौलांचीं खेडवळ घरें वगैरेंनीं भोंवार देखावा विचित्र दिसतो. अजून द्राक्षांच्या वेलींनीं पल्लव धारण न केल्यामुळें, त्या शोभेंत जी अप्रतिम भर पडायला हवी, व जिची परिपूर्णता मला गेल्या वर्षी पहायला मिळाली–ती भर अद्याप पडायची

आहे. आणखी एकादा पाऊस पडला पाहिजे. मधल्या रात्रीच्या पावसानें ओलावा मिळाला व मार्च महिन्यांतील सूर्यकिरणांनीं उष्णता मिळाल्यामुळें गवतें व झुडपें हिरवींगार होऊन, इतर झाडें फुलायला लागलीं आहेत. त्यामुळें सकाळच्या प्रहरीं कूअर-पाहुण्यांची गर्दी होण्यापूर्वीं-गिरफ नांवाच्या दुतर्फा झाडेंझुडपें असलेल्या रस्त्यावर अगर इतर ठिकाणीं डोंगरांत फिरण्याला गेलें असतां सकाळची ती थंड, स्वच्छ व आरोग्यदायक हवा व गवतां-फुलांचा मंद सुगंध यांनीं मन शांत, प्रसन्न व तल्लीन होऊन जातें. वसंतारंभ असल्यामुळें दक्षिणेकडून परत येऊं लागलेल्या पक्ष्यांचें सकाळच्या ताजेपणाच्या रंगांत मंजुळ चिवचिवणें कानावर पडून, दूधसाखरेच्याहि जोडीला मागें टाकणारी गोड जोड सृष्टीच्या पहांटच्या कोंवळ्या सौंदर्याला मिळते; व तो सर्व सभोंवारचा देखावा, तो प्रसंग आपल्या अपूर्व माधुर्यानें मजसारख्यास गुंग करून सोडतात यांत नवल नाहीं ! पण आश्चर्याची गोष्ट ही, कीं, अशा प्रसन्न शांत-मधुर सकाळच्या प्रहरीं पाहुणे-मंडळ घोरत पडलेलें अगर शरीर-भूषणादि प्रातःकर्मांत गुंतलेलें असतें. त्यांची जेव्हां या रस्त्यांवर मुंग्यांप्रमाणें गर्दी करण्याची वेळ येते, त्या वेळेला सूर्य प्रखर होऊन व पक्षी भक्ष्य शोधण्यांत गुंतले जाऊन सकाळच्या प्रेमळ देखाव्याचा अनुभव येणें त्यांनां दुरापास्त होतें. अभाग्याच्या घरीं कामधेनु आल्याप्रमाणें त्यांची गति होते !

कूअर-ओर्ट् ह्मणजे काय असतें, त्याचा होखसेझाँ ( हाय सीझन् =मोसम ) ह्मणजे काय याची पुसट कल्पना गेल्या वर्षींच आली होती. पण यंदां कूअर ( इं. क्युअर )साठीं स्वतःच यावें लागल्यामुळें त्याचें खरें स्वरूप कळलें. पर्वत व नद्या, पर्वत व सरोवरें, पर्वत आणि समुद्र अशा सृष्टिसौंदर्याच्या ठिकाणीं आधींच हवा उत्तम असते; त्यांत असें ठिकाण दक्षिणेकडे निवाऱ्यांत, सूर्यानें सदा प्रकाशित असलें ह्मणजे अर्थात रोग्यांनां निरोगी करणें व निरोग्यांनां

टेवहवी आमणें ही कामें वैद्यावांचूनच अर्धीअधिक होतात. मग अशाहि ठिकाणीं उत्तम वैद्य, व सर्व नव्या साधनांनीं परिपूर्ण दवाखाने यांची जोड मिळाल्यावर लोक कां न धांवतील ? मेरान हें खेडें दहापंधरा हजारांचीहि मूळ वस्ती नसेल; पण वसंत ऋतूंत-कीं, ज्या वेळीं हवा, सृष्टिशोभा व सूर्यप्रकाश अप्रतिम असतात त्या वेळीं येथें आस्त्रिया हंगारी, जर्मनी, रशिया ( पोलंडसहित ) वगैरे देशोदेशचे १३।१४ हजार पाहुणे जमा होतात ! साधारणपणें फेब्रुवारी पंधरा तारखेपासून अर्धा मे पावेतों येथील मुख्य मोसम असतो.

या पाहुण्यांस-अर्थात् जे रोगी अशक्त असतील त्यांस-उत्तम औषधोपचाराची तर सोय आहेच, पण ज्यावांचून सर्व यूरोपियनांनां सर्व जीवित शुष्क वाटतें अशीं-नाच, जलसे, तमाशे, नाटकें, कॉफीगृहें, कासीनो आदि करमणुकीचीं साधनें, हीं गांवच्या कूअरपंचाइतीनें अगणीत करून ठेविलीं आहेत. नाच, गायन, शिळोपा, वर्तमानपत्रवाचन, पत्ते खेळणें ( पैसे लावून बहुतेक-जुगार !) वगैरेसाठीं कूअरसाल ह्मणून चांगलीशी इमारत असते. तिचा उपयोग करा अगर न करा, रोजीं अर्धा क्रौन् ( पांच आणे ) कर प्रत्येक पाहुण्यानें दिलाच पाहिजे ! शिवाय मिलिटरी-कॉन्सर्ट झाला तरी दक्षिणा द्यावीच लागते. पण तीहि लोक हौसेनें देतात. सगळेच गायनप्रिय असतात असें नव्हे. माझ्या ओळखीच्या एका ऑस्ट्रियन माणसानें सांगितल्याप्रमाणें पुष्कळांनां ( तरुण स्त्रिया, पुरुषहि थोडे ) स्वतःचें व स्वतःच्या ऐश्वर्याचें प्रदर्शन करायचें असतें. कॉन्सर्टमध्यें कुजबुजणें चालूच असतें; कारण गाणें काय, रोजचें आहेच. पण कोणी कसा पोषाक केला हें नीट पाहून त्यावर टीका मग केव्हां करायची ? जसें आपल्याकडे विधवांनां पुराण ह्मणजे गप्पागोष्ठींचा व वाती करण्याचा एक अड्डा असतो, तसाच हाहि प्रकार आहे.

असो. आणखी लिहावें; पण जेवायची घंटा होऊन गेली, व वाढणारी दासीहि मुद्दाम वर येऊन वर्दी देऊन गेली, तेव्हां पुरे.

लाइप्झिक्, ४ एप्रिल, १९१३.

प्रकृति बरी असल्याचें मी तुह्मांला मेरानहून ता. १४ मार्च रोजीं लिहिलेंच आहे. त्यानन्तर आठ दिवसच तेथें होतों. नन्तर ता. २१ ला डॉक्टरकडून प्रकृति पुनः नीट तपासवून 'फुप्फुस निर्दोष झाला' असें त्यांनीं ह्मटल्यावर किती बरें वाटलें, याची कल्पना करावी! चार समुद्रांपलीकडे आप्तस्वकीयांच्या इच्छेविरुद्ध येऊन पडावें व तेथेंहि असा चमत्कारिक व अत्यंत काळजी वाटण्यासारखा आजार जडावा! प्रथमप्रथम हा विचार आला ह्मणजे मनाचें पाणी होऊन जाई. पण पुढेंपुढें बरें वाटूं लागल्यावर धीर आला. शेवटीं डॉक्टरनें परत जर्मनीला जाण्यास परवानगी दिली व मी मित्राला भेटण्यास बॉनकडे निघालों.

वाटेंत ईस्टरच्या रविवारीं 'म्युन्शेन्' (इं. Munich)ला होतों. क्याथोलिक लोकांचें शहर; ज्या देवळाकडे जावें तेथें आंत व बाहेर ही गर्दी! सणाचा दिवस असल्यामुळें नीटनेटके कपडे घालून बायका, मुलें, पुरुष सर्व रस्त्यांवरून जातांना दृष्टीला पडत होतीं. सर्वांच्या चेहऱ्यावर सणाचा आनंद पाहून मलाहि उल्हास वाटला. शेवटीं एका झुंडीबरोबर तेथील राट्हाउस् ('टाउन होल' जवळजवळ--अथवा म्युनिसिपल बिल्डिंग्ज) समोरील चौकांत गेलों, तो तेथें फार मोठा समुदाय दिसला. हे लोक येथें अळशासारखे कां उभे, ह्मणून शोध करतां, राटहौसच्या घड्याळाखालीं राजाराणी, सरदार व त्यांचीं द्वंद्वयुद्धें, खेडवळ लोकांचा नाच वगैरेंचीं चित्रें अकरांच्या ठोक्याबरोबर फिरायला लागून खेळ करून दाखवतात, तो पाहण्यास

हा गद्दा जमला, असें कळलें. मीहि थोडा वेळ ती मौज व तो चित्रविचित्र आनंदी जनसमुदाय पाहत उभा राहिलों.

नंतर उल्म येथील 'म्युन्स्टर' देऊळ पाहण्यासाठीं दोन तास उतरलों. निमुळत्या कमानी, उंच सुळकेदार टोंकाचे मनोरे–दर टोंकावर सूळाची ( Cross ) आकृति–असें हें गॉथिक थाटाचें देऊळ बाहेरून भव्य दिसतें. आंत जावें तों गोटेस्-डीन्स्ट् ( देवपूजा ) चालली असल्यामुळें अर्धा तास थांबावें लागलें. नंतर आंत गेलों. आंतील तिघई काम व समोरील आडवा गाभारा वगैरे साध्या थाटाचीं होतीं. तेथें आंत बसून जरा विसांवा घेतला; व पाऊस पडत असल्यामुळें शहरांत चक्कर मारण्याचें रहित करून भिजत भिजत स्टेशनवर आलों. उल्मच्या देवळाचा मनोरा जगांतील अशा तऱ्हेच्या सर्व इमारतींत अति उंच ह्मणजे १६१ मेटर ( ५२६ वर फूट ) आहे.

तेथून हायडल्‌बर्गपर्यंत प्रवास पांचएक तासांचा होता. वाटेंत डब्यांत स्टेशनास्टेशनानें निरनिराळीं माणसें येत; त्यांच्यशीं बोलण्यांत, त्याच्या बोलण्याचालण्याची तऱ्हा पाहण्यांत बराच वेळ मजेंत जाई. मी ज्या प्रांतांतून चाललों होतों त्याचें नांव वाडेन. याची राजधानी स्टुटगार्ट तिच्याविषयीं मागें लिहिलेच आहे. या प्रांताच्या दक्षिणेस एक मोठें अरण्य आहे, त्यास श्वार्त्सवाल्ड ह्मणतात. इंग्रजी पुस्तकांतून ब्लॅक फॉरेस्टचें नांव तुह्मी वाचलेंच असेल. पूर्वीं उत्तरेकडील यात्रेकरूंना रोमकडे जाण्याला या निर्जन जंगलांतून वाट असे. या प्रांताच्या लोकांस श्वाब ( इं. श्वेबियन ) ह्मणतात. हे लोक तोंडशूर ह्मणून प्रख्यात आहेत. अशाच एका श्वाबशीं माझें बोलणें झालें. त्यानें अमेरिका, फ्रान्स, स्पेन, इटली वगैरेंत प्रवास केला असल्यामुळें त्याला बऱ्याच गप्पागोष्टी करतां येत. पण त्या मध्यें न थांबतां व इतरांचें ऐकून न घेतां चऱ्हाटासारख्या वळीत बसण्याची त्याला खोड असल्यामुळें पुढें पुढें कंटाळा येई. शिवाय या प्रांतात प्रत्येक गावच्या लोकांची

व्यंजनें गाळण्याची रीत असल्यामुळें तो काय बोले तें कांहीं वेळ तर्कानें समजून घ्यावें लागे. उदाहरणार्थ 'इश् कान् ईनेन निष्ट् सागेन्' हें वाक्य तो 'इ का ईन नी साग' असें ह्मणे! (अर्थ:--मला तें तुह्मांला सांगतां येत नाहीं.) एकदां डब्यांत एक नर्स आली. तिनें मला वाटेनें लागणाऱ्या शहरांची व एकंदर त्या प्रांताची बरीच माहिती सांगितली. तिच्या धंद्यासंबंधानें बोलत असतां नर्स होण्यास प्रथम एक वर्ष तें काम नर्सशाळेंत शिकावें लागतें व नन्तर तीन वर्षें कोठें तरी इस्पितळांत प्रत्यक्ष काम शिकावें लागतें. नन्तर नर्सचा दाखला मिळून स्वतंत्र धंदा अगर नोकरी करतां येते, असें सांगितलें. असो.

हायडल्बर्गला जाऊन, फ्राउ प्रो. शेरर व तिच्या नवऱ्याला भेटून मित्राविषयीं माहिती विचारली. त्यांचा अभ्यास-वर्तन वगैरेविषयीं ह्मातारा ह्मातारी संतुष्ट दिसलीं. एकंदरीनें हिंदी विद्यार्थ्यांचा अभ्यास, मेहनतीपणा, वर्तन वगैरेविषयीं दोघांचेंहि फार चांगलें मत आहे.

हायडल्बर्गहून ऱ्हाइन नदीच्या डाव्या कांठानें बॉनकडे निघालों. प्रथम मान्हाइम् थोडेंसें व माइन्त्स् हीं शहरें पाहिलीं. ऱ्हाइनकांठचीं हीं शहरें अति स्वच्छ दिसलीं. नदी कांठीं वसलेलें शहर अनायासेंच गोड दिसत; त्यांतच उत्तम, स्वच्छ, रुंद रस्ते; व तांबड्या दगडाचीं उंचउंच भव्य घरें यांची भर येथें पडलेली! मग मनावर चांगला परिणाम कां होऊं नये? नदीच्या कांठीं दगडी तट बांधले असून, वरच्या बाजूला हवा खाणारांसाठीं दुतर्फा झाडांचे स्वच्छ रुंद रस्ते आहेत. यांना ऱ्हाइन्प्रोमेनाड ह्मणतात. माइन्त्स् येथें नदीकांठीं फिरत असतां मालानें लादलेल्या होडग्यांच्या माळाचे माळा दृष्टीला पडल्या. एका बोटीच्या मागें पांचसहापावेतों अशीं होडगीं लोखंडी दोरांनीं एकामागेंएक बांधलेलीं असतात; यांस श्लेपर (इं. टग्) ह्मणतात. जर्मनीच्या परदेशांशीं होणाऱ्या व्यापाराचा बराच मोठा भाग ऱ्हाइन् नदीच्या द्वारें होतो. आम्स्टरडामहून माल श्लेपरवर भरून माइन्त्सला येतो; व

उलट माइन्त्सहून आमूस्टरडामला रवाना होतो. यामुळें माइन्त्सचें व्यापारी महत्त्व फार मोठें आहे. येथील मोठमोठे पूलहि पाहण्यासारखे आहेत. पुलाची मधली मोठी कमान दोही बाजूंनीं बांधलेल्या दगडी मनोऱ्यांनीं सांवरली असून, मधील रस्ता कमानीनें तोलून धरला आहे. हें एंजिनियरी कौशल्यतर अपूर्वच; पण करड्या पिंवळसर दगडाचे मनोरे बांधून, त्यांस तांबड्या कौलांनीं सुशोभित करणाऱ्या कारागिराची अभिरुचीहि वाखाणण्याजोगी होय. त्यायोगें पुलाला वैचित्र्य व सौंदर्य आलें आहे. असो.

माइन्त्सहून पुढला प्रवास फारच गोड—ह्मणजे नदीच्या अगदीं कांठानें झाला. डोंगरांतून वळणें घेत जाणारी, पाण्यानें तुडुंब भरलेली रुंद ऱ्हाइन् नदी सर्व वेळ डोळ्यांसमोर राहून अति समाधान झालें. डब्यांत एक बोलका व्यापाऱ्याचा मुनीम होता, त्यानें निरनिराळ्या ठिकाणांचीं नांवें सांगावीं. वाटेनें समोरच्या टेंकडीवर गरमानिया (Germania)नांवाचें प्रसिद्ध राष्ट्रीय स्मारक स्पष्टपणें दिसलें; त्या स्त्रीच्या चेहऱ्याचें बरोबर अनुकरण जर्मन पोस्टाच्या टिकिटावर आहे. नंतर नेपोलियनला अखेर चीत करण्यांत अर्धा वांटेकरी झालेला ब्ल्यूशर फ्रेंच हेरांना चुकवून ज्या दरींतून निघून ऱ्हाइन्ला उतरला व वेलिंग्टनच्या कुमकेला गेला, तें ठिकाणहि दुरून क्षणभर पहायला सांपडलें; येथें अगदीं नदीकांठीं त्या वीराचा पुतळा आहे. त्यानन्तर लोरेलाय नांवाचा कडा त्या गृहस्थानें दाखविला. याविषयीं पौराणिक दंतकथा अशी सांगतात, कीं, तेथें सोन्याच्या केसाची सुंदर अप्सरा असून, ती आपल्या गायनानें नदीवरून जाणाऱ्यायेणाऱ्या नावाड्यांना भुरळ पाडी व त्यामुळें त्यांचें सुकाणूचें लक्ष सुटून, त्यांच्या होड्या नदीमधील खडकावर आपटून फुटत! नंतर पुढें कॉब्लेन्सवरून रात्रीं बॉनला गेलों, व मित्राकडे ४।५ दिवस मुक्काम केला.

फारा दिवसांनीं 'मऱ्हाटें' गोड बोलणें कानावर पडून, सुनेला जसा 'माहेरचा बहायाला आला' असतां आनंद व्हावा, तसा मला व त्यांसहि झाला, यांत नवल काय ?

ऱ्हाइनूप्रोमेनाडवर सहल करणें, जवळचीं ऱ्हाइनूपलीकडचीं ड्राखेनूफेल्स वगैरे स्थळें पाहणें, व रात्रीं दोन दोन वाजपर्यंत विविध विषयांवर गप्पा मारीत बसणें यांत वेळ कसा क्षणासारखा जात असे. हवाहि फारच उत्तम होती. याप्रमाणें ९ दिवस काढून गेल्या शनिवारीं रात्रीं येथें दाखल झालों.

प्रकृति आतां चांगली आहे, वाचन तीन महिने नव्हतेंच; अजूनहि फारसें सुरू केलें नाहीं. तेव्हां त्या बाबतींतली तुमची सूचना आधींच अमलांत आली होती.

**लाइपझिक्**, १६ मे, १९१३.

दिवसांतून दोनतीन वेळ मोकळ्या हवेंत फिरायला जाणें, खिडक्या नेहमीं मोकळ्या ठेवून मोकळी हवा खोलींत खेळूं देणें, रोज सकाळीं गार पाण्याचें स्पंज्-स्नान वगैरे सर्व प्रकार मेरानच्या डॉक्टरनें सांगितल्याप्रमाणें आज दीड महिना चालू आहेत. शिवाय महिन्यांतून दोन तीन वेळ डॉक्टरकडून प्रकृति तपासून घेत असतों. त्यामुळें सर्व सुरळीत चाललें आहे. मागल्या दुखण्याची उगीच थोडीशी चुणुक लागून पडसें अजूनहि कधीं येतें; त्याची काळजी घ्यावी लागते. यापलीकडे त्रासदायक कांहीं राहिलें नाहीं. तरी यासंबंधीं काळजी वाटूं देऊं नये.

याप्रमाणें बेतानें राहून प्रकृति ताब्यांत ठेवून त्रास न होईल असें वाचन, लिहिणें वगैरे चालूच आहे. येत्या आगस्टांत सर्व संपवून सप्टेंबरांत घराची वाट धरणें आहे. ज.ठ.ठ्यामागें आठवडा जाऊन येथील

मुक्काम आतां संपत आला; तरी फार दिवस न पाहिलेल्या घराचें दर्शन घेण्याची उत्कंठा इतकी जबर आहे, कीं, राहिलेले दिवस आतां केव्हां संपतात असें झालें आहे; त्यामुळें नित्यक्रमांत मात्र बिलकूल व्यत्यय येऊं देत नाहीं.

शिवाय लाइपझिकच्या कुंद, जड हवेंतून पळ काढण्याची संधि लहानसहान सुट्यांतून साधतां येते, हें एक बरें आहे. उदाहरणार्थ, मे १ लीला स्वर्गारोहणाची सुटी होती. त्या दिवशीं चौवेपांच जण मिळून एका खेड्याकडे सकाळीं आठ वाजतां फिरायला गेलों व दुपारीं दीडला जेवायला परत आलों. वाटेंत कुकुक् (इं. ककू–आपल्या कोकिळाहून भिन्न. याची आरोळी थेट अशी असते, म्हणून हें नांव.) च्या आनंदाच्या आरोळ्या ऐकून आम्हांलाहि आनंद झाला. ज्या खेड्यांत आम्ही गेलों तेथील बड्या जमीनदाराच्या बागेंत नाख्टिगाल् (इं. नायटिंगेल–बुलबुल )चे मधुर तानांसारखे आलाप ऐकिले. हा अनुभव मला यूरोपांत आल्यापासून अगदीं प्रथमच असल्यामुळें तल्लीन होऊन उत्सुकतेनें ऐकत उभें रहावेंसे वाटे. नंतर परवां रविवारपासून फिंग्स्टेन् (इं० व्हिट्सन्‌टाइड्) ची दहा दिवस सुटी मिळाली; तिच्या पहिल्याच दिवशीं आगगाडीनें नाउम्बुर्गला गेलो, व तेथून साल नदीच्या तीरानें डोंगरी झाडींतून कोजेनवरून रूडेल्सबुर्ग नांवाच्या जुन्या गढीकडे चालत गेलों. प्रत्यक्ष सूर्यप्रकाश नसल्यामुळें उन्हाचा ताप न होतां ही पायीं सफर फार चांगली झाली; सोळा किलोमेटर ( दहा मैल ) चालत गेलों तरी कांहीं थकल्यासारखें वाटलें नाहीं. गढीवर एक जुना बुरूज, व विद्यार्थिदशेंतील तेजस्वी पण उग्र दिसणारा बिस्मार्कचा पुतळा हीं पाहिलीं. या सुटींतच तरुण बिस्मार्कचें दर्शन घेण्यासाठीं द्वंद्वयुद्ध खेळणाऱ्या विद्यार्थि मंडळ्यांतील ( ‘ कोअर ’ किंवा ‘ फरबिंडुंग , ) विद्यार्थी येत असतात; पण ते आम्हांला मुळींच दिसले नाहींत. त्यांचा येण्याचा दिवस दुसरा असावा.

गादीवरून पुनः चार किलो मेटर परत येऊन, कॉजेनला गाडींत बसलों व संध्याकाळीं साडेसहाला घरीं आलों.

अशा रीतीनें मोकळी हवा, व्यायाम, सृष्टिशोभा पाहणें, व करमणूक हीं या सफरींनीं साधतात; निराळा प्रदेश, निराळे लोक पहायला मिळतात. ही सुटी अजून आहेच; त्या निमित्तानें × × येथें येणार आहें. मग कदाचित् ड्रेसडेन्‌ला जाऊं.


समाप्त.